Fullscreen 127 14 / 87




जयद्रथाचा वध झाल्याबरोबर कृष्ण, अर्जुन व भीम सर्वांनीं आनंदानें शंखनाद केला.

भीमानें अर्जुनाला, कर्णानें त्याचा कसा अपमान केला होता हें सांगितलें. तें ऐकून अर्जुनाला फार राग आला. तो कर्णाजवळ येऊन म्हणाला—"दुष्टा ! तूं माझ्या मोठ्या भावाचा अपमान केलास, त्याबद्दल पहा, तुझ्या डोळ्यादेखत तुझा मुलगा वृषसेन याला मी यमसदनास पाठवितो."

तें ऐकून कौरव सैन्यांत हाहाकार उडून गेला. नियमाप्रमाणें सूर्यास्तानंतर युद्ध बंद व्हायला पाहिजे होतें. पण युद्ध चालू राहिलें. कारण जयद्रथाचा वध झाल्यानें दुर्योधनाला अपार दुःख वाटत होतें. याशिवाय दुर्योधनाचे एकतीस भाऊ त्या दिवशीच्या युद्धांत मारले गेले. तें दुःख इतकें अनावर होतें कीं पांडवांचें कांहीं तरी मोठें नुकसान केल्याशिवाय त्याच्या चित्ताला शांति मिळणें शक्य नव्हतें. तो द्रोणाकडे गेला व म्हणाला—"आचार्य ! भीष्माचार्यांचा वध करणारा तो शिखंडी सुद्धां अजून जिवंत आहे. माझ्या भरंवशावर जे जे अतिरथी, महारथी या युद्धांत माझ्या मदतीला धांवून आले ते एका मागून एक कमी होत आहेत. पण तुमचें अर्जुनावरचें प्रेम थोडें देखील कमी झालेलें दिसत नाहीं. शत्रु कोण व मित्र कोण याचा नीट विचार केल्याशिवाय मीं या युद्धांत उडी घेतली त्याचीं फळें मला भोगावीं लागत आहेत."

द्रोण म्हणाला—"दुर्योधना ! मी तुला कितीदां ही गोष्ट सांगितली आहे कीं अर्जुनाला जिंकणें म्हणजे थट्टा नव्हे. मी एक दरिद्र ब्राह्मण आहें म्हणून मी तुझ्या आज्ञेनें निरपराध पांडवांच्या विरुद्ध शस्त्र उचललें. त्या जयद्रथानें जें पाप केलें त्याचीं फळें त्याला भोगावीं लागणारच. त्याचें रक्षण तुझ्या किंवा माझ्या हातून का होणारें होतें. मी आपल्या शक्तीची पराकाष्टा करून पाहिली. पण अर्जुनाला अडवून धरणें मला शक्य झालें नाहीं आणि तुम्ही सर्व एकाहून एक पराक्रम महारथी होतांच ! तुम्ही तरी पहात कसे उभे राहिलांत ?"



दुर्योधन जास्त रागानें म्हणाला—"आचार्य ! तुम्ही जाणून बुजून अर्जुनाला पुढें येऊं दिलेंत. म्हणूनच सिंधुराज जयद्रथाचा आज वध झाला. तुम्ही म्हणालांत म्हणून मी जयद्रथाला पाठीशीं घातला आणि त्याला घरीं जाऊं दिलें नाहीं. त्याचा हा असा परिणाम झाला !"

कर्ण म्हणाला—"दुर्योधना ! उगाच आचार्यांना दोष देण्यांत काय अर्थ आहे ? फक्त तेच दोषी आहेत का ? या वधाची जबाबदारी त्यांच्या बरोबर आपणांवर देखील आहे !"

घनदाट अंधकार पडला. कोल्ह्यांची कोल्हेकुई आरंभ झाली. घुबडें व वटवाघळें किलकाऱ्या मारून इंसूं व खिदळूं लागलीं. पण दोन्ही सैन्यें आपापल्या शिबिरांत परतलीं नव्हतीं. दुर्योधन पांडवांच्या सैन्यांत शिरला आणि असावध लोकांचा वध करूं लागला.

दुर्योधनानें युद्ध सुरू केल्यावर द्रोणाचार्यांना नियमविरुद्ध त्या काळोख्या रात्रीच्या युद्धांत भाग घ्यावा लागला. त्यांनीं केकेय व धृष्टद्युम्नाच्या मुलांचा वध केला. पांडवांना देखील स्वरक्षणार्थ युद्ध करावें लागलें. त्यांनीं घटोत्कच व त्याचे अनुयायी राक्षस यांना युद्धभूमीवर पाठविलें. स्वतः दुर्योधन व कर्ण यांच्यासारख्या योद्ध्यांना देखील राक्षसांच्या सैन्यासमोर माघार घ्यावी लागली.


Fullscreen

127




18 / 87



एकवटुन बळ फिरून मंथन
सुरासुरांनीं सुरु केलें।
धन्वन्तरिचें रूप मनोहर
क्षीरसिंधुंतुन वर आलें ॥

हातामध्यें एक मनोहर
स्वर्णकलश पण पाहुनिया।
"अमृत आलें! धांवा, धांवा!"
दैत्य म्हणाले थांबुनिया ॥

कलश घेउनी बळ जबरीनें
करूं लागले ओढाताण।
करूं लागले मारामारी
देहाचे अन् विसरुनि भान ॥

कलश अमृताचा डोक्यावर
नाचुं लागले घेउनिया।
करूं लागले खूप ओरडा
शिरा खूप अन् ताणुनिया ॥

उड्या मारुनी टाळ्या पिटुनी
खूपशि दारू पिउनि जणूं
"अमृतघट हा सगळा अमुचा"
देवांना लागले म्हणूं ॥

हादरलें जग, दुभंगलें नभ
त्रिभुवन हललें गलक्यानें।
पुढें येउनी धीर करुन पण
म्हटलें असुरां इंद्रानें—

"केलें आपण मिळून मंथन
यशस्वि झाला श्रम अपुला;
वांटुनि वांटा घेऊं आतां
येइल जो अपुला अपुला!"

"तुमचा वांटा कसला आतां?
लागा चालूं अपुली वाट!
वाट बघत बघ बसला आहे
यम तो तुमची वाटुनि ताट!"





# अग्निद्वीप

[ ३ ]

[त्या विचित्र महालांत चित्रसेनाला मंत्री, सेनापति वगैरे बोलावुन घेऊन गेले. राजवाड्यांतल्या सर्व सुखसोयी त्या महालांत होत्या. दुसऱ्या दिवशीं चित्रसेनाचे वडील तारकेश्वर महाराज त्याला भेटायला आले. त्यांनी चित्रसेनाला वचन दिले कीं संकटसमयीं त्यानें निरोप पाठवावा, संकोच करूं नये. त्या नंतर ते निघून गेले—पुढें वाचा]

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चित्रसेन आपल्या वडिलांना निरोप देऊन जेव्हां मंत्र्यांबरोबर परत आला तेव्हां महालांत पुष्कळ लोक जमा झालेले त्याला दिसले. चित्रसेनाला जवळ आलेला पाहून त्यांनीं लोटांगण घातलें आणि म्हणाले—"महाप्रभो, रक्षण करावें! या जंगलांतला उग्राक्ष राक्षस व त्याचे अनुयायी प्रथम आमचीं गुरेंच पळवून नेत असत आतां मनुष्यांना सुद्धां उचलून नेऊं लागले आहेत. आपण रक्षण केलें तरच आमचा जीव वांचेल." चित्रसेनाची प्रजा म्हणाली.

उग्राक्षाचें नांव ऐकतांच चित्रसेनाला प्रथम कांपरें भरलें. पण त्यानें विचार केला कीं मला भ्यायचें कारण नाहीं. मी एक राजा आहें. माझ्याकडे राज्य, सैन्य, अधिकारी सर्व कांहीं आहे. राज्यांत शांतता राखणें हा राजाचा धर्म आहे. तटस्थपणा दाखवून भागणार नाहीं.



त्यानें प्रजेला विचारलें–" उग्राक्षच तुमचीं गुरें व माणसें पळवून नेतो ? हें तुम्हांला कसें कळलें."

तो प्रश्न ऐकून सर्व लोकांना आश्चर्य वाटलें. प्रजेचे पुढारी पुढें येऊन म्हणाले–" महाराज ! आमच्या पैकीं कित्येकांनीं त्या उग्राक्षाला व त्याच्या अनुयायांना गुरें पळवून नेत असतां स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिलें आहे. हें खरें कीं माणसांना पळवून नेत असलेला पाहिलें नाहीं. पण नरभक्षक राक्षसांशिवाय हें कोणाचें काम असूं शकेल ! "

त्यांचें तें उत्तर ऐकून चित्रसेनाला आश्चर्यच वाटलें. कांहीं विचार करून तो आपल्या प्रजेला म्हणाला–" बरें तर, आतां तुम्ही आपापल्या घरीं जा. त्या उग्राक्षाचा व त्याच्या अनुयायांचा समाचार घेणें माझ्या-वर सोडून द्या. त्याच्या अत्याचारांना आळा घालणें माझें कर्तव्य आहे."

चित्रसेनानें असें म्हटल्यावर पंतप्रधानानें जवळ जाऊन कानांत सांगितलें कीं महाराज ! मी त्या उग्राक्ष राक्षसाविषयीं ऐकलें आहे. माझे दूत त्याला पाहून आले आहेत. तो एक भयंकर राक्षस आहे.

चित्रसेन जिना चढत असतां म्हणाला–" असेल भयंकर ! म्हणून आपण तटस्थपणानें पहात रहावयाचें का ? त्यानें राज्यांत असा धुमाकूळ माजविला असतां, कोणताहि स्वाभि-मानी राजा कसा स्वस्थ बसूं शकेल ! सेना-पति कोठें आहेत ? "

तो प्रश्न ऐकतांच सेनापतीनें पुढें येऊन लवून नमस्कार केला आणि म्हणाला–" महाराज ! "

" आपल्याकडे किती सैन्य आहे ? या उग्राक्ष राक्षसाशीं व त्याच्या अनुयायांशीं दोन हात करूं शकेल इतकें शिक्षण त्याला दिलें गेलें आहे कीं नाहीं ? " चित्रसेनानें विचारलें.

सेनापति तें ऐकून घाबरला. कांपऱ्या आवाजांत म्हणाला—" महाराज ! तो राक्षस आहे ! " त्याचा तो घाबरा आवाज ऐकून चित्रसेनाला थोडें हंसूं आलें. म्हणाला–" सेनापति तुम्हीच त्या राक्षसाचें नांव ऐकल्याबरोबर इतके घाबरलां आहांत तर तुमच्या सैनिकांचें काय होईल हें विचारा-यलाच नको. तरी तो कोठें राहतो एवढें मला सांगा." चित्रसेन म्हणाला.

सेनापति, मंत्री व चित्रसेन जिना चढून वर गेले आणि राजवाड्याच्या किल्ल्याच्या एका बाजूच्या बुरुजावर चढून दूर पश्चिमेकडे बोट दाखवीत म्हणाले–" तें पहा महाराज ! आपलें सैन्य. शिबिर उभें करण्यासाठीं जमीन साफ करीत आहेत."

चित्रसेनाला कित्येक हजार लोक काम करीत असलेले दिसले. प्रत्येक कुऱ्हाड, कुदळ, पहार, फावडें वगैरे हातांत घेऊन जंगल साफ करण्याची खटपट करीत होते. तें पाहून चित्रसेनाला फार आनंद झाला. आपल्याकडे राजवाडा, खजिना व दरबारच नव्हें, तर एक मोठें सैन्य देखील आहे.



त्यानें मनांतल्या मनांत त्या सिद्ध पुरुषाला नमस्कार केला.

" महाराज ! त्या राक्षसावर स्वारी करण्यापूर्वी आपण मागचा पुढचा थोडा विचार करावा असें माझें मत आहे ! त्या उपर महाराजांची मर्जी ! " मंत्री म्हणाला.

" या सैन्याला त्या राक्षसांचा समाचार घ्यायला पाठवायचा माझा विचार नाहीं. मी स्वतः त्या राक्षसाला भेटून त्याच्याशीं बोलणार आहे." असें म्हणत त्यानें विचारलें–" तो कोठें राहतो हें तुम्हांला माहीत आहे का ? "

Fullscreen 127 22 / 87

"माझ्या गुप्तचरांनीं त्याच्या किल्ल्याचा पत्ता काढला आहे. परंतु महाराज! आपण त्या भानगडींत...." बोलत असतां मध्येंच सेनापतीची वाचा बंद झाली व त्याच्या अंगाला दरदरून घाम सुटला.

"मी एकटा त्याच्या किल्ल्यांत जात नाहीं. माझ्या बरोबर कांहीं सैनिक देखील जातील. तुम्हांला वाटलें तर तुम्हीं सुद्धां बरोबर यावें असें मी म्हणेन." चित्रसेन म्हणाला.

"महाराज! मीच काय, आपल्या सैन्यांतील प्रत्येक सैनिक स्वतःचा प्राण आपल्यावर ओंवाळून टाकायला तयार आहे." सेनापति म्हणाला.

कांहीं वेळानें चित्रसेन कांहीं निवडक सैनिकांना बरोबर घेऊन उग्राक्षाच्या निवासस्थानाकडे निघाला. जे गुप्तचर उग्राक्षाचें निवासस्थान पाहून आले होते ते पुढें पुढें चालले होते. ऐन दुपारच्या वेळीं रानांत खूप दूर चालत गेल्यावर ते एका डोंगरी ओढ्याच्या काठीं पोंचले. तेथेंच उग्राक्ष रहात असे.

डोंगराखालच्या रानांत कांहीं राक्षस होते. त्यांनीं चित्रसेन व त्याच्या अनुयायांना येतांना पाहिलें व हंसूं लागले. "ओहो! हे लोक किती शहाणे दिसत आहेत. स्वतः पायीं चालत येत आहेत. आपल्याला दोन तीन दिवसांपुरेसा तरी आहार मेहनत केल्याशिवाय मिळणार आहे!" राक्षस आपसांत बोलत होते.

चित्रसेन जवळ येऊन त्या राक्षसांना ओरडून म्हणाला तुम्ही आपल्या राजाला जाऊन सांगा. मी येत आहें. माझें नांव चित्रसेन आहे!"

तें ऐकून राक्षस जास्तच जोरजोरानें हंसूं लागले. म्हणाले—"नरमांस मग तें कोणाचेंहि असो सारखेंच चवदार असतें. तुझें मांस काय जास्त चवदार आहे होय? तुझे कपडे तर छान रेशमी दिसत आहेत. तूं राजा आहेस वाटतें, या लोकांचा?"

"होय मी राजा आहें! महाराज चित्रसेन माझें नांव आहे. या रानांत दहा कोस अंतरावर जो एक राजवाडा आहे तो तुम्हांला माहीतच असेल." चित्रसेनानें दरडावून विचारलें.

त्या राजवाड्याचें नांव ऐकतांच राक्षस थोडे चपापल्यासारखे दिसले. म्हणाले—"माफ करा. आमच्या राजानें आपल्या-





Fullscreen 127 24 / 87



विषयीं आम्हांला सांगितलें आहे. आपली व त्यांची एकदां भेट झाली होती असें आम्ही ऐकलें आहे. यावें, यावें ! आमचे महाराज आंत किल्ल्यांत आहेत." असें सांगून ते चालूं लागले आणि चित्रसेन आपल्या सैनिकांबरोबर त्यांच्या मागें चालूं लागला.

उग्राक्षाचा किल्ला विचित्रच होता. एक डोंगरच पोखरून एक राजवाडा बांधला होता. डोंगराचाच बाहेरचा भाग खोदून त्याचा किल्ला केला होता. चार बाजूला चार बुरुज होते. मुख्य द्वार पूर्वेकडे होतें. सर्व एकाच दगडाचें होतें. युद्ध करून तो किल्ला सर करणें मनुष्याला काय, राक्षसांना देखील अशक्य होतें. असा तो एक अजिंक्य किल्ला होता.

चित्रसेन किल्ल्यांत शिरला. दुरून उग्राक्ष राक्षसानें त्याला आंत येतांना पाहिलें व मोठमोठ्यानें हंसूं लागला. तो आपल्या घरासमोरच्या एका पायरीवर येऊन बसला होता.

"चित्रसेन ! तुझा तो मोठा मुलगा कोठें आहे ? तूं कबूल केलें होतेंस ना कीं तूं घेऊन येशील म्हणून ?" असें विचारीत चित्रसेनानें सर्व सैनिकांकडे लक्षपूर्वक पाहिलें.

"उग्राक्षा ! तुला वेड तर नाहीं लागलें ? अरे ! मी तुला काल नाहीं परवांच तर वचन दिलें होतें. या अवधींत अठरा वर्षें निघून गेली असतील असें वाटलें तुला ?" चित्रसेनानें धीटपणानें प्रश्न केला.

चित्रसेनाचें तें वाक्य ऐकून उग्राक्ष जास्तच जोरानें हंसला. म्हणाला—"राक्षसाची बुद्धि ठिकाणावर असतांना त्याला कोणी वेडा म्हटलें आणि समज त्याला खरोखरचेंच वेड लागलें तर माणसांची जात या पृथ्वीवर उरेल तरी का ? आतां मी वेडा कीं तूं ? सांग" ।

"मला सर्व माणसांच्या जातीच्या वतीनें बोलण्याचा अधिकार नाहीं, पण मी आपल्या राज्यांतल्या प्रजेच्या वतीनें खास विचारूं शकतों. माझ्या राज्यांतली प्रजा मात्र रोज कमी होऊं लागली आहे." चित्रसेन म्हणाला.

"तुझें राज्य !" विचारीत उग्राक्षानें आश्चर्य प्रगट केलें व स्मित करून म्हणाला— "होय ! उग्राक्षाचें सारें जंगल आतां तुझेंच झालें आहे नाहीं का ? नर्मदा नदीच्या काठचें धवलगिरीचें राज्य सोडून सर्व राज्य या उग्राक्षाचेंच आहे."

"या रानांतील खेडे गांवांत राहणाऱ्या लोकांचा संहार तुझ्या अनुयायांनीं चालविला आहे. त्यांचीं गुरें धरून नेत आहेत. मुलांबाळांना लहान थोर माणसांना ते धरून नेत आहेत. हें सर्व तूं दिलेल्या वचनाच्या विरुद्ध आहे. चित्रसेनानें धीटपणानें दरडावून विचारलें.

चित्रसेनाचा तो धीटपणा पाहून उग्राक्ष देखील चकित झाला. त्याचे शब्द तोंडांतल्या तोंडांत राहून गेले. समोरच्या



दगडांकडे बोट दाखवीत तो म्हणाला— "सर्व एकेका दगडावर बसा." नंतर चित्रसेनाकडे वळून म्हणाला—"चित्रसेन ! तूं चुकतो आहेस. तुझ्या राज्यांतल्या प्रजेवर अत्याचार करणारे माझे अनुयायी किंवा मी नाहीं. त्याची जबाबदारी माझ्यावर नाहीं."

"म्हणजे तुझें म्हणणें असें आहे वाटतें कीं या सर्व अत्याचाराला जबाबदार दुसरा कोणी आहे ?" चित्रसेनानें विचारलें.

"माझें असें म्हणणें नाहीं कीं माझ्या अनुयायांनीं कधींच कोणाला उचलून आणलें









Fullscreen 127 26 / 87

नसेल. सणावारीं दोघां तिघांना उचलून आणलें असेल कदाचित. परंतु खेडेगांव उध्वस्त करणारा कोणी दुसराच असला पाहिजे." उग्राक्ष बोलतां बोलतां थांबला. चित्रसेनाकडे पहात थोड्या वेळानें त्यानें विचारलें– "चित्रसेन! तूं अग्निद्वीपाचें नांव ऐकलें आहेस का?"

"अग्निद्वीप! या नांवाचें द्वीप आहे हें मी कधीं ऐकलें नाहीं." चित्रसेन आश्चर्य करीत म्हणाला.

"बरें तर आज तूं व तुझे हे अनुयायी येथें रहा. मी आज रात्रीं तुम्हांला ते क्रूर लोक कोण हें दाखवितों. ते अग्निद्वीपांत राहतात. राक्षसांसमोर ते कांहीं करूं शकत नाहींत. परंतु ते एक तऱ्हेच्या भयंकर जनावरांवर बसून येतात. त्या जनावरांना पाहिलें कीं आम्हां राक्षसांना सुद्धां धडकी भरते. त्या जनावरांना पंख आहेत. ते आकाशांत उडतात. म्हणून त्यांना जनावरें म्हणण्यापेक्षां पक्षी म्हटलें तर जास्त बरोबर होईल. त्या विचित्र पक्ष्यांच्या पाठीवर बसून येणाऱ्या लोकांपैकीं फक्त एकालाच आम्हीं आजपर्यंत पकडूं शकलों. पण तो दुसऱ्याच दिवशीं मेला. कां व कसा हें नाहीं कळलें. त्याचा अस्थिपंजर मात्र उरला आहे. पाहिजे तर पहा. मी तुला दाखवितों." उग्राक्ष म्हणाला.

"अस्थिपंजरच नव्हे तर मी त्या दुष्ट जातीच्या लोकांनाच पहावें, म्हणतों. त्यांचे ते भयंकर पक्षी कसे काय आहेत हें डोळ्यांनीं पहावयाचें आहे मला." चित्रसेन म्हणाला. उग्राक्षानें मान हलवून ठीक आहे, दाखवितों असें सुचविलें.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं.]



## अपराधाबद्दल बक्षीस

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. शव खांद्यावर टाकलें आणि निश्शब्दपणें स्मशानाच्या दिशेनें चालूं लागला. तेव्हां वेताळ बोलूं लागला– "राजा! तुझी निष्ठा पाहिली म्हणजे खरोखर आश्चर्य वाटतें. पैसे देऊन सुद्धां कोणी इतक्या निष्ठेनें काम करील असें मला वाटत नाहीं. रामभद्रासारखीं कांहीं निष्ठावान माणसें देखील ऐन वेळीं आपली निष्ठा गमावून बसतात. पण तूं म्हणजे तूंच आहेस. तुला या एकान्त वेळीं कंटाळा वाटूं नये म्हणून मी रामभद्राची गोष्ट सांगतों, ऐक." त्यानें गोष्ट सुरू केली–

"अयोध्या नगरींत रामभद्र नांवाचा एक क्षत्रिय तरुण रहात असे. तो जगांत एकटा होता. पोटापाण्यासाठीं त्याला नोकरी करावी लागे.

एकदां त्याला एक नोकरी लागली. ही त्याच्या आयुष्यांतली शेवटचीच नोकरी

Fullscreen 127 28 / 87



ठरली. अयोध्येपासून थोड्या अंतरावर एका खेड्यांत रामभरोसे नांवाचा एक श्रीमंत म्हातारा क्षत्रिय रहात असे. उतार-वयामुळें त्याचें शरीर कसें कांटा होऊन गेलें होतें. त्याला एकुलता एक मुलगा होता. तो हि गेल्यानें म्हातारा आयुष्याला वैतागला. त्यांत त्याचा तापट स्वभाव. कामावर कोण टिकणार? कित्येक नोकर चार दिवस काम करून निघून गेले. तसा पगार चांगला मिळत असे. त्या बरोबर लाखोली आणि पाठीची पूजा पण होई. मग हें सर्व कोण सहन करणार?

रामभद्राच्या नशिबीं त्याच म्हाताऱ्याच्या पदरीं नोकरी करण्याचें आलें. त्यानें गांव-कऱ्यांच्या तोंडीं म्हाताऱ्याच्या स्वभावाचें वर्णन ऐकलें होतें. तरी त्यानें विचार केला– म्हातारे थोडे तापट असतातच. आपण थोडी सेवा शुश्रूषा केल्यावर म्हातारा खूष होईल! एकूण रामभद्र नोकरीला लागला.

नवा नोकर म्हणून म्हाताऱ्यानें त्याला घरांतलें सर्व काम नीट समजावून सांगितलें आणि त्याच्यावर उगीच राग काढावयाचा नाहीं असें मनाशीं ठरविलें. पण हरिदासाची कथा पुन्हां मूळपदावर आली.

रामभद्राला आढळून आलें कीं या खाष्ट म्हाताऱ्याकडे नोकरी करणें कोणालाहि शक्य नाहीं. म्हातारा तापला कीं जें हातांत येई तें टाळक्यांत घाली. त्यानें रामभद्राची वेळीं अवेळीं पुष्कळ पाठपूजा केली. एकदां राग आला कीं रामभरोसेच्या क्रूरपणाला सीमा नसे.

एक दिवस रामभद्र इतका कंटाळला कीं त्यानें ती नोकरी सोडावयाचें मनाशीं ठरविलें आणि आपले कपडे व सामान सुमान एका पिशवींत घालून जाण्याची तयारी करूं लागला. रामभरोसेनें तें पाहिलें





व त्याला बोलावून म्हणाला–"माझ्यावर असा रागावून निघून गेलास तर मला कोण विचारील? अनाथ मुलासारखी माझी स्थिति होईल."

रामभरोसेच्या त्या वाक्यानें रामभद्रचें मन विरघळलें. त्याच्या मनांत बदल झाला. परंतु रामभरोसेचा मात्र मूळ स्वभाव जाईना.

गांवांतलीं कांहीं थोर म्हातारीं माणसें रामभरोसेला भेटायला येत तेव्हां म्हणत– "बाळ, तूं फार गुणी दिसतोस इतकी सहनशक्ति व सोशिकपणा दुसऱ्या एकाहि नोकरानें दाखविला नाहीं. या म्हाताऱ्या-जवळ कोणाचा निभाव लागेल तर ना? अशीच सेवा करीत रहा. चार दिवसांचा पाहुणा आहे."

डॉक्टर वैद्य जो कोणी येई, म्हाताऱ्याच्या औषधपाण्याची काळजी घेण्यास रामभद्रलाच सांगून जाई.

रामभद्रनें स्वत:ला जणुं कांहीं कैदीच करून घेतलें होतें. म्हाताऱ्याच्या एका गोड शब्दावर तो रहावयास तयार झाला होता. म्हणून ही नोकरी सोडवेना व भरून राहवेनाहि. म्हातारा आहे तोंपर्यंत त्याची नोकरी करावयाची, जणुं हेंच त्याच्या नशिबीं लिहिलें होतें.

सुमारें एक वर्ष हो ना हो ना करीत लोटले. अयोध्येला जाण्याची इच्छा राम-भद्रच्या मनांत बळावत चालली. रामभरोसेचे अत्याचार वाढतच होते. झालेला पगार मागून घेऊन निघून जावें असा त्यानें मनाशीं निश्चय केला. झाली ती सेवा पुरे झाली.

म्हाताऱ्याला भेटायला जे लोक येत त्यांना तो म्हणे–"आजोबांच्या सेवेला कोणी दुसरा नोकर ठेवून घ्या. मला नाहीं हें काम होत. मी चार दिवसांनीं जाणार आहें."


Fullscreen

127





30 / 87


ते म्हणत–"अरे, इतकी घाई कां ? एवढा पावसाळा जाऊं दे. इतके दिवस धीर धरलास तसा आणखी कांहीं दिवस धर. कसे तरी हे तीन महिने निघून गेले म्हणजे मग दुसरा नोकर ठेवून घेऊं."

शेवटीं रामभद्रानें नोकरी सोडण्याचा विचार रहित केला. पण त्याचा त्रास कमी होण्याऐवजीं वाढतच गेला. म्हाताऱ्याची सेवाशुश्रूषा करतां करतां तो स्वतःच इतका अशक्त झाला कीं आजारी पडतो कीं काय शंका वाटूं लागली. त्याला पगार चांगला मिळत होता. पण मिळून काय उपयोग ? त्याच्या जिवाला सुख नव्हतें.

म्हणून पुन्हां एक दिवशीं रामभद्रानें निघून जायचें ठरविलें. रामभरोसेकडे त्याचे पगाराचे सर्व पैसे तसेच जमा होते. मागायला गेलें तर मी निघून चाललों आहे असें म्हाताऱ्याला वाटेल. म्हणून पगार सुद्धां सोडून जावयाचें त्यानें ठरविलें. इतका तो कंटाळला होता.

परंतु त्याच दिवशीं दुपारीं म्हाताऱ्यानें गांवच्या पाटलांना बोलावून त्यांच्या हातांत एक मोठा कागद दिला. तें त्याचें मृत्युपत्र होतें. त्याची सर्व मिळकत त्यानें कोणाच्या तरी नांवें लिहून ठेवली होती.

रामभद्रला जेव्हां मृत्युपत्राची गोष्ट कळली तेव्हां म्हातारा आतां जाणार. फार दिवस त्रास सोसावा लागणार नाहीं. गेले तसे आणखी कांहीं दिवस असेच घालवावे असा त्यानें विचार केला. जर निघून गेलों तर लोक काय म्हणतील ?

असेंच कांहीं दिवस लोटले. म्हाताऱ्याचा आजार वाढत चालला. त्याबरोबर त्याचा तापटपणा देखील वाढत होता. त्याला दिवसभर काम असे व रात्रभर म्हाताऱ्याची सेवा करावी लागे. त्याचा डोळा लागूं लागला कीं तेवढ्यांत म्हातारा त्याला हाक मारी–"अरे, पेंगूं लागलास वाटतें ? ऊठ औषध दे ! पाणी दे !"

एकदां रात्रीं म्हाताऱ्यानें कितीदां तरी हांका मारल्या असतील. पण रामभद्रची झोप मोडली नाहीं. म्हातारा इतका तापला कीं त्यानें मागेंपुढें कांहीं पाहिलें नाहीं आणि हाताला तांब्या लागला तोच उचलून रामभद्रला भिरकावून मारला.

रामभद्र दचकून ओरडला. त्याचें सर्व तोंड रक्तबंबाळ झालें होतें. पण त्याचें













Fullscreen 127 32 / 87

त्याला भान नव्हतें. त्याला मालकाचें ओरडून रागावणें तेवढें ऐकूं आलें. डोक्याला जेथें जखम झाली होती तेथें दुखूं लागलें. म्हणून त्यानें हात लावून पाहिला तेव्हां त्याला रक्त येत असल्याचें कळलें. त्याला म्हाताऱ्याचा इतका राग आला कीं त्यानें म्हाताऱ्याचें तोंड दोन्ही हातांनीं दाबून धरलें. म्हातारा दोन मिनिटें तडफडला आणि त्यानें अंग टाकलें आणि डोळे फिरविले.

रामभद्र घाबरून गेला. केवढा अपराध केला मी ! त्यानें जवळ पासच्या लोकांना धांवत जाऊन बोलावून आणलें. थोड्या-वेळानें वैद्यबुवा पण आले. ते म्हणाले—"म्हातारा इतके दिवस जगला हेंच आश्चर्य ! रामभद्रनें आपल्या सेवेनें त्याचें आयुष्य वाढविलें होतें."

तें ऐकून रामभद्र खजील झाला. लोकांचा माझ्यावर इतका विश्वास ! आणि मी हें काय केलें ! पश्चात्तापानें त्याला रडूं कोसळलें. लोकांना वाटलें कीं म्हातारा गेल्याचें त्याला दुःख होत आहे. म्हणून लोकांनीं त्याचें सांत्वन केलें व त्याच्या स्वामीभक्तीची प्रशंसा केली.

दुसऱ्या दिवशीं गांवच्या पाटलांनीं गांवां-तल्या सर्व प्रमुखांना बोलावून त्यांच्या समोर ते मृत्युपत्र वाचलें. म्हाताऱ्या रामभरोसेनें सर्व संपत्ति रामभद्रच्या नांवीं लिहून ठेवली होती. हें कळल्यावर तर त्याला फारच दुःख वाटूं लागलें. म्हाताऱ्यानें दिलेल्या संपत्तिपैकीं एका पैलादेखील हात लावावयाचा नाहीं असें त्यानें ठरविलें. मला म्हाताऱ्याची संपत्ति नको असें जर सांगितलें तर सर्व कारण विचारतील. म्हणून संपत्ति घेऊन गोरगरिबांना वांटून टाकावी किंवा धर्मकार्यांत खर्च करून टाकावी असें त्यानें मनाशीं ठरविलें.

त्याला एवढी मोठी संपत्ति फुकटांत मिळाली असें कोणाला वाटलें नाहीं. कारण गांवातले सर्व लोक म्हणत "हा देवमाणूस आहे ! नाहींतर त्या क्रूर म्हाताऱ्याची सेवा इतके दिवस कोणी केली असती का ! राक्षस होता राक्षस ! रामभद्र म्हणूनच इतके दिवस टिकून राहिला. दुसरा कोणी राहिला असता का !" सर्व रामभद्राच्या सोशीकपणाची वाखाणणी करीत होते.

इतर लोक रामभरोसेची निंदा करीत असत. पण रामभद्र मात्र त्याची प्रशंसाच करीत असे. म्हणे—"खडक फोडूनच पाण्याचा झरा बाहेर वाहात येतो. म्हताऱ्याचें हृदय तसेंच होतें."






Fullscreen 127




34 / 87



हळूहळू रामभद्राच्या मनांत बदल होऊं लागला. त्यानें दानधर्म कमी केला. पैसा वांचवूं लागला. त्यानें लग्न करून घेतलें आणि आपला संसार थाटला. तो संसारांत इतका रमला कीं त्यानें केलेले सर्व निश्चय तो पार विसरून गेला.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें—"राजा, जो रामभद्र आपल्या पापकर्मा-बद्दल इतका पश्चात्ताप करीत होता त्याचा विचार असा एकदम कसा काय बदलला? आपण करीत आहों तें बरोबर आहे असें त्याला वाटूं लागलें होतें काय? किंवा मोहाला बळी पडून त्याचें मन अगदीं थंडगार होऊन गेलें होतें! या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिलीं नाहींस तर तुला परिणाम माहीतच आहे. तुझें डोकें तुझ्याच पायांवर शंभर छकलें होऊन आदळेल.

विक्रमार्क म्हणाला—"रामभद्रानें विचारपूर्वक रामभरोसेचा वध केला नव्हता. त्याचा स्वतःच्या बुद्धीवर वश राहिला नव्हता. म्हणून त्याच्या हातून अगदीं अनपेक्षितपणें म्हातार्‍याचा जीव गेला. रामभद्रला मात्र वाटत होतें कीं आपल्याच हातून म्हातार्‍याचा खून झाला. म्हणून केलेल्या अपराधाबद्दल त्याला पश्चात्ताप वाटणें अगदीं साहजिक होतें. परंतु स्वतःच्या निर्णयापेक्षां जगाचा निर्णयच जास्त महत्वाचा असतो. जगानें त्याला निर्दोष मानलें होतें. म्हणून त्याच्या मनाला शांतिलाभ झाला आणि तो सामान्य माणसासारखा म्हातार्‍याच्या धनाचा उपयोग करूं लागला.

राजाचें मौन भंग होतांच वेताळ नाहींसा झाला आणि झाडावर जाऊन लटकूं लागला.

(कल्पित)






# रत्नावली

सिंहल देशाचा राजा विक्रमबाहु यास रत्नावली नांवाची एकुलती एक मुलगी होती. वत्सदेशाचा राजा उदयन याचा मंत्री यौगंधराय याला एका सिद्ध योग्या-कडून असें कळलें कीं तिचा पति एक चक्रवर्ति राजा होईल. आपला राजा चक्रवर्ति व्हावा असें यौगंधरायाला वाटलें. म्हणून त्यानें सिंहल देशाचा राजा विक्रमबाहु याज-कडे दूत पाठवून राजकन्या रत्नावलीला आपल्या राजाच्या वतीनें मागणी घातली. परंतु उदयन महाराजांची पहली राणी वासव-दत्ता ही विक्रमबाहूची पुतणी होती. आपल्या मुलीला पुतणीची सवत करून घरांत भांडणें लावणें त्याला पसंत नव्हतें म्हणून त्यानें यौगंधरायाला नकार दिला.

परंतु सिंहल देशांत कांहीं दिवसांनीं अशी बातमी आली कीं वासवदत्ता लावणक येथें अग्निहोत्रांत पडून मरण पावली. म्हणून सिंहल देशाचा राजा उदयन महाराजांशीं रत्नावलीच्या विवाहास कबूल झाला. त्यानें आपल्या मुलीला वसुभूति नांवाचा मंत्री व यौगंधरायनें पाठविलेला दूत यांच्या बरोबर कौशांबीला पाठवून दिलें.

एका जहाजांत प्रवास करीत असतां एक मोठें वादळ आलें आणि त्यांत एका खडकावर आपटून त्यांच्या जहाजाचे तुकडे तुकडे झाले. सुदैवानें रत्नावलीला जहाजाची फळी मिळाली व त्यावर तरंगत तिनें आपला जीव वांचविला. कौशांबीचा एक व्यापारी त्या बाजूनें जात असतां त्यानें रत्नावलीला त्या स्थितींत वांचविलें आणि यौगंधराय याच्याकडे तिला नेऊन पोंचविलें.

यौगंधरायाला ही तरुणी रत्नावलीच आहे हें कळल्यावर फार आनंद झाला. त्यानें रत्नावली

सौ. गंगादेवी आपटे

Fullscreen
127
36 / 87



साठीं उदयन महाराजांच्या वतीनें जेव्हां मागणी घातली तेव्हां महाराजांना ही गोष्ट कळविली नव्हती. कारण महाराजांचें वासवदत्तेवर फार प्रेम होतें. म्हणून यौगंधरायानें रत्नावलीचें नांव सागरिका असें ठेवून तिला वासवदत्तेच्या महालांत दासी म्हणून नेमलें.

वसंतोत्सव आला. राणी वासवदत्ता मकरंद उद्यानांत रक्ताशोक वृक्षाजवळ आपल्या सर्व सखींना बरोबर घेऊन मन्मथाच्या पूजेसाठीं आली. उदयन आपला मित्र विदूषक वसंतक याच्या बरोबर उत्सवाची गंमत पहावयास त्याच बाजूला आला.

इतर परिचारिकांबरोबर सागरिकापण तेथें आली. तिचें रूप लावण्य पाहून राणीला भय वाटूं लागलें. म्हणून चातुर्यानें तिला दूर पाठवावयाचें ठरवून वासवदत्ता तिला म्हणाली—"हें पहा, तूं या पोपटाचा पिंजरा घेऊन जा. कांचनमाला पूजाद्रव्य देण्यासाठीं येथें राहील."

सागरिकेनें पूर्वी कधीं मन्मथपूजा पाहिलेली नव्हती. तिला तो उत्सव पाहण्याची फार इच्छा होती. पण राणीची आज्ञा झाल्यानें तिला जावें लागलें. तरी फुलें तोडण्याचें कारण काढून ती दृष्टि आड उभी राहली. तिनें मन्मथपूजा पाहण्याचें आपल्या मनाशीं ठरवून टाकलें होतें.

ती फुलें तोडीत असतां त्याच बाजूनें महाराज उदयन वसंतकाबरोबर आले. वासवदत्तेनें मन्मथ पूजा समाप्त करून पतीची पूजा सुरू केली होती. फुलें तोडून झाल्यावर सागरिका एका झुडपा आड उभी राहून ती पूजा पाहूं लागली.

उदयन महाराजांचें सौंदर्य पाहून ती मुग्ध झाली. तिला वाटलें कीं या देशांत स्वतः मन्मथच पूजेच्या वेळीं हजर राहून पूजेचा स्वीकार करतो. तिचें मन उदयन महाराजांनीं



हिरावून घेतलें होतें. तिनें सुद्धां मन्मथाची पूजा करण्याचें ठरविलें.

ती एका बाजूला गेली व एका चित्र-पटावर उदयन महाराजांचें चित्र मन्मथ समजून काढूं लागली. इतक्यांत सुसंगति नांवाची एक दासी पोपटाचा पिंजरा घेऊन तेथें आली. सागरिकानें तें चित्र लपविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

सुसंगतीनें उदयनचें चित्र ओळखलें होतें. तरी तिनें तिला विचारलें—"सागरिका हें कोणाचें ग चित्र?"

"मन्मथाचें!" सागरिका म्हणाली.

"तर मग बाजूला रतीला उभें केल्याशिवाय हें चित्र पूर्ण होणार नाहीं." सुसंगति थट्टेनें म्हणाली. असें सांगून तिनें उदयनच्या बाजूला सागरिकेचें चित्र काढलें.

"हें काय तूं माझें चित्र काढते आहेस?" सागरिकेनें विचारलें.

"तूं मन्मथाचें चित्र काढलेंस, मी रतीचें काढलें. यांत काय चुकलें." असें म्हणून ती खदखदां हंसूं लागली.

सुसंगति तिच्या विश्वासांतली सखी होती. म्हणून तिनें घडलेली सर्व गोष्ट तिला सांगितली



व महाराजांवर तिचें मन बसलें आहे हें देखील सांगून टाकलें. इतक्यांत ओरडा झाला कीं माकड सांखळी सोडून पळालें. त्या दोघींना वाटलें कीं माकड त्यांच्याकडेच येत आहे. म्हणून त्या पळून गेल्या आणि एका अडोशाच्या जागीं येऊन उभ्या राहिल्या. या गडबडींत पोपट पिंजऱ्यांतून उडाला. दोघी त्याला शोधायला म्हणून निघाल्या.

त्याच वेळीं राजा उदयन वसंतकाबरोबर त्या बाजूला आले. त्यांच्या वाटेवरच तो पोपट झाडावर बसून, त्यानें त्या दोघींचें जें बोलणें ऐकलें होतें तें, बोलत होता. राजाला


Fullscreen

127





38 / 87





त्याचें बोलणें ऐकून अर्थातच कुतूहल वाटलें. त्याच्या बोलण्यावरून महाराजांना एवढें कळलें कीं कोण्या सुंदरीनें आपल्या प्रियकराचें चित्र काढलें आहे. तिच्या सखीनें विचारलें कीं तो कोण? तर ती म्हणाली—"मन्मथ!" त्यानंतर विचारणाऱ्या सखीनें आपल्या सखीचें चित्र तिच्या प्रियकराजवळ काढलें आणि म्हणाली—"ही रति!" हें ऐकून वसंतकानें टाळी वाजविली. त्याबरोबर घाबरून पोपट उडून गेला.

वसंतकानें पोपटाला उडविलें नसतें तर तो आणखी काय काय बोलला असता कोणास ठाऊक? असा विचार करीत राजानें कदलीगृहांत प्रवेश केला आणि तेथें त्यानें स्वतःचें चित्र पाहिलें. जवळ एका अपरूप सुंदरीचें चित्र पाहून राजानें तिच्या सौंदर्याची खूपखूप वाखाणणी केली.

या अवधींत सागरिका व सुसंगति परत कदलीवनाकडे आल्या. त्यांनीं आडून राजाचें बोलणें ऐकलें.

"रति-मन्मथाचें चित्र पहा महाराजांच्या हातांत आहे. जाऊन घे ना आतां!" सुसंगति सागरिकेला चिडवीत म्हणाली. परंतु सागरिका राजासमोर जायला लाजली.

म्हणून सुसंगतीनें पुढें जाऊन राजाजवळ तें चित्र मागितलें. राजानें चित्र देण्याचें नाकारलें. तेव्हां गालांत हंसत सुसंगति म्हणाली—"मी सर्व ऐकलें आहे. मला सर्व कळतें. चित्र दिलें नाहीं तर राणी साहेबांकडे जाऊन सर्व सांगून टाकीन."

"तूं रागावलीस होय! मी थट्टेंत देणार नाहीं असें म्हटलें होतें. ही घे मोत्यांची-माळ तुला बक्षीस!" राजा म्हणाला.

"मी तरी थट्टेंत भीति दाखविली होती. मला नको ही मोत्यांची माळ. खरा राग जिला यायला पाहिजे ती सागरिका पहा बाजुला लपून बसली आहे. तिला द्या जें बक्षीस द्यायचें असेल तें." सुसंगती म्हणाली.

"कुठें आहे ती? कुठें आहे?" विचारीत राजा सागरिका होती तिकडे गेला. तिचा हात आपल्या हातांत घेऊन प्रेमाचे दोन शब्द बोलला. इतक्यांत राणी वासवदत्ता आपली सखी कांचनमाला हिच्या बरोबर तेथें आली. सागरिका आणि सुसंगति त्या आधींच तेथून निघून गेल्या होत्या.

दुर्दैवानें त्या चित्रावर राणीची नजर गेली. त्यांत महाराजांबरोबर सागरिकेचें चित्र पाहून राणीच्या तळपायाची आग मस्तकापर्यंत गेली. तिनें महाराजांना विचारलें—"आपल्या शेजारच्या रमणीचें चित्र कोणी काढलें?" राजानें खरी गोष्ट लपवून उत्तर दिलें—"मीच स्वतःच्या कल्पनेनें हें चित्र रेखाटलें आहे!"

परंतु राजाच्या बोलण्यावर राणीचा विश्वास बसला नाहीं. ती रागानेंच तेथून निघून गेली. राजाजवळ एक शब्द देखील



Fullscreen 127 40 / 87



बोलली नाहीं. त्यानंतर तिनें सगळा राग सागरिकेवर काढला. तिच्यावर कडक नजर ठेवण्यांत आली. तिच्या हालचालीवर बंधनें घालण्यांत आलीं. राजाला सागरिकेची भेट न झाल्यामुळें कांहीं सुचेना. वसंतकानें राजा व सागरिकेची भेट व्हावी म्हणून एक उपाय योजला. त्यानें राणीचीं वस्त्रें नेसवून सागरिकेला माधवीलता मंडपांत घेऊन यायला सुसंगतीला सांगितलें.

ही गोष्ट एका दासीकडून वासवदत्तेला पण कळली. तिनें जें ऐकलें होतें तें खरें कीं खोटें हें कळावें म्हणून राणी स्वतः माधवी लतामंडपाजवळ जाऊन उभी राहिली. परंतु काळोख असल्यामुळें तिलाच सागरिका समजून राजा तिच्याशीं बोलला. तें ऐकून राणीला फारच राग आला. "मी सागरिका वाटल्यें होय महाराजांना?" वासवदत्तेनें विचारलें.

राजाचे डोळे उघडले. तो राणीची माफी मागूं लागला. परंतु चुकीची दुरुस्ती होणें अशक्य होतें. म्हणून राणी एक शब्द देखील बोलल्याशिवाय तेथून निघून गेली. तितक्यांत सागरिका वासवदत्तेचीं वस्त्रें परिधान करून आली. तिला पाहून राजाच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं.

इकडे राणीला राजावर कोप केल्या-बद्दल थोडें वाईट वाटलें. राजाला दुःख झालें असेल असें समजून ती माफी मागण्या-साठीं परत आली. पण राजाला सागरिके-बरोबर प्रेमालाप करतांना पाहून ती दचकून मागें सरकली.

आतां सागरिकेला डोळ्याआड केल्या-शिवाय उपाय नाहीं असा मनाचा निर्धार करून राणीनें सागरिकेला अंतःपुरांतल्या एका खोलींत बंद करून ठेविलें. ही गोष्ट कोणाला कळली नाहीं. परंतु सागरिकेनें भावी संकटाची कल्पना येतांच आपला रत्नहार सुसंगतीला देऊन तो कोणातरी ब्राह्मणाला दान करण्यास सांगितलें. तिनें तो वसंतकाला नेऊन दिला.



राजाला सागरिकेचा विरह असह्य झाला होता. त्यांत वसंतकाच्या गळ्यांत तिचा रत्नहार पाहून त्याचें दुःख जास्तच वाढलें.

इतक्यांत असें कळलें कीं वासवदत्तेचें माहेरगांव उज्जयिनी येथील कोणी जादुगार आला आहे. राजाच्या दुःखी मनाला थोडी करमणूक होईल असा विचार करून राणीनें जादूचे खेळ करून दाखविण्यास त्याला सांगितलें. जादुगारानें एक मोठा चमत्कार दाखविला. सर्वांना आकाशांत ब्रह्मा, विष्णु, महेश यांच्याबरोबर स्वर्गांतले देव व अप्सरा दिसूं लागल्या. जादूचे खेळ चालू असतांच यौगंधरायनें राजाच्या भेटीस अपरिचित पाहु-ण्यांस पाठविलें. हे दोघे दुसरे कोणी नसून यौगंधरायानें सिंहलच्या राजाकडे पाठविलेला दूत व सिंहल देशाचा मंत्री वसुभूति होते. जहाज फुटल्यावर दोघे कांहीं काळानें किनाऱ्याला लागले होते.

राजानें जादुगाराला कांहीं वेळ खेळ बंद करायला सांगितलें.



"महाराजांची आज्ञा शिरोधार्य आहे! एकच खेळ उरला आहे तो मागाहून दाख-वीन." असें सांगून जादुगार बाजूला झाला.

वसुभूतीनें वसंतकाच्या गळ्यांत सिंह-लच्या राजकन्येचा रत्नहार पाहिला. तो पाहून त्यानें चकित होऊन जहाज फुटून सिंहलची राजकन्या कशी समुद्रांत पडली याचें वर्णन केलें आणि म्हणाला—"राजकन्या महाराजांशीं लग्न करण्याच्या हेतूनेंच येत होती."

यौगंधरायाच्या प्रयत्नानें रत्नावलीशीं आपला विवाह होणार होता हें जेव्हां


Fullscreen

127





42 / 87



राजाला कळलें तेव्हां त्याला आश्चर्य वाटलें. कारण त्याला त्यांतलें कांहींच माहीत नव्हतें.

परंतु आपली बहीण समुद्रांत बुडून मेल्याचें ऐकून राणी रडूं लागली.

त्याच वेळी एकाएकीं अंतःपुराला आग लागल्याचें पाहून राजवाड्यांत ओरडा झाला. वासवदत्ता ओरडली—"वांचवा! वांचवा!" राजा म्हणाला—"घाबरूं नकोस. मी आहें."

"तें नव्हें! मी सागरिकेला अंतःपुरांत बांधून ठेवलें आहे. तिला वांचवा!" वासवदत्ता म्हणाली.

राजानें मागें पुढें पाहिलें नाहीं व आगीचे लोट येत होते तरी तो अंतःपुरांत शिरला. त्याच्या पाठोपाठ अनेक लोक आंत शिरले. राजानें सागरिकेला सोडवून आणलें. पण त्याच्या किंवा तिच्या अंगाला कांहींच अपाय झाला नाहीं. कारण ती खरी आग नव्हती. जादुगारानें शेवटचा खेळ दाखवीन असें म्हटलें होतें तोच हा खेळ होता. या जादूमुळें सर्व प्रश्न आपोआपच सुटले. वसुभूतीनें राजकन्या रत्नावलीला ओळखलें. वासवदत्तेनें रत्नावलीशीं राजाच्या विवाहास मान्यता दिली.

यौगंधरायानें सर्व कांहीं माहीत असून देखील रत्नावलीच सागरिका आहे हें कधीं कोणाला सांगितलें नाहीं व कळूं दिलें नाहीं. कारण त्याला वाटलें कीं राजा लग्नाला कबूल होणार नाहीं. जादुगाराला पाठविणारा यौगंधरायच होता. हें सर्व कारस्थान त्यानें राजाचा विवाह रत्नावलीशीं व्हावा या हेतूनेंच रचलें होतें. आपले महाराज चक्रवर्ती व्हावे ही एकच इच्छा त्याच्या मनांत होती, हें कळल्यावर महाराज उदयन व राणी वासवदत्तेनें आपल्या इमानदार व स्वामिभक्त मंत्र्याला माफ केलें.





[८]

मार्कोपोलो बड्या खानाच्या पदरीं नोकरी करीत असतां आपल्या भारतांत सुद्धां आला होता. तो आपल्या देशांत पुष्कळ दिवस राहिला. त्यानें या देशांत जें कांहीं पाहिलें त्याचें सुंदर वर्णन लिहून ठेविलें आहे. या वर्णना बरोबर त्यानें जपान, पूर्वेकडील बेटें व लंकेचें वर्णनहि पुष्कळ केलें आहे.

हें ऐकून कीं जपान देश हा एक सधन व सुखवस्तु देश आहे. कुबलाय खानानें आपल्या दोघां सरदारांना एक मोठें सैन्य देऊन जपान देशावर स्वारी करण्यास पाठविलें. १२६८ सालीं या सैन्यानें चीनचा समुद्र पार केला. जपानच्या किनाऱ्यावर पोंचल्या बरोबर किनाऱ्यावरच्या खेडेगांवांचा ध्वंस या सैन्यानें सुरू केला.

इतक्यांत उत्तरेकडून एक मोठें वादळ येत असलेले पाहून कुबलाय खानाचें सैन्य घाबरून गेलें. त्यांना वाटलें कीं या वादळांत सांपडून आपलें सर्व आरमार नष्ट होणार. म्हणून त्यांनीं आपलें आरमार किनाऱ्यावर सुरक्षित जागीं आणण्याची खटपट केली. परंतु वादळाचा जोर जास्तच वाढत गेला आणि युद्ध नौका परस्परांवर आदळून आपटून फुटूं लागल्या. कितेक सैनिक समुद्रांत बुडून गेले. कांहीं जहाजें जपानच्या


Fullscreen

127





44 / 87





किनाऱ्याला लागलीं व कांहीं निर्जन बेटांच्या किनाऱ्याला जाऊन लागलीं.

कांहीं वेळानें वादळ थांबलें. अनोळखी निर्जन बेटावर शेंकडों सैनिक उतरले. शेंकडों पोहोत येऊन पोंचले. जीं जहाजें होतीं त्यांत सर्वांना स्वदेशीं नेणें अशक्य होतें. म्हणून सरदार व मोठे मोठे अधिकारी आणि कांहीं निवडक लोक स्वदेशीं निघून गेले. तीस हजारांवर सैनिक या अनोळखी द्वीपावरच मागें राहून गेले.

या सैनिकांना सुटकेचा कांहीं मार्ग दिसेना. त्यांना वाटलें कीं या द्वीपांतच उपाशी मरावें लागणार. जपानच्या राजाला शत्रुसैन्य बेटावर अडकून पडल्याची गोष्ट कळली. त्यानें विचार केला, अनायासहि हे लोक पकडले जाणार आहेत. म्हणून त्यानें आपलें एक सैन्य व आरमार यांना धरून आणण्यासाठीं पाठविलें.

जपानचें सैन्य येत असलेलें ऐकून कुब्या खानाचें सैन्य एका बाजूला झाडींत शिरून लपून बसलें. शत्रुसैन्य चांगलें आंत आल्या-वर कुब्याखानाचें सैन्य दुसऱ्या बाजूनें समुद्र किनाऱ्यावर पोंचलें आणि जपानी लोकांच्या जहाजांत बसून पळून गेलें. आतां जपानी सैन्य अडकून पडलें. कुब्या खानाच्या सैन्याला आणखी एक गोष्ट सुचली. स्वदेशीं जाते वेळीं त्यांनीं जहाजें जपानच्या दिशेनें चालू केलीं. जपानवासियांना वाटलें कीं त्यांचें सैन्य शत्रुसैन्याला धरून आणीत असावें. परंतु सैन्य किनाऱ्यावर उतरल्यावर खरी गोष्ट कळली. या अनपेक्षित हल्ल्याला तोंड देण्यास जपानी सैन्य जागेवर नव्हतें. कुब्या खानाच्या सैन्यानें एकामागून एक अनेक नगरें काबीज केलीं. कोणी अडथळा केला नाहीं.

जें जपानी सैन्य बेटावर अडकून पडलें होतें त्यानें येणाऱ्या जाणाऱ्या नावा व होडक्या किनाऱ्यावर बोलावून आपली सुटका



करून घेतली. जपान्यांनीं आपल्या नगरांना वेढा दिला. कुब्या खानाच्या सैन्याला बाहेर येणें अशक्य झालें. शेवटीं शत्रूला शरण जाण्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. दोघांमध्यें तह झाला. त्यांत मुख्य अट अशी होती कीं कुब्या खानाच्या सैन्यानें जपान देशांतच कायमचें राहण्याचें कबूल केल्यास त्याला जिवंत सोडण्यांत येईल.

* * *

मार्कोपोलोनें भारताच्या मार्गावर चंबा नांवाचा एक देश पाहिला. हल्लींचा वी अट नाम देश जेथें आहे तेथेंच हा देश असावा. १२२८ मध्यें कुब्या खानानें येथील राज्य जिंकून त्या देशाच्या राजाला आपला मांडलिक करून घेतलें. त्यावेळीं हा देश हत्ती व तऱ्हे तऱ्हेचे वृक्ष या साठीं प्रसिद्ध होता. या देशांत एक विचित्र प्रथा होती. कुमारिकांना राजाला समर्पण करण्यांत येत असे. ज्या मुलींशीं राजा लग्न करीत नसे त्या मुलींशीं लोकांची लग्नें होत. या देशाच्या राजाच्या अंतःपुरांत शेंकडों राण्या असत व कित्येक राजकुमार असत. मार्कोपोलो या देशांत पोंचला तेव्हां राजाला मुलें मुली मिळून एकंदर ३२६ अपत्यें होतीं.



चंबा पासून १५०० मैलांवर जावा द्वीप होतें. हा एक संपन्न देश होता. येथें सुगंधी द्रव्यें मिळत. कुब्या खानानें हा देश जिंकला नाहीं. मार्कोपोलो चंबा देशांतून लोकाक नांवाच्या देशांत पोंचला. हा एक स्वतंत्र देश होता. तेथें पुष्कळ सोनें मिळत असे. येथून कवड्या परदेशांत पाठविल्या जात.

तेथून मार्कोपोलो चिन्टान बेटांत येऊन पोंचला. या बेटाजवळचें मलमूर द्वीप दर्यावर्दी लोकांचें एक मुख्य केंद्र म्हणून प्रसिद्ध होतें. या दोन्हीं द्वीपांच्या शेजारीं लहान जावा नांवाचें एक द्वीप होतें. त्या द्वीपांत आठ









Fullscreen 127 46 / 87

राजे आठ राज्यांवर राज्य करीत असत. या द्वीपांतून ध्रुव तारा दिसत नसे. मार्कोपोलोला या द्वीपांत हत्ती व गेंडे पहावयास मिळाले.

मार्कोपोलो व त्याच्या अनुचरांना सुमात्रा द्वीपांत पांच महिने रहावें लागलें. या द्वीपांत नरभक्षक रानटी लोक रहात असत. येथील अनेक राज्यांपैकीं एका राज्याचें नांव फन्सूर असें होतें. मार्कोपोलोनें लिहून ठेवलें आहे कीं येथें उत्तम कापूर तयार होतो आणि साबूदाणा एका तऱ्हेच्या झाडाच्या खोडापासून तयार करण्यांत येतो.

लहान नाग द्वीपांतून मार्कोपोलो अंदमान व निकोबार द्वीपांत आला. त्यानें असें लिहून ठेवलें आहे कीं या देशांत कोणी राजा राज्य करीत नसे. मनुष्य जनावरांसारखे खात पीत. ते कपडे घालीत नसत. पण त्यांना मोत्यांचीमात्र फार आवड असे. मोत्यांच्या माळा गळ्यांत व कमरेभोंवती ते घालीत. अंदमान देशांत देखील रानटी नरभक्षक लोक रहात असत.

मार्कोपोलो अंदमान देशांतून लंकाद्वीपांत आला. त्यानें असें लिहून ठेवलें आहे कीं खरा केम्प फक्त येथेंच आढळतो. या केम्प शिवाय गोमध, इंद्रनील वगैरे मणीदेखील या देशांत सांपडतात. असें सांगतात कीं लंकेच्या राजाकडे तळहाताएवढा केम्प होता. कब्ला खानानें पुष्कळ किंमत देऊन तो विकत घेण्याची इच्छा दर्शविली. पण लंकेचा राजा विकण्यास तयार झाला नाहीं. कारण तो केम्प लंकेच्या राजघराण्यांत कित्येक पिढ्यांपासून होता.

लंकेहून मार्कोपोलो भारतांत आला. आपल्या भारताविषयीं त्यानें पुष्कळ रसभरीत वर्णन लिहिलें आहे. [पुढें चालू]





# आळशी अजगर

फार पूर्वी चीन देशांत एक चोर रहात असे. तो सामान्य प्रजेला त्रास देत नसे. उलट गोरगरिबांना होईल तितकी मदतच करीत असे. ज्यांच्या घरीं तो चोरी करी ते देखील त्याच्या कौशल्याची वाखाणणी करीत. हा चोर चीन देशाच्या सुचोऊ या नगरींत रहात असे. सर्व त्याला 'आळशी अजगर' या नांवानें ओळखीत. कारण एकदां चोरी केली कीं तो पुन्हां बरेच दिवस चोरी करीत नसे.

या "आळशी अजगरा"च्या चोरीविषयीं कित्येक विचित्र गोष्टी लोक सांगतात. त्यानें कधीं कोणा गरिबाच्या घरांत चोरी केली नाहीं. जे लोक अन्याय व अत्याचार करून धन लुटीत त्यांच्याच कडे हा चोर चोरी करीत असे. तो चोरीचें धन स्वतः न वापरतां गोरगरिबांमध्यें वांटून टाकी.

एकदां देखील तो पोलीस शिपायांच्या हातीं सांपडला नाहीं. एक अट्टल चोर म्हणून तो प्रसिद्ध होता.

या विचित्र चोराच्या गोष्टीपैकीं एक गोष्ट अशी आहे :—

एकदां आळशी अजगराला कळलें कीं एका श्रीमंत गृहस्थानें एका विणकऱ्याला लुबाडून पुष्कळ सोनें व चांदी आपल्या घरीं गहाण म्हणून ठेवून घेतली आहे. त्यानें तें सोनें व चांदी चोरी करून त्या गरिबाला परत मिळवून द्यायचें मनाशीं ठरविलें. तो त्या श्रीमंताच्या घरीं चोरी करायला म्हणून गेला, पण चुकीनें दुसऱ्याच एकाच्या घरांत शिरला. तें एक गरिबाचें घर होतें. त्या घरांत लपायला एका चौरंगाशिवाय कांहीं नव्हतें. आळशी अजगर त्या चौरंगाखालीं लपून बसला.

श्री. भा. गो. देसाई


Fullscreen
127




48 / 87




थोड्या वेळानें घराचा मालक व मालकीण जेवायला बसलीं. अगदीं साधें जेवण, म्हणजे मीठ भाकरच होती जेवायला. नवरा बायकोला म्हणाला—"कर्जाची परतफेड दोन दिवसांत झाली नाहीं तर घर लिलावांत निघेल. जवळ एक फुटकी कवडी सुद्धां नाहीं. आढ्याला दोरी बांधून फांशी लावून घेणें हाच एक उपाय उरला आहे."

"पण त्याची गरज काय? मला विकून टाका. जे पैसे मिळतील त्यानें व्यापार करा!" बायको म्हणाली. दोघं अश्रू ढाळीत बसलीं होतीं. आळशी अजगरानें तें सर्व ऐकलें. त्याला चौरंगाखालीं पडून राहवेना. तो बाहेर आला आणि म्हणाला—"तुमच्यावर हा जो प्रसंग ओढवला आहे त्याबद्दल जास्त काळजी करूं नका. मी तुम्हांला दोनशें तोळे चांदी आतां आणून देतों. व्यापार करा. आत्महत्या करणें महा पाप आहे!" असें सांगून तो बाहेर निघून गेला.

थोड्या वेळानें त्या गरिबाच्या दारासमोर 'धम्म' असा कांहीं तरी पडल्याचा आवाज झाला. दार उघडून पाहिलें तेव्हां त्यांना तेथें एक गाठोडें दिसलें. त्यांत दोनशें तोळे चांदी होती. त्यांनीं कर्ज फेडून आपलें घर सोडवून घेतलें.

आळशी अजगराचा एक बालमित्र होता. तो आपला सर्व जमीनजुमला घालवून बसला. त्याची गरिबी पाहून आळशी अजगराला फार दया आली. त्यानें त्याला विचारलें—"मित्रा! काय रे तुझी ही दशा? ओळखत सुद्धां नाहींस." मित्रानें त्याच्यावर कसे कसे प्रसंग ओढवले व सर्व जमीनजुमला तो कसा घालवून बसला, वर्णन करून सांगितलें.

"तूं कोणाजवळ बोलूं नकोस. मी उद्यां एका श्रीमंताच्या घरीं चोरी करायला जाणार आहें. तूं माझ्याबरोबर आलास तर



तुला देखील थोडा वाटा मिळेल." आळशी अजगर म्हणाला.

मित्र त्याच्याबरोबर जायला तयार झाला. पण त्यानें अट घातली. म्हणाला—"मी तुझ्याबरोबर येईन पण दूर उभा राहीन. मला तुझा धंदा जमणार नाहीं." आळशी अजगरानें तें कबूल केलें व मित्राला घराबाहेर भिंतीजवळ उभा करून तो आंत शिरला. बराच वेळ झाला तरी आळशी अजगर बाहेर आला नाहीं. कुत्र्यांना बाहेर भिंतीजवळ कोणी उभा असल्याचें दिसतांच तीं भुंकूं लागलीं. मित्र पळूं लागला. थोड्या वेळानें आळशी अजगर त्याला भेटला. म्हणाला—"बाबा रे, आज तर प्राणावरच बेतलें होतें तुझ्यामुळें. मी सोनें घेऊन निघालों तर कुत्रीं तुला सोडून माझ्या पाठीस लागलीं. जागाजाग झाली आणि घरांतले लोक माझा पाठलाग करूं लागले. मी सर्व सोनें फेंकून दिलें आणि पळ काढला."

"तुझ्यासारखा अट्टल चोर सुद्धां संकटांत सांपडला. मग माझी काय गत झाली असती याचा विचार कर. माझें भाग्य म्हणून मी वांचलों. तर मग माझ्या नशिबीं



आज कांहीं मिळायचें नव्हतें. तुझा जीव मात्र धोक्यांत पडणार होता." मित्र म्हणाला.

पुन्हां एका महिन्यानें दोघे मित्र भेटले. आळशी अजगर आपल्या मित्राला म्हणाला—"मीं त्याच दिवशीं एक पेटी चोरून आणली होती. जर मी त्याच दिवशीं तुझ्या हातांत ती दिली असती तर तुला शिपायांनीं धरलें असतें. म्हणून मी ती पाण्याच्या एका खड्डयांत टाकून दिली. तो श्रीमंत गप्प कां बसला आहे कळत नाहीं. बरें, आज ती पेटी मी घेऊन येतों." रात्रीं आळशी अजगर ती पेटी उचलून घेऊन









Fullscreen 127 50 / 87

आला. त्यांत सोनें व चांदी होती. त्यानें पेटींतलें सोनें व चांदी सर्व आपल्या मित्राला देऊन टाकलें.

त्या मित्रानें पुढें व्यापार केला आणि तें धन पुढें पुष्कळ वाढविलें.

आळशी अजगराला जनावरांच्या व पक्ष्यांच्या आवाजाची हुबेहूब नक्कल करतां येत होती. तो बायका पुरुषांच्या आवाजाची सुद्धां नक्कल करीत असे. या कलेचा त्याला वेळीं अवेळीं छान उपयोग होत असे.

एकदां तो एका घरांत चोरी करायला गेला. तो ज्या खोलींत शिरला होता तींत मूल्यवान कपडे ठेवलेले होते. इकडे तो खोलींत शिरला आणि मालकिणीनें खोली बंद करून यायला आपल्या मोलकरणीला सांगितलें. चोर नकळत खोलींत बंद झाला. कोणी दार उघडल्याशिवाय बाहेर निघणें अशक्य आहे असें जेव्हां त्याला कळलें तेव्हां त्यानें एक युक्ति केली. जितके कपडे अंगांत घालून घेणें शक्य होतें तितके त्यानें अंगांत घातले व इतर कपड्यांचें एक गांठोडें बांधून दरवाज्यांत जवळ आणून ठेवलें. त्यानंतर दरवाज्याजवळ उंदीर कपडे कुरतडतो तसा आवाज करीत बसला.



घराच्या मालकाच्या कानावर कपडे कुरतडण्याचा आवाज आल्याबरोबर तो ओरडला—"पहा, आंत उंदीर शिरलेले दिसत आहेत. त्यांना बाहेर काढून खोली बंद करा."

मालकाची आज्ञा होतांच मोलकरणीनें दार उघडलें आणि आंत जाऊं लागली. पण कपड्याच्या गांठोड्यावर पडली. तिच्या हातांतला दिवा विझला. ती मोठ्यानें ओरडली. "चोर! चोर!"

आळशी अजगरानें मोलकरणीला बाजूला ढकलून गांठोडें उचललें आणि पसार झाला. मालक येऊन पाहतो तर काळोख. मालकानें मोलकरणीलाच चोर समजून खूप बडविलें. बिचारी मोठमोठ्यानें ओरडूं लागली तेव्हां खरी गोष्ट सर्वांना कळली. चोर नाहींसा झाला होता.

एकदां एका श्रीमंतानें एका रेशमाच्या व्यापाऱ्याला पुष्कळ मोठी रक्कम दिली. आळशी अजगराची नजर त्या रकमेवर पडली. व्यापाऱ्यानें तें धन बायकोच्या पलंगाजवळ लपवून ठेवलें होतें.

आळशी अजगर एके दिवशीं रात्रीं त्या व्यापाऱ्याच्या घरांत त्याच्या बायकोच्या











Fullscreen
127
52 / 87

खोलींत शिरला आणि पलंगावर पाय ठेवून त्यानें पेटी उचलली.

व्यापाऱ्याच्या बायकोची झोंप मोडली. तिला शंका वाटली कीं पलंगावर कोणाचा तरी पाय आहे. तिनें चाचपून पाहिलें तेव्हां चोराचा पाय तिच्या हाताला लागला. तिनें तो घट्ट धरला. तिनें लगेच आपल्या नवऱ्याला जागें केलें,—"हा पहा चोर! मी त्याचा पाय पकडला आहे."

पण त्याच वेळीं आळशी अजगरानें व्यापाऱ्याच्या पायाला जोरानें चिमटा काढला. व्यापारी जोरानें ओरडला,—"ए तूं माझ्या पायाला कां चिमटा घेत आहेस? तो माझा पाय आहे?" बायकोनें घाबरून हात सोडला. त्या बरोबर आळशी अजगर पेटी घेऊन पळून गेला.

झालें नवरा बायकोचें भांडण सुरू. "मी छान चोराला पकडलें होतें आणि उगीच आरडा ओरडा करून त्याला सोडायला लावलेंत." बायको म्हणाली.

"वा ग वा! छान! माझा पाय अजून दुखतो आहे आणि म्हणे चोराला धरलें होतें." व्यापारी म्हणाला.

"तुमचा पाय होता आंत व मी धरला होता तो पाय होता बाहेर. मी नव्हता बाई चिमटा काढला. उगीच काय?" बायको म्हणाली!

"तर मग चोरानेंच चिमटा काढला म्हणावयाचा. वस्ताद दिसतो आहे. मग तूं पाय कां सोडलास? घट्ट धरून ठेवायचा." नवरा म्हणाला.

"तुम्ही ओरडलांत म्हणून मी भ्यालें." बायको म्हणाली.

थोड्या वेळानें भांडण मिटल्यावर पाहिलें तों पेटी नाहींशी झालेली.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]





# ब्रह्मदेवाची सृष्टि

शरत् पौर्णिमेचें दुधासारखें स्वच्छ चांदणें पडलें होतें. आजोबा आराम खुर्चीवर येऊन बसले आणि दोन्ही नाकपुड्यांत तपकीर कोंबीत एक श्लोक पुटपुटले—

"वस्तुषु ब्रह्मसृष्टेषु
स्थावरेषु चरेषुच
सफलं दृश्यते सर्वं
विफलंनैव दृश्यते।"

भोवताली घोळका करून मुलें येऊन बसलीं व विचारूं लागलीं—"आजोबा! याचा अर्थ काय हो? सांगा ना!"

"या श्लोकाचा अर्थ होय? हें पहा याचा अर्थ असा आहे कीं ही ब्रह्मदेवाची सृष्टि आहे ना, तींत चर व अचर जितके पदार्थ आहेत त्या पैकीं एकहि पदार्थ व्यर्थ व निरुपयोगी नाहीं. प्रत्येकाचा कांहीं ना कांहीं तरी उपयोग हा असतोच. समजलें?" अजोबा म्हणाले.

"पण आजोबा! हा श्लोक कोणी व केव्हां म्हटला हें नाहीं सांगितलेंत. नुसता अर्थ आम्हांला नको. सांगा ना!" मुलें हट्ट करून बसलीच. तेव्हां आजोबांनीं गोष्ट सांगायला सुरवात केली.

एकदां अंगदेशाच्या गादीवर अंगपाल नांवाचा एक राजा राज्य करीत असे. त्यानें मोठमोठ्या विद्वानांना आणि शास्त्रज्ञांना या कामावर नेमलें कीं जगांत कोणत्या वस्तू उपयोगी आहेत व कोणत्या अनुपयोगी याचा शोध करून त्यांची त्यांनीं यादी करून द्यावी. शेवटीं पुष्कळ शोध केल्यावर शास्त्रज्ञांनीं उपयोगी व अनुपयोगी वस्तूंची एक यादी तयार करून दिली. ती पाहून राजानें असें ठरविलें कीं सर्वांत निरुपयोगी प्राणी म्हणजे डांस व कोळी. झालें, त्यानें हुकूम सोडला कीं राज्यांत

श्री. वा. सा. वागळे


Fullscreen
127



54 / 87




आडळेल तिथें कोळी व डांस यांचा संहार करावा.

यांत प्रजेचें हित होतें. म्हणून प्रजेनें देखील या कामीं दरबाराच्या आज्ञेचें पालन करण्यात विशेष उत्साह दाखविला. सर्व म्हणू लागले, राजा असावा तर असा, पोटच्या पोराप्रमाणें प्रजेची काळजी वाहणारा.

पुढें कांहीं दिवसांनीं एका एकीं शत्रूनें अंगदेशावर स्वारी केली. पण अंगपालानें युद्धाची तयारी केली नव्हती. तो युद्धाला तयारच नव्हता. म्हणून आपल्या कांहीं विश्वासपात्र सैनिकांना बरोबर घेऊन त्यानें पळ काढला. एका पडक्या घरांत त्यांनीं ती रात्र काढली. परंतु डांस फार असल्यामुळें कोणाला झोंप लागली नाहीं. हें एका दृष्टीनें त्यांच्या हिताचेंच झालें. शत्रूचे शिपाई त्यांचा शोध काढीत त्या पडक्या घराकडे आले. त्यांची चाहूल लागतांच राजा युवराजाला व तिघां चौघां सैनिकांना बरोबर घेऊन पळाला आणि एका डोंगरां-तल्या गुहेंत जाऊन लपून बसला.

उजाडल्यावर शत्रूचे कांहीं सैनिक राजाचा पाठलाग करीत त्या गुहेपर्यंत आले. पण गुहेच्या तोंडावर कोळिष्टकें पाहून त्यांना वाटलें कीं या गुहेंत कोण असणार व ते पुढें निघून गेले.

तेव्हां अंगपालाला कळलें कीं जगांत अगदीं निरुपयोगी समजून ज्या प्राण्यांचा संहार करण्यासाठीं त्यानें हुकूम काढला होता. त्याच प्राण्यांच्या सहाय्यानें त्याचें संकटसमयीं रक्षण झालें.

ही गोष्ट त्याच्या एका दरबारी कवीनें ऐकली व हा श्लोक रचला. लक्षांत ठेवा— ब्रह्मदेवाच्या सृष्टींत निरुपयोगी किंवा फालतू वस्तु एक हि नाहीं! तिचा उपयोग काय हें सूज्ञ लोकच ओळखूं शकतात.





"हा अन्याय आहे सर! शंभरांपैकीं फक्त एकच शून्य मला दिलें आहे."
"कबूल, हा अन्यायच समज! काय करणार? शून्याहून कमी काय देऊं?"



"दुष्ट कुठला! मला अडवलें नसतें तर सुधीरची चामडी सोलविली असती!"
"अडविलें कोणी?"
"आणखी कोणी? सुधीरनेंच."



"हा अन्याय आहे! लोक या रामाच्या नांवाचाच जप करतात, माझ्या नांवाचा नाहीं करीत. माझें नांव किती छान आहे— "वीर वेंकट सत्यनारायण वरप्रसाद राव!"



"तुमची नाडी अगदीं दुरुस्त आहे. कांहीं काळजी नाहीं घड्याळासारखी चालू आहे."
"माझ्या घड्याळावर हात लावून सांगतां आहां वाटतें!"

चित्रकार: **एन. शंकरनारायण**


Fullscreen

127





56 / 87





# मेवाडचा सिंह

राजपुतान्याच्या इतिहासांत कित्येक शूरवीर योध्दांचीं चरित्रें वाचावयास मिळतात. रजपूत हे जात्याच फार स्वाभिमानी होते. देश व धर्म यांकरितां त्यांनीं दाखविलेला आत्मत्याग वाखाणण्यासारखा आहे. त्यांचा पराक्रम भारतांतल्या इतिहासांतच नव्हे, तर जगाच्या इतिहासांत प्रसिद्ध आहे.

जयपुर, जोधपुर, जेसलमेर, मेवाड वगैरे संस्थानांतले राजवंश व राजकर्ते फार प्रसिद्ध होऊन गेले. त्यांतल्या त्यांत मेवाडचें राजघराणें फारच प्रसिद्ध होतें. फक्त या एका राजघराण्यांतल्या राजकर्त्यांनीं परकीय सत्तेसमोर कधीं मान तुकविली नाहीं. इतर संस्थानिकांनीं मोंगलांची सत्ता मान्य केली व त्यांच्या पदरीं नोकऱ्या पत्करल्या. एवढेंच नव्हें तर त्यांच्याशीं बेटीव्यवहार सुद्धां केला. पण मेवाडच्या राजघराण्याचा बाणा कांहीं निराळाच होता. याच घराण्यांत राणा प्रतापसिंहाचा जन्म झाला होता. पराक्रम, देश भक्ति आणि धर्मप्रेम यांचें एक उदाहरणच जणुं कांहीं राणा प्रतापनें आपल्या भारतासमोर ठेवलें आहे.

राणाप्रताप गादीवर बसण्यापूर्वीच सुमारें चार वर्षें मेवाडची राजधानी चितोड ही मोंगलांच्या हातीं गेली. परंतु मेवाडचा राणा उदयसिंह आणि त्याच्या नंतर त्याचा पराक्रमी मुलगा राणा प्रताप यांनीं मोंगलांशीं संधी केली नाहीं. त्यांनीं उदयपुर येथें नवीन राजधानी स्थापन करून मोंगलांशीं युद्ध चालू ठेवलें. त्यांना कित्येक महिने रानोमाळ हिंडावें लागलें. उपासमार सोसावी लागली. परंतु त्यांनीं माघार घेतली नाहीं व शेवटपर्यंत मोंगलांशीं युद्ध चालू ठेवलें.

श्री व. वा. पाटील



त्यावेळीं दिल्लीस अकबर बादशहा राज्य करीत होता. त्याच्या दरबारीं मोठमोठे रजपूत सरदार होते. त्याच्या नवरत्नांमध्यें त्याचा मुख्य मंत्री मानसिंह होता. अकबर बादशहानें प्रतापसिंहाकडे मानसिंहाला पाठविलें व आपली मैत्री स्वीकारण्यास विनंति केली.

परंतु स्वाभिमानी प्रतापसिंहाला ही मैत्री कबूल नव्हती. मैत्री बरोबरीच्या मित्रांशीं होऊं शकते. श्रीमंत-गरिबाची, राजारंकाची किंवा चक्रवर्ति व मांडलिक यांची मैत्री कशी होऊं शकेल. अकबराशीं मैत्री केल्यानें सुखांत राहतां येईल, रक्तपात वांचेल हें त्याला माहीत होतें. परंतु आपलें स्वातंत्र्य गमावून गुलामींत आयुष्य कंठणें राणाप्रतापसिंहासारख्या स्वाभिमानी वीरपुरुषास कसें रुचेल? वाटेल ती किंमत देऊन स्वातंत्र्याचें रक्षण करण्याचें त्यानें ठरविलें.

अकबर बादशहाचा रणांगणावर पराभव करणें अशक्य आहे, हें राणाप्रतापसिंहाला माहीत होतें. अकबराजवळ फार मोठें सैन्य होतें. त्याच्या दरबारीं रजपुत वीर होते. राणाप्रतापसिंहाचा धाकटा भाऊ शक्तसिंह देखील अकबराच्या पदरीं नोकरीला होता. तेव्हां अकबराला युद्ध करून जिंकणें तर अशक्यच होतें.

परंतु प्रतापसिंह हताश होऊन बसला नाहीं. त्यानें आपल्या अनुयायांची जमवाजमव केली व त्यांच्या मदतीनें भिल्ल जातीचें एक सैन्य उभें केलें. या सैन्याला दारूगोळा व रसद पुरी पडावी म्हणून हें सैन्य शत्रु सैन्यावर छापे मारी. असावध शत्रु सैन्य घाबरून जाई. अशा आकस्मिक हल्ल्यांमुळें शत्रु सैन्याचें फार नुकसान होऊं लागलें.

मानसिंहानें उदयसागर सरोवराच्या कांठीं तळ दिला आणि राणा प्रतापसिंहाकडे


Fullscreen

127





58 / 87


मेजवानीचें बोलावणें पाठविलें. परंतु राणानें उलट निरोप पाठविला कीं शत्रूनें टाकलेले भाकरीचे तुकडे चघळणाऱ्या कुत्र्यांच्या पंक्तीला सिंहाचा छावा कधीं येऊं शकेल काय?

मानसिंहाला फार राग आला व त्यानें बादशहाकडून एक मोठें सैन्य मागून घेतलें आणि युद्धास निघाला. बादशहानें बरोबर युवराज सलीम याला हि पाठविलें. सन् १५७६ च्या जुलाई महिन्यांत हळदी घाटी या स्थानीं निकराचें युद्ध झालें. या युद्धांत राणाचे १४ हजारांवर सैनिक हताहत झाले. मोंगलांचे २० हजारांवर सैन्य कापलें गेलें. स्वतः युवराज सलीम राणाप्रतापाच्या तलवारीचा वार लागून जखमी झाला. परंतु राणा प्रतापसिंहाला या युद्धांत जय मिळाला नाहीं.

शत्रूच्या हातीं पडण्यापेक्षां पळून जावें व पुन्हां सैन्याची जमवाजमव करून आपला देश स्वतंत्र करतां आला तर करावा असें मनाशीं ठरवून राणानें शत्रूची नजर चुकवून युद्ध भूमीवरून पाय काढला. परंतु दोघां शत्रुसैनिकांनीं राणाला पाहिलेंच व राणाचा पाठलाग केला. त्यांच्या पाठोपाठ राणाचा भाऊ शक्तसिंह आपल्या असहाय भावाच्या मदतीस धांवला. आधींच दमलेला राणाचा घोडा 'चेतक' किती वेळ पळणार. एका जागीं त्याचें पाऊलच पुढें पडेना. त्याच वेळीं दोन्ही सैनिकांनीं राणाला घेरलें. परंतु शक्तसिंहानें ऐन वेळीं आपल्या भावाला मदत करून त्याचे प्राण वांचविले.

राणानें त्याचे आभार मानले आणि म्हणाला—"शक्तसिंह, तुझ्यासारख्या वीरानें शत्रूला जाऊन मिळावें या सारखी दुःखाची गोष्ट आणखी काय होऊं शकेल. माझ्या खांद्याला खांदा लावून जर तूं शत्रू बरोबर युद्धाला आलास तर आपला देश स्वतंत्र होईल." शक्तसिंहानें तें कबूल केलें.

'चेतक' जागच्या जागीं मरण पावला. शक्तसिंहानें आपला घोडा राणाला दिला व पळून जायला सांगितलें. चेतकाचें स्मारक म्हणजे समाधी आजहि हळदी घाटी पासून सुमारें दहा मैलांवर पहावयास मिळते.

राणा कुंभलमेरच्या किल्ल्यांत आश्रयासाठीं म्हणून गेला. पण किल्ल्यांतल्या विहिरींत शत्रूनें विष टाकविलें होतें. म्हणून राणाला पुन्हां रानोमाळ हिंडत फिरण्याची पाळी आली. आज खायला आहे तर उद्यां नाहीं.





Fullscreen 127 60 / 87




अशा स्थितींतहि आपला देश कसा स्वतंत्र होईल हा एकच विचार राणाच्या मनांत येत होता. त्यानें पुन्हां सैन्याची जमवाजमव केली व शत्रूला असावध पाहून शत्रूवर छापे मारायला सुरवात केली. फरीदखान नामक एक मोंगल सेनापतीनें राणाला जिवंत वा मृत धरून आणण्याची प्रतिज्ञा केली आणि युद्धास आला. परंतु उलट तोच राणाच्या हातीं कैदी झाला. राणानें त्याला निःशस्त्र करून आदरपूर्वक परत पाठवून दिलें.

एकदां खानखानान नांवाच्या एका सेनापतीच्या अंतःपुरांतील सर्व स्त्रियांना प्रतापसिंहाच्या एका सरदारानें धरून आणलें. परंतु प्रतापसिंहानें स्त्रियांवर अत्याचार होता कामा नये असा हुकूम काढून त्या सर्व स्त्रियांना आदर पूर्वक खानखानानकडे पोंचतें केलें. प्रतापसिंहाचें हें औदार्य पाहून खानखानान यानें प्रतापसिंहावर कांहीं स्तुतिपर पद्यें लिहून अकबर बादशहाला ऐकविलीं.

पुढें मेवाडचा एक कवि अकबराच्या दरबारीं गेला. तेव्हां त्यानें बादशहाला लवून नमस्कार करीत असतां आपली पगडी काढून ठेवली होती. बादशहानें त्याला त्याचें कारण विचारलें तेव्हां तो म्हणाला—"ही पगडी राणा प्रतापसिंहांनीं मला सन्मानार्थ दिली होती. माझी मान. बादशहासमोर नमत असली तरी महाराणा प्रतापसिंहानें दिलेली पगडी कशी मान तुकवील?" तें उत्तर ऐकून बादशहाला राग येण्याऐवजीं आनंद झाला व त्यानें राणा प्रतापसिंहाच्या बाणेदारपणाची प्रशंसा केली.

राणा प्रतापसिंहांनीं आपल्या मातृभूमीला स्वतंत्र करण्यासाठीं सर्वस्वाचा होम केला. पण त्यांना यश मिळालें नाहीं. म्हणून त्यांनीं सिंधु नदी पार करून नवें राज्य स्थापन करण्याचें ठरविलें. अशा स्थितींत अकबर बादशहानें विचार केला कीं राणा प्रतापसिंहाशीं संधि करून घेण्यासाठीं कोणाला तरी पाठवून पहावें. बादशहाच्या कैदेंत राणा प्रतापचा एक सरदार होता. बादशहानें त्याला बोलवून सांगितलें कीं राणा प्रतापसिंह संधीला तयार आहे असें ऐकतों. तूं जाऊन आमच्या वतीनें संधी करून ये. तो सरदार म्हणाला—"बादशहा! ही गोष्ट साफ खोटी आहे. आपल्याला कोणी तरी फंसविलें आहे. आपण आपलें सर्व राज्य देऊं केलें तरी राणा प्रताप संधीला तयार होणार नाहींत." शेवटीं बादशहाच्या आग्रहानें तो सरदार राणाकडे गेला. बादशहानें राणाप्रतापसिंहावर स्तुतिपर कविता लिहवून त्याच्याबरोबर पाठविल्या होत्या. राणा प्रतापसिंहानें कविता ऐकून बादशहाचे आभार मानले आणि त्या सरदाराला असा निरोप देऊन पाठविलें कीं गुलामींत खितपत राहून राजसुख भोगण्यापेक्षां स्वातंत्र्याची मीठभाकर बरी. खुल्या आकाशांत उडणाऱ्या पक्ष्याला सोन्याच्या पिंजऱ्यांत ठेवलें तरी त्याच्या मनाला सुख मिळेल का?"

त्यानंतर बादशहानें राणा प्रतापसिंहाशीं संधी करण्याचा विचार सोडून दिला.




मेवाड राज्यांत भामाशाह नांवाचा एक श्रीमंत व्यापारी रहात असे. मातृभूमीच्या रक्षणासाठीं महाराणानें भोगलेले कष्ट पाहून त्यानें आपली सर्व संपत्ति राणाला अर्पण केली आणि म्हणाला—"हें वडिलोपार्जित धन देश स्वतंत्र करण्यासाठीं उपयोगी पडलें तर पहावें." महाराणा त्याच्या विनंतीस नकार देऊं शकला नाहीं. तें धन घेऊन राणानें पुन्हां सैन्य उभें केलें.

राणानें अशी प्रतिज्ञा केली कीं जोपर्यंत चितोड स्वतंत्र होणार नाहीं तोपर्यंत मी


Fullscreen

127




62 / 87




गादीवर झोंपणार नाहीं, सुवर्णपात्रांत जेवणार नाहीं, पक्वान्नाला हात लावणार नाहीं व रेशमी वस्त्रें धारण करणार नाहीं. राणानें पुन्हां सैन्याची जमवाजमव केली व मेवाड राज्यावर चाल केली. मोगल राज्यकर्त्यांना या अनपेक्षित हल्ल्याची कल्पना देखील नव्हती. कुंभल्मेरचा किल्ला सर करून राणानें मेवाडचे सर्व किल्ले एका मागून एक जिंकले. परंतु चितोडचा किल्ला सर करण्याची इच्छा अपूर्णच राहिली. राणानें राजा मानसिंहाच्या राज्यांतला बराचसा भाग जिंकून मेवाडच्या राज्यांत मिळवून टाकला. सन १५८६ च्या सुमारास मोंगलांचा एकहि सैनिक मेवाड राज्यांत उरला नाहीं. अकबर बादशहा तेव्हां बंगालच्या मोहिमेवर गेला असल्यानें त्या संधीचा फायदा घेऊन राणाप्रतापनें आपलें गेलेलें राज्य पुन्हां मिळविलें.

ज्या सरदारांनीं राणाला स्वदेश स्वतंत्र करण्यासाठीं मदत केली होती त्या सर्वांना राणानें जहागिरी वांटून दिल्या. त्यानंतर १५७६ पर्यंत निर्विघ्नपणें मेवाडचें राज्य केलें.

देशाला स्वतंत्र करण्याचें स्वप्न साकार झालेलें पाहून राणाच्या मनाला मृत्युसमयीं शांति मिळाली. अशा तऱ्हेनें मातृभूमीची सेवा करीत हा वीरपुरुष आपल्या देशाच्या इतिहासांत अमर झाला.

असें सांगतात कीं चितोड स्वतंत्र झाला नाहीं म्हणून मेवाडच्या राजकुळांतील वंशज आज पावेतों राणाप्रतापानें केलेल्या प्रतिज्ञेचें पालन करतात. ते गादीवर झोंपावयाचें झालें तरी गादीखालीं गवत घालून झोंपतात. सोन्या चांदीच्या ताटांत जेवायचें झालें तरी त्याच्या खालीं पानें घालून जेवतात.

महाराणाची कीर्तिगाथा मेवाडचे भाट आजतागायत मोठ्या अभिमानानें गातात.




# अमृतसरचें सुवर्णमंदिर

शिखांचें सर्वांत मोठें तीर्थक्षेत्र अमृतसर येथें आहे. हें नगर पंजाबांत आहे. येथें शिखांचे चवथे गुरु रामदास यांनीं अकबर बादशहाकडून ही जागा मिळविली आणि या देवळाचा पाया घातला. त्यानंतर गुरु अर्जुनदेव यांनीं एक तलाव खणविला आणि त्याच्या मध्यभागीं हें देऊळ बांधविलें. पंजाबचा राजा रणजितसिंह यानें (१७८०-१८३९) या देवळाचा कलश तांब्याच्या पत्र्यानें मढविला व त्यावर सोनें चढविलें. या सुवर्णमंदिरांत रेशमी वस्त्राखालीं शिखांचा पवित्र ग्रंथ गुरु ग्रंथ साहेब हा ठेवलेला आहे. 'गुरु का बाग' नांवाच्या उद्यानांत शीख धर्माचा संस्थापक गुरु नानक यांच्या आयुष्यांतल्या गोष्टी चित्रित केलेल्या आहेत.

सुवर्णमंदिरापासून सुमारें १०० पावलांवर "अकाल तख्त नांवाचें एक भवन आहे. हें भवन शीख धर्माच्या अनुयायांस इतिहास प्रसिद्ध वाटतें. कारण याच जागीं सर्व शीख गुरूंच्या बैठकी होत आणि धार्मिक प्रश्नांवर विचार विनिमय होई. म्हणून शीख लोकांस हें तीर्थक्षेत्र फार महत्वाचें वाटतें.




Fullscreen

127





64 / 87






# गुणाढ्य पंडित

गोदावरी नदीच्या काठीं फार पूर्वी प्रतिष्ठान म्हणजे पैठण हें एक समृद्ध नगर होतें. या गांवीं सोमशर्मा नांवाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याला दोन मुलें होतीं व श्रुतार्थ नांवाची एकुलती एक मुलगी होती. आपल्या भावांना कळविल्याशिवाय श्रुतार्थेनें कीर्तिसेन नांवाच्या एका नाग तरुणाशीं गंधर्व विवाह करून घेतला होता. त्यांना एक मुलगा देखील होता. त्याचेंच नांव गुणाढ्य.

गुणाढ्य वयानें लहान असतांनाच त्याची आई व दोघे मामा वारले. पुढें तो दक्षिणेकडील प्रदेशांत जाऊन राहूं लागला. त्यानें सर्व विद्या अवगत करून घेतल्या व फार मोठी कीर्ति संपादन केली. त्याच्याकडे कित्येक शिष्य विद्याभ्यासासाठीं येऊं लागले. त्या सर्वांना तो आपलें जन्मस्थान प्रतिष्ठान येथें घेऊन आला.

त्यावेळीं प्रतिष्ठानला शातवाहन राजवंशाचें राज्य होतें. तें नगर एक वैभवशाली नगर होतें. गुणाढ्यानें आपल्या शिष्यांकरवीं आपल्या आगमनाची सूचना राजाला देवविली.

शातवाहन राजानें गुणाढ्याला आपल्या दरबारांत बोलावून त्याचा सत्कार केला. गुणाढ्यानें मिळविलेली प्रतिष्ठा दरबाऱ्यांच्या तोंडून ऐकून राजा इतका खूष झाला कीं त्यानें गुणाढ्याला आपला प्रधान अमात्य नेमलें. गुणाढ्य विवाह करून प्रतिष्ठानला राहूं लागला.

शातवाहन राजा दीपकर्णी नामक राजाला मिळालेला एक मुलगा होता. दीपकर्णीची बायको सांप चावल्यानें वारली. त्यानंतर राजानें पुन्हां लग्न केलें नाहीं. परंतु आपल्या मागें आपला वारस कोणी नाहीं.

सौ. शांता देसाई

या गोष्टीची त्याला फार काळजी वाटूं लागली. एकदां दीपकर्णी शिकारीसाठीं रानांत गेला असतां त्याला ऐन दुपारच्या वेळीं दूर एक सिंह दिसला आणि आश्चर्य म्हणजे त्या सिंहावर एक मुलगा बसलेला होता. एका ओढ्याच्या काठीं तो मुलगा सिंहाच्या पाठीवरून उतरला आणि सिंह पाणी पिऊं लागला. त्याच वेळीं दीपकर्णीनें त्याला एक बाण मारून ठार केलें. दीपकर्णी त्या मुलाला रानांतून घरीं घेऊन आला आणि त्यालाच आपला वारस करून घेण्याचें ठरविलें. योग्य वेळीं राज्याभिषेक समारंभ झाला. हाच मुलगा मोठा झाल्यावर चक्रवर्ति शातवाहन म्हणून प्रसिद्ध झाला.

शातवाहन विशेष शिकलेला नव्हता. संस्कृत भाषेचा विद्याभ्यास त्यानें मुळींच केला नाहीं म्हणून, त्याचा पदोपदीं अपमान होऊं लागला.

एकदां शातवाहन आपल्या सर्व राण्यांसह वनविहारास गेला होता. जलक्रीडा करीत असतां राजानें आपल्या एका राणीवर पाणी उडविलें. त्यावेळीं राणी फार दमलेली होती. म्हणून तिनें विनंती केली—"महाराज! माझ्यावर पाणी उडवूं नका!" हें ती



संस्कृत मध्यें म्हणाली—"राजन! मोदकैस्ताड्य!" संधिविग्रह केल्याशिवाय याचा अर्थ होतो—'राजन, मला लाडवांनीं मारा!' पण "मा उदकैः ताड्य!" असा संधिविग्रह केल्यास—"राजन, पाण्याचा मारा करूं नका!" असा अर्थ होतो. राजानें पहिला अर्थ मानून नोकरांकडून लाडू मागविले. त्यावर राणी हंसली व म्हणाली—"महाराज, संस्कृतचा एवढा संधि-विग्रह देखील आपल्याला कळूं नये, आश्चर्य आहे!" हा अपमान असह्य झाल्यानें राजानें खाणें पिणें सोडून दिलें. तो आजारी पडला. सर्व काळजींत पडले.


Fullscreen

127




66 / 87


राजाच्या दरबारी शर्ववर्मा नांवाचा एक विद्वान पंडित होता. त्यानें व गुणाढ्यानें मिळून राजाच्या आजाराचें खरें कारण ओळखून इलाज करण्याचें ठरविलें. त्यांच्या प्रयत्नाला यश आलें व राजाच्या आजाराचें खरें कारण समजलें.

शातवाहन राजानें गुणाढ्य पंडिताला विचारलें—" परिश्रम करून विद्याभ्यास केल्यास विद्वान व्हायला किती दिवस लागतील ? "

गुणाढ्य म्हणाला—" महाराज ! व्याकरण सर्व विद्यांचा आधार आहे. व्याकरण शिकायला सामान्यपणें बारा वर्षे लागतात. परंतु मी सहा वर्षांत शिकवून देईन."

लगेच शर्ववर्मा म्हणाला—" महाराज ! मी सहा महिन्यांत शिकवून देईन."

हें ऐकून गुणाढ्याला राग आला. म्हणाला—" ठीक आहे ! तूं तसें करून दाखविलेंस तर मी देव भाषा संस्कृत व माणसांची भाषा प्राकृत दोन्हींत बोलायचें सोडून देईन."

" तूं म्हणतोस तशी व्याकरण शिकायला राजाला सहा वर्षें लागलीं. तर मी बारा वर्षें तुझ्या खडावा मस्तकीं ठेवीन." शर्ववर्मानें प्रतिज्ञा केली.

या भांडणांत राजाला एवढें कळलें कीं परिश्रम केल्यास त्याला संस्कृत येईल.

सहा महिन्यांत व्याकरणाचा अभ्यास करणें बृहस्पतीला देखील अशक्य आहे, हें शर्ववर्माला माहीत होतें. ही प्रतिज्ञा कशी खरी करून दाखवायची या काळजींत तो पडला. घरीं जाऊन त्यानें बायकोचा सल्ला घेतला.

ती म्हणाली—" एक उपाय आहे ! आपण कांहीं काळजी करूं नये. आपण कुमारस्वामीच्या देवळांत जावें त्याच्याकडे आपलें गाऱ्हाणें जाऊन सांगावें. तो आपल्याला मदत करील."





बायकोच्या सल्ल्याप्रमाणें शर्ववर्मा पहाटे उठून कुमारस्वामीच्या देवळांत गेला. तेथें निराहार व्रत घेऊन त्यानें खडतर तप केलें. तेव्हां कुमारस्वामी संतुष्ट होऊन प्रत्यक्ष झाला व म्हणाला—" माग ! काय पाहिजे तो वर माग !"

त्यावर शर्ववर्मा म्हणाला—" प्रभो ! शातवाहन राजा विद्याभ्यास केल्याशिवाय संस्कृत भाषेंत विद्वान होईल असा वर मिळावा !" कुमारस्वामी ' तथास्तु ' म्हणून अंतर्धान पावला.

शर्ववर्माला कुमारस्वामी कडून मिळालेल्या वराप्रमाणें राजानें सहा महिन्यांत संस्कृत भाषेंत पांडित्य संपादन केलें. राजानें शर्ववर्माच्या सन्मानार्थ खास दरबार बोलाविला. राजानें गुरुपूजा करून नर्मदा नदीच्या काठचें मरुकच्छप राज्य गुरुदक्षिणा म्हणून गुरूला दिलें आणि जी राणी हंसली होती तिला आपली पट्टराणी करून घेतलें.

गुणाढ्य या चढाओढींत हारला होता. म्हणून स्वतःच्या प्रतिज्ञेप्रमाणें त्याला देववाणी व प्राकृत दोन्ही भाषांचा त्याग करावा लागला. आतां त्याला खुणा करून बोलण्याशिवाय दुसरा उपाय राहिला नाहीं. हें अपमानजनक आयुष्य घालविण्यापेक्षां त्यानें रानांत राहून कोठें तरी दिवस घालविण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें तो आपल्या दोघां पट्टशिष्यांबरोबर रानांत तप करूं लागला.

तेथें वडाच्या झाडाखालीं बसून त्यानें भूत पिशाच यांची भाषा शिकून घेतली. त्या झाडावर काणभूति नांवाचें एक पिशाच्च रहात होतें. गुणाढ्यनें त्याच्याजवळ पिशाच्च भाषेंत सात गोष्टी ऐकून शिकून घेतल्या. गुणाढ्यानें त्यानंतर पिशाच भाषेंतच स्वतःच्या रक्तानें लक्षावधि गोष्टी लिहिल्या. गुणाढ्याचे शिष्य गुणदेव आणि नंदिदेव यांनी सल्ला

Fullscreen 127 68 / 87

दिला कीं या गोष्टी शातवाहन महाराजांना समर्पण कराव्या. गुणाढ्यानें तें कबूल केलें. त्यानें आपले सर्व ग्रंथ आपल्या दोघां शिष्यांबरोबर शातवाहन राजाकडे पाठविले. स्वतः नगराबाहेर राहिला.

गुणाढ्याच्या शिष्यांनीं राजाला ते ग्रंथ नेऊन दिले. राजा ते ग्रंथ पाहून आश्चर्य चकित झाला. म्हणाला—"ग्रंथ मोठमोठे दिसतात. पण हे कोणत्या भाषेत लिहिले आहेत मला कळत नाहीं, आणि हे ग्रंथ सर्व लाल लाल अक्षरांनीं लिहिलेले दिसत आहेत. अभद्र व कुलक्षणी ग्रंथ असावेत असें मला वाटतें."

शिष्यांनीं घडलेलें वृत्त गुरूला जाऊन सांगितलें. तें ऐकून गुणाढ्याला फार वाईट वाटलें. गुणाढ्यानें निराश होऊन त्या सर्व ग्रंथांचा होम करण्याचें ठरवून आग पेटविली. त्यांतल्या गोष्टी सांगून एकामागून एक ग्रंथ त्यानें अग्नींत टाकायला सुरवात केली. त्या गोष्टी इतक्या मनोहर होत्या कीं त्या ऐकायला पशुपक्षी जमा झाले. कांहीं शोकपर्यवसायी गोष्टी ऐकून पशुपक्षी अश्रू ढाळूं लागले.

पुढें शातवाहन आजारी पडला. राज-वैद्यांनीं निदान करून सांगितलें कीं राजाला सशक्त पशुपक्ष्यांच्या अभावीं पौष्टिक आहार मिळत नसल्यानें असें होत आहे. शोध लावल्यावर कळलें कीं गुणाढ्याच्या गोष्टी ऐकत राहिल्यानें पशुपक्ष्यांनीं खाणेंपिणें सोडलें आहे. तें ऐकून राजा स्वतः रानांत गेला व त्यानें गुणाढ्याचे पाय धरून त्याची माफी मागितली तों पर्यंत कित्येक ग्रंथ अग्निनारायणानें स्वाहा केले होते. उरलेले ग्रंथ गुणाढ्यानें शातवाहन महाराजांना अर्पण केलें. हेच ग्रंथ पुढें "बृहत कथा" या नांवानें प्रसिद्ध झाले.



# आज असे संक्रांत !

[ कवि : श्री मुल्लाअल्ली अब्बास ]

तिळगुळ वाटूं चला गड्यांनो, आज असे संक्रांत ॥

स्नान अगोदर करुनी निर्मळ
मंदिरिं जाउन वाटूं तिळगुळ
प्रणाम करुं, प्रभु देइल प्रेमळ, बल-बुद्धि अतोनात ।
तिळगुळ वाटूं चला गड्यांनो, आज असे संक्रांत ॥

वंदन करुनी मातापित्यांना
तिळगुळ देऊं प्रेमें त्यांना
आशीर्वादा देतिल अपणां, "सुखी रहा जगतांत !"
तिळगुळ वाटूं चला गड्यांनो, आज असे संक्रांत ॥

गुरुजींच्या घरिं नंतर जाउन
चरणीं त्यांच्या विनम्र होउन
तिळगुळ देऊं, देतिल ते पण दिव्य ज्ञान अज्ञात ।
तिळगुळ वाटूं चला गड्यांनो, आज असे संक्रांत ॥

तिळगुळ देऊं मग मित्रांना
अभिवादन पण करुं या त्यांना
साह्य होउनी परस्परांना, प्रगति करुं जीवनांत ।
तिळगुळ वाटूं चला गड्यांनो, आज असे संक्रांत ॥

शेजाऱ्यांना, गांवकऱ्यांना,
सादर नमन करुनी त्यांना
तिळगुळ देऊं या सर्वांना
विसरुन जाऊं वैरभावना, राहूं आनंदांत ।
तिळगुळ वाटूं चला गड्यांनो, आज असे संक्रांत ॥


Fullscreen

127





70 / 87




# विचित्र ज्योतिष

एके दिवशीं एक गरीब मनुष्य आपल्या बायकोला बरोबर घेऊन उदरनिर्वाहाच्या शोधार्थ बगदाद शहरीं आला. एका श्रीमंत मनुष्यानें त्यांना पाहून विचारलें—"तुम्हांला रोज मी गांवांत हिंडतांना पाहतों! तुम्हांला कांहीं काम धंदा नाहीं वाटतें ?"

तो गरीब म्हणाला—"मालक! पोटा-पाण्यासाठीं मजुरी करणें हा एकच मार्ग आमच्याकडे आहे. मला कांहीं कामधंदा येत नाहीं!"

"बरें तर मी तुला एक कुऱ्हाड देतों. तूं लाकूडफोड्याचें काम करूं लागलास तर तुला सहजीं पोटापाण्या पुरेसे पैसे मिळूं लागतील." तो गृहस्थ म्हणाला.

त्या गरीब माणसानें दुसऱ्या दिवसा-पासून लाकूडफोड्याचें काम सुरू केलें. एकदां त्याची बायको म्हणाली—"मला सार्वजनिक नहाणी घरांत नहावयास जावयाचें आहे. थोडे पैसे हवे आहेत."

त्या गरीब माणसानें पैसे दिले. त्याची बायको स्नानगृहांत गेली. अरबी पद्धतीचें तें सार्वजनिक स्नानगृह होतें. श्रीमंत घरा-ण्यांतील स्त्रिया स्नानासाठीं आल्या होत्या. त्यांच्या समोर आपल्या गरीबीकडे पाहून तिला लाज वाटली.

इतक्यांत तिनें एका श्रीमंत बाईला स्नानगृहाकडे येत असलेली पाहिलें. तिच्या बरोबर कित्येक दास दासी होत्या. चवकशी करतां तिला कळलें कीं ती राजज्योतिष्याची बायको आहे.

ती मनाशीं म्हणाली—"काय माझें हें भिकारडें आयुष्य? बायकोच व्हायचें तर राजज्योतिष्याचें व्हावें." असा विचार करीत ती गरीब स्त्री स्नान करून घरीं गेली.

श्री. आ. गो. पाटील

घरीं आल्याबरोबर ती नवऱ्याला म्हणाली— "तूं राजज्योतिषी तरी झालें पाहिजेस किंवा मला सोडचिठ्ठी तरी दिली पाहिजेस."

गरीब लाकूडफोड्या चकित होऊन म्हणाला—"तुला वेड तर नाहीं लागलें? अग! मला लिहितां वाचतां देखील येत नाहीं. मग मी ज्योतिषी कसा होणार?"

"तें सर्व मला माहीत नाहीं. तूं राज-ज्योतिषी होईपर्यंत मला तोंड दाखवूं नकोस!" बायको फणकाऱ्यानें म्हणाली.

बिचारा लाकूडफोड्या काय करणार? तो दऊत, टाक व कागद घेऊन स्नानघरा-समोर जाऊन बसला. कागदावर रेघोट्या काढीत तो दरवाज्यांतच बसला होता.

थोड्या वेळानें स्वतः खलीफा स्नानगृहांत आले. त्यांच्या भोंवती सर्व लोक घोळका करून उभे राहिले आणि त्यांच्याजवळ मनाला येईल तें मागूं लागले. त्या गरीब लाकूडफोड्यानें तें पाहिलें. त्याला वाटलें हा कोणीतरी मोठा माणूस दिसतो आहे. त्यानें लवून सलाम केला आणि म्हणाला— "हजूर! एकदां या गरिबाकडे आलांत तर मोठी कृपा होईल." खलीफा त्याच्याजवळ आले. योगायोग असा कीं त्याच वेळीं दिंडी



दरवाज्याचा एक कळस तुटून खालीं पडला. खलीफा बाजूला झाल्यामुळें ते वांचले.

खलीफांचे दरबारी व इतर लोक म्हणाले— "हा कोणीतरी मोठा ज्योतिषी दिसतो आहे. त्यानें हें पूर्वीं ओळखूनच खलीफांना बाजूला व्हायला सांगितलें. नाहींतर देशावर व धर्मावर केवढें संकट ओढवलें असतें!" सर्वांनीं त्या लाकूडफोड्याची प्रशंसा केली. सर्वांनीं त्याला जवळ जें कांहीं होतें बक्षीस दिलें. खलिफांनीं तर त्याला जडजवाहीर देऊन वर आशीर्वाद दिला.

घरीं गेल्यावर तो बायकोला म्हणाला— "हें पाहिलेंस! मला काय काय इनाम












मिळालें आहे तें! आतां तरी सरळ मुखानें बोलशील कीं नाहीं?"

"मला तुझीं हीं बक्षिसें घेऊन काय चाटावयाचीं आहेत? तूं राजज्योतिषी झालास कीं नाहीं हें प्रथम मला सांग. मग पुढल्या गोष्टी!" बायको म्हणाली.

बिचारा तोंड वांकडें करून म्हणाला— "राजज्योतिषी कांहीं मी अजून झालों नाहीं."

"मग तोंड दाखवायला कशाला आला आहेस येथें? हो चालता!" बायको म्हणाली. बिचारा पुन्हां त्या स्नानगृहासमोर जाऊन बसला.

त्या दिवशीं खलीफांची हिऱ्याची अंगठी चोरीला गेली होती. पुष्कळ शोध केला तरी ती सांपडली नाहीं. कोणी म्हटलें— "तो स्नाना गृहासमोर ज्योतिषी बसतो न? त्याला विचारा, तो सांगेल नक्की कोठें आहे ती. त्यानेंच त्या दिवशीं खलीफांना वांचविलें."

खलीफांनीं लाकूडफोड्याला बोलावून चोर कोण व कोठें आहे हें विचारलें.

बिचारा काय उत्तर देणार? म्हणाला— "मालक, विचार करायला थोडा वेळ पाहिजे!"

"हरकत नाहीं! दोन दिवसांनीं ये!" खलीफा म्हणाले.

बिचाऱ्यानें विचार केला, ज्योतिषी बनण्याच्या या नादांत जिवावरचेंच संकट येत आहेसें दिसतें. कोठें तरी पळून जावें. पण खलीफानें राजमहलांतल्या एका खोलींत त्याला बंद केलें व तेथेंच खाण्या पिण्याची पण व्यवस्था करून दिली.

लाकूडफोड्या घाबरून गेला. काय करावें, हें त्याला सुचेना. तो खिडकीजवळ उभा राहून बाहेर मैदानांत पहात राही. एकदां त्याला मैदानांत कांहीं बदकें जात असलेली दिसलीं. त्यांपैकीं एक बदक लंगडत चालत होतें.



लाकूडफोड्या मनांत म्हणाला—"हें बिचारें देखील माझ्या सारखेंच हतभागी दिसतें आहे."

तिसऱ्या दिवशीं खलीफाचें बोलावणें आलें, म्हणून त्याला जावें लागलें.

"माझी अंगठी कळली का कोठें आहे ती?" खलीफानें विचारलें.

"मालक, क्षमा करा! गेले दोन दिवस मी एका लंगड्या बदकाकडेच पहात राहालों." लाकूडफोड्या म्हणाला.

त्याच्या तोंडून 'लंगडें बदक' शब्द ऐकतांच पुढचें कांहीं ऐकण्यापूर्वींच खलीफाचे नोकर धांवत जाऊन त्या बदकाला धरून घेऊन आले. त्यांनीं त्याचें पोट चिरलें तेव्हां त्यांतून हिऱ्याची अंगठी निघाली.

खरें म्हणजे, एका दासीनें ती अंगठी चोरली होती. पण ती लपवून ठेवूं शकली नाहीं व चोरी उघडकीला येईल या भीतीनें तिनें ती अंगठी एका बदकाच्या घशांत कोंबली. बदक ओळखतां यावें म्हणून तिनें त्या बदकाचा एक पाय मोडून ठेवला.

खलीफाला वाटलें कीं लाकूडफोड्यानें वर्तवलेलें तें भविष्य होतें म्हणूनच अंगठी सांपडली. खलीफानें खूष होऊन त्याला पुष्कळ बक्षीस दिलें. लाकूडफोड्यानें तें आपल्या















बायकोस नेऊन दाखविलें. म्हणाला–" पहा, केवढें मोठें बक्षीस मिळविलें आहे तें."

ती म्हणाली–" तुझें बक्षीस घेऊन काय चाटावयाचें आहे? तूं राजज्योतिषी होऊन आला आहेस का हें प्रथम सांग!"

" नाहीं बुवा....!" नवरा म्हणाला.

" होय ना? मग आल्या वाटेनें परत जा!" बायको म्हणाली.

बिचाऱ्याला जिणें व्यर्थ वाटूं लागलें. तो सरळ खलीफांच्या महालाकडे गेला. खलीफाचे नोकर त्याला आंत बोलावून घेऊन गेले. तो म्हणाला–

" खलीफा, मी एक विनंति करूं इच्छितों. आपली कृपा असेल तर राजज्योतिषी व्हावयाची माझी इच्छा आहे." लाकूडफोड्या म्हणाला.

त्याच वेळीं त्यानें एका माणसाला एका पिशवींत कांहीं तरी भरून खलीफाकडे येत असलेला पाहिलें.

खलीफानें विचारलें–" सांग त्या पिशवींत काय आहे? तूं बरोबर उत्तर दिलेंस तर मी तुला राजज्योतिषी करून घेईन."

" क्षमा करा, स्नानागाराजवळ मी जरा बाजूला व्हायला सांगितल्यावर कळस तुटून पडला. मी लंगड्या बदकाची गोष्ट म्हटल्या-बरोबर त्याच्या पोटांतून अंगठी निघाली. ससानें किती लटपटी केल्या तरी तो शिकाऱ्याच्या जाळ्यांतून पळून जाऊं शकेल का?" लाकूडफोड्या म्हणाला.

नोकरानें पिशवींतून ससा बाहेर काढून दाखविला. खलीफा म्हणाले–" शाबास! शाबास! तुझ्याहून मोठा ज्योतिषी आणखी कोठें भेटणार? मी आजपासून तुलाच आपला राजज्योतिषी नेमतों!"

त्या दिवशीं लाकूडफोड्या आनंदानें घरीं गेला. त्याच्या बायकोच्या मनाचें समाधान झालें व पुढें त्यांचा संसार सुखाचा झाला.




# फोटो जोडनांवें चढाओढ

मार्च १९६१ :: बक्षिस १० रुपये




**कृपा करून जोडनांवें पोस्ट-कार्डावरच पाठवावीत.**

वरील फोटोंची ओळख करून देणारीं जोड-नांवें दोन ते चार शब्दांत किंवा त्याहून मोठीं पण परस्परांशीं थोडेंफार साम्य दर्शविणारीं असावीत आणि तीं जोडनांवें पोस्ट-कार्डावर स्वतःचें नांव व संपूर्ण पत्त्यासह ७ जानेवारी १९६१ पूर्वी खालील पत्त्यावर पाठवावीत. पोस्ट-कार्डाखेरीज आलेलीं जोडनांवें स्वीकार-ण्यांत येणार नाहींत.

**चांदोबा फोटो जोडनांवें चढाओढ, चंदामामा प्रकाशन, मद्रास-२६**

## जानेवारी महिन्याचा निकाल

या महिन्यासाठीं खालील जोडनांवें सर्वोत्तम ठरलीं आहेत. या महिन्याचा अंक प्रसिद्ध होतांच बक्षिस १० रुपये मनिऑर्डरनें प्रेषकाचें नांवीं रवाना करण्यांत येईल.

पहिला फोटो : होता वाचत रम्य साहस कथा, आश्चर्य त्या वाटलें!

दुसरा फोटो : त्यातें पाहुनि ही लिहीत कविता, गांभीर्य सामावलें!

प्रेषक : **श्री सरोज दिवेकर C/o माई दिवेकर,**

७०२, दिवेकर वाडा, धर्मपुरी-वाई (सातारा)

 Fullscreen  127     74 / 87  


बायकोस नेऊन दाखविलें. म्हणाला—"पहा, केवढें मोठें बक्षीस मिळविलें आहे तें."

ती म्हणाली—"तुझें बक्षीस घेऊन काय चाटावयाचें आहे? तूं राजज्योतिषी होऊन आला आहेस का हें प्रथम सांग!"

"नाहीं बुवा....!" नवरा म्हणाला.

"होय ना! मग आल्या वाटेनें परत जा!" बायको म्हणाली.

बिचाऱ्याला जिणें व्यर्थ वाटूं लागलें. तो सरळ खलीफांच्या महालाकडे गेला. खलीफाचे नोकर त्याला आंत बोलावून घेऊन गेले. तो म्हणाला—

"खलीफा, मी एक विनंति करूं इच्छितों. आपली कृपा असेल तर राजज्योतिषी व्हावयाची माझी इच्छा आहे." लाकूडफोड्या म्हणाला.

त्याच वेळीं त्यानें एका माणसाला एका पिशवींत कांहीं तरी भरून खलीफाकडे येत असलेला पाहिलें.

खलीफानें विचारलें—"सांग त्या पिशवींत काय आहे? तूं बरोबर उत्तर दिलेंस तर मी तुला राजज्योतिषी करून घेईन."

"क्षमा करा, स्नानागाराजवळ मी जरा बाजूला व्हायला सांगितल्यावर कळस तुटून पडला. मी लंगड्या बदकाची गोष्ट म्हटल्या-बरोबर त्याच्या पोटांतून अंगठी निघाली. ससानें किती लटपटी केल्या तरी तो शिकाऱ्याच्या जाळ्यांतून पळून जाऊं शकेल का?" लाकूडफोड्या म्हणाला.

नोकरानें पिशवींतून ससा बाहेर काढून दाखविला. खलीफा म्हणाले—"शाबास! शाबास! तुझ्याहून मोठा ज्योतिषी आणखी कोठें मिळणार? मी आजपासून तुलाच आपला राजज्योतिषी नेमतों!"

त्या दिवशीं लाकूडफोड्या आनंदानें घरीं गेला. त्याच्या बायकोच्या मनाचें समाधान झालें व पुढें त्यांचा संसार सुखाचा झाला.




## फोटो जोडनांवें चढाओढ

मार्च १९६१ :: बक्षिस १० रुपये





**कृपा करून जोडनांवें पोस्ट-कार्डावरच पाठवावीत.**

वरील फोटोंची ओळख करून देणारीं जोड-नांवें दोन ते चार शब्दांत किंवा त्याहून मोठीं पण परस्परांशीं थोडेंफार साम्य दर्शविणारीं असावीत आणि तीं जोडनांवें पोस्ट-कार्डावर स्वतःचें नांव व संपूर्ण पत्त्यासह ७ जानेवारी १९६१ पूर्वी खालील पत्त्यावर पाठवावीत. पोस्ट-कार्डाखेरीज आलेलीं जोडनांवें स्वीकार-ण्यांत येणार नाहींत.

**चांदोबा फोटो जोडनांवें चढाओढ, चंदामामा प्रकाशन, मद्रास-२६**

### जानेवारी महिन्याचा निकाल

या महिन्यासाठीं खालील जोडनांवें सर्वोत्तम ठरलीं आहेत. या महिन्याचा अंक प्रसिद्ध होतांच बक्षिस १० रुपये मनिऑर्डरनें प्रेषकाचें नांवीं रवाना करण्यांत येईल.

पहिला फोटो : होता वाचत रम्य साहस कथा, आश्चर्य त्या वाटलें!

दुसरा फोटो : त्यातें पाहुनि ही लिहील कविता, गांभीर्य सामावलें!

प्रेषक : **श्री सरोज दिवेकर C/o माई दिवेकर,**

७०२, दिवेकर वाडा, धर्मपुरी-वाई (सातारा)

Fullscreen 127 12 / 86




मशाली लावून युद्धाला सुरवात झाल्यावर दोन्ही बाजूचे योद्धे हमरी तुमरीनें पुढें सरसावले. द्रोणाचार्यानें या युद्धांत फार मोठा पराक्रम गाजविला. कर्णानें तर आज आपलें सर्व युद्ध कौशल्य पणाला लावण्याचेंच जणूं ठरविलें होतें. पांडवसेनेची पीछेहाट होऊं लागली. आणीबाणीचा प्रसंग येऊन ठेपला.

युधिष्ठिरानें अर्जुनाला बोलावून म्हटलें—"या कर्णाला थोपवून धरण्याची शक्ति फक्त तुझ्यांत आहे. काय वाटेल तें कर आणि याला एक पाऊल देखील पुढें टाकूं देऊं नकोस.

अर्जुनानें कृष्णाचा सल्ला विचारला. कृष्ण म्हणाला—"या वेळीं कर्णासमोर तूं जाण्यांत शहाणपणा नाहीं. इंद्रानें जेव्हां त्याच्याकडून कवच कुंडलें मागून घेतलीं तेव्हां त्याचा त्याग पाहून वैजयंती नामक एक अमोघ अस्त्र त्याला दिलें. तें अस्त्र त्याच्या जवळ असे पर्यंत तूं त्याच्याशीं समोरासमोर युद्धास जाणें बरोबर होणार नाहीं. तें त्यानें तुझ्यासाठीं मुद्दाम राखून ठेवलें आहे. हें विसरून कसें चालेल? त्याला थोपवून धरण्याची शक्ति फक्त एका घटोत्कचाच्या अंगांत आहे."

असें सांगून कृष्णानें घटोत्कचाला बोलाविलें आणि म्हणाला—"पांडवांचा जय पराजय तुझ्या हातीं आहे. कर्ण सैन्याचा संहार करीत कसा पुढें येत आहे हें तूं पहातोसच आहेस. या रात्रीच्या वेळीं माया युद्धाशिवाय जय मिळणें शक्य नाहीं. तूं त्यांत प्रवीण आहेस.

"तुझ्या मदतीला तुझे बाबा, भीमदादा व सात्यकी येतील." अर्जुन म्हणाला.

"कोणी माझ्या मदतीला येण्याची गरज नाहीं. द्रोणाचार्य व कर्ण यांना बाटेला लावणें माझ्याकडे लागलें." असें सांगून घटोत्कच आपली राक्षस सेना घेऊन युद्धभूमीवर निघाला. घटोत्कचाला येत असलेला पाहून दुर्योधन दुःशासनाला म्हणाला—"जा तूं कर्णाच्या मदतीला!"

त्याच वेळीं जटासुराचा मुलगा अलंबुस दुर्योधनाजवळ येऊन म्हणाला—"महाराज! दुष्ट पांडवांनीं माझ्या महापराक्रमी वडिलांचा वध केला आहे. म्हणून आपली परवानगी असेल तर मी त्या पांडवांना ठार करून त्याचें प्रायश्चित त्यांना देणार आहे. म्हणजे वडिलांच्या मृतात्म्यास शांति मिळेल."

दुर्योधन म्हणाला—"अलंबुसा! प्रथम या घटोत्कचाला अडव!"

अलंबुस व घटोत्कच यांचें द्वंद्व जुंपलें. घटोत्कचानें क्षणार्धांत घमेंडखोर अलंबुसाला यमसदनास पाठविलें. त्यानें तलवारीनें त्याचा शिरच्छेद केला व दुर्योधनाकडे जाऊन म्हणाला—"महाराज! असें म्हणतात, स्त्री, गुरुजन व राजा यांच्याकडे रिक्त हस्तानें जाऊं नये. म्हणून हा नजराणा सादर करीत आहे." असें सांगून त्यानें अलंबुसाचें शिर



दुर्योधना समोर टाकलें. घटोत्कचाचें तें क्रूर कृत्य व त्याची ती अचाट शक्ति पाहून दुर्योधनाच्या साऱ्या अंगाला घाम सुटला आणि अंगावर शहारे उभे राहाले. त्यांत कर्ण ज्या बाजूला होता त्या बाजूला घटोत्कच वळत असलेला पाहून तर दुर्योधन जास्तच घाबरला.

इतक्यांत अलायुध नांवाचा दुसरा एक राक्षस येऊन दुर्योधनाला म्हणाला—"भिमानें बकासुर व हिडिंब राक्षसांस मारून आमच्या राक्षस जातीचा अपमान केला आहे. त्याला व त्याचा मुलगा घटोत्कच ह्याला ठार केल्या

Fullscreen 127 14 / 86

शिवाय पितरांचें ऋण फेडल्याचें समाधान मला होणार नाहीं. दुर्योधन म्हणाला—"फार छान! हो पुढें! आम्ही आहों तुझ्या पाठीशीं."

अलायुधाशीं युद्ध करण्यास भीम पुढें सरसावला. पण कृष्णानें त्याला मागें फिरायला सांगितलें व कर्णाशीं युद्ध करण्यास दुसऱ्या योद्ध्यांस पाठवून घटोत्कचाला बोलावून घेतलें. राक्षसांशीं राक्षसानेंच युद्ध करावें असें सांगून त्यानें घटोत्कचाला पाठविलें. त्यानें एका क्षणार्धांत अलायुधाचा शिरच्छेद केला. त्याचें शिर दुर्योधनाच्या समोर जाऊन आदळलें. दुर्योधन दचकला. तिकडे पांडव सैन्यांत विजयोत्साहानें योद्धे शंख वाजवूं लागले.

दुसरा कोणी राक्षस कौरव सैन्यांत उरलाच नाहीं. तेव्हां घटोत्कचानें दुर्योधनाच्या भावांना पकडून ठार करून भिरकावून द्यायला सुरवात केली.

तें पाहून दुर्योधन कर्णाकडे धांवला व म्हणाला—"प्रथम या घटोत्कचाचा अंत कर बाबा! अर्जुनाशीं युद्ध करणें आपणांस शक्य आहे. पण याच्याशीं कोण युद्ध करणार? इंद्राकडून तुला जी अमोघ शक्ति मिळाली आहे तिचा उपयोग केला नाहींस तर आपणांपैकीं एकाला देखील हा जिवंत सोडणार नाहीं."

निरुपाय म्हणून कर्णानें त्या अमोघ शक्तीचा प्रयोग केला. घटोत्कच रणभूमीवर पडतांच पांडवांच्या शिबिरांत सर्व शोक करूं लागले. एकटा कृष्ण हंसत होता. अर्जुनानें कारण विचारलें तेव्हां तो म्हणाला—"अर्जुना! कर्णाची ही अमोघ शक्ति त्यानें तुझ्यासाठीं राखून ठेवली होती. ती असेपर्यंत तूं त्याला जिंकूं शकला नसतास. आतां मी हंसूं नाहीं तर काय रडूं?"





# समुद्रमंथन

इंद्र म्हणाला—"कशास भांडण
उगीच अमृतासाठीं या।
दोघांसाठीं आतां आपण
दोन भाग याचे करूंया!"

कबूल नाहीं आम्हां वदले
दैत्य ओरडा करुनिया।
चूप बैसले, परंतु करडी
दृष्टि बळीची पाहुनिया॥

कलश मधोमध ठेवुनि झाले
दैत्य बाजुला सुखे जणूं।
"कावा देवांचा हा दिसतो!"
मनांत ते लागले म्हणूं॥

उभे राहले मधें ठेवुनी
कलश अमृताचा जेव्हां,
एक सुंदरी प्रकट जाहली
तिथें अचानक पण तेव्हां॥

रूप मनोहर, करूनि वरती
आली ती सोळा शृंगार।
तालावर अन् नृत्य छनन् छन्
करित नूपुरांचा झनकार॥

पाहुनि तिजला अप्सरांस पण
नाचण्यास चढला उत्साह।
पैंजण बांधुन आल्या; असुरां
त्यांत वाटला नव उत्साह॥

मादक रूपावर ते भुलले
आणि भाळले नृत्यावर।
मत्त जाहले संगीतावर
नव्हता कोणी भानावर॥

ओंवाळुनि टाकण्यास अपुले
प्राण तिच्या मृदु हास्यावर
तयार होते दैत्य; पडलें
देवांच्या तें पथ्यावर॥


Fullscreen
127




16 / 86


पर्वत, डोंगर, झाडें-झुडपें
आलें ज्याच्या हातीं जें,
करूं लागले प्रहार घेउन
झालें, होतें नशिबीं जें ॥

जोर लावला देवांनीं पण
शौर्यानें ते लढले खूप ।
असुर विसरले शौर्य आपुलें
पाय काढला अन् गुपचूप ॥

रक्ताचे नद वाहुं लागले
बुडूं लागले राक्षस त्यांत
ढीग मढ्यांचे पडूं लागले
दैत्यगणाचे रणांगणांत ॥

उरले राक्षस जे जे होते
पळून गेले पाताळांत ।
इकडे सुरराजास घातली
विजयश्रीनें माळ गळ्यांत ॥

बलि राजानें सर्व पाहिलें
होतें डोळ्यांनीं अपुल्या ।
निराश होउन नावें ठेवित
गृहास गेला तो अपुल्या ॥

समुद्रमंथन पूर्ण जाहलें
पूर्ण-काम अन् झाले देव ।
घेउनि सारीं रत्नें गेले
स्वर्गी आनंदानें देव ॥

उरलें कलशा मध्यें होतें
थोडें अमृत घेउनि तें,
वासुकीस इंद्रानें दिधलें
आनंदें तो प्याला तें ॥

समुद्रमंथन झालें, त्याचा
झाला जगतीं शुभ परिणाम ।
अमर जाहले स्वर्ग-निवासी
झालें सुखसागर सुरधाम ॥

[ संपूर्ण ]






[ ४ ]

[ गरीब प्रजेचें गाऱ्हाणें ऐकून कीं उग्राक्ष राक्षस व त्याचे अनुयायी, माणसें व गुरें पळवून नेत आहेत, चित्रसेन आपल्या कांहीं निवडक सैनिकांसह उग्राक्षाच्या किल्ल्यांत गेला. तेथें त्याला कळलें कीं तें काम राक्षसांचें नसून अग्निद्वीपांतील कांहीं विचित्र मनुष्यांचें आहे. उग्राक्षानें वचन दिल्यावर कीं तो तीं माणसें कोण व कशीं येतात हें दाखवील, चित्रसेन.नें उग्राक्षाच्या घरींच आपल्या अनुयायांसह ती रात्र काढण्याचें ठरविलें. पुढें वाचा—]

उग्राक्षानें चित्रसेन व त्याच्या अनुयायांना आपला सर्व किल्ला दाखविला. त्या किल्ल्यां-तल्या एका कोठारांत जडजवाहीर आणि सोनें व चांदी पोतीं भरभरून ठेवलेलें पाहून चित्रसेनाला फार आश्चर्य वाटलें. एका कोठारांत राक्षसांचीं प्राचीन काळापासूनचीं शस्त्रास्त्रें, शिरस्त्राणें व चिलखतें ठेवलेलीं चित्रसेनानें पाहिलीं. चित्रसेनानें उग्राक्षाला विचारलें—"उग्राक्षा! तुम्हां राक्षसांना इतक्या धनाची व शस्त्रास्त्रांची काय गरज?"

उग्राक्ष मोठ्यानें हंसला व म्हणाला—"चित्रसेना! अरे, आमचे राक्षस तुम्हां मनुष्यांसारखे सभ्य होऊन शेती, व्यापार वगैरे करूं लागले म्हणजे याची गरज भासेल कीं नाहीं? अठरा वर्षांनीं मला या धनाची एक विशेष जरूर पडणार आहे."









Fullscreen 127 18 / 86

अठरा वर्षांनंतरची गोष्ट ऐकतांच चित्रसेनाच्या अंगावर शहारे उभे राहिले. पण त्यानें वेळींच स्वतःला सावरून घेतलें.

उग्राक्षानें आपल्या पाहुण्यांसाठीं खास मेजवानीची व्यवस्था केली होती. सर्व खाण्यापिण्यांत व गप्पा मारण्यांत गर्क होऊन गेले होते, इतक्यांत एका राक्षस नोकरानें उग्राक्षाला सांगितलें कीं महाराज कुंभिकूप भागांतल्या आपल्या अनुयायांनीं मोठा जाळ करून अशी सूचना दिली आहे कीं अग्निद्वीपांतून ते भयंकर पक्षी येत आहेत.

तें ऐकून उग्राक्ष चित्रसेनाला म्हणाला– "चल, आटप लवकर! तुझ्या राज्यांत शिरून गुरें व माणसें उचलून नेणारे लोक येत आहेत." सर्वांनीं भराभर जेवणें आटोपलीं व उग्राक्षाबरोबर निघाले. उग्राक्षानें आपल्या अनुयायांना जागोजागीं नेमलें व चित्रसेन व त्याच्या अनुयायांना बरोबर घेऊन निघाला.

सर्व पूर्वेकडच्या दाट रानांत येऊन पोंचले असतील इतक्यांत त्यांना किल्ल्याच्या बाजूनें पंखांचा आवाज ऐकूं आला. किल्ल्यावर आकाशांत ते भयंकर पक्षी उडत असलेले त्यांना दिसले. किल्ल्यांतले पाहरेकरी मोठ-मोठ्या मशाली जाळून ते पक्षी किल्ल्यांत उतरूं नयेत याची खबरदारी घेत होते. जाळ पाहून व राक्षसांचा ओरडा आरडा ऐकून पक्ष्यांना किल्ल्यांत उतरण्याची हिम्मत झाली नाहीं.

चित्रसेन म्हणाला–"उग्राक्षा! यांचा काय विचार आहे कळत नाहीं. तुझ्या किल्ल्यांत शिरून तुझ्या राक्षस अनुयायांना पळवून नेण्याचा यांचा विचार आहे वाटतें? म्हणजे हे स्वतःच्या प्राणालाच मुकणार म्हणावयाचें."

"अग्निद्वीपांतल्या लोकांनीं यापूर्वी देखील आमचा किल्ला सर करण्याचा दोन तीन वेळां प्रयत्न केला. परंतु त्या कामीं त्यांना यश मिळालें नाहीं. माझ्या अनुयायांनीं जाळ करून व मशाली पेटवून त्यांना पळवून लावलें. पक्ष्यांच्या पाठीवर बसून येणारांपैकीं एकाला भाला मारून खालीं पाडलें. त्याला आम्ही कैद केलें आणि घाण्याला जुंपलें तेव्हां तो व त्याचे इतर साथी कोठें राहतात हें त्यानें सांगितलें. पुढें त्याला आम्ही नीट वागविलें. परंतु कां कोणास ठाऊक? तो एकाएकीं मरण पावला व त्याच्याकडून जास्त





Fullscreen 127 20 / 86



माहिती काढून घेणें आम्हांला अशक्य झालें. तेव्हांपासून त्याचे साथी सुडाच्या भावनेनें नानाप्रकारें त्रास देत आहेत. पण त्यांना यश मिळणें शक्य नाहीं." उग्राक्ष म्हणाला.

उग्राक्ष बोलत असतां सोसाट्याचा वारा सुटला व त्यावरून ते भयंकर पक्षी येत असल्याचें त्यांनीं अनुमान लावलें आणि खरोखरच कर्कश आवाज करीत दोन पक्षी किल्ल्याबाहेर कांहीं अंतरावर उतरले. त्यांच्या पाठींवरून व्याघ्रचर्म घातलेले चार लोक उड्या मारून जमिनीवर उतरले. त्यांच्या हातांत भाले होते. त्यांनीं जमिनीवर निजून



दूरवर झाडींत कोणी दिसतें का पाहिलें. उग्राक्षानें चित्रसेनाला सावध केलें आणि त्याला व त्याच्या अनुयायांना घेऊन तो एका उंचवट्याच्या जागीं येऊन पोंचला.

त्या विचित्र लोकांमागें ते दोघे पक्षी पण येत होते. त्यांना पंख होते म्हणून पक्षी म्हणावें लागतें. पण त्यांना चोंचीच्या जागीं मगरीच्या तोंडासारखे मोठे जबडे होते व तसेच भयंकर दांत होते. अंगावर पिसें नव्हतीं कीं लव पण नव्हती. ते दोन्ही पायांवर थोडें पुढें वांकून चालत असत. त्यांच्या तंगड्याच सात-आठ फूट उंचीच्या होत्या.

उग्राक्ष म्हणाला—"आपण या माणसांना भिण्याचें कारण नाहीं. पण हे जे पक्षी आहेत तेच भयंकर आहेत. ते माणसेंच्या माणसें गिळून टाकतात व आम्हां राक्षसांच्या अंगाचे लचके तोडून खातात. हे पक्षी आपल्या मालकांचें रक्षण करतात व कोणी हल्ला करण्यासाठीं आलें तर हे पक्षीच पुढें धांवतात. हे लोक यांना मागाहून शिट्या वाजवून पिटाळीत असतात."

उग्राक्षानें सांगितल्याप्रमाणेंच ते लोक शिट्या वाजवूं लागले व पक्षी पळूं लागले. ज्या जागीं उग्राक्ष व चित्रसेन आपल्या अनुयायांबरोबर लपून बसले होते तिकडेच ते सरळ येऊं लागले.

"पाहिलेंस ते इकडेच येत आहेत!" उग्राक्ष म्हणाला.

"चला, आपण सर्व मिळून त्यांच्यावर हल्ला करूं या. आपण गंमत पहात उभे राहिलों तर आपणा सर्वांना उचलून नेल्या-शिवाय ते राहणार नाहींत. म्हणून वेळींच त्यांच्यावर हल्ला करून त्यांना आपलें पाणी दाखविलें पाहिजे." चित्रसेन म्हणाला.

"ते पक्षी नसते तर या व्याघ्रचर्म पांघरून येणाऱ्या गाढवांना मी ढेंकणासारखें चिरडून मारून टाकलें असतें." उग्राक्ष म्हणाला.

तितक्यांत उग्राक्ष व चित्रसेन उभे होते तेथें एका झाडावर एक घुबड मोठ्यानें ओरडलें. त्याचा आवाज ऐकून ते पक्षी बरोबर त्या दिशेला वळले. अर्थात तें घुबड त्या लोकांचा एक दूत होतें, हें उघड होतें.

आतांपर्यंत पक्षी मागें व ते लोक पुढें होते. पण घुबड ओरडल्याबरोबर पक्षी पुढें आले व ते लोक त्यांच्या मागें चालूं लागले. ते पक्षी कर्कश व भयंकर आवाज काढीत पुढें पुढें येत होते.



उग्राक्षानें आपल्या अनुयायांना बोलावून हळूच त्यांच्या कानांत कांहींतरी सांगितलें. ते दोन तुकड्या करून कोठेंतरी निघून गेले. उग्राक्ष व चित्रसेन ज्या बाजूला उभे होते त्या बाजूला ते पक्षी धांवले. त्यांच्या मागें भाला घेऊन त्यांचे पांच सहा मालक पण येत होते.

चित्रसेनानें आपली तलवार म्यानेंतून काढली. उग्राक्षानें आपली गदा घेतली व दोघांनीं त्या पक्ष्यांवर हल्ला केला. उग्राक्षाची गदा नेमकी एका पक्ष्याच्या डोक्यावर बसली व तो कोलमडून खालीं पडला. परंतु दुसऱ्या

Fullscreen 127 22 / 86



पक्ष्यानें उग्राक्षाच्या खांद्याचे व छातीचे लचके तोडायला सुरवात केली.

त्याचवेळीं आणखी कित्येक पक्षी तेथें येऊन पोंचले. त्यांच्या पाठीवर ते क्रूर लोक होते. परंतु उग्राक्षाच्या अनुयायांनीं दोन्ही बाजूंनीं असा छापा मारला कीं त्यांची धुळदाण उडून गेली व ते खालीं उतरलेच नाहींत. उग्राक्षाच्या अनुयायांनीं त्या क्रूर लोकांना धरून दूर उचलून फेंकायला सुरवात केली. चित्रसेनानें एकाला आडवा कापून काढला.

उग्राक्षानें स्वतःच्या प्राणाची फिकीर न करून असें शौर्य गाजवलें कीं शत्रूला पाय काढावा लागला. उग्राक्षाच्या गदेचा प्रहार पक्ष्यांना इतका असह्य झाला कीं त्यांना पाय काढण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. या निकराच्या युद्धांत उग्राक्ष व त्याचे अनुयायी चांगलेच जखमी झाले.

चित्रसेनानें एकाला यमसदनास पाठविल्यावर दुसऱ्याला जाऊन घेरलें. परंतु पक्षीच पळूं लागल्यावर त्या लोकांनीं सुद्धां पळायला सुरवात केली. चित्रसेन व त्याच्या अनुयायांच्या तलवारीचे वार चुकवीत ते मार्गें सरकत होते. पक्ष्यांची व त्यांच्या अनुयायांची अशी पीछेहाट होऊं लागली तेव्हां चित्रसेनाला व त्याच्या अनुयायांना जास्तच चेव चढला. चित्रसेनानें राक्षसांच्या मदतीनें पुन्हां जोराचा हल्ला केला. "या वेळीं या दुष्टांची खोड मोडली तर हे पुन्हां इकडे येण्याची हिम्मत करणार नाहींत. म्हणून उग्राक्षा! चल एकदां शेवटचा व निकराचा हल्ला करूं या!" चित्रसेन म्हणाला.

उग्राक्षानें उग्ररूप धारण केलें व आपली गदा फिरवीत व भयंकर गर्जना करीत शत्रूवर तुटून पडला. त्याचे अनुयायी व चित्रसेन आणि त्याचे अनुयायी पण बरोबर होतेच. कित्येक शत्रू हताहत झाले व जे उरले

Fullscreen 127 24 / 86









त्यांनीं पक्ष्यांच्या पाठीवर उड्या मारल्या व त्यांना पळण्यास खूण केली. मालकांची शिट्टी ऐकतांच पक्ष्यांनीं उड्डाण केलें. उग्राक्षानें सिंहगर्जना करून आपली गदा एका पक्ष्याला भिरकावून मारली. पण तो पक्षी पुष्कळ दूर निघून गेला होता.

उग्राक्ष अगदीं दमून गेला होता. त्याच्या अंगाखांद्यांतून रक्ताच्या धारा वहात होत्या. ते पक्षी दृष्टीआड झाल्याबरोबर तो जमिनीवर बसला आणि आडवाच झाला.

चित्रसेन त्याच्याजवळ येऊन सहानुभूतिपूर्वक म्हणाला–" उग्राक्षा ! आज तूं जो पराक्रम दाखविलास तो मी कधीं विसरणार नाहीं. तूं होतास म्हणून आमचें सर्वांचें रक्षण झालें. चल या जखमा धुवून कांहीं झाडपाला लावूं या."

उग्राक्ष म्हणाला–" ह्या दुखण्यांत निदान दहा दिवस तरी अंथरुणावर पडून रहावें लागणार आहे. माझ्या अनुयायांपैकीं किती मेले व किती जखमी झाले व किती वांचले ?"

फक्त दोघेच मेले. चार जण जखमी होऊन पडले आहेत. शत्रूंपैकीं एक जणच मेलेला दिसतो आहे. पुष्कळ हताहत झाले. पण त्यांना उचलून घेऊन गेले ते." चित्रसेन म्हणाला.

" भितरे भागूबाई कुठले." उग्राक्ष म्हणाला.

चित्रसेनाचे अनुयायी पुढें येऊन म्हणाले– " महाराज ! आपल्यापैकीं कित्येक हताहत होऊन पडले आहेत."

त्यांचा उतरलेला चेहरा पाहून चित्रसेन म्हणाला–" युद्ध करायला जातांना त्याची तयारी करूनच जावें लागतें ! असें हताश होऊन कसें चालेल ? सर्वांना घेऊन चला, त्यांच्या औषध पाण्याची व्यवस्था केली पाहिजे."

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]





# ऊर्वशी-पुरूरव

एके दिवशीं रंभा, ऊर्वशी वगैरे अप्सरा कुबेरपुरी अलकापुरीहून अमरावतीला परत येत असतां हिरण्यपूर निवासी केशी नामक राक्षसानें हेमकूट पर्वतावर ऊर्वशी व तिची सखी चित्रलेखा दोघींना धरलें. दोघींना धरून तो ईशान्य दिशेकडे निघाला.

रंभा वगैरे इतर अप्सरा जोरजोरानें ओरडूं लागल्या–" वांचवा ! वांचवा !"

त्यांचा आवाज चक्रवर्ति पुरूरवाच्या कानीं पडला. तो प्रतिष्ठानपूरचा राजा होता. महा पराक्रमी म्हणून त्रिलोकांत त्याची कीर्ति होती. त्यानें स्वतः इंद्राला अनेक युद्धांत मदत करून फार मोठी कीर्ति मिळविली होती. तो स्नानादि उरकून प्रातःसंध्या समाप्त करून राजधानीकडे निघणार होता. इतक्यांत त्याच्या कानावर रंभादिकांचा आवाज आला. तो त्यांच्या मदतीला धांवत आला व सर्व वृत्तांत ऐकून म्हणाला–" मी तुमच्या दोघी सखींना सोडवून घेऊन येतो."

नंतर पुरूरवा आपल्या सोमदत्त रथांत बसून ईशान्य दिशेकडे निघाला. रंभादिक अप्सरा हेमकूट पर्वत चढूं लागल्या.

पुरूरवानें वायव्यास्त्राचा प्रयोग करून केशी राक्षसाच्या सैन्याची धुळधाण उडवून दिली. त्यानें केशीचा पराभव केला व दोघां अप्सरांना सोडवून परतला. ऊर्वशी तर राक्षसानें धरल्याबरोबर बेशुद्धच होऊन गेली होती. हळूहळू ती शुद्धीवर येऊं लागली. पुरूरवानें आपलें रक्षण केल्याचें ऐकून तिनें मनांतल्या मनांत त्याचे आभार मानले व त्याला मनानें वरलें. ऊर्वशीचें रूपलावण्य पाहून पुरूरवाचें मन देखील तिच्यावर बसलें.

दुरून पुरूरवाच्या रथाचा झेंडा पाहून रंभादि अप्सरांना आपल्या दोघी सखी

Fullscreen 127 26 / 86



सुटून आल्याबद्दल फार आनंद झाला. त्यांनीं पुरूरवाने त्या मदतीबद्दल आभार मानले. पुरूरवा म्हणाला—"मी तर कांहींहि केलें नाहीं. ही सर्व इंद्राची कृपा आहे."

इकडे नारदानें इंद्रसभेंत केशीनें ऊर्वशीला पळवून नेल्याचें वृत्त सांगितलें. इंद्राच्या आज्ञेनें चित्ररथ गंधर्व सेना घेऊन ईशान्य दिशेकडे जात असतां वाटेंत त्याला कळलें कीं पुरूरवानें ऊर्वशीला सोडवून आणलें आहे व सर्व अप्सरा आतां हेमकूट पर्वतावर पुरूरवाबरोबर आहेत. चित्ररथ हेमकूट पर्वतावर जाऊन पुरूरवाला म्हणाला—"महाराजाधिराज! ब्रह्मदेवानें अप्सरांत सर्वश्रेष्ठ व सुंदर अशा ऊर्वशीची सृष्टि केली व इंद्राला दिली. आतां आपण तिचें रक्षण करून पुनरपि इंद्रालाच अर्पण करीत आहांत. आपण स्वतः स्वर्गपुरी अमरावतीस पदार्पण करून याबद्दल सुरराज इंद्राचें आतिथ्य स्वीकारावें."

पण पुरूरवा म्हणाला—"आपल्या या विनंतीस मान देऊन इंद्रपुरीस येणें माझें कर्तव्य आहे. परंतु मला राजधानींत काम असल्याकारणानें मी आपणांबरोबर येऊं शकत नाहीं. याबद्दल क्षमा करावी." पुरूरवाला सोडून इंद्रपुरीस जाणें ऊर्वशीला बरें वाटेना. ती स्वतः त्याचा निरोप देखील घेऊं शकली नाहीं. तिनें आपली सखी चित्रलेखा हिच्या जवळ सांगून निरोप पाठविला—"आपणांस जावयाचें आहे तर जावें पण या दासीला मात्र विसरूं नये." पुरूरवा तो निरोप ऐकून सर्व अप्सरा दृष्टीआड होईपर्यंत जागच्याजागीं उभा राहिला.

प्रतिष्ठानपूरला पोंचल्यावर ऊर्वशीच्या विरह दुःखानें राजाचें मन राज्यकार्यांत लागेना. ऊर्वशीनें आपलें मन हरण करून नेल्याची गोष्ट त्यानें आपला विदूषक मित्र



माणवक यास सांगितली व ही गोष्ट कोणास सांगूं नये असें बजावून सांगितलें.

पुरूरवाची पट्टराणी कालिकादेवी हिला राजा दुःखी असल्याचें कळलें. तो नेहमीं अन्यमनस्क राही. तिनें आपली दासी निपुणिका हिला बोलावून माणवकाकडून राजाच्या दुःखाचें कारण चतुराईनें काढून घेऊन येण्यास सांगितलें.

निपुणिका फार चतुर दासी होती. ती माणवक एकांतांत बसला असतां त्याच्याकडे गेली व म्हणाली—"राणीनें पाठविलें आहे मला आपणांकडे!" माणवकानें तिला विचारलें—"महाराणी सरकारांची काय आज्ञा आहे?"

"मी किती दुःखी आहें, हें माहीत असून तूं असा थंड का? महाराजांना काय झालें आहे हें तूं सांगितलें नाहींस तर मी प्राण देईन. राणी सरकारांनीं तुला सांगायला सांगितलें आहे." निपुणिका म्हणाली.

"महाराजांनीं राणीसरकारांविरुद्ध अन्यायाचें वर्तन केलें आहे कीं काय?" विचारलें.

निपुणिकानें चतुराईनें विचारलें—"याहून मोठा अन्याय तो काय असणार? महाराजांनीं राणी सरकारांशीं प्रेमालाप करीत असतां



त्यांचें नांव न घेतां चुकून एका परक्या स्त्रीचें नांव घेतलें!"

माणवकाला वाटलें स्वतः महाराजांनींच रहस्य स्फोट केलेला दिसतो आहे. राणी सरकारांची मर्जी संपादन करतां येईल असा विचार करून तो म्हणाला—"महाराजांच्या तोंडून ऊर्वशीचें नांव निघालें होतें का? त्यांनीं तिला पाहिलें तेव्हां पासून त्यांना प्रेमोन्माद चढला आहे." खुलसटपणानें त्यानें सर्वच सांगून टाकलें. अशा प्रकारें निपुणिकानें चातुर्यानें राजाच्या मनांतील रहस्य ओळखून राणीला जाऊन सांगितलें.

Fullscreen 127 / 86



"ठीक! आतां पुढें क्षणाक्षणाला जें जें घडेल तें येऊन मला सांगत जा!" राणीनें निपुणिकाला सांगितलें.

राजानें माणवकाला बोलावून म्हटलें—"आतां हा वियोग असह्य वाटूं लागला आहे. हें दुःख कमी व्हायला कांहीं उपाय सांग."

"पोटभर जेवा महाराज! म्हणजे सर्व दुःख एका क्षणांत पळून जाईल!" माणवक आपल्या स्वभावाप्रमाणें थट्टेत म्हणाला.

"तूं आहेस खादाड! म्हणून पक्वान्ना-शिवाय तुला दुसरें कांहीं सुचत नाहीं. पण मला उर्वशी भेट झाल्याशिवाय माझें दुःख कमी होणार नाहीं." पुरूरवा म्हणाला.

"महाराज, आपण जसे दुःखी आहां तशीच उर्वशी देखील दुःखी असेल कां? अहो, तिला गरज असेल तर ती नाहीं का येणार तुमच्याकडे? विदूषक म्हणाला.

दोघे उद्यानांत जाऊन बसले. वसंत ऋतूचें राज्य चहूंकडे पसरलें होतें. त्यामुळें राजाचें दुःख कमी होण्याऐवजीं जास्तच वाढलें. त्यानें माणवकाला तें दुःख कमी करण्यास कांहींतरी उपाय करावयास सांगितलें. कांहीं वेळ विचार करून विदूषक म्हणाला—"महाराज! मला वाटतें तुम्ही झोंपा. म्हणजे उर्वशी स्वप्नांत येईल व तुमचें सर्व दुःख नाहींसें होईल. नाहींतर उर्वशीचें चित्र काढून तें पहात बसा!"

"या दुःखांत झोंप का येणार? तिचें चित्र काढूं लागलों तर डोळ्यांतून अश्रूंचा पूर येईल व पुढें या डोळ्यांना सर्व जग पारखें होईल!" महाराज म्हणाले.

"मला तिसरा उपाय सुचत नाहीं!" माणवक म्हणाला.

इतक्यांत स्वतः उर्वशी आपल्या सखी-बरोबर तेथें आली व झाडी आड उभी राहून गंमत पहात उभी राहली. पुरूरवा व माणवक यांचें संभाषण तिनें ऐकलें. महाराज तिच्या विरहदुःखानें दुःखी आहेत हें ऐकून तिला अपार आनंद झाला. तिनें एका ढलप्यावर दोन कविता लिहिल्या आणि तो राजाच्या समोर टाकला.

माणवकानें तो ढलपा पाहून उचलून राजाला दिला. राजानें त्यावर लिहिलेल्या कविता वाचल्या. त्या उर्वशीनें लिहिलेल्या आहेत हें कळल्यावर तर राजाच्या आनंदाला पारावार उरला नाहीं. त्यानें तो ढलपा माणवकाला देऊन सुरक्षित ठेवण्यास सांगि-तलें. त्याच वेळीं उर्वशी व चित्रलेखा राजा-समोर येऊन उभ्या राहिल्या. पुरूरवा उर्वशीला भेटून देहभान विसरून गेला. पण त्यांचा परस्परांशीं प्रेमालाप चालू असतां मध्येंच इंद्रलोकांतून उर्वशीकडे निरोप आला कीं भरत मुनींनीं लक्ष्मी स्वयंवर नांवाचें नाटक रचलें असून त्यांत लक्ष्मीची भूमिका करण्यासाठीं उर्वशीनें हजर रहावें. नाटकाचा प्रयोग पाहण्यास स्वतः इंद्र येणार होता. नाईलाजानें उर्वशीला इंद्रलोकीं जावें लागलें.

इकडे माणवकानें तो ढलपा हलगर्जीपणानें कोठें तरी ठेवला. निपुणिकेकडून महाराज उद्यानांत माणवकाबरोबर विहारकरीत आहेत



हें ऐकून राणी तेथें गेली व झुडपाआड उभी राहून दोघांचें संभाषण ऐकूं लागली.

त्याच वेळीं तो ढलपा वाऱ्याबरोबर उडत नेमका राणीच्या समोर येऊन पडला. त्यावर लिहिलेली कविता वाचून राणीच्या तळ-पायाची आग मस्तकाला गेली. "महाराज हाच ढलपा शोधीत होते वाटतें? ध्यावें हें प्रेयसीचें पत्र!" असें फणकाऱ्यानें म्हणत ती तोंड फिरवून उभी राहली.

राजा लज्जित होऊन तिची क्षमा मागूं लागला. पण राणी रागारागानें तेथून निघून गेली. परंतु अंतःपुरांत गेल्यावर राणीला

Fullscreen 127 30 / 86



पश्चात्ताप वाटूं लागला. आपण महाराजांचें मन उगाच दुखविलें. महाराजांना प्रसन्न करण्यासाठीं तिनें एक व्रत करण्याचा निश्चय केला. पुजेसाठीं राणीनें राजाकडे निरोप पाठविला. राणीच्या इच्छेप्रमाणें राजा ताब-डतोब निघाला. बरोबर विदूषक होताच. पण तोंडानें उर्वशीच्या नांवाचा जप चालू होता.

उर्वशी इंद्राच्या आज्ञेप्रमाणें लक्ष्मीचा वेश धारण करून रंगभूमीवर आली. स्वयं-वराच्या वेळीं "मी विष्णूला वरतें!" असें म्हणण्याऐवजीं ती "मी पुरूरवाला वरतें!" असें म्हणाली. भरत मुनींना त्याचा इतका राग आला कीं त्यांनीं तिला शाप दिला—"देव लोकांत राहण्याची तुझी लायकी नाहीं. जा मर्त्य लोकांत वास कर! दिव्यज्ञान तुला सर्व काळ पारखें होईल!" बिचारी लाजेनें मान खालीं करून उभी राहली. काय बोलणार व काय करणार? पण इंद्राला दया आली. तो म्हणाला—"पुरूरवाचें आमच्यावर जें ऋण आहे त्याची फेड आमच्या हातून होणें शक्य नाहीं. तरी तूं पुरूरवाकडे जाऊन रहा. त्याला एक पुत्र देऊन तूं परत ये!"

अशा तऱ्हेनें भरत मुनींचा शाप उर्वशीच्या पथ्यावरच पडला. ती आपल्या सखीबरोबर पुरूरवाकडे गेली व लपून पुरूरवा व माणवक यांचें संभाषण ऐकूं लागली. परंतु राणीला येत असलेली पाहून त्या दोघांचें संभाषण अचानक बंद झालें.

पुरूरवा वरकरणी प्रेम दाखवीत राणी-जवळ बोलला. पण राणीला का तें कळणार नाहीं? ती म्हणाली—"महाराजांचें मन कोणावर जरी बसलें असलें तरी त्यांनीं या दासीला विसरूं नये."

राजा म्हणाला—"तुझ्याशिवाय माझें कोणावरहि प्रेम नाहीं. खरें सांगतों." त्यांत राजानें राणीला फार आग्रहकरून कांहीं वेळ थांबण्यास सांगितलें तेव्हां उर्वशीला फारच वाईट वाटलें. नंतर पुजेची वेळ झाली आहे असें सांगून राणी राजाचा निरोप घेऊन निघून गेली. राणी निघून गेल्यावर उर्वशीच्या विरह वेदनेनें राजा पुन्हां दुःखी झाला. तें पाहून उर्वशीच्या जिवांत जीव आला. तिनें समोर येऊन राजाला प्रणाम केला.

माणवक निघून गेला व उर्वशीच्या सखी बाजूला झाल्या. राजा पुरूरवा व उर्वशी शिवाय तेथें कोणी नव्हतें. दोघें दऱ्या खोऱ्यांत आनंदानें हिंडूं फिरूं लागलीं. कांहीं दिवसांनीं उर्वशीला दिवस गेले व यथावेळीं ती प्रसूत झाली. तिला एक मुलगा झाला. मुलाला राजानें पाहिलें तर तिला स्वर्गांत परत जावें लागेल असा विचार करून तिनें दिवस गेल्याची व मुलगा झाल्याची गोष्ट राजाजवळून लपवून ठेवली. आपल्या मुलाला ती च्यवन ऋषींच्या आश्र-मांत घेऊन गेली. तेथें सत्यवती नांवाच्या तपस्विनीच्या हातीं मुलास देऊन ती प्रति-ष्ठानपुरला परत आली. तो मुनींच्या आश्रमांतच वाढत होता.



पुढें कांहीं दिवसांनीं राजा आपल्या सर्व राण्यांना बरोबर घेऊन त्रिवेणीसंगमांत स्नाना-साठीं निघाला. उर्वशी वस्त्राभूषणें घालीत होती. त्यावेळीं एक दासी एक मणी एका तबकांत ठेवून तिच्या डोक्यांत घालण्यासाठीं येत होती. त्याला मांसाचा एक तुकडा समजून एक घार तो मणी उचलून घेऊन गेली. ही गोष्ट पुरूरवाला कळली. घार दूर उडून गेली होती. राजानें शिकाऱ्यांना बोलावून आज्ञा केली कीं त्या घारीचा पाठलाग करा आणि तो मणी घेऊन या!"

Fullscreen 127 32 / 86

राजानें राणीला फार आग्रहकरून कांहीं वेळ थांबण्यास सांगितलें तेव्हां उर्वशीला फारच वाईट वाटलें. नंतर पुजेची वेळ झाली आहे असें सांगून राणी राजाचा निरोप घेऊन निघून गेली. राणी निघून गेल्यावर उर्वशीच्या विरह वेदनेनें राजा पुन्हां दुःखी झाला. तें पाहून उर्वशीच्या जिवांत जीव आला. तिनें समोर येऊन राजाला प्रणाम केला.

माणवक निघून गेला व उर्वशीच्या सखी बाजूला झाल्या. राजा पुरूरवा व उर्वशी शिवाय तेथें कोणी नव्हतें. दोघें दऱ्या खोऱ्यांत आनंदानें हिंडूं फिरूं लागलीं. कांहीं दिवसांनीं उर्वशीला दिवस गेले व यथावेळीं ती प्रसूत झाली. तिला एक मुलगा झाला. मुलाला राजानें पाहिलें तर तिला स्वर्गांत परत जावें लागेल असा विचार करून तिनें दिवस गेल्याची व मुलगा झाल्याची गोष्ट राजाजवळून लपवून ठेवली. आपल्या मुलाला ती च्यवन ऋषींच्या आश्रमांत घेऊन गेली. तेथें सत्यवती नांवाच्या तपस्विनीच्या हातीं मुलास देऊन ती प्रतिष्ठानपुरला परत आली.तो मुनींच्या आश्रमांतच वाढत होता.



पुढें कांहीं दिवसांनीं राजा आपल्या सर्व राण्यांना बरोबर घेऊन त्रिवेणीसंगमांत स्नानासाठीं निघाला. उर्वशी वस्त्राभूषणें घालीत होती. त्यावेळीं एक दासी एक मणी एका तबकांत ठेवून तिच्या डोक्यांत घालण्यासाठीं येत होती. त्याला मांसाचा एक तुकडा समजून एक घार तो मणी उचलून घेऊन गेली. ही गोष्ट पुरूरवाला कळली. घार दूर उडून गेली होती. राजानें शिकाऱ्यांना बोलावून आज्ञा केली कीं त्या घारीचा पाठलाग करा आणि तो मणी घेऊन या !"

ती घार उडत उडत सरल च्यवन ऋषीच्या आश्रमाकडे गेली. उर्वशीच्या मुलानें बाण मारून त्याला खालीं पाडलें. च्यवन ऋषींना ही गोष्ट कळली. "ह्यानें आश्रमांतले नियम मोडण्यास सुरवात केली आहे. आतां याला ह्याच्या आईवडिलांकडे पाठवून दे !" च्यवन ऋषींनीं सत्यवतीला सांगितलें.

पुरूरवानें पाठविलेल्या शिकाऱ्याला मेलेल्या घारीच्या चोंचींत मणि सांपडला. पुरूरवानें घारीच्या पोटांत शिरलेला बाण पाहिला तेव्हां त्याला त्यावर "हा उर्वशी व पुरूरवाच्या मुलाचा आहे !" असें लिहिलेलें दिसलें.

इतक्यांत सत्यवती त्या मुलाला घेऊन राजाकडे आली. जसा इंद्राला जयंत आहे तसाच आपल्याला एक मुलगा आहे हें कळल्यावर पुरूरवाला परमानंद झाला. पण उर्वशीला आनंद होण्या ऐवजीं अपार दुःख झालें. हें त्याचें कारण राजाला काय कळणार ? ती दुःखानें म्हणाली–"हा आपला मुलगा आहे, हें महाराजांना कळलें आहे. आतां मला इंद्राच्या आज्ञेप्रमाणें इंद्रलोकीं परत जावें लागणार."

"तसें असेल तर मी याचा राज्याभिषेक करून देऊन वानप्रस्थाश्रम ग्रहण करीन." राजा म्हणाला.

इंद्राला ही गोष्ट कळली. राजाच्या मदतीची त्याला गरज होती. म्हणून त्यानें नारदा करवीं राजाकडे निरोप पाठविला कीं उर्वशी तुझ्याकडेच राहील.

तें ऐकून पुरूरवा व उर्वशी दोघांस आनंद झाला. राजानें आपल्या मुलाचा राज्याभिषेक करून दिला आणि उर्वशीबरोबर आनंदानें राहूं लागला.




Fullscreen
127




34 / 86





# वररुचि

वेतसम नामक गांवीं देवस्वामी आणि करम्भक नांवाचे दोन भाऊ रहात असत. त्यांना अनुक्रमें व्याडी व इंद्रदत्त नांवाचीं मुलें होतीं. व्याडीचे वडील वारल्यावर त्याचा भाऊ करम्भक याला संसाराचा कंटाळा आला व तो संन्यास घेऊन निघून गेला. दोघांच्या बायका पति विरहानें परलोकीं गेल्या. व्याडी व इंद्रदत्त पोरके झाले.

दोघांनीं विचार केला कीं गुरुगृहीं जाऊन विद्याभ्यास करावा. चांगला गुरु मिळावा म्हणून त्यांनीं कुमारस्वामीची मनोभावें प्रार्थना केली. कुमारस्वामीनें प्रसन्न होऊन स्वप्नांत दृष्टांत दिला व म्हणाला–

"तूं पाटलीपुत्राला जा! तेथें नंद राजा राज्य करतो. पाटलीपुत्राला वर्ष नांवाचा एक विद्वान ब्राह्मण राहतो. त्याच्याकडे जाऊन तुम्ही विद्याभ्यास करा."

त्याप्रमाणें व्याडी व इंद्रदत्त पाटलीपुत्राला गेले. चवकशी करतां त्यांना कळलें कीं पाटलीपुत्रांत वर्ष नांवाचा एक मूर्ख ब्राह्मण आहे. त्या नांवाचा कोणी विद्वान ब्राह्मण नाहीं. तरी दोघे त्या मूर्ख ब्राह्मणाकडे गेले. ते वर्ष नांवाच्या ब्राह्मणाचेंच घर होतें. घरांतली गरीबी त्यांना चांगली दिसून आली. तरी ते पुढें झाले व त्या ब्राह्मणाच्या बायकोला नमस्कार करून येण्याचें कारण सांगितलें. ती म्हणाली–"माझे यजमान पूर्वीं मूर्खच समजले जात. पण कुमारस्वामीच्या कृपेनें त्यांनीं सर्व विद्या अवगत करून घेतल्या आहेत. एकदां सांगून ग्रहण करील त्यालाच आपला शिष्य करून घेण्याची प्रतिज्ञा आहे." दोघांनीं वर्षच्या बायकोला १०० वराह मुद्रा आगाऊ दक्षिणा म्हणून दिल्या व एक पाठी हुशार शिष्य हुडकून आणण्यासाठीं निघाले. ते कौशांबी नगरीं येऊन पोंचले.

कौशांबीला सोमदत्त नांवाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याच्या बायकोचें नांव वसुदत्ता असें होतें. त्यांना वररुचि नांवाचा एकुलता एक मुलगा होता. वररुचीच्या लहानपणींच सोमदत्त स्वर्गवासी झाला. त्याच्या विद्याभ्यासाचा भार त्याच्या आईवर येऊन पडला. दैवयोग असा कीं व्याडी व इंद्रदत्त वसुदत्तेच्या घरींच उतरायला आले.



त्या वेळीं वाद्यें वाजण्याचा भास झाला. वसुदत्ता म्हणाली–"पहा, तुझ्या वडिलांचा मित्र नंद नृत्य करीत आहे, वाटतें!"

वररुचि तिला म्हणाला–"तर मग आई, मी जाऊं का तिकडे? मी तें नृत्य पाहून येईन व गाणें म्हणून तुला नाचून दाखवीन!"

तें ऐकून व्याडी व इंद्रदत्त चकित झाले. त्यांनीं विचारलें फक्त एकदां ऐकून तसें कसें येईल? तेव्हां वररुचीची आई म्हणाली–"माझा मुलगा एक पाठी आहे. एकदां जें ऐकतो तें कधीं तो विसरत नाहीं."

व्याडी व इंद्रदत्त दोघांचा त्यावर विश्वास बसेना. त्यांनीं त्याची परीक्षा घेण्यासाठीं एका पुस्तकांतून कांहींतरी वाचलें. वररुचीनें तें सर्व ऐकलें व जसेंच्या तसें म्हणून दाखविलें. नंतर वररुचि शेजारीं व्याडी व इंद्रदत्त दोघांना बोलावून घेऊन गेला. तेथें नृत्य चालू होतें. त्यानें घरीं आल्यावर गाणें म्हणून नृत्य करून दाखविलें.

व्याडी व इंद्रदत्त दोघांनीं वसुदत्तेला येण्याचें कारण सांगितलें व म्हणाले–"बाई! तुम्ही आपला हा होतकरू व हुशार मुलगा जर आमच्या बरोबर पाठविलेंत तर हा गुरु वर्ष यांच्याकडे सर्व विद्याभ्यास करील व आम्हांलाहि विद्या शिकवील. वसुदत्तेनें ही चालून आलेली संधी न दवडतां मुलाला


Fullscreen
127




36 / 86


त्यांच्याबरोबर पाठवून दिलें. म्हणाली— "तुमचाच भाऊ आहे. देव तुम्हां सर्वांना सुखी राखो!"

तिथे पाटलीपुत्रास गेले व गुरु वर्ष यांना जाऊन नमस्कार करून सर्व विद्या शिकविण्यास विनंति केली. वररुचीची कुशाग्र बुद्धि पाहून त्याला आपला शिष्य करून घेण्यास वर्षनें मान्य केलें. वररुचि वेदांच्या ऋचा गुरुच्या सुखीं एकदांच ऐकून पुन्हां म्हणून दाखवी. गुरु व त्यानंतर वररुचि दोघांनीं म्हटल्यावर व्याडीला पाठ होई व त्यानें म्हटल्यावर इंद्रदत्ताला पण पाठ होई.

अशा तऱ्हेनें तिघांचा विद्याभ्यास सुरू झाला. ज्या वर्ष ब्राह्मणाला लोक मूर्ख समजत होते त्याचे शिष्य असे हुशार निघालेले पाहून सर्व पाटलीपुत्र नगर चकित झालें. वर्षची कीर्ति साऱ्या शहरांत पसरली. त्याचा धाकटा भाऊ उपवर्ष सोडून सर्व वर्षचा आदर करूं लागले. स्वतः महाराज नंदानें त्याचा सत्कार करून त्याला वर्षासन बांधून दिलें.

विद्याभ्यास संपूर्ण झाला तरी गुरूला सोडून गेले नाहींत. राजधानींत इंद्रोत्सव सुरू झाला. तिथे शिष्य उत्सव पहायला निघाले. स्त्रीपुरुषांची मोठी गर्दी होती. स्त्रियांच्या गर्दींत त्यांना रतीसारखी सुंदर एक तरुणी दिसली. तिच्याबरोबर तिच्या सखी होत्या.

वररुचि व त्या तरुणीची दृष्टादृष्ट झाली व परस्परांनीं मनांतल्या मनांत परस्परांना वरलें. नंतर वररुचीला कळलें कीं ती तरुणी गुरूचे बंधु उपवर्ष याची उपकोश नांवाची कन्या आहे. उपकोशला देखील सखींकडून वररुचि वडिलांच्या भावाचा शिष्य असल्याचें कळलें. त्या दिवशीं रात्रीं वररुचीला झोंप आली नाहीं. उजाडतांच तो उपवर्षच्या घरासमोरील आंब्याच्या झाडा खालीं येऊन उभा राहिला.

त्याला पाहून उपकोशनें आपल्या सखीला पाठविलें. वररुचीनें निरोप पाठविला कीं वडिलांच्या अनुमती शिवाय दोघांचें लग्न शक्य नाहीं." सखीनें जाऊन उपकोशाला व तिच्या आईला तो निरोप सांगितला. आईनें उपकोशाच्या वडिलांजवळ मुलाच्या लग्नाची गोष्ट काढून वररुचि व उपकोश दोघांनीं परस्परांस वरलें असल्याचें सांगितलें. उपवर्षनें संमति दिल्यावर लग्नाचा मुहूर्त ठरला. व्याडी कौशांबीला जाऊन वसुदत्ताला घेऊन आला. वररुचि व उपकोश दोघांचा विवाह झाल्यावर वररुचि पाटलीपुत्रांतच राहूं लागला.





Fullscreen 127 38 / 86



वर्षच्या शिष्य परंपरेंत पाणिनी नांवाचा एक शिष्य होता. तो थोडा मंदबुद्धीचा आहे असें वर्षच्या पत्नीला वाटलें. म्हणून तिनें त्याला उलट पावलीं परत पाठविलें. पाणिनीनें हिमालय पर्वतावर जाऊन तप केलें व शंकराला प्रसन्न करून संस्कृत भाषेचें व्याकरण संपादन केलें. त्यानें परत आल्या-वर वर्षचा सर्वोत्तम शिष्य वररुचि याला शास्त्रार्थ करण्यास आह्वान केलें. आठ दिवस शास्त्रार्थ चालू होता. त्यांत वररुचि हारला. त्यानंतर ऐन्द्र व्याकरण लुप्त झालें व पाणिनीचें सुरू झालें.

वररुचि स्वस्थ बसला नाहीं. त्यानें देखील हिमालयांत जाऊन तप केलें आणि शंकराला प्रसन्न करून आणखी एक व्याकरण मिळ-विलें. त्यानें तें व्याकरण आपल्या गुरुसमोर येऊन म्हणून दाखविलें.

व्याडी व इंद्रदत्तनें विद्याभ्यास संपल्यावर गुरुदक्षिणा देऊन घरीं परतण्याचें ठरविलें. त्यांनीं गुरुदक्षिणा किती द्यावयाची असें गुरूला विचारलें. वर्षनें एक कोटी वराह मुद्रा मागितल्या. दोघांनीं वररुचीकडे जाऊन इतकी मोठी गुरुदक्षिणा कोठून आणावयाची असा प्रश्न केला. इतकें धन नंदमहाराजां-शिवाय कोणाजवळ मिळणार ? चल त्यांच्या कडे जाऊन मागूं या.”

तिघे नंद कटकला नंदमहाराजांना भेट-ण्यासाठीं गेले. तेव्हां नंदमहाराज कांहीं क्षणापूर्वीच वारल्याची शोकवार्ता त्यांना मिळाली.

इंद्रदत्ताला योगविद्या येत होती. तो आपल्या मित्राला म्हणाला—“एक उपाय आहे. मी राजाच्या मृतदेहांत प्रवेश करतों. व्याडी माझ्या प्राणहीन देहाचें रक्षण करीत येथें राहील. तूं येऊन नंद महाराजांकडे धन माग. मीच त्याच्या शरिरांत राहीन व धन देईन. आपलें काम भागल्यावर मी नंद महाराजांचें शरीर सोडून स्वतःच्या शरिरांत प्रवेश करीन.”

बेत ठरला. इंद्रदत्तानें वेशीजवळच्या एका जुन्या पडक्या देवळांत आपला देह ठेवला आणि नंद महाराजांच्या मृत देहांत प्रवेश केला. व्याडी इंद्रदत्ताच्या शरिराचें रक्षण करण्यासाठीं देवळांत मागें राहिला.

मृत राजा जिवंत झालेला पाहून प्रजेला अपार आनंद झाला. राजधानींत पुनर्जन्माचा उत्सव साजरा करण्यांत आला. वररुचीनें महाराजांकडे जाऊन त्यांना आशीर्वाद दिला व एक कोटी वराह मुद्रा मागितल्या. नंद आपला मंत्री शकटाल बोलावून आज्ञा केली कीं या ब्राह्मण तरुणास एक कोटी वराह मुद्रा द्याव्या.

शकटाल चतुर होता. त्याला आश्चर्य वाटत होतें कीं मृत राजा जिवंत कसा झाला. राजा जिवंत झाला काय, कोणी येऊन एक कोटी वराह मुद्रा मागतो काय आणि राजा द्यायला कबूल होतो काय ? सर्वच विचित्र दिसतें आहे. कोणी योगविद्या जाणणाऱ्यानें महाराजांच्या मृत देहांत प्रवेश तर केला नसेल ? त्या योग्याचें शरीर जवळपासच कोठें तरी असलें पाहिजे. त्यानें आज्ञा केली—“राजधानींत कोठें मृत शरीर दिसल्यास ताबडतोब तें जाळून टाकण्यांत यावें. पडक्या देवळांत शिपायांना एक शव दिसलें. व्याडीनें त्यांना अडवलें. पण शिपायांनीं त्याला बाजूला सारून इंद्रदत्ताचें शरीर जाळून टाकलें.



त्याच वेळीं इकडे नंद शकटालला विचारीत होता कीं या ब्राह्मणाला एक कोटी सुवर्ण मुद्रा दिल्या कीं नाहीं ?

शकटालनें कांहीं तरी कारण सांगून वेळ मारून नेली.

Fullscreen
127
40 / 86

इतक्यांत व्याडी पळत आला आणि म्हणाला–" महाराज! आपल्या राज्यांत सैनिकांचा अत्याचार इतका वाढला आहे कीं योग समाधींत झोपलेल्या एका ब्राह्मणाचें शरीर त्यांनीं जाळून टाकलें आहे. नंदाच्या शरिरांत वसणाऱ्या इंद्रदत्ताला कळलें कीं त्याचें शरीर शिपायांनीं जाळून टाकलें आहे.

नंतर त्यानें व्याडीला एकांतांत बोलावून पुढें काय करावयाचें या विषयीं सला विचारला. तो म्हणाला–" आतां जें कांहीं झालें तें झालें. आतां बदलणें अशक्य, पण या शकटाल वर कडक नजर ठेवणें जरूरी आहे. तो तुझा नाश करून थोरल्या नंद राजाचा मुलगा चंद्रगुप्त याला गादीवर बसवील. म्हणून तूं वररुचीला आपला मंत्री करून घे!"

नंदाच्या शरिरांत वासकरणाऱ्या इंद्रदत्तानें वररुचीला आपला मंत्री नेमला. पण स्वतः नकली नंद महाराजांच्या स्वभावांत बदल होऊं लागला. आपण उगाच या राजाच्या शरिरांत प्रवेश केला असें त्याला वाटूं लागलें. त्यानंतर तो स्वतः भोगविलासांत इतका रमला कीं हळूहळू त्याचा वररुचीवरचा विश्वास पण उडाला. त्यानें वररुचीचा वध करण्याचा थाट घातला. ही गोष्ट वररुचीला कळली तेव्हां तो शकटालच्या घरीं जाऊन लपून बसला.

राजधानींत अफवा उडाली कीं राजानें वररुचीचा वध केला आहे. तें ऐकून उपकोशनें अग्निप्रवेश केला. वसुदत्ता पुत्रशोक करीत परलोकीं गेली. त्यानंतर चाणक्य नांवाचा एक कडक स्वभावाचा ब्राह्मण नंद राजावर इतका कुद्ध झाला कीं त्यानें सात दिवसांत नंद राजाचा वध करविला आणि त्याच्या गादीवर चंद्रगुप्ताला बसविला.

वररुचीला जगाचा व संसाराचा वीट आला. तो रानांत जाऊन तप करूं लागला.





[ ९ ]

मार्कोपोलो १३व्या शतकाच्या शेवटच्या दशकांत आपल्या भारतांत आला होता. तो या देशांत कांहीं दिवस राहिला होता. त्यानें या देशांत जें कांहीं पाहिलें त्याचें वृत्त आपल्या प्रवास वर्णनांत लिहून ठेवलें आहे. तें वृत्त सांगून या अंकाबरोबर मार्कोपोलोचें प्रवासवृत्त संपवीत आहों.

सिंहल देशापासून ६० मैल समुद्रांत प्रवास केल्यावर माबार देश लागतो. या देशांत पांच स्वतंत्र राज्यें आहेत. माबार व सिंहल द्वीपाच्या मध्यभागीं जी सामुद्रधुनी आहे तींत मोतीं मिळतात. जगांत उत्तमोत्तम म्हणून प्रसिद्ध असलेलीं मोतीं याच सामुद्रधुनींतून काढण्यांत आलीं आहेत. येथील समुद्र विशेष खोल नाहीं. कांहीं व्यापारी मिळून एकेक नाव घेऊन येथें येतात. एप्रिल महिना पुरा व मे महिना अर्धा मोतीं काढण्याचें काम चालतें. समुद्रांत बुडी मारून मोतीं काढणारे मजूर मजुरीवर काम करतात. हे मजूर शिंपा काढून व्यापाऱ्यांना देतात. या शिंपांत व्हान मोठीं मोतीं असतात. मोत्यांच्या शिंपा चांगल्या गोड पाण्यांत टाकल्या कीं आंतील मांस पाण्यावर तरंगूं लागतें व मोतीं तळाला राहून जातात. अशा तऱ्हेनें व्यापारी असंख्य मोतीं जमा


Fullscreen
127





42 / 86





करून घेऊन जातात. मजुरांनीं पाण्यांत बुडी मारली कीं कांहीं ब्राह्मण मंत्र म्हणतात. हे मंत्र म्हटल्यानें बुडी मारणाऱ्यांच्या जिवाला धोका नाहीं अशी त्यांची समजूत आहे. व्यापारी लोक मोतीं निघाल्यावर त्यांतले पांच टक्के मोतीं ब्राह्मणांना दक्षिणा म्हणून देतात.

माबार देशांत शिंपी नाहींत. म्हणजे शिवलेले कपडे अंगांत घालण्याची पद्धत नाहीं. धोतर व उपरण्यावरच काम भागतें. स्वतः राजा देखील उपरण्याशिवाय अंगांत दुसरें वस्त्र घालीत नाहीं. पण उपरण्याचे काठ रत्नांनीं मढवलेले असल्या कारणानें या उपरण्यांची किंमत फार असते. एका उपरण्यानें एकेक शहर विकत घेतां येईल इतकी त्यांची किंमत असते. राजाज्ञेशिवाय एक रत्न देखील राज्या बाहेर जात नाहीं.

या देशांत घोडे अरबस्तानांतून आणलेले मिळतात. घोड्यांसाठीं या देशांतील लोक लक्षावधि रुपये खर्च करतात. या देशांत एक विचित्र रीत आहे. नवरा मेल्यावर बायको नवऱ्याबरोबर सती जाते. नवऱ्याबरोबर सती जाणाऱ्या स्त्रीचा या देशांत फार आदर आहे. या देशांत लोक जेवतांना उजव्या हाताचाच उपयोग करतात. पाणी पितांना भांडें तोंडाला लावीत नाहींत.

कोणी कर्ज घेऊन कर्ज वेळेवर परत केलें नाहीं तर त्याच्या चारी बाजूला कर्ज देणारा एक रेघ ओढतो व कर्ज घेणारा कर्जफेड करीपर्यंत त्या रेघेच्या बाहेर जात नाहीं. स्वतः राजा देखील या नियमाचें पालन करतो. मी स्वतः एकदां एक विचित्र दृश्य पाहिलें.

राजानें एका अरबी व्यापाऱ्याचें कर्ज फेडलें नाहीं. राजा घोड्यावरून जात असतां व्यापाऱ्यानें त्याच्या चारी बाजूला एक रेघ ओढली. राजानें नोकरांकरवीं पैसे मागवून कर्ज फेडलें व नंतर पलीकडे गेला.



या देशांत शकुन पाहून लोक सर्व कामें करतात. विशेष करून प्रवासाला मुहूर्त पाहूनच निघतात. घराबाहेर निघतांना कोणी शिंकला तर पुढें जात नाहींत. दुसऱ्या शिंकेचा आवाज कानीं पडला तर मात्र जायला हरकत नाहीं. तसेंच राहुकाल पाहून कामें करतात. राहुकालांत कोणतेंहि काम करीत नाहींत. हा राहुकाल दररोज निरनिराळ्या वेळीं पडतो. घरांतल्या पालींचा आवाज ऐकून लोक स्थान व वेळेनुसार निरनिराळे अर्थ लावतात.



मार्कोपोलो इ.स. १२७० साली मोटपल्ली नांवाच्या बंदरांत उतरला. त्यावेळीं आंध्र देशांत काकतीय राजघराण्यांतल्या रुद्रमदेवीचें राज्य होतें. तिच्याविषयीं मार्कोपोलो म्हणतो—

"या देशांतील राणी ज्ञानी व विदुषी आहे. पति वारल्याला ५० वर्षें झालीं तरी तिनें दुसरें लग्न केलें नाहीं. हिनें चाळीस वर्षें पतीच्या मागें राज्य केलें. हिच्या राज्यांत धर्म व न्याय उत्तम आहे. प्रजेचें आपल्या राणीवर मातेसारखें प्रेम आहे. राजा व प्रजा यांचें परस्परांशीं इतकें प्रेम इतरत्र दुर्मीळ आहे.

या देशांत हिरे मिळतात. डोंगरांवर पाऊस पडूं लागला कीं नद्या व ओढे वाहूं लागतात. पाण्याच्या ओघांत दगडांबरोबर हिरे पण वहात येतात. जगांत फक्त येथेंच हिरे मिळतात. उत्तमोत्तम हिरे राजे महाराजे व सरदार लोक विकत घेतात. कारण सामान्य गरीब लोक हिरे विकत घेऊंच शकत नाहींत.

जगांत सर्वोत्तम अशा शाली या देशांतच तयार होतात. या शाली राण्या मोठ्या हौसेनें विकत घेतात. या देशांत पशु-धन मुबलक आहे. या देशांत जितकीं मोठीं मेंढरें आहेत, तितकीं मोठीं इतर कोणत्याहि देशांत मी पाहिलीं नाहींत.

 Fullscreen  127    44 / 86 

या देशांत लाड नांवाचें एक राज्य आहे. तेथील वैश्य व्यापारांत फार हुशार आहेत. जगांत यांच्या इतके विश्वसनीय व्यापारी मी पाहिले नाहींत. विदेशांतून व्यापारी व्यापारासाठीं आले कीं हे त्यांच्याकडून माल घेतात व त्यांचा माल विकून रास्त किंमत त्यांना देतात. विदेशी व्यापाऱ्यांना या देशांतील व्यापाराचे नियम माहींत असोत कीं नसोत पण या देशांतील व्यापारी त्यांच्याशीं लुच्चेगिरी करीत नाहींत. जी रास्त किंमत असे तीच घेत. विदेशी व्यापारी आनंदानें जें कांहीं देत तें आभार मानून त्यांच्याकडून घेत. हे वैश्य मांस खात नाहींत. दारू पीत नाहींत. हिंसा करीत नाहींत हिंसा करणें हें एक पाप मानलें जातें. हे वैश्य चोळ देशांतून उत्तमोत्तम मोती आणून आपल्या राजाला विकतात. ज्या किंमतीला त्यांनीं मोती विकत घेतलें आहे ती किंमत सांगतात व राजा ठीक दुप्पट किंमत देतो.

भारत देशांत सर्व लोक पान खातात. कुलीन लोकांना याची विशेष संवय असते. पानाबरोबर हे चुना, कापूर वगैरे वस्तूंचें सेवन करतात.

भारतांतले अगदीं टोकाचें राज्य नेच मक्कान आहे. येथें मुसलमानांची वस्ती अधिक आहे. येथें भातशेतीबरोबर गव्हाची शेती देखील होते.

माबार व त्याच्या लगतचा मध्य देश भूखंडांतला सर्वोत्तम भाग आहे. येथील उत्तमोत्तम व वैभवशाली नगरांचें वर्णन करणें माझ्या शक्तीच्या बाहेर आहे. (संपूर्ण)

# असिधारा व्रत

विक्रमार्कनें आपला हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ पुन्हां गेला आणि प्रेत काढून खांद्यावर घेतलें आणि स्मशानाकडे जाऊं लागला. तेव्हां त्या प्रेतांत बसलेला वेताळ बोलूं लागला—"राजा! मला कळत नाहीं, तुझ्या डोक्यांत कोणतें खूळ शिरलें आहे. अपरात्री हें प्रेत खांद्यावर उचलून नेण्यांत तूं कोणतें कर्तव्य साधन करीत आहेस कोण जाणें. पण धर्म पालन करणाऱ्यांना सुद्धां कधीं कधीं पश्चात्ताप करावा लागतो. सनत्कुमाराला नाहीं का पश्चात्ताप करीत बसावें लागलें. ऐक ती गोष्ट." त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

"ब्रह्मपुत्रा नदीच्या काठीं अरण्यांत एक लहानसें राज्य होतें. तेथील राजाच्या पदरीं सनत्कुमार नांवाचा एक तरुण सरदार नोकरी करीत असे. त्याला शिकारीचा नाद होता.

Fullscreen 127 46 / 86



सनत्कुमार ज्या रानांत शिकारीस जात असे त्या रानांत नागा जातीच्या लोकांची वस्ती होती. ती वस्ती वसुवर्मा नांवाच्या एका जहागीरदाराच्या जहागिरींत होती. वसुवर्मा व सनत्कुमार यांची शिकारीच्या वेळीं नेहमीं भेट होई. हळूहळू त्यांची छान मैत्री जमली.

एकदां सनत्कुमार शिकारीसाठीं गेला असतां एका नागा वस्तींत येऊन पोंचला.

सनत्कुमारला एक नागाकन्या मेंढरें चरायला येऊन गेली असतां रानांत दिसली. तिची वेशभूषा रानटी असली तरी तिचें रूप लावण्य पाहून सनत्कुमार चकित झाला. "हें रानटी फूल देखील किती सुंदर आहे!"

तो घोड्यावरून उतरला व ती झाडाखालीं फुलें ओवीत बसली होती तेथें येऊन उभा राहिला. तिनें त्याच्याकडे निर्भीडपणें डोकें वर करून पाहिलें. दोघांची दृष्टादृष्ट झाली. ती कांहीं बोलली नाहीं.

परंतु सनत्कुमारानें तिला प्रेमळ आवाजांत तिचें नांव विचारलें. तिनें एकाच शब्दांत उत्तर दिलें—"नागिण!"

थोड्या वेळानें दोघांचें पुष्कळ मोकळेपणानें बोलणें झालें. तिनें नागलोकांना राज्याचे अधिकारी कसा त्रास देतात याचें वर्णन करून सांगितलें.

सनत्कुमारला तें सर्व ऐकून आश्चर्य वाटलें. तो म्हणाला—"तूं बाई माणूस! अजून वयानें लहान दिसतेस. या सर्व गोष्टींची काळजी थोरा मोठ्यांनीं करावयाची असते." नागिणीनें त्याचें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

आतां नागिणीला भेटण्यासाठींच सनत्कुमार त्या रानांत पुन्हां पुन्हां येऊं लागला. शिकारीपेक्षां नागिणीशीं गप्पा मारण्यांत त्याला जास्त मजा वाटूं लागली.



एके दिवशीं नागिणीनें सनत्कुमाराला सहज विचारलें—"आमचा राजा म्हणें, आमचीं सर्व शेतें आमच्या हातांतून हिसकावून घेणार आहे आणि आम्हांला या रानांतून बाहेर हांकलून देणार आहे?"

"पण तुला या गोष्टीच्या उठाठेवी कशाला? हीं थोरांमोठ्यांचीं कामें आहेत." सनत्कुमार म्हणाला.

"आमचे वाडवडील याच रानांत रहात आले. त्यांनीं रानें कापून शेती करायला सुरवात केली. गाई गुरें पाळलीं. पण राजाला हें आमचें सुख पहावत नाहींसें दिसतें. त्यानें आम्हांला एक दिडकी देखील दिली नाहीं. आम्हींच आपल्या मेहनतीनें शेताची मशागत करून ही वस्ती वसविली. पिढ्यान् पिढ्या येथें आम्हीं रहात आलों. आतां येथून आम्ही कां निघून जावें?" नागिणीनें आवेशांत येऊन उत्तर दिलें.

ही नागा पोर गांवढळ नसून पुष्कळ पोक्त दिसते आहे. मनांतल्या मनांत तिचें कौतुक करीत त्यानें तिचा हात धरला आणि म्हणाला—"नागिणी, तुझ्या....!"

तो जास्त बोलूंच शकला नाहीं. नागीणच ती. एका झटक्यांत तिनें हात सोडवून




घेतला आणि निघून गेली. सनत्कुमारला वाटलें कीं या अति प्रसंगामुळें तिला राग आला असावा. पुन्हां कित्येक दिवस त्या रानांत जायला त्याचें मन धजेना.

पुढें कांहीं दिवस त्याला राज्याच्या कामामुळें तो नागा वस्तीकडे फिरकूं शकला नाहीं. सुमारें तीन महिने लोटल्यावर त्याला दरबाराची आज्ञा झाली कीं वसुवर्माच्या मदतीला जावें.

नागा लोकांनीं वस्ती सोडून जायचें नाकारल्यामुळें वसुवर्माला त्यांच्या विरुद्ध शस्त्र उचलण्याशिवाय दुसरा उपाय उरला



नाहीं. त्याच्या मदतीस जाण्यासाठीं सनत्कुमारची नेमणूक झाली. वसुवर्मानें आपलें सर्व सैन्य त्याच्या हाताखालीं नागा-वस्ती काबीज करण्यासाठीं पाठविलें.

सनत्कुमारला हें एक असिधारा व्रत वाटलें. वसुवर्माच्या सैन्याचा सेनापति म्हणून त्याला आपल्या कर्तव्याचें पालन करणें भाग होतें. तिकडे त्याचें नागिणीवर प्रेम होतें. धर्म व प्रेम दोन्ही निभावून नेणें सोपें काम नव्हतें.

नागा जातींत दोघे शत्रूला फितूर झाले होते. नागा लोकांनीं त्या दोघांना एका झोपडींत डकवून झोपडीला आग लावून दिली. या जाळपोळींत वसुवर्माचे चार सहा अधिकारी ठार झाले. सुदैवानें दोघे फितूर नागा वेळींच झोपडींतून निसटून पळून गेले.

सनत्कुमार त्यांच्या रक्षणासाठीं सैन्य घेऊन आला. त्यावेळीं नागावस्तींत फक्त बायका व मुलें होतीं. सर्व पुरुष पळून गेले होते. परंतु, दोघां फितूर नागा लोकांच्या मदतीनें त्यानें पळून गेलेल्या नागा लोकांना घेरलें. त्यानें नागा लोकांना संबोधून म्हटलें—"तुम्ही बऱ्या बोलानें आपल्या बायका मुलांना घेऊन निघून जायला तयार आहां कीं तुम्हांला धक्के मारून काढल्यावर जाणार आहां!"

"आमच्या वाडवडिलांनीं काबाडकष्ट करून ह्या शेतांची मशागत केली. आम्ही आपल्या बायका पोरांना घेऊन कोठें जायचें! जिवांत जीव असे पर्यंत आम्ही येथून हलणार नाहीं!" एका नागा नायकानें उत्तर दिलें.

"ठीक आहे! मग तुमच्या प्रेतांवर चालूनच आम्हांला पुढें जावें लागणार आहे." असें सांगून सनत्कुमारानें आपल्या सैनिकांना हल्ला करण्यास हुकूम दिला. लष्करी शिक्षण मिळालेल्या सैनिकांसमोर रानटी नागा लोक कितीवेळ टिकाव धरून राहणार? त्यांची पीछे हाट होऊं लागली. कांहीं लोक पळून जाऊं लागले.

इतक्यांत एक स्त्री झाडावरून उडी मारून पळून जाणाऱ्या नागालोकांस म्हणाली—"पुरुषांसारखे पुरुष आणि पळून काय जातां? बांगड्या भरा हातांत म्हणजे आम्ही बायका भालाबरछी घेऊन येऊं. तुमच्या वाडवडिलांनीं स्वतःचें रक्त आटवून आणि अंगाचा घाम गाळून हीं शेतें तुम्हांला दिलीं. याच शेतांवर तुमचा हा देह तुम्ही पोसलांत आणि आज प्राणभयानें आपल्या या मातेला सोडून जायला तुम्हांला लाज नाहीं वाटत?"

तिची ती आरोळी ऐकून नागालोक मागें फिरले. सनत्कुमारानें त्या तरुणीस ओळखलें. ती त्याची प्रेयसी नागीण होती. नागा सैन्याचें नायकत्व ती करीत होती व वसुवर्माच्या सैन्याचें सनत्कुमार करीत होता. ज्या प्रसंगाची त्यानें स्वप्नांत देखील कल्पना केली नव्हती तीच दत्त म्हणून समोर उभा होता.

नागा सैन्यानें सनत्कुमाराच्या सैन्याचा पहिला मारा परतवला. थोडा वेळ वाटलें कीं सनत्कुमाराची पीछेहाट होणार. नागिणीनें



देखील हातांत भाला घेऊन सनत्कुमाराच्या अनेक सैनिकांना जमिनीवर लोळविलें. सनत्कुमार तिच्या शौर्याचें कौतुक करीत कांहीं वेळ जागच्या जागीं स्तब्ध उभा राहिला. परंतु त्याला क्षत्रीय धर्माचें पालन करावयाचें होतें. नागीण जोंपर्यंत युद्ध करीत आहे तोंपर्यंत नागा लोकांना वश करून घेणें अशक्य आहे हें ओळखून त्यानें एक तीर नागिणीला मारला. तो ठीक तिच्या छातीला लागला व ती मूर्छित होऊन जमिनीवर पडली. तिला पडलेली पाहून नागा लोकांचा धीर सुटला व ते पळून गेले.








Fullscreen 127 50 / 86

सनत्कुमार दुःख वेग आवरूं शकला नाहीं. तो थांबत गेला आणि आपल्या प्रेमिकेचें डोकें त्यानें आपल्या मांडीवर घेतलें. तिनें फक्त एकदांच त्याच्याकडे डोळे उघडून पाहिलें आणि प्राण सोडला. सनत्कुमाराला आपली चूक कळली. आपण न्यायबुधि सोडून एका अत्याचारी सरदाराच्या वर्तीनें लढलों व ह्यांत क्षत्रियधर्माचें पालन करीत आहों असें मानलें. अविचारानें आपण आपल्या हातानें आपल्या निरपराध शूर प्रेयसीचा वध केला.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें—"राजा! मला आश्चर्य वाबतें, आपल्या प्रेयसीला ओळखून देखील त्यानें तिचा असा वध कां करावा? धर्मपालनाच्या नांवाखालीं त्यानें प्रेमाचा असा अपमान कां केला? उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे.

विक्रमार्क म्हणाला—"प्रत्येक माणसाचा धर्म तो ज्या समाजांत राहातो त्या समजाच्या नियमाप्रमाणें निर्णीत होतो. सनत्कुमाराला त्या समाजधर्माचें पालन करावें लागलें. त्या धर्माचें पालन करीत असतां स्वतः त्याची प्रेमिका आडवी आली तरी तो धर्मच्युत झाला नाहीं. ह्यांत त्याचा थोरपणाच दिसतो. त्यानें आपल्या प्रेमिकेचा वध केला पण त्याचें त्याला दुःख वाटलें. तिला बेशुद्ध स्थितींत सोडून तो निघून गेला असता तर त्याचें प्रेम खोटें होतें असें मी म्हटलें असतें. पण त्यानें हळुवारपणें आपल्या प्रेमसीचें डोकें आपल्या मांडीवर ठेवून घेतलें. अशा तऱ्हेनें प्रेम व धर्म दोन्हींचा निभाव करण्यासाठीं तो झटला."

राजाचें मौन भंग झाल्याबरोबर वेताळ प्रेतासह नाहींसा झाला आणि झाडाच्या फांदीला जाऊन लटकूं लागला. (कल्पित)





# आळशी अजगर

[ मागील अंकावरून पुढें चालू ]

सूचौ नगरांत आळशी अजगराला अट्टल चोर म्हणून प्रसिद्धी मिळाली. नगराचा नायक चांग यानें त्याला बोलावून विचारलें—"तूं पटाईत चोर आहेस तर!"

तो म्हणाला—"मी चोर नाहीं. मी कधीं चोरी केली नाहीं. मग पटाईत चोर कसा होईन. मला कित्येक कला अवगत आहेत. त्यांचें प्रदर्शन करून मी लोकांचें मनोरंजन करतों. आपली आज्ञा असेल तर मी आपली कला आपणांस दाखवूं शकेन."

तें ऐकून चांग खूष झाला. त्याला चोर म्हणून पकडण्याच्या भानगडींत पडण्यापेक्षां त्याचीच मदत घ्यावी म्हणजे कोणताहि त्रास होणार नाहीं. तो आळशी अजगराला म्हणाला—"तूं चोरी करण्यांत पटाईत आहेस हें मला चांगलें माहीत आहे. मी तुला शिक्षा करीत नाहीं. उलट तुझ्या कौशल्याचें कौतुक करतों. हा पोपट आहे ना? आज रात्रीं तो चोरून घेऊन जा आणि उद्यां सकाळीं पुन्हां मला आणून दे." आळशी अजगरानें लवून मुजरा करून निघून गेला.

चांगनें पोपटाच्या पिंजऱ्याजवळ दोघां सशस्त्र पाहारेकऱ्यांना पाहाऱ्यावर नेमलें आणि बजावून सांगितलें—"रात्रभर जर का तुम्ही येथून हाललांत तर उद्यां दोघांची चामडी लोळवीन." दोघां पाहारेकऱ्यांनीं रात्र जागून काढली. पहाटे आळशी अजगर चांगच्या खोलीच्या छपराला भोंक पाडून आंत शिरला. तेथें त्याला चांगचे कपडे दिसले. ते चटकन अंगांत घालून दिवा लावून तो पुढें आला. दिव्याचा उजेड तोंडावर पडणार नाहीं अशा तऱ्हेनें उभा राहून

Fullscreen  127     52 / 86



चांगच्या आवाजांत त्यानें आज्ञा केली– "उजाडूं लागलें आहे. आतां पाहऱ्याची गरज नाहीं जा घरीं." इकडे पाहारेकऱ्यांनीं पाठ फिरविली आणि अजगरानें पिंजरा लांबविला.

पाहरेकरी रात्रभर जागून दमून गेले होते. आज्ञा करणारा चांग आहे कीं कोणी दुसरा हें देखील त्यांना कळलें नाहीं. "घरीं जा!" अशी आज्ञा होतांच ते निघून गेले.

उजाडल्यावर चांग पोपटाच्या पिंजऱ्याकडे आला. पण पिंजरा नाहींसा झालेला पाहून त्यानें त्यांना बोलावून आणायला नोकराला पाठविलें. आल्यावर विचारलें– "पहारा सोडून कोठें गेलां होतां?"

ते म्हणाले–"हुजूर आपणच तर "घरीं जा!" म्हणून आज्ञा केलीत! आणि पोपट उचलून नेलात."

"कोणी मी उचलून नेला कीं माझें भूत? काय शुद्धीवर आहां का दारू पिऊन आलां आहांत?" चांगनें दरडावून विचारलें.

त्यानें सारें घर हुडकून पाहिलें पण पोपटाचा पिंजरा दिसला नाहीं. छपराला पडलेलें भोंक मात्र दिसलें व त्याचे कपडे पण नाहींसे झालेले दिसले. थोड्या वेळानें आळशी अजगरानें स्वतः येऊन पोपटाचा पिंजरा परत केला. चांगनें त्याच्या कौशल्याची मुक्त कंठानें प्रशंसा करून त्याला पुष्कळ बक्षीस दिलें.

* * *

एकदां एक जुगारी एक हजार तोळे चांदी जुगारींत जिंकून घरीं चालला होता. वाटेंत त्याला आळशी अजगर भेटला. त्याला तो म्हणाला–"आज मी ही चांदी उशाखालीं ठेवून झोंपतों. तूं ती चोरी करून नेलीस तर मी मेजवानी देईन, चोरी करूं शकला नाहींस तर तूं दिली पाहिजेस." आळशी अजगरानें पैज कबूल केली.

जुगाऱ्यानें घरीं जाऊन बायकोला सांगितलें कीं मी पुष्कळ चांदी जिंकून घेऊन आलों आहें. निजतांना त्यानें आळशी अजगराशीं लावलेल्या पैजेची गोष्ट देखील बायकोला सांगितली. दोघांनीं रात्रभर झोंपायचें नाहीं असें परस्परांना बजावून सांगितलें. त्याचें बोलणें बाहेर उभा राहून आळशी अजगर ऐकत होता.

दोघें जागत राहिले तर चोरी करणें अशक्य म्हणून त्यानें एक उपाय केला. तो सैंपाक घरांत गेला आणि त्यानें कांहीं तरी चावून खात असल्यासारखा आवाज काढला.

आवाज ऐकून बायको उठली. म्हणाली– "मांजर शिरलें आहे वाटतें सैंपाक घरांत? कोंबडीचें मांस ठेवलें आहे आंत?" असें म्हणत ती पळतच सैंपाक घरांत गेली.

इकडे आळशी अजगर सैंपाक घरांतून बाहेर पळून गेला आणि विहिरींत एक मोठा दगड टाकला. त्याबरोबर मोठा आवाज झाला.

जुगाऱ्याला वाटलें मांजराला मारायला म्हणून बायको बाहेर गेली आणि बहुतेक



विहिरींत पडली. म्हणून तो बाहेर गेला. तेवढ्यांत आळशी अजगरानें उशीखालची चांदी लांबविली.

मांसाला मांजरी शिवली देखील नाहीं या गोष्टीची खात्री करून आश्चर्य करीत बायको परत झोंपायच्या खोलींत आली. जुगारी सुद्धां विहिरींत कोणी पडलें नाहीं याची खात्री करून घेऊन परत आला. पण पाहतात तर उशी सरकलेली व उशीखालची चांदी नाहींशी झालेली.

डोळ्यांत तेल घालून दोघे जागत असतां आळशी अजगरानें दोघांच्या हातावर तुरी

 Fullscreen 127     54 / 86 

दिली. दोघे आळशी अजगराच्या कौशल्याचीं प्रशंसा करीत झोंपले.

दुसऱ्या दिवशीं उजाडतांच आळशी अजगरानें चांदी आणून दिली व वचन दिल्या प्रमाणें मेजवानी द्यायला सांगितलें. मेजवानी ठरली एका खानावळींतून पंच-पक्वान्नांचीं जेवणें मागविण्यांत आलीं. जेवणें घेऊन यायची जबाबदारी आळशी अजगरानें स्वतःवरच घेतली. स्वतः खानावळवाला जेवणें घेऊन बरोबर आला. सर्व जेवायला बसलीं. जेवतांना रात्रीच्या गमती आठवून सर्व हंसत होतीं. खानावळवाल्यानें हंसण्याचें कारण ऐकून म्हटलें—"आळशी अजगरा! तुझ्या चोरी करण्याच्या कौशल्याच्या मी अनेक गोष्टी ऐकल्या आहेत पण त्यांपैकीं एकीवर हि माझा विश्वास बसत नाहीं. टेबलावर ही दारूची सुरई तुला दिसते आहे. रात्रीच्या रात्रीं तूं ती नाहींशी केलीस तर मी तुला मेजवानी देईन" आळशी अजगरानें स्मित करून नुसतें "ठीक आहे!" म्हटलें.

"पण दरवाजे व खिडक्यांना हात लावत. कामा नये. फक्त ही सुरई नाहींशी झाली पाहिजे. पाहतों तुझें कौशल्य!" खानावळ वाला म्हणाला.

"ठीक आहे! ठीक आहे!" म्हणत आळशी अजगर निघून गेला.

त्या दिवशीं खानावळवाल्यानें सर्व दरवाजे व खिडक्या घट्ट बंद करून टाकल्या. आळशी अजगराला आंत यायला एकहि वाट नाहीं या गोष्टीची खात्री करून घेऊन त्यानें बांकावर दिवा लावून ठेवला व पहारा देत जागत शेजारीं बसला. रात्रीं बारा वाजेपर्यंत खुट्ट सुद्धां झालें नाहीं. आळशी अजगर आतां काय येतो? आंत यायला मार्ग असेल तर ना? असा विचार करीत बांकावरच तो थोडा आडवा झाला. एका मिनिटांत छान झोंप लागली व तो घोरूं लागला. आळशी अजगर संधीची वाट पहात बाहेर उभा होता. घोरण्याचा आवाज ऐकूं आल्यावर त्यानें सैंपाकघरांतल्या मोरीजवळचें भोंक जरा मोठें केलें आणि आंत शिरला. धोतऱ्याच्या फुलासारखेंच एका जातीचें फूल बरोबर घेऊन तो गेला होता. तें फूल खानावळवाल्याच्या नाकाजवळ नेऊन त्याला तें हुंगवलें आणि खानावळवाला बेशुद्ध झाल्यावर अलगद सुरई उचलून घेऊन निघून गेला. मोरीजवळच्या विटा पुन्हां जशाच्या तशा बसवून त्यानें तेथून पाय काढला.





Fullscreen 127 56 / 86

खानावळवाला उठला तेव्हां दिवा छान जळत होता. खोलींत छान उजेड पण होता. परंतु सुरई मात्र त्याला दिसली नाहीं. दरवाजे व खिडक्या आंतून बंद होत्या. तरी सुरई नाहींशी कशी झाली हें त्याला कळेना. आळशी अजगराला जादू मंत्र देखील माहिती असावा. दुसऱ्या दिवशीं आळशी अजगरानें सुरई आणून दिली तेव्हां वचन दिल्याप्रमाणें खानावळवाल्यानें त्याला मेजवानी दिली.

* * *

एका गांवीं एक न्यायाधीश रहात असे. तो फार श्रीमंत होता. सर्व पैसा त्यानें लबाडी व लुच्चेगिरीनें मिळविला होता. आळशी अजगराच्या मित्रमंडळींनीं त्याला घेऊन सांगितलें कीं यानें लबाडीनें पैसे मिळविले आहेत तर लबाडीनेंच याला लुबाडलें देखील पाहिजे. आळशी अजगरानें ती जबाबदारी स्वतःवर घेतली.

एके दिवशीं रात्रीं तो त्या गांवांत गेला आणि न्यायाधिशाच्या कोठडींत शिरला. एका लहानशा पिंपांत त्यानें दोनशें तोळे सोनें काढून घेतलें. त्यानें चोरी केली आहे हें कळावें म्हणून त्यानें भिंतीवर पिंपाचें चित्र काढून ठेवलें. नंतर पिंप घेऊन तो पसार झाला.

दोन तीन दिवसांनीं न्यायाधीश आपल्या कोठडींत जाऊन पाहतो तों भिंतीवर त्याला एक पिंपाचें चित्र दिसलें. हें काय गौड-बंगाल आहे, त्यानें विचार केला. जरा लक्ष पूर्वक पाहिलें तर एक पिंप नाहींसें झालेलें. आणखी थोड्या वेळानें दोनशें सुवर्ण मुद्रा नाहींशा झालेल्या त्याला दिसल्या. आळशी अजगराशिवाय दुसऱ्या कोणाचें हें काम नाहीं असें त्यानें अनुमान लावलें.

त्यानें कोतवालाला बोलावणें पाठविलें आणि म्हणाला—"आळशी अजगराला धरून घेऊन ये आणि माझ्यासमोर हजर कर !" कोतवाल म्हणाला—"हुजूर! त्याच्या वाटेला न जाण्यांतच शहाणपण आहे. त्याला पकडणें एकतर कठीण व पकडलें तर आपल्यालाच त्रास सोसावा लागेल."

"तें कांहीं नाहीं. माझी आज्ञा आहे. त्याला धरून घेऊन ये! नाहींतर तुलाच शिक्षा करीन. तुम्ही सर्व कोतवाल शिपाई चोरांना सामील झालेले दिसतां." न्याया-धिशानें दरडावून सांगितलें.

बिचारा कोतवाल तरी काय करणार दोघां तिघां शिपायांना बरोबर घेऊन तो सूचौ नगराच्या पश्चिम द्वाराजवळ गेला. आळशी अजगर तेथेंच त्याला भेटला. कोतवालानें न्यायाधिशानें दिलेली धमकी त्याला सांगितली. आळशी अजगर म्हणाला—"सोनें माझ्याकडे नाहीं. तुझ्या घरासमोरच्या अंगणांत मी तें पुरून ठेवलें आहे. रात्रीं तूं खुशाल घरीं जाऊन झोंप. मी न्यायाधिशाच्या समाचाराला जातों. मला पकडण्याचा विचार त्यानें सोडला नाहीं तर मी नांवाचा 'आळशी अजगर' नाहीं."

त्या दिवशीं आळशी अजगर पुन्हां न्यायाधिशच्या घरीं गेला. त्याला दोन बायका होत्या. एक बायको एकटी झोंपली होती. आळशी अजगरानें तिच्या केसांची एक बट कातरून काढून घेतली. ती बट न्यायाधिशाच्या मुद्रा ठेवण्याच्या पेटींत नेऊन ठेवली आणि पुन्हां पिंपाचें चित्र भिंतीवर काढून निघून गेला.

न्यायाधिशाची बायको सकाळीं उठून पहाते तों तिची एक बट कातरलेली. आर-शांत तोंड कसें विद्रूप दिसत होतें. ती जोरानें ओरडली. न्यायाधीश धांवतच आला, काय भानगड आहे पहायला. बायकोचें तें रूप पाहून तो ओरडला—"पाहातों, हें कोणाचें
















Fullscreen 127 58 / 86

काम आहे तें. गुलामाची चामडी लोळविली नाहीं तर मी न्यायाधीश नाहीं." असें म्हणत तो एक हुकूम काढण्यासाठीं आपल्या दप्तराच्या पेटीजवळ गेला. त्यानें सही खालीं आपली मुद्रा लावण्यासाठीं पेटी उघडली. पेटीला कुलूप लावलेलें होतें. निदान या पेटीला तरी चोराचा हात लागलेला दिसत नाहीं असा विचार करीत त्यानें आपली मुद्रा काढली. पण तिच्या खालीं केसांची बट पाहून तो थक्क झाला. त्याच्या पोटांत धस्स झालें. ज्यानें ही बट कापली आहे तो गळासुद्धां सहजीं कापूं शकला असता. ज्यानें पेटी उघडून ही बट मुद्रे खालीं ठेवली आहे तो मुद्रा देखील उचलून घेऊं शकला असता. अशा माणसाशीं वैर करणें शहाणपणाचें होणार नाहीं. त्यानें कोतवालाला बोलावून सांगितलें कीं आळशी अजगराला धरण्याची गरज नाहीं. कोतवालानें विचार केला कीं आळशी अजगराला धरलें नाहीं हें बरें केलें. कारण त्यानें सांगितल्याप्रमाणें खरोखरच कोतवालाला घरच्या अंगणांत सोनें पुरलेलें मिळालें.

* * *

दुसऱ्या एका गांवीं असाच एक अत्याचारी काजी रहात असे. त्यानें पुष्कळ अत्याचार केले होते म्हणून चवकशीसाठीं दुसऱ्या एका अधिकाऱ्याला पाठविण्यांत आलें होतें.

त्या काजीनें आळशी अजगराकडे निरोप पाठवून त्याला पुष्कळ बक्षीस देऊन या संकटांतून कांहींतरी मार्ग काढण्यास विनंति केली. तो म्हणाला—"त्या अधिकाऱ्याची मुद्रा जर चोरी करून घेऊन गेलास तर त्याची नोकरीच जाईल व माझी सुटका होईल. मी तुला निराळें बक्षीस पण देईन."

"ठीक आहे, हुजूर! मी ती मुद्रा उद्यां आणून देतों!" आळशी अजगर म्हणाला.

दुसऱ्या दिवशी सकाळीं आळशी अजगरानें मुद्रा आणून दिली व काजीनें वचन दिल्याप्रमाणें त्याला बक्षीस दिलें. आळशी अजगरानें त्याला विचारलें—"ही मुद्रा घेऊन तुम्ही काय करणार?"

तो म्हणाला—"मी स्वत:जवळ जपून ठेवीन. ती माझ्याजवळ असेपर्यंत माझ्याविरुद्ध त्याला कांहीं करतां येणार नाहीं."

आळशी अजगर म्हणाला—"माझा सल्ला ऐकून घ्या. तो अधिकारी फार हुशार आहे. त्याच्याकडे ही मुद्रा पाठवून द्या आणि सांगून पाठवा कीं एका चोरानें ती लांबविली होती. आपल्या शिपायांनीं त्याला पकडून त्याच्याकडून ती काढून घेतली. पण चोर निसटून पळून गेला."

"वा रे वा! त्याच्या हातांत ही मुद्रा पडली तर तो मला सोडील वाटलें होय तुला? मुद्रेची काळजी तुला कशाला? तूं चालू लाग." काजी म्हणाला.

आळशी अजगर कांहीं बोलल्या शिवाय निघून गेला. आपली मुद्रा चोरीला गेल्याची गोष्ट त्या अधिकाऱ्याला कळल्यावर त्याला काजीचाच संशय आला. ह्यानेंच ही पळविली असणार असें त्यानें अनुमान लावलें.



त्यानें तब्येत बरी नसल्याचें सोंग केलें व चवकशीचें काम तहकूब केलें.

काजी मनांतल्या मनांत हंसून म्हणाला—“मला कळतो हा आजार! बच्चू आतां माझ्या मुठींत आहे. कोठें जातो पाहातों. इतका मोठा अधिकारी आजारी पडल्यावर त्याला आपण भेटायला गेलों नाहीं तर आरोप येईल असा विचार करून काजी अधिकाऱ्याला भेटायला गेला.

त्या अधिकाऱ्यानें त्याला बराच वेळ गप्पा मारीत बसवून घेतलें. त्याला खूप दारूप्यायला दिली. इतक्यांत नोकर ओरडत आले—“मालक, सैंपाकघरांत आग लागली आहे!”

त्या अधिकाऱ्यानें मुद्रा ठेवण्याची पेटी त्या काजीला देत म्हटलें—“कांहीं दिवस ही पेटी आपणांकडे संभाळून ठेवा आणि आग विझवायला कोणाला तरी पाठवून द्या.”

काजी ती पेटी घेऊन आपल्या घरीं गेला. त्याच्या नोकरांनीं येऊन आग विझविली. नंतर अधिकाऱ्यानें काजीकडे निरोप पाठविला कीं माझी पेटी पाठवून द्याली, म्हणजे चवकशीचें काम सुरू करतां येईल.

काजीला पेंच पडला. आतां रिकामी पेटी पाठविली तर आपणच मुद्रा चोरून घेतल्याचा आरोप आपल्यावर लागेल. म्हणून त्यानें पेटींत मुद्रा ठेवून पेटी पाठवून दिली.

चवकशीचें काम पुरें करून तो अधिकारी राजधानीला परत गेला. त्यानें आपल्या अहवालांत काजीवरचे सर्व अपराध साबीत झाल्याचें लिहिलें होतें. त्या बरोबर मुद्रा कशी चोरीला गेली व कशी चालून परत आली हें देखील लिहिलें होतें.

काजीला कठोर कारावासाची शिक्षा झाली. आळशी अजगराचा सल्ला त्यानें मानला असता तर तो पार सुटला असता.



## गलिवरच्या सफरी



पुस्तकें वाचण्यासाठीं विशेष व्यवस्था करण्यांत आली. एक ओळ वाचण्यासाठीं मला एका टोंका-पासून दुसऱ्या टोंकापर्यंत चालावें लागे.



एकदां मी न्हाव्याकडून राजाच्या डोक्यांतला एक केस मागून घेतला. त्या एका केसाचा एक मोठा कंगवा तयार झाला. त्या केसाची जाडी कंगव्या-च्या दांत्यांसारखी होती.



राणीच्या केसांनीं मी एक खुर्चीच विणून घेतली. मी राणीचा आदर करीत असें. म्हणून राणीच्या केसांनीं विणलेल्या खुर्चीवर मी बसलों नाहीं.



मला पियानो छान वाजवतां येतो, असें सांगून मी साहस करून राजाचा पियानो वाजविला. दोन दांडूंच्या कांड्यांना उंदरांचें चामडें बांधून पियानोच्या पट्यांवर दाणदाण आपटीत इकडून तिकडे धांवत असें. तें संगीत ऐकून मला व राजा राणीला आश्चर्य वाटे.



एकदां राजा सपरिवार समुद्रकाठीं वन भोजनासाठीं म्हणून गेला. मला देखील एका खोलीवजा पेटींत घालून माझी आया बरोबर घेऊन निघाली.



माझी पेटी एका खडकावर ठेवून माझी आया गंमत पहायला गेली.



पुष्कळ वेळ झाला, पण ती कांहीं आली नाहीं. मी आपला पेटींत बंद, पिंजऱ्यांत पडलेल्या उंदरासारखा आंतल्या आंत फिरत होतों.



परंतु अचानक एक मोठें वादळ आल्यासारखें मला वाटलें व हां हां म्हणतां माझी पेटी हवेंत उडूं लागली. माझी तर घाबरगुंडीच उडून गेली.



माझी पेटी आकाशांत पुष्कळ वर उडत होती. एकाएकीं ती समुद्रांत जाऊन पडली. सुदैवानें ती बुडाली नाहीं. पाण्यावर तरंगूं लागली.



मी विचार केला, याच वेळीं इकडून एखादें जहाज जात नसेल कशावरून? मी आपला सदरा फाडून त्याचा झेंडा केला.



पेटींतून तो झेंडा बाहेर काढून मी बसून राहिलों. इतक्यांत माझी पेटी कोणीतरी ओढीत असल्याचा भास मला झाला.



आपल्या देशांतल्या जहाजवाल्यांनींच समुद्रांत एक पेटी व तीवर झेंडा पाहून मला वर काढलें. त्यांना वाटलें, कोणीतरी मला ही शिक्षा दिली असावी.



मी आपल्या प्रवासाचें वर्णन केलें. पण कोणाचा विश्वासच बसेना माझ्या बोलण्यावर. शेवटीं मी राणीची चाका एवढी अंगठी व करवतीसारखा कंगवा वगैरे वस्तू दाखविल्या तेव्हां त्यांना खरें वाटलें. तोंपर्यंत त्यांना वाटत होतें कीं मी जुलत्या थापा मारीत आहें.



माझ्या डोळ्यांना पर्वताकार लोक पाहण्याची संवय झाली असल्यानें आपल्याच देशांतील लोक मला लिलीपुटचे निवासी वाटूं लागले.



संवयी प्रमाणें मी फार मोठ्यानें बोलत असें. म्हणून माझी मित्र मंडळी देखील कानावर हात ठेवून म्हणत, "हळू बोल बाबा !"



असो, देवाच्या दयेनें मी सुखरूप स्वदेशीं पोंचलों आहें. बायकामुलांना भेटल्यावर मला किती आनंद झाला. मी त्यांना वचन दिलें कीं आतां देशाच्या बाहेर कधीं पाऊल टाकणार नाहीं. (संपूर्ण)



# म्हाताऱ्याची बायको

फार पूर्वी तुर्कस्तानांत एक श्रीमंत गृहस्थ रहात असे. त्याला एकुलता एक मुलगा होता. मुलाचें वय लग्नायोग्य झाल्यावर आईवडिलांनीं पुष्कळ स्थळें पाहिलीं. पण मनाजोगतें एक देखील स्थळ मिळालें नाहीं.

त्या श्रीमंत गृहस्थाच्या घरापासून थोड्या अंतरावर एका गरीब लाकूडतोड्याचें घर होतें. आपल्या गरीब कुटुंबाच्या पोटापाण्या-साठीं लाकडें फोडणें हा एकच धंदा त्याला माहीत होता. त्याला एक सुंदर मुलगी होती. तिचें वय देखील लग्नायोग्य झालें होतें.

एकदां त्या गरीबाच्या घरीं त्या श्रीमंत गृहस्थाची बायको गेली असतां तिची नजर त्या सुंदर मुलीवर पडली व तिनें तिला सून करून घेण्याचें आपल्या मनाशीं ठरविलें. ती लाकूडतोड्याच्या बायकोला म्हणाली– "मी आपल्या मुलाकरितां कित्येक मुली पाहिल्या, पण तुझ्या मुलीसारखी मुलगी मला कोठें आढळली नाहीं. तूं कबुली दिलीस तर तुझ्या मुलीला सून करून घेईन."

तें ऐकून लाकूडतोड्याच्या बायकोचा स्वतःच्या कानावरच विश्वास बसेना. ती एवढेंच म्हणाली–"अल्लाची मेहेरबानी असेल तसेंच सर्व होतें !" त्या श्रीमंत बाईनें आपल्या बोटांतील अंगठी काढून मुलीच्या बोटांत घातली व म्हणाली–"हा संबंध ठरला !" ती घरीं गेली आणि आपल्या मुलाला घडलेली हकीगत सांगून म्हणाली– "अगदीं तुझ्या जोगी मुलगी आहे बघ !"

लाकूडतोड्या संध्याकाळीं घरीं आला तेव्हां त्याच्या बायकोनें मुलीचें लग्न त्या श्रीमंत गृहस्थाच्या मुलीशीं ठरल्याची गोष्ट सांगितली. लाकूडतोड्या तें ऐकून म्हणाला– "सर्व त्या अल्लाची मेहरबानी आहे."

श्री वा. गो. देशपांडे



पण दैवाला तो संबंध पसंत नव्हता कीं काय कोण जाणें, लग्न मोडलें. शेजार-पाजारच्या बायकांनीं त्या श्रीमंत बाईची थट्टा केली—" कोठें तुम्ही आणि कोठें तो लाकूड-तोड्या ! पायाची वहाण पायांतच राहालेली बरी ! नुसतें सुंदर तोंड पाहून तूं भाळलीस, कुळ गोत्र कांहीं पाहायला हवें कीं नाहीं. हा संबंध जन्माचा आहे."

तें ऐकून श्रीमंत बाईनें विचार केला, थोडी घाई केली मी. त्यांत काय, जाऊन सांगावें, आम्हांला नाहीं पसंत हा संबंध. असा विचार करून ती लाकूडतोड्याच्या घरीं गेली आणि त्याच्या मुलीच्या हातांतली अंगठी काढून घेऊन आली. लग्न मोडलें.

संध्याकाळीं लाकूडतोड्या घरीं आला तेव्हां त्याच्या बायकोचा व मुलीचा चेहरा उतरलेला पाहून त्यानें कारण विचारलें. घडलेली गोष्ट ऐकून तो म्हणाला—" अल्लाची जशी मर्जी असतें तसेंच घडतें. उद्यां मी मुलीला घेऊन मशिदीसमोर उभा राहतों. मशिदींतून जो सर्वांत आधीं बाहेर येईल त्याच्याशीं मुलीचें लग्न लावून देतों."

सकाळीं उठल्यावर लाकूडतोड्यानें बायकोला, मुलीला जरा नीटनेटके कपडे घालून बरोबर पाठवायला सांगितलें. दोघे मशिदीच्या बाहेर दरवाज्यांत उभे राहिले. थोड्या वेळानें फाटके कपडे घालून एक म्हातारा मनुष्य बाहेर आला. लाकूडतोड्यानें त्याला आदरपूर्वक नमस्कार केला व म्हणाला—" माझी मुलगी लग्नाची आहे. तिचें एक जुळलेलें लग्न मोडलें. तुम्ही तिचा हात धरलात तर पोर तरेल."

म्हातारा म्हणाला—" बाळ, मला घरदार कांहीं नाहीं. चार पैसे मिळविण्याची माझ्या अंगांत शक्ति उरली नाहीं आणि तुझ्या मुलीशीं लग्न करून घेऊन तिच्या पोटा-पाण्याची जबाबदारी कशाला घेऊं ?"

लाकूडतोड्या म्हणाला—" आम्ही तरी श्रीमंत आहों म्हणून तुमच्याकडे आलों असें वाटतें का तुम्हांला ? आम्हांला सुद्धां उपाशी झोंपायची संवय झाली आहे."

" ठीक, पहा बुवा ! " असें म्हणत म्हातारा त्या लाकूडतोड्याच्या मुलीला बरोबर घेऊन मशिदी शेजारच्या एका झोंपडींत घेऊन गेला आणि तेथें त्यानें चार लोकां-समक्ष त्या मुलीशीं लग्न लावून घेतलें. लग्न झाल्यावर लाकूडतोड्या व इतर लोक मुलीला त्या झोंपडींत सोडून निघून गेले.

त्या दिवसापासून म्हातारा रोज संध्या-काळीं घरीं येई व बायकोला चार पैसे व मेणबत्ती देऊन निघून जाई. त्याची बायको त्या पैशांवर स्वतःचें पोट कसेंतरी भागवी. मुलीची ही स्थिति पाहून लाकूडतोड्याच्या बायकोच्या हृदयाला मात्र पीळ पडूं लागला. ती मुलीला भेटायला गेली खरी, पण मुलीची प्रकृति पाहून तिला जास्तच वाईट वाटलें. आईनें तिला कोठून तरी जुने कपडे मागून आणून दिले.

इकडे त्या श्रीमंत बाईच्या मुलाच्या लग्नासाठीं एक स्थळ पाहण्यांत आलें. मुहूर्त पण ठरला. लग्नाच्या दिवशीं श्रीमंत बाईनें




लाकूडतोड्याच्या बायकोला मदतीसाठीं बोला-विलें. तिनें आपल्या मुलीला ती गोष्ट सांगून बरोबर यायला सांगितलें. ती म्हणाली—" मी ' त्यांना ' विचारून सांगेन."

संध्याकाळीं नित्याप्रमाणें म्हातारा आल्या-वर तिनें आईनें मदतीला बोलाविलें असल्याचें सांगितलें व त्याची परवानगी मागितली.

" जा, अवश्य जा, आणखी हें पहा, मी नक्की सांगतों, नवरा मुलगा तुला पाहिल्या-बरोबर नवऱ्यामुलीला सोडून नक्की तुलाच माळ घालील. तूं तें मान्य केलें पाहिजेस !" म्हातारा म्हणाला.

Restore 127



"तर मग मी जातच नाहीं. मला नाहीं आवडत तसलें बोलणें नि वागणें." त्याची बायको म्हणाली.

"तुला त्यांत हरकत कां वाटावी, विचारतों मी ! तुला तेथें सर्व सुखसोयी मिळतील." म्हातारा म्हणाला.

"नाहीं. मी जाणार नाहीं. माझ्या नशिबीं गरीबी लिहिली आहे. मी त्या श्रीमंताशीं लग्न केलें तर त्या घरची लक्ष्मी पळून जाईल व चौपदरी हातीं येईल. नको, तो विचारच नको." बायको म्हणाली.

"तूं गेलें पाहिजेस. माझा हुकूम आहे. समजलीस ?" असें दरडावून सांगून म्हातारा निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं तिची आई तिला बरोबर घेऊन लग्नघरीं जायला निघाली. तिनें शेजार पाजारच्या लोकांकडून मागून मुली करितां कपडे आणले होते. ते मुलीला घालायला देऊन ती निघाली. तेवढ्यांत त्यांच्या घरासमोर एक गाडी उभी राहली. गाडींतून दोन बायका उतरल्या. त्यांनीं तिला घरांत बोलावून नेलें व तिला उंची वस्त्रें व सुंदर दागिने घालायला दिले. नंतर सर्व मिळून गाडींत बसून लग्नघरीं गेल्या.

पाहुण्यांनीं वधूला अहेर केला. उंचीउंची वस्त्रें व दागिने पाहून डोळे दिपून जात होते. म्हाताऱ्याच्या बायकोनें पुढें येऊन आपल्या बोटांतली हिऱ्याची अंगठी काढून वधूच्या बोटांत घातली. सर्व बायका चकित होऊन पाहूं लागल्या, ही कोण महाराणी !

इतक्यांत वधूला घेऊन जाण्यासाठीं वर आला. लाकूडतोड्याच्या मुलीचें सौंदर्य पाहून तो थक्क झाला. तें पाहून वधूला फार राग आला. ती फणकाऱ्यानें तेथून निघून गेली.

लग्न मोडलें. लाकूडतोड्याच्या मुलीला ज्या बायका बोलावून घेऊन गेल्या होत्या त्यांनीं तिला परत तिच्या झोंपडींत पोंचतें केलें.

त्याच्या गाडीच्या पाठीमागून दुसरी एक गाडी आली. तींत नवऱ्यामुलानें आपल्या नातेवाईकांस पाठविलें होतें. नवऱ्यामुलाला कळलें कीं त्याच मुलीशीं त्याचें लग्न ठरलें होतें. त्यानें आपल्या नातेवाइकांबरोबर निरोप पाठविला कीं मी लाकूडतोड्याच्या मुलीशिवाय इतर कोणाशीं हि लग्न करणार नाहीं."

"मी एका म्हाताऱ्या भिकाऱ्याची बायको आहें. देवानें त्याची व माझी जन्माची गांठ घातली आहे. मी सुखी आहें !" तिनें उलट निरोप पाठविला.

तें उत्तर ऐकून तो श्रीमंताचा मुलगा फार रागावला. "मी लग्न करावयास तयार आहें. निरोपावर निरोप पाठवीत आहें, पण ती नकार देते, म्हणजे समजते काय स्वतःला ?" त्यानें सुलतानाकडे जाऊन तक्रार केली.

"मी उद्यां या विषयीं चवकशी करतों." सुलतान म्हणाला.



दुसऱ्या दिवशीं दरबारांत लाकूडतोड्याच्या मुलीला हजर करण्यांत आलें. दरबारांत कां बोलाविलें आहे हें देखील तिला कळलें नाहीं. म्हणून भीतभीतच ती दरबारांत आली. दरबारांत तिला तो श्रीमंत नवरामुलगा दिसला. सुल्तान पडद्याआड बसला होता.

नवरामुलगा म्हणाला—"ह्या मुलीशीं माझें लग्न कधीं ठरलें होतें. म्हणून हिच्याशींच माझें लग्न झालें पाहिजे. नाहींतर हिला फांशीची शिक्षा देण्यांत यावी."

"मला फांशीवर चढविलें तरी चालेल. पण मी ह्याच्याशीं लग्न करायला तयार







नाहीं. माझें लग्न एका म्हाताऱ्याशीं झालेलें आहे." लाकूडतोड्याची मुलगी म्हणाली.

"कोण आहे तो म्हातारा?" पडद्याआड बसून सुलतानानें विचारलें.

"मला नाहीं माहीत. तो रोज संध्याकाळीं मला चार पैसे व एक मेणबत्ती देऊन निघून जातो." ती म्हणाली.

"त्या भिकाऱ्याचा नाद सोडून या श्रीमंताशीं लग्न करून घ्यायला काय हरकत आहे तुला?" सुलतानानें दरडावून विचारलें.

"मालक! लग्नें स्वर्गांत होत असतात. म्हातारा असो कीं तरुण, श्रीमंत असो कीं गरीब, एकदां ज्याचा हात धरला त्याचा हात कोणतीहि घरंदाज बाई सोडीत नाहीं." म्हाताऱ्याची बायको म्हणाली.

"तुझ्या समोर तुझ्या नवऱ्याला उभा केला तर तूं त्याला ओळखशील का?" सुलतानानें पडद्याआडून विचारलें व पडद्याबाहेर आला. तिनें सुलतानाला प्रथमच पाहिलें होतें. तो एक सुंदर तरुण होता. त्याला पाहून प्रथम ती लाजली व म्हणाली—"मालक! आपणच माझे पति आहां. आपल्या गालावरच्या डागावरून मी आपल्याला ओळखलें."

सुलतान स्मित करून म्हणाला—"तूं बरोबर मला ओळखलेंस. पण मी तुला नीट ओळखलें नव्हतें. म्हणून एवढी परीक्षा घ्यावी लागली. त्या दिवशीं मी वेश पालटून मशिदींतून येत होतों व तुझ्या बापानें तुझें माझ्याशीं लग्न लावून दिलें. पण तूं माझी बेगम व्हायला लायक आहेस कीं नाहीं हें कळावें म्हणून मी तुझी ही अग्नि परीक्षा घेतली."

त्यानंतर दोघांचें लग्न झालें. एक महिनाभर मेजवान्या होत होत्या.





# नृपानुग मंत्री

चांदण्या रात्रीं आजोबा अंगणांत आराम खुर्ची टाकून बसले होते. डाव्या हातांत तपकीर घेत त्यांनीं हा श्लोक म्हटला—

"मन्त्रः कार्यानुगो येषां
कार्यं स्वामि हितानुगं
त एव मन्त्रिणो राज्ञां
नतु ये गत पक्ष्वाः"

तो श्लोक ऐकून नातवंडें धांवत आलीं आणि आजोबांच्या चारी बाजूला घोळका करून हट्ट धरून बसली—"आम्हांला याचा अर्थ सांगा!"

आजोबांनीं तपकीर नाकांत कोंबली व हात झाडीत म्हणाले—"या श्लोकाचा अर्थ होय? सांगतों, ऐका. याचा अर्थ असा आहे—

"जो मंत्री असतो त्याला राजाच्या मर्जीप्रमाणें काम करावें लागतें. जो तसें करीत नाहीं तो मंत्रीच कसला?"

मुलांनीं गिल्ला केला—"नाहीं अजोबा, याची आम्हांला गोष्ट सांगा! मंत्री कोण व राजा कोण सर्व सांगा!"

आजोबा गोष्ट सांगूं लागले—"एकदां चक्रपुर नांवाच्या नगरींत सुदर्शन नांवाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या दरबारीं बुद्धिसिंधु नांवाचा एक हुशार मंत्री होता.

राजाच्या डोक्यांत एकदां एक खूळ शिरलें. त्यानें ज्योतिष्यांना बोलावून भविष्य विचारायला सुरवात केली. एक ज्योतिषी राजाकडे आला व स्वतःच्या पांडित्याचें त्यानें स्वमुखानेंच खूप वर्णन केलें.

राजानें स्वतःची कुंडली मागवून त्याला दाखविली आणि माझें किती वय उरलें आहे असें त्या ज्योतिष्याला विचारलें.

कुंडली पाहून ज्योतिषी म्हणाला—"महाराज! आजपासून बरोबर सहा

    

महिन्यांनीं आपल्याला यमराजाचें बोलावणें येईल."

तें ऐकून राजा इतका घाबरला कीं त्या काळजीनें त्यानें अंथरूणच धरलें. हळूहळू त्याचें अन्नपाणी तुटलें व तो इतका अशक्त झाला कीं अंथरुणावरून उठणें देखील त्याला अशक्य वाटूं लागलें.

मंत्र्यानें तें भविष्य ऐकलें होतें. त्याला ज्योतिष्याचा भयंकर राग आला. राजा आजारी पडल्यामुळें तर मंत्र्याला जास्तीच काळजी वाटूं लागली. तो राजाकडे गेला आणि म्हणाला—"महाराज! या ज्योतिष्यांच्या बोलण्यावर विश्वास करून तुम्ही व्यर्थ आपला जीव धोक्यांत घालीत आहां! अहो! स्वतः वसिष्ठ ऋषींना विचारून नाहीं का दशरथ महाराजांनीं राज्याभिषेकाचा मुहूर्त ठरविला? पण काय झालें? रामाला रानांत जावें लागलें आणि अयोध्येचें वाटोळें झालें."

परंतु राजाचा आजार कमी झाला नाहीं. तेव्हां मंत्र्यानें आणखी एक उपाय केला. त्यानें ज्योतिष्याला राजासमोर हजर करून विचारलें—"काय हो! राजाचें वय फक्त सहा महिने उरलें आहे, म्हणालांत? पण आपलें वय किती आहे. नाहीं सांगितलेंत?"

"कां? चाळीस वर्षे आणखी!" ज्योतिषी म्हणाला.

"असें होय! चढवा याला सुळावर!" मंत्र्यानें आज्ञा केली. इकडे ज्योतिषी सुळावर चढला व तिकडे राजाची प्रकृति सुधारूं लागली आणि त्याच्या डोक्यांतलें ज्योतिषाचें खूळ पण नाहींसें झालें. खरें आहे. मंत्री असावा तर नृपानुग मंत्री असावा.



# जीवन पुष्प

[ कवि : श्री. पुरुषोत्तम त्र्यंबकराव शुक्ल, अकोला. ]

मुला सांग रे आवडतें तुज पुष्प कोणतें बरें
फुला पाहुनी मोद येतसे दुःख तिळभर उरें
फुला मुलांची एक संगती जगीं लावती जन
मुला पाहुनी फुलासारखें भास होती तें कवि मन ॥ १ ॥

पुष्पें तुजला रुचती कोणती मला सांग बा खरें
चंपक, मालती वा मोगरा, शेवंती मन हरें
एकच त्यांचा निर्माता अन् एकच त्या फुलविता
एकच विनाश कर्ता त्यांचा एकच अमरत्वाचा दाता ॥ २ ॥

फुलें डोलतां बागेमध्यें मन त्या सर्वेची डोलतसे
कुठें चिमुकली कळी पायदळीं तुडवितसा मन कळवळतसे
बागेमध्यें शोभेसाठीं कुणा फुलांचा जन्म असे
कुणी फुलें रानांतच फुलती का त्यांचा उपयोग नसे ॥ ३ ॥

मानव पाही सौंदर्यातें सुंदर पुष्पें त्या हातीं
भ्रमर चाहतो मधास्तवा अन् सौंदर्या मग नच गणती
कुणीं असो फूल आकर्षक वा असो अति कुरूप
असता मधू तयामधीं साचा भ्रमरा चढे हुरूप ॥ ४ ॥

खरें पहावें अंतर्मन नच बाह्य वैभवा गुंगावें
सत्यासत्य परीक्षे लागी मन नित्यचि ठेवावें
भ्रमर गुंगतो मधासाठीं तर आपण गुंगावें सुपथी



# महाभारत

घटोत्कचाचा वध झाल्यानें सर्व कौरवसेना आनंदानें नाचूं लागली. द्रोण व कर्ण दोघे नवीन उत्साहानें लढूं लागले. पण पांडवांनीं दोघां वीरांस एक पाऊलहि पुढें टाकूं दिलें नाहीं.

पण द्रोणानें आज असामान्य पराक्रम दाखवून विराट, द्रुपद, द्रुपदाचे तिघे मुलगे व पांचाल, मत्स्य आणि चेदीच्या वीर योद्धयांचा संहार केला. अर्थातच द्रुपद राजाचा मुलगा धृष्टद्युम्न याला भयंकर राग आला व त्यानें प्रतिज्ञा केली कीं द्रोणाचा वध करून मी पितृऋणांतून मुक्त होईन.

तीन प्रहर रात्र लोटल्यावर सैनिक दमून भागून रथांत, घोड्यांवर किंवा हत्तींवर, ज्याला जिथें जागा मिळाली, पेंगूं लागले. त्यांची ती दयनीय स्थिति पाहून अर्जुनाला देखील दया आली. तो मोठ्यानें ओरडून म्हणाला—"चंद्रोदय होईपर्यंत सर्व थोडी विश्रांति घ्या."

पांडव सेना विश्राम घेत असल्याचें पाहून कौरव सैन्यानें देखील तोंपर्यंत विश्राम घेण्याचें ठरविलें.

चंद्रोदय होतांच पुन्हां युद्धास आरंभ झाला. द्रोणाचार्यांनीं उग्ररूप धारण केलें होतें. त्यांनीं सहस्रावधि पांचाल, मात्स्य, सृंजय व त्यांचे हत्ती व घोडे यांचा संहार केला होता.

तो संहार पाहून कृष्ण पांडवांना म्हणाला—"द्रोणाचार्यांना काय वाटेल तें करून जर वेळींच वाटेला लावलें नाहीं तर ते आपणां सर्वांचा संहार केल्याशिवाय थांबणार नाहींत. परंतु आचार्यांचा युद्धांत पराभव करणें म्हणजे थट्टा नव्हे. तरी एक उपाय आहे. अश्वत्थामा त्यांचा एकुलता एक मुलगा आहे. तो युद्धांत मेला, हें त्यांच्या कानीं पडलें तर पुत्र प्रेमानें ते शस्त्र त्याग करतील."

पण हें खोटें बोलणार कोण? आणि त्यावर आचार्यांचा विश्वास तरी कसा बसणार? स्वत: धर्मराज युधिष्ठिरानेंच जर सांगितलें तर त्यांचा विश्वास बसेल. सुदैवानें त्याच वेळीं अश्वत्थामा नांवाचा हत्ती मेल्याची वार्ता आली. कृष्णानें त्या संधीचा फायदा घेऊन युधिष्ठिराकडून एवढें वदविलें—"अश्वत्थामा मेला—मनुष्य कीं हत्ती नकळे!" पण द्रोणाचार्यांच्या कानावर शेवटचे तीन शब्द पडले नाहींत. कारण त्याच वेळीं पूर्वी ठरल्याप्रमाणें मोठमोठ्यानें नगारे वाजूं लागले. अशा तऱ्हेनें धर्मराजाच्या तोंडून खोटें वदवल्याशिवाय द्रोणाचार्यांकडून शस्त्र त्याग करविण्याचा श्रीकृष्णाचा बेत पार पडला.



तें ऐकून व आतां या जगांत काय उरलें आहे असा विचार करून द्रोणाचार्यांनीं शस्त्रत्याग केला. शोक करीत ते रथांत बसून राहिले. त्याच वेळीं धृष्टद्युम्नानें तलवारीनें त्यांचा शिरच्छेद केला. अशा तऱ्हेनें त्यानें अमानुषपणें आपल्या वडिलांच्या वधाचा सूड उगविला. अर्जुनानें दुरून धृष्टद्युम्नाला तलवार उपसून आचार्यांकडे जात असलेला पाहिलें व तो मोठ्यानें ओरडला—"धृष्टद्युम्ना! थांब ....!" पण त्याचे ते शब्द कानीं पडण्या पूर्वीच द्रोणाचार्यांचा वध झाला होता.

लागोपाठ पांच दिवस कौरव सेनेचें सेनापतित्व द्रोणाचार्यांकडे होतें. त्यांच्या वधामुळें कौरव सैन्यांत चहूंकडे शोककळा पसरली. अर्जुन व सात्यकी धृष्टद्युम्नाचा वध करण्यास धांवले. पण भीम व कृष्ण दोघांनीं त्यांना अडविलें व शांत केलें.


Fullscreen
127



14 / 88


कौरव सेना भयभीत होऊन पळूं लागली. भीष्म व द्रोण यांच्या सारखे वीर धरातीर्थीं पडल्यावर आतां आपला वाली कोण अशा मनःस्थितींत कौरव काय युद्ध करणार? मोठमोठे रथी व महारथी देखील युद्धभूमी-वरून पळून गेले.

त्याच वेळीं वडिलांच्या मृत्यूची वार्ता ऐकून अश्वत्थामा तेथें येऊन पोंचला. प्रथम त्याचा विश्वासच बसेना. परंतु त्याचे मामा कृपाचार्यांच्या तोंडीं घडलेलें वृत्त ऐकून त्याला इतका राग आला कीं त्यानें नारायणा-स्त्राचा प्रयोग केला. नारायणास्त्रांत विशेष असें होतें कीं तें पदातीला मारीत नसे. पण जो कोणी रथांत, हत्तीवर किंवा घोड्यावर बसून युद्ध करी त्याचा हटकून वध केल्या-शिवाय तें परत येत नसे. कृष्णाला ही गोष्ट माहीत होती. म्हणून त्यानें सर्वांस भराभर उड्या मारून जमिनीवर येण्यास सांगितलें. सर्वांनी त्याप्रमाणें खालीं उतरून नारायणास्त्रास नमस्कार केला. एकटा भीम हट्टानें रथांत बसून राहिला. तेव्हां सर्वांनीं मिळून त्याला रथांतून खालीं खेचलें. नारायणास्त्र शांत झालें.

अश्वत्थामाला निराशा वाटली. इतकें मोठें अस्त्र, पण एकाचाहि वध केल्याशिवाय शांत झालें. तिकडे सूर्यास्त झाला व महा-भारत युद्धाचा पंधरावा दिवस शेष झाला. दोन्हीं सैन्यें आपापल्या शिबिरांत परतलीं.

त्या दिवशींच्या युद्धांत अर्जुनाला एक विचित्र दृश्य दिसलें, त्याला भास झाला म्हणा पाहिजे तर. कोणीतरी तेजस्वी पुरुष त्रिशूल हातांत घेऊन असंख्य सेनेचा संहार करीत होता. श्रीकृष्णाला तें कळलें पण तो बोलला नाहीं. पण पुढें व्यास मुनीं कडून अर्जुनाला कळलें कीं अर्जुनाच्या बाजूनें स्वतः शंकरानें शस्त्र धारण केलें होतें.





# स्यमंतकमणि

## प्रथम अध्याय

द्वारकापुरी सजली होती
होती गर्दी रस्त्यांवर।
ध्वजा तोरणें झळकत होतीं
जिकडे तिकडे दारांवर॥

सडा घालुनी बायकामुली
काढित होत्या रांगोळी।
फुलें नि पत्री आणुं लागलीं
मुलें आटपुन आंघोळी॥

मुलें घोळका करून होतीं
जागोजागीं जमलेलीं।
होती रात्रीं जागुन त्यांनीं
आरास घरीं केलेली॥

कसली होती सर्व तयारी?
स्वागत कोणाचें होतें?
कशास नटली द्वारकापुरी?
काय नवें झालें होतें?

माहित, गणराजाची स्वारी
होती त्या दिवशीं येणार।
म्हणुनि तयारी चालू होती
मनांत होता मोद अपार॥

गणपतिबाप्पा आले होते
बसुनि मूषकावरती छान।
वाहन गणराजाचें म्हणुनी
मिळत मूषका होता मान॥

गणराजाची पुजा चालली
होती पत्री-पुष्पांनीं।
मोदक, लाडू, करंज्या, फळें
तऱ्हे तऱ्हेचीं आणूनी॥

कृष्णाचें घर सजलें होतें
वैभव पाहुनि चकित कुबेर;
मान जाहली खालीं त्याची
दिसतां शेरा सव्वा शेर॥









Fullscreen 127 18 / 88

## द्वितीय अध्याय

म्हणतां रुक्मिणि हंसे खदखदां
आणि म्हणे–"तूं भितेस काय?
आज कशाला व्यर्थ काळजी?
पाहतों उद्यां, होतें काय?"

रात्र उलटली; रुक्मिणीस पण
नाहीं आली रात्रीं झोंप।
घोरत होता कृष्ण रात्रभर
छान लागली त्याला झोंप॥

उजाडतां जग जागें झालें,
होउं लागल्या भूपाळ्या।
दचकुनि उठला कृष्ण धांवतां
एका एकीं भूपाळ्या!

"कृष्णा! कान्हा! धांव सांवळ्या
अग्निदेव जणुं आला कोण!"
हांक ऐकुनी कृष्ण धांवला
पहावयाला आहे कोण?

सत्राजित नृप करीत होता
सागरतीरीं खडतर तप।
प्रसन्न करण्या सूर्याला तो
करीत होता त्याचा जप॥

दिवस जाहले अकरा पाहुन
सतत उभा अन् पाहुनिया,
आला धांवत रथांत बसुनी
पाखर फुटला रविहृदया॥

सप्त अश्वरथ आदित्याचा
दुरून दिसला येतांना।
सुवर्ण किरणें पडतां चहूं दिशिं
मोद वाटला सर्वांना॥

सोन्याचा रथ झळकत होता
नील अश्व अन् जुपलेले।
अरुण सारथी, रथांत भास्कर
दिसले सर्वां बसलेले॥





# अग्निद्वीप

[ ५ ]

[ उग्राक्षानें चित्रसेन व त्याच्या अनुयायांस एक मेजवानी दिली. मेजवानीच्या वेळीं बातमी मिळाली कीं भयंकर पक्ष्यांवर बसून कांहीं लोक अग्निद्वीपांतून येत आहेत. उग्राक्ष व चित्रसेन रानांत गेले. तेथें अग्निद्वीपांतल्या लोकांशीं त्यांचें युद्ध झालें. त्यांत कांहीं राक्षस मारले गेले. उग्राक्ष देखील घायाळ झाला. पुढें वाचा—]

उग्राक्ष आपल्या अनुयायांच्या खांद्यावर हात टेकून कण्हत कण्हत उठून उभा राहिला. जबर जखमा लागल्यामुळें तो म्हणाला—"चित्रसेना! पहा माझी ही गति. पहावें तिकडे माझें राज्य आहे. राक्षस जातींत मला किती मान आहे. उच्च कुळांत माझा जन्म झाला आहे. या परकीय लोकांच्या हातून स्वतःच्या जन्मभूमीवर मार खाऊन मला मान खालीं करून घ्यावी लागली."

चित्रसेनानें उग्राक्षाला आश्वासन देत म्हटलें—"असा शोक करीत बसलास तर कसें चालेल. आमचा व तुम्हां राक्षसांचा अग्निद्वीपांतल्या त्या लोकांच्या हातीं पराभव झाला का? त्या भयंकर पक्ष्यांसमोर आपला टिकाव लागला नाहीं. त्या पक्ष्यांना आमच्या या लहान शस्त्रास्त्रांनीं परतवणें अशक्य आहे. त्यांना जिंकावयाचें झाल्यास कांहींतरी दुसरा उपाय केला पाहिजे."

Fullscreen 20 / 88



"काय उपाय करावा या विचारांत वेळ आपण घालवूं व तिकडून ते दुष्ट येऊन तुझा राजवाडा, माझा किल्ला व सारें राज्य बळकावून घेतील. आपण तें सर्व पहायला जिवंत तरी राहूं कीं नाहीं कोण जाणें ?" उग्राक्ष हताश होऊन म्हणाला. त्या भयंकर राक्षसाला देखील सामान्य माणसासारखा घाबरून गेलेला पाहून चित्रसेनाला त्याची दया वाटली.

"उग्राक्षा ! तुला असें का वाटतें कीं, तुझें व माझें राज्य बळकावण्याच्या हेतूनें अग्निद्वीपवाले आपल्यावर स्वारी करीत आहेत ?" चित्रसेनानें विचारलें.

"नाहींतर काय हेतु असावा या स्वाऱ्यांचा ? तूंच सांग !" उग्राक्षानें विचारलें

"मी सुद्धां तोच विचार करीत आहें. आमच्या गांवांतल्या एकट्या दुकट्या माणसाला धरून नेण्यासाठीं ते येत असतीलसें वाटत नाहीं मला." चित्रसेन म्हणाला.

"त्यांच्यापैकीं कोणी जिवंत सांपडला तर सर्व रहस्य काढून घेतां येईल." उग्राक्ष म्हणाला.

"आज ना उद्यां कोणीतरी सांपडेलच कीं नाहीं ! तेव्हां कळेल सारें ! कोणी पकडला गेला तर त्याच्या अंगाला सुया टोंचून त्याचा भेद काढून घेतां येईल. पण हें अग्निद्वीप आहे कोठें कळत नाहीं. हे भयंकर पक्षी ह्यांना कसे मिळाले ? त्यांच्यावर बसून आपल्या लोकांना धरून नेण्यांत त्यांचा काय हेतु आहे, सर्व समजलें पाहिजे. बरें आतां तूं फार वेळ उभा राहणें बरें नाहीं. जखमा भरून येईपर्यंत तूं विश्रांति घे. किल्ल्याच्या रक्षणाची नीट व्यवस्था कर. मी सुद्धां सावध राहीन." चित्रसेन म्हणाला आणि आपल्या अनुयायांना घेऊन निघाला.

"चित्रसेन, कोणाला सांगूं नकोस बरें, माझी अशी दशा झाली आहे म्हणून. कारण हा माझ्या अब्रूचा प्रश्न आहे. तुझ्या अनुयायांना मी माणसाहून लहान आहें असें वाटायचें कदाचित." उग्राक्ष थांबून चित्रसेनाला हाक मारून म्हणाला.

उग्राक्षाचें तें बोलणें ऐकून चित्रसेनाला हंसूं आलें. त्याच्या पाठीमागून धांवत सेनापति आला, त्यानें 'महाराज' म्हणून हाक मारली.

"काय सेनापति ! इतक्या तातडीनें आलांत !" चित्रसेनानें विचारलें.

"या अग्निद्वीपांतील लोकांशीं युद्ध करण्यास या राक्षसांच्या मदतीची आपणांस गरज नाहीं का ?" सेनापतीनें विचारलें.

"सेनापति ! म्हणजे आपण आपल्या नगराचें स्वतः रक्षण करूं शकणार नाहीं असें वाटतें का तुम्हांला ? आपण आपल्या मनगटाच्या बळावर शत्रूशीं दोन हात करूं शकलों नाहीं तर परक्यांची मदत घेऊन रक्षिलेलें राज्य किती दिवस आपल्या हातीं राहील ?" चित्रसेनानें प्रश्न केला.

तें उत्तर ऐकून सेनापति निरुत्तर झाला. ते पुढें चालू लागले. तितक्यांत त्यांना आरोळ्या ऐकूं आल्या—"महाराज ! महाराज !" मागें वळून पाहतात तर दोन राक्षस. चित्रसेनाला आश्चर्य वाटलें. कारण आतांच



उग्राक्षाचा निरोप घेऊन तो निघाला होता. एवढ्यांत पुन्हां हाक मारण्याचें काय कारण ?

सेनापतीनें विचारलें—"पुन्हां अग्निद्वीपवाल्यांनीं स्वारी केली कीं काय ?"

चित्रसेनानें पूर्वेकडे तोंड करून पाहिलें, सूर्योदयाची वेळ होती. म्हणाला—"ते दिवसा येत नाहींत. फक्त रात्रीं काळोखांत येतात." राक्षस जवळ येऊन म्हणाले—"महाराज ! आमच्या राजानें आपल्याला उलट पावलीं येण्याची विनंति केली आहे. कुंभीकूपाजवळ आपण यावें. ते तेथें आपली वाट पहात आहेत."

Fullscreen 127 22 / 88



"मी आतांच निरोप घेऊन निघालों. इतकें जरूरी काय काम आलें आहे ?" चित्रसेनानें विचारलें.

"त्यांच्यापैकीं एकजण सांपडला आहे. हा एकटा मागें कसा राहिला कोण जाणें ? म्हणून आमच्या मालकानें आपणांला लगेच यावें अशी विनंति केली आहे." राक्षस म्हणाले.

"एकट्याकरितां इतक्या त्वरेनें येण्याची गरज काय होती. जो सांपडला आहे त्याला कैद करून ठेवतां आलें असतें. त्यानंतर त्याच्याकडून जी माहिती काढून घ्यावयाची ती काढून घेतां आली असती." चित्रसेन थोडा चिडून म्हणाला.

"महाराज, त्याला आम्ही कैद करूं शकलों नाहीं. तो एका झाडावर चढून बसला आहे, खालीं उतरत नाहीं. आपण आल्याखेरीज हें काम भागणार नाहीं. आमच्या मालकानें सांगितलें आहे." राक्षस म्हणाले.

चित्रसेनाला वाटलें कीं हे दोघे पिऊन आले असावे. जो शत्रु झाडावर का होईना सांपडला आहे त्याला खालीं उतरविणें यांना कठीण कां वाटावें ?

अर्ध्या तासानें चित्रसेन कुंभीकूपाजवळ येऊन पोंचला. तेथें वस्तीपासून दूर एका झाडाभोंवती कांहीं राक्षस घोळका करून उभे होते. सर्वांच्या मध्यभागीं उग्राक्ष उभा होता. सर्वांची दृष्टि त्या झाडावर होती. व्याघ्रचर्म घालून एक मनुष्य झाडावर तलवार उपसून बसलेला होता. तो ओरडत होता—"मी येणार नाहीं ! येणार नाहीं खालीं ! खालीं उतरलों तर तुम्ही राक्षस मला जिवंत सोडाल का ? वर आलांत तर तलवारीनें एकेकाला कापून काढीन आणि आत्महत्या करून घेईन."

चित्रसेनानें जवळ येऊन उग्राक्षाला विचारलें —"उग्राक्षा ! इतक्या तांतडीनें बोलावण्याचें कारण ?"

उग्राक्षानें उत्तरादाखल प्रश्नसूचक संकेत करून झाडावरच्या त्या माणसाला दाखविलें व म्हणाला—"काल रात्रीच्या युद्धांत हा मागें कसा काय राहिला कोणास ठाऊक ? त्याला जिवंत पकडणें कठीण दिसतें आहे. त्याला वाटत आहे कीं आम्ही राक्षस त्याला भाजून खाऊं. तूं त्याला समजावून सांग. आम्ही त्याच्या अंगाला हात देखील लावणार नाहीं."

चित्रसेनानें झाडावरच्या त्या मनुष्याकडे पहात म्हटलें—"तूं अगदीं भिण्याचें कारण नाहीं. माझ्या आज्ञेबाहेर तुझ्या अंगाला कोणी हात लावणार नाहीं. तूं खुशाल खालीं उतर !"

"तुझी आज्ञा मानायला ते लोक कोण ? आणि तूं त्यांचा कोण ?" त्या माणसानें विचारलें.

"मी यांचा राजा आहें. हें जंगल, यांतली गावें शहरें सर्व माझ्या राज्यांत आहेत. माझ्या शब्दावर विश्वास ठेवून तूं खुशाल खालीं उतर." चित्रसेन म्हणाला.



Fullscreen 127 24 / 88



चित्रसेनानें एवढें म्हटल्याबरोबर तेथें जमलेल्या सर्व लोकांनीं जयघोष केला—"चित्रसेन महाराज की जय!"

तो जयजयकार ऐकून झाडावर बसलेल्या त्या मनुष्यानें विचारलें—"पण हे राक्षस आहेत ना! त्यांनीं माझे हात पाय कापून भाजून खाल्ले तर?"

"ते तुझ्या अंगाला स्पर्श देखील करणार नाहींत. ते सुद्धां माझ्या आज्ञे-प्रमाणेंच वागतात." असें म्हणत चित्रसेनानें उग्राक्षाकडे वळून पाहिलें. उग्राक्षानें आपल्या अनुयायांकडे वळून डोळ्यांनीं संकेत केल्या-बरोबर सर्व राक्षसांनीं मिळून जयघोष सुरू केला—"चित्रसेन महाराज की जय!" उग्राक्षानें स्वत: चित्रसेनासमोर लवून नमस्कार केला व हळूहळू पुटपुटला—"राक्षसांच्या राजाची ही दशा व्हावी ना?"

"महाराज! तुमच्या शब्दावर विश्वास ठेवून मी खालीं उतरत आहें." असें सांगून व्याघ्रचर्म घालून झाडावर बसलेला माणूस खालीं उतरूं लागला.

तो खालीं उतरल्यावर चित्रसेन त्याला म्हणाला—"तूं आपली तलवार आमच्या सेनापतींच्या हातीं दे." त्यानें सुचविल्या-प्रमाणें चित्रसेनानें आपली तलवार सेना-पतीच्याहातीं दिली. "चित्रसेन, तुला वाटतें होय कीं याला घाण्याला जुंपल्याशिवाय हा तोंड उघडील?" उग्राक्षानें शंका केली.

"होय!" तो मनुष्य म्हणाला. उग्राक्ष त्याचें उत्तर ऐकून चकित झाला. तो मनुष्य पुढें म्हणाला—"मला जें कांहीं माहीत आहें तें सर्व मी निवेदन करायला तयार आहें. मी हें सर्व कोणाला तरी सांगतां यावें म्हणूनच झाडावर बसून स्वतःचा बचाव करीत होतों. त्या लोकांनीं आम्हांला सांगितलें होतें कीं आपण सर्व बंधु आहोत! पण



सकट समर्थ त्यांनीं मला एकट्याला मार्ग सोडून दिलें आणि स्वतःचा जीव घेऊन पळून गेले. ते पूर्व समुद्रावरील अग्निद्वीपांत आतापर्यंत पोंचले देखील असतील."

"म्हणजे तूं अग्निद्वीपांत राहणारा नाहींस वाटतें?" चित्रसेनानें चकित होऊन विचारलें.

"मी त्या द्वीपांतला असतों तर तुझ्या हातीं जिवंत आलों असतों असें वाटतें होय तुला? त्या द्वीपवाल्यांना मदत करणाऱ्या कपिलपुराच्या नागवर्माचा मी एक सैनिक आहें. माझें नांव अमरपाल असें आहे." तो म्हणाला.

नागवर्माचें नांव ऐकतांच उग्राक्षाचा चेहरा बदलल्यासारखा दिसला. म्हणाला—"नागवर्मा तर एक सेनापति होता. राजा केव्हां झाला? मग राजा वीरसिंह कोठें आहे?"

"वीरसिंह महाराजांना बहुतेक अग्नि-द्वीपांत बंदी करून ठेवण्यांत आलें आहे. नागवर्मानें त्यांना गादीवरून काढून टाकलेंच आहे. आतां तो राजकन्या कान्तिमतीशीं बळजबरीनें विवाह करून घेण्याच्या प्रयत्नांत आहे. त्यानें अग्निद्वीपांतील दुष्ट लोकांशीं मैत्री करून जवळपासचा प्रदेश जिंकून आपल्या राज्यांत मिळवून घ्यायला सुरवात




Fullscreen

127



26 / 88


केली आहे. चक्रवर्ति म्हणवून घेण्याची तो स्वप्नें पहात आहे." अमरपाल म्हणाला.

चित्रसेनाला जवळपासच्या राज्यांच्या-विषयीं विशेष माहिती नव्हती. अमरपालच्या सांगण्यावरून त्याला कळलें कीं त्याच्या राज्यालगतच्या प्रदेशांतील एका राजानें अग्निद्वीपांतील लोकांशीं मैत्री केली आहे. अमरपाल म्हणतो तें सर्व खरें आहे कीं नुसत्या थापा, एक शंका त्याच्या मनांत येऊन गेली.

चित्रसेन बोलतच होता, तेवढ्यांत दुरून त्याला घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकूं आला व कांहीं घोडेस्वार येऊन पोंचले देखील. त्याचा मंत्री दोघांतिघां सैनिकांना घेऊन आला होता. म्हणाला—" महाराज! धवलगिरीहून एक सांडणीस्वार निरोप घेऊन आला आहे कीं नागवर्मा नामक एका राजद्रोह्यानें धवलगिरीवर स्वारी केली आहे. त्यांनीं आपणांस सैन्य घेऊन मदतीस बोलाविलें आहे."

चित्रसेनानें आपल्या सेनापतीकडे वळून आज्ञा केली—" सेनापति! तुम्ही अर्धें सैन्य घेऊन धवलगिरीला तावडतोब जा. इकडच्या भागाच्या रक्षणाची जबाबदारी माझ्यावर!"

" आज्ञा महाराज!" असें सांगून सेनापति निघून गेला.

" या नागवर्माबरोबर अग्निद्वीपांतले रहिवाशी तर आले नसतील? ते आपल्या पक्ष्यांवर बसून आले असतील तर मात्र ..." चित्रसेन बोलतां बोलतां मध्येंच थांबला व अमरपालाकडे वळून त्यानें प्रश्नसूचक संकेत केला.

अमरपालानें एकदां चारी बाजूला पाहिलें, जणूं कांहीं उत्तर देणार आहे. नंतर विचार करून तो आकाशाकडे दृष्टि रोखून पाहूं लागला. (पुढील गोष्ट पुढील अंकीं)



# स्वामिभक्ति

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. झाडाजवळ जाऊन प्रेत काढलें आणि तें खांद्यावर घेऊन स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ बोलूं लागला— "स्वामिभक्त नोकर आपल्या मालकासाठीं वाटेल तो त्याग करतो. पण धर्मवीर नांवाच्या स्वामिभक्त नोकरानें जो त्याग केला तो खरोखरच अद्वितीय असाच म्हटला जाईल. पण तुझ्यासारख्या राजानें एकाद्या भिकाऱ्याला दिलेल्या वचनासाठीं इतके कष्ट सोसणें अगदीं गैरवाजवी वाटतें. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी धर्मवीराची गोष्ट सांगतो. त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली."

एकदां भद्रावती नांवाच्या नगरींत शूद्रक नांवाचा राजा राज्य करीत असे. तो एक महा प्रतापी व प्रजावत्सल राजा होता. त्याचें राज्य म्हणजे रामराज्यच होतें. राजाच्या दर्शनासाठीं माळव देशाचा रहिवाशी धर्मवीर नांवाचा एक

वेताळाच्या गोष्टी

Fullscreen 127 28 / 88



ब्राह्मण आला. त्यानें महाराजांजवळ प्रार्थना केली कीं कांहीं नोकरी द्यावी, चार पोटें भरतील. ब्राह्मणाच्या हातांत पळीपंच-पात्रीच्या जागीं ढालतलवार पाहून राजाला वाटलें कीं द्रोणाचार्यांसारखाच कोणी शूर ब्राह्मण असावा. म्हणून राजानें विचारलें—
“काय पगार घ्याल ?”

धर्मवीर म्हणाला—“मला, रोज पांचशें दीनार द्यावेत, महाराज!” पगार जास्त होता. पण राजानें त्याची परीक्षा घेण्यासाठीं तो पगार कबूल करून त्याला आपल्या पदरीं नोकरी दिली.

राजाला आश्चर्य वाटे कीं हा पांचशें दीनार रोज घेऊन करणार काय? म्हणून त्यानें गुप्त हेर ठेवून धर्मवीर काय करतो हें कळविण्यास सांगितलें.

धर्मवीराला राजानें आपल्या खास महालाच्या देवडीवर पाहारा देण्याच्या कामावर नेमलें. धर्मवीर रोज फक्त दोन वेळ घरीं जेवायला जाई. संध्याकाळीं जातांना आपली मजुरी घेऊन जाई. घरच्या खर्चा-करितां बायकोला शंभर दीनार देई. शंभर दीनार कपडेलत्ते व इतर सामानासाठीं व शंभर रुपये धर्मकार्यासाठीं खर्च करी. धर्मवीराला एकहि व्यसन नव्हतें. त्याचें कुटुंब तसें मोठें नव्हतें—बायको, मुलगा व मुलगी.

राजाला हेरांनीं येऊन सांगितलें कीं उरलेले पैसे धर्मवीर शिल्केंत टाकतो. धर्मवीराला कांहीं व्यसन नाहीं. हें ऐकून राजानें विचार केला आपण धर्मवीरावर जो खर्च करीत आहों तो व्यर्थ नाहीं.

आतां राजानें धर्मवीराच्या स्वामिभक्तीची परीक्षा घेण्याचें ठरविलें.

रात्रंदिवस धर्मवीर देवडीवर मनोभावें पाहारा देई. वेळीं अवेळीं महाराजांनीं हाक मारली कीं—“देवडीवर कोण आहे?”



तो उत्तर देई—“मी आहें महाराज, धर्मवीर!”

ऊन पडो, पाऊस पडो, वीज पडो, वादळ येवो, धर्मवीर आपला तलवार हातांत घेऊन देवडीवर उभा राही. हें पाहून राजाच्या मनांत आपल्या स्वामिभक्त नोकराविषयीं जास्त आदर उत्पन्न झाला. तो असेपर्यंत आपल्या जिवाला धोका नाहीं अशी राजाची खात्री पटली.

एके दिवशीं रात्रीं मुसळधार पाऊस पडला. रात्रभर पावसाची धार चालू होती. घनदाट अंधःकार होता. मध्यरात्रीच्या वेळीं राजाला दुरून कोणी तरी स्त्री रडत असल्याचा भास झाला. म्हणून राजानें सज्ज्यांत येऊन कानोसा घेतला. तेव्हां खरोखरच कोणी रडत आहे याची त्याला खात्री झाली. म्हणून राजानें हाक मारली—
“कोण आहे देवडीवर?”

“मी आहें महाराज, धर्मवीर!” उत्तर मिळालें.

“हें पहा, धर्मवीर! दूर कोणी तरी स्त्री रडत आहे. ती कोणत्या संकटांत सापडली आहे, पाहून येऊन मला सांग.” राजा म्हणाला.



“आज्ञा महाराज!” असें म्हणत धर्मवीर ज्या दिशेनें रडण्याचा आवाज येत होता त्या दिशेला निघून गेला. तो काय करतो हें पाहण्यासाठीं राजा स्वतः त्याच्या मागोमाग गेला. परंतु ही गोष्ट धर्मवीराला माहीत नव्हती. तो त्या पावसांत व काळोखांत चालत चालत गांवाच्या बाहेर एका तलावा-जवळ पोंचला. तेथें एक स्त्री रडत असलेली त्याला दिसली. त्यानें तिला हाक मारून विचारलें—
“बाई, तुम्ही कोण? कां रडतां आहां?”

“मी भूदेवी आहें. तीन दिवसांत या देशाचा राजा शूद्रक मेल्यावर माझें रक्षण

Fullscreen 127 30 / 88



कोण करणार म्हणून मी रडत आहें." ती स्त्री म्हणाली.

धर्मवीराच्या मनांत धस्स झालें. ज्याच्या अन्नावर हा देह वाढत आहे त्याच्यावर कांहीं तरी मोठें संकट येणार आहे हें ऐकून धर्मवीर घाबऱ्या आवाजांत विचारूं लागला– "राजाला मृत्युमुखांतून वांचविण्यास कांहीं उपाय नाहीं का ?"

"आहे, पण तो तुझ्या हातून होणार नाहीं, असें मला वाटतें." ती स्त्री म्हणाली.

"ज्या मालकाच्या अन्नावर हा देह वाढत आहे त्याच्या रक्षणासाठीं आपल्या प्राणाचा बळी द्यावा लागला तरी मी तयार आहें." धर्मवीर म्हणाला.

"राजमहालाच्या शेजारीं जें चंडिकेचें देवालय आहे त्यांत जाऊन तूं आपल्या मुलाचा बळी दिलास तर राजाला शतायुलाभ होईल." ती स्त्री म्हणाली.

"एवढेंच ना ?" असें म्हणत धर्मवीर सरळ आपल्या घरीं गेला. इकडे तलावांतली भूदेवी अंतर्धान पावली.

राजा हें सर्व कांहीं पाहून व ऐकून थक्क झाला. धर्मवीर काय करतो हें पाहण्यासाठीं तो त्याच्या मागोमाग निघाला.

धर्मवीर घरीं गेला तेव्हां सर्व गाढ झोपीं गेले होते. त्यानें बायकोला जागें करून भूदेवीची आज्ञा सांगितली आणि म्हणाला– "महाराजांसाठीं एवढें आपणांस केलेंच पाहिजे."

"मी मुलाला उठवितें. तुम्ही त्याला सर्व सांगा ! बायको म्हणाली. तिनें मुलाला जागा केला व नवऱ्याजवळ त्याला घेऊन आली. धर्मवीर म्हणाला–"बाळ, आपल्या राजावर फार मोठें संकट आलें आहे. भूदेवीनें तुझा बळी चंडिकेसमोर दिला तर राजाचें रक्षण होईल असें सांगितलें आहे."

"बाबा ! चला चंडिकेच्या देवळांत ! राजाच्या ऋणांतून मुक्त होण्यास याहून जास्त चांगली संधि कोठून मिळणार ?" मुलगा म्हणाला.

धर्मवीर मुलाचा हात धरून चंडिकेच्या देवळांत निघाला. मुलाची आईपण मुलीला घेऊन बरोबर निघाली. राजा देखील पाठोपाठ होताच.

देवळांत जाऊन धर्मवीर चंडिकेला नमस्कार करून म्हणाला–"देवी ! या मुलाचा बळी मी स्वतःच्या हातानें देत आहें. आमच्या महाराजांना पूर्ण आयु दे !" असें सांगून त्यानें मुलाचें डोकें कापून देवीच्या चरणांवर वाहालें. आपल्या भावाचा विरह असह्य झाल्यानें धर्मवीराच्या मुलीनें देखील प्राण सोडला.

डोळ्या देखत दोघां मुलांचा अशा तऱ्हेनें जीव गेलेला पाहून मुलांची आई म्हणाली– "आतां मी तरी जिवंत राहून काय करूं ? या मुलांबरोबर तुम्हीच या देहाला अग्नि द्या."

धर्मवीरानें चिता रचली. त्याची बायको दोघां मुलांना मांडीवर घेऊन चितेवर बसली. धर्मवीरानें देवी पुढच्या दिव्यानेंच चितेला अग्नि दिला.



Fullscreen 127 32 / 88



नंतर तो देवी समोर गुडघे टेंकून उभा राहिला. तिला नमस्कार करून म्हणाला— "चंडिके! आतां तूं आमच्या महाराजांचें रक्षण करशील, या गोष्टीची मला खात्री आहे. ज्या मुलांबाळांसाठीं मी महाराजांच्या पदरीं नोकरी धरली तींच आतां या जगांत नाहींत. मग मी तरी जगून काय करूं? मला देखील आपल्या पायांपाशीं आश्रय दे!" असें सांगून त्यानें स्वतःच्या छातींत खंजीर भोंसकला.

हें सर्व पाहून राजा थक्क झाला. आपण हें सर्व पहात उभे कसे राहालों? माझा जीव वांचविण्यासाठीं या सर्वांनीं आपला जीव द्यावा आणि मी तें सर्व डोळ्यांनीं पहात रहावें? या पेक्षां जास्त स्वार्थीपणा तो काय असणार? असा विचार करून त्यानें देवीच्या पायावर मस्तक ठेवून प्रार्थना केली—"देवी, तूं माझा बळी घे आणि या सर्वांना जिवंत कर! हें कुटुंब खरोखर देवलोकांतून आलेलें आहे." असें सांगून राजानें खंजीर उपसला व स्वतःच्या छातींत भोंसकणार इतक्यांत आकाशवाणी झाली— "बाळ! थांब, मी धर्मवीराला व त्याच्या कुटुंबाला जिवंत करतें. तूं निश्चितपणें घरीं जा." तिकडे राजानें पाठ फिरविली आणि इकडे धर्मवीर सकुटुंब जिवंत झाला. त्याला हें सर्व स्वप्नासारखें भासलें. तो आपल्या बायका मुलांना म्हणाला—"हें काय? तुम्हांला चितेवर ठेवून मी अग्नि दिला नाहीं का? मी स्वतःच्या हातानें खंजीर भोंसकून घेतला होता. पण मी जिवंत कसा? ही सर्व चंडिकेची कृपा आहे!" असें म्हणत त्यानें देवी समोर लोटांगण घातलें.

त्यानंतर त्यानें आपल्या बायका मुलांना घरा पोंचतें केलें व पुन्हां राजवाड्यांत जाऊन देवडीवर उभा राहिला. राजानें त्याला








Fullscreen 127 34 / 88

पाहिलें. त्यानें तेथूनच देवीला नमस्कार करून तिचे आभार मानले व जणुं कांहीं काय काय घडलें हें आपणांस माहीतच नाहीं अशा तऱ्हेनें नेहमींच्या आवाजांत त्यानें विचारलें—" देवडीवर कोण आहे ?"

" मी आहें, महाराज ! धर्मवीर ! आपल्या आज्ञेप्रमाणें मी त्या स्त्रीचा शोध काढीत गेलों होतों. भूदेवी होती. मला पाहाल्यावर अदृश्य झाली." धर्मवीरानें हें सांगितलें. पण राजाला दीर्घायुलाभ व्हावा म्हणून त्यानें देवीसमोर स्वतःचा व कुटुंबाचा बळी कसा दिला हें सांगितलें नाहीं. त्यानंतर राजानें धर्मवीराला कर्नाटकाचें राज्य देऊन त्याचा गौरव केला.

वेतालानें येथवर गोष्ट सांगून विचारलें—"राजा, आतां मला तूं हें सांग कीं धर्मवीर त्याची बायको, मुलगा व मुलगी आणि राजा शूद्रक या पांच जणांत तूं कोणाला थोर मानतोस ? उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर परिणाम माहीत आहे तुला !"

विक्रमार्क म्हणाला—" शूद्रक राजा माझ्या मतें थोर मनाचा ठरतो. धर्मवीरानें आपल्या त्यागबुद्धीनें स्वामिभक्ति दर्शविली. पण त्यानें आपल्या धर्माचेंच पालन केलें. बायकोनें नवऱ्याच्या पावलावर पाऊल ठेवून चालणें तिचा धर्म आहे. त्याच प्रमाणें धर्मवीराच्या मुलानें पितृआज्ञेचें पालन केलें आणि मुलीनें भ्रातृप्रेम निभावून नेलें. परंतु आपल्या नोकरासाठीं आपला प्राण देण्यास तयार होणें, हें कोठें मी ऐकलेलें नाहीं. म्हणून राजाच सर्वांत थोर आहे."

राजाचें मौन अशा प्रकारें भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला आणि झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.





# कुशाग्रबुद्धि तिम्मरसू

महाराज कृष्णदेवराय यांचें नांव तुम्ही ऐकलेंच असेल, त्यानें आपल्या पराक्रमानें विजयनगरचें साम्राज्य स्थापन करून मोठी कीर्ति मिळविली.

कृष्णदेवराय यांचे वडील साल्व नरसिंह-राय राज्य करीत असतां त्यांचा पंतप्रधान एकाएकीं आजारी पडला व तो आजार शेवटचाच ठरला. आपल्या योग्य पंतप्रधा-नाच्या जागीं दुसरा पंतप्रधान नेमण्याचें ठरवून त्यानें पंतप्रधानाच्या हुशारीची परीक्षा घेण्यासाठीं एका कागदावर एक वीतभर लांबीची रेघ काढून आपल्या नोकरांना देत म्हटलें, तुम्ही राज्यभर फिरून ही रेघ पुसल्याशिवाय लहान करून दाखवील अशा माणसाला आदरपूर्वक घेऊन या.

नोकर तो कागद घेऊन गांवोगांव हिंडूं लागले. प्रत्येक गांवांत जो कोणी हुशार विद्वान आढळे त्याला तो कागद दाखवून राजानें सांगितल्याप्रमाणें रेघ पुसल्याशिवाय लहान करून दाखवायला सांगितलें. कित्येक पंडित व विद्वान 'तुमचा राजा वेडपट आहे झालें !' असें सांगून निघून जात. म्हणत—" हें अशक्य आहे. म्हणे रेघ पुसल्याशिवाय ती लहान आहे हें दाखवा. हे लोक आमची थट्टा करायला तरी निघाले असले पाहिजेत नाहींतर माथेफिरू तरी असले पाहिजेत."

नोकर फिरत फिरत एका ब्राह्मण लोकांच्या वस्तींत आले. त्या गांवीं देशांतले विख्यात विद्वान ब्राह्मण रहात असत. नोकरांनीं त्या गांवांत एक शाळा होती तेथें जाऊन गुरुजींना विचारावयाचें ठरविलें. शाळेंत गुरुजी मुलांना भूमिति शिकवीत होते. नोकरांनीं गुरुजींना जाऊन तो कागद दाख-वून महाराजांनीं विचारलेला प्रश्न सांगून उत्तर

Fullscreen 127 36 / 88



विचारलें. गुरुजी म्हणाले—"मीच काय कोणी जादुगर सुद्धां हें काम करूं शकेल का ? वेडे कुठले." नोकर निराश होऊन पुढें जाऊं लागले.

त्या शाळेंत तिम्मरसू नांवाचा एक कुशाग्रबुद्धि विद्यार्थी शिकत होता. तो दुरून सर्व पहात होता. त्यानें गुरुजींजवळ येऊन विनम्रपणें विचारलें—"गुरुजी, त्यांनीं जो प्रश्न आपणांला विचारला होता तो तर अगदीं सोपा आहे. त्या रेषेच्या बाजूला दुसरी एक मोठी रेष काढा म्हणजे त्यांनीं काढलेली रेष लहान नाहीं का होणार ?"

गुरुजींना ती युक्ति पटली. त्यांनीं आपल्या शिष्याची पाठ थोपटली व म्हणाले—"मीं आजपर्यंत तुला शिकविलें तें आज फळास आले. तूंच या गुरूचें पुढें नांव काढशील. शाबास ! शाबास ! नंतर त्यांनीं त्या नोकरांना परत बोलाविलें आणि म्हणाले—"या इकडे ! पाहूं तो कागद !" नोकरांच्या हातांतून तो कागद घेऊन गुरुजींनीं त्या रेषेच्या जागीं दुसरी एक मोठी रेष काढली व म्हणाले—"झाली ना तुमची रेष लहान ? जा आतां तुम्ही !"

नोकर चकित झाले व आदरपूर्वक त्या गुरुजींना नमस्कार करून म्हणाले—"महाराज, साळ्व नरसिंहरायांनीं पालखी पाठविली आहे आपणांसाठीं. जो कोणी ही रेष पुसल्याशिवाय लहान करून दाखवील त्याला आदरपूर्वक घेऊन या असें सांगून त्यांनीं आम्हांला पाठविलें आहे. आम्ही कित्येक दिवस फिरत आहों. पण आजच आम्हांला यश मिळालें. यावें, राजधानीस चलावें"

गुरुजींना अपार आनंद झाला. पण मनांत भीति वाटत होती कीं महाराजांनीं असाच कांहीं प्रश्न विचारला तर आपली फजीती होईल. त्यांनीं आपला शिष्य तिम्मरसू यास जवळ बोलावून म्हटलें—"खरें पाहिलें तर आज तुझा आदर व्हायला पाहिजे व तूं महाराजांकडे जायला पाहिजे. पण स्वतः महाराजांनींच या लोकांना पाठविलें असेल याची कल्पना मला नव्हती. तें ऐकून तिम्मरसू म्हणाला—"गुरुदेव ! ही माझी गुरुदक्षिणा आहे असें समजून आपण जावें. आपला आशीर्वाद असेल तर मला पुष्कळ आदर मिळेल व बक्षिसें मिळतील." गुरुजींनीं त्याला आशीर्वाद दिला व पालखींत बसून राजधानीस गेले.

गांवांत गुरुजींचें भाग्य उघडल्याबद्दल लोक त्यांची वाहवा करूं लागले. खरें रहस्य काय तें गुरुशिष्यांनाच माहीत होतें.

राजाच्या नोकरांनीं घडलेलें वृत्त सांगून गुरुजींनीं मूळ रेष कशी लहान करून दाखविली हें सांगितलें. तें ऐकून राजाला आनंद झाला. परंतु गुरुजींच्या तोंडावर तें तेज नसलेलें पाहून राजाला संशय आला. म्हणून त्यानें गुरुजींना एक प्रश्न करून त्यांची परीक्षा घ्यायचें ठरविलें.

दरबारांत एका चिंचोळ्या जागीं एक उंच तिवईवर एक मुद्रा ठेवण्यांत आली. तिवईपर्यंत जाण्यासाठीं जी वाट होती तेथें



एक गादी अंथरण्यांत आली. नंतर राजा साळ्व नरसिंहरायांनीं गुरुजींना बोलावून म्हटलें—"मी आपणांस आपला पंत अमात्य नेमण्याचें ठरविलें आहे. आपली मुद्रा तेथें तिवईवर ठेवलेली आहे. तुम्ही जाऊन घेऊन या. पण गादीवर पाय देऊन जातां कामा नये."

आपला सत्कार करण्यासाठीं महाराजांनीं बोलाविलें असेल असें समजून गुरुजींनीं राजधानीस येण्याचें कबूल केलें होतें. महाराजांनीं पंतअमात्यांची परीक्षा घेण्यासाठीं ही युक्ति केली होती हें कळल्यावर


Fullscreen
127




38 / 88



गुरुजींच्या अंगाला घाम सुटला. गादीवर पाय दिल्याशिवाय पंतअमात्याची मुद्रा कशी उचलावयाची हा प्रश्नच होता. भरलेल्या दरबारात आपली मान खालीं होणार या विचारानें गुरुजी फारच खजील झाले. त्यांनीं हात जोडून महाराजांजवळ जें खरें होतें तें सांगून टाकलें व म्हणाले—"या पदवीस मी नाहीं, माझा शिष्य तिम्मरसू हा योग्य आहे. त्याला बोलवून त्याचा आदर करावा.

गुरुजींनीं खरें खरें तें निवेदन केल्या बद्दल साळ्व नरसिंह रायांच्या मनांत गुरुजींच्या विषयीं आदर जास्तच वाढला, व त्यांनीं त्यांना आदरपूर्वक बसायला सांगून त्यांचा शिष्य तिम्मरसू यास बोलावून आणावयास दूत पाठविले.

दूत पालखी घेऊन तिम्मरसूच्या गांवीं गेले. तिम्मरसूला आश्चर्यच वाटलें. परंतु राजाचा हुकूम म्हणून तो गेला. महाराज त्याला सामोरे गेले. त्याला आदरपूर्वक दरबारांत बोलावून म्हणाले—"तूं वयानें लहान असून मी दिलेलें कोडें कसें सहजीं सोडविलेंस व पंतअमात्याच्या पदवीस योग्य झाला आहेस. मी तुला आपला पंतअमात्य नेमण्याचें ठरविलें आहे. ती पहा तिवईवर पंतअमात्यांची मुद्रा ठेवलेली आहे. तूं ती घेऊन ये. पण गादीवर पाय पडतां कामा नये." तिम्मरसूनें तत्क्षण गादी गुंडाळली व जाऊन मुद्रा उचलली.

तिम्मरसूचें वय लहान होतें. पण त्याची कुशाग्रबुद्धि व प्रसंगावधान पाहून महाराजांनीं त्याची पाठ थोपटली व त्याला आपला पंतअमात्य नेमलें. त्या पदावर तिम्मरसूनें कित्येक वर्षें काम करून विजयनगरचें साम्राज्य वाढवून मोठी कीर्ति मिळविली.





# नौबत वाजली

एकदां दोन चिनी शेतकरी दोन रांजणें भरून मध बाजारांत विकायला घेऊन गेले. तो बाजारांत विकून रात्र झाल्यामुळें दोघे एका धर्मशाळेंत उतरले. झोंपण्यापूर्वीं त्यांनीं विचार केला कीं पैसे लपवून ठेवले पाहिजेत.

"आपण कोठें तरी हे पैसे लपवून ठेवूं या ? धर्मशाळाच ही. आपण या टोपलींत पैसे ठेवून वर गवत व पानें टाकून ठेवूं या. चोर आला तरी आपण टोपल्यांत पैसे ठेवले आहेत हें कोणाला कळणें शक्य नाहीं." एक शेतकरी म्हणाला.

दुसऱ्याला पहिल्या शेतकऱ्याची युक्ति पटली. दोघांनीं सर्व पैसे दोन्ही टोपल्यांत ठेवून, वर गवत व पानें घालून ठेवून दिली. नंतर दिवा विझवून दोघे झोंपी गेले.

पण म्हणतात ना, भिंतीला देखील कान असतात आणि दरवाजाच्या कडी कोयंड्यांना डोळे असतात. धर्मशाळेचा राखणदार व त्याची बायको दोघें आपल्या खोलींत बसून सर्व पहात होतीं. शेतकरी झोंपी गेल्यावर नवरा बायकोनें सर्व धन चोरून पुन्हां टोपलींतलें गवत व पानें सारखीं करून ठेवलीं.

सकाळीं दोघे शेतकरी उठून पाहतात तर दोन्ही टोपली रिकामीं. इतकी काळजी घेऊन सुद्धां शेवटीं चोरी झालीच. पण लगेच त्यांना धर्मशाळेच्या राखणदाराचा संशय आला. त्यांनीं त्याला जाऊन विचारलें—"आमचे पैसे कोणी चोरून नेले ? आंत दुसरा कोणी वाटसरू तर आला नाहीं. दरवाजा बंद होता. मग चोरी कशी काय झाली ?"

तें ऐकून दोघें नवरा बायको कांगावा करून म्हणालीं—"आम्ही गेलीं पन्नास वर्षें या धर्मशाळेंत रहात आहों. पण असला खोटा आरोप कोणी आमच्यावर लावला नाहीं.

Fullscreen 127 40 / 88



तुमचे पैसे गेले कीं नाहीं देव जाणें. पण तुम्हीं आमच्यावर हा खोटा आरोप लावून आम्हांला बदनाम मात्र केलें आहे. या खोट्या आरोपाबद्दल आम्हांला न्यायाधिशाकडे तक्रार करावी लागेल."

चौथे गांवच्या न्यायाधिशाकडे गेले आणि त्यांनीं आपापली तक्रार न्यायाधिशासमोर सांगितली. परंतु काय न्याय द्यावा हें न्यायाधिशाला कळेना. कारण कोणाजवळच कांहीं पुरावा नव्हता. म्हणून न्यायाधिशानें चियान्शान नांवाच्या एका हुशार नागरिकाला मदतीसाठीं बोलाविलें. न्यायाधिशानें चियान्शानला सांगितलें कीं या शेतकऱ्यांची फिर्याद आहे कीं यांचे पैसे या दोघां नवरा-बायकोनें चोरले आहेत. नवरा-बायकोनें तक्रार केली आहे कीं या दोघां शेतकऱ्यांनीं त्यांना उगाच बदनाम करण्यासाठीं त्यांच्यावर हा आळ आणला आहे. चियान्गशाननें न्यायाधिशासमोर पुन्हां दोघां शेतकऱ्यांना विचारलें कीं चोरी कशी झाली तें खरें खरें सांगा. त्यांनीं रात्रीं टोपलींत पैसे कसे ठेवले हें सांगून रात्रीं त्या धर्मशाळेंत दुसरा कोणी वाटसरू न आल्याचें सांगितलें व म्हणाले—"आम्हांला या राखणदाराचा व त्याच्या बायकोचाच संशय आहे." दोघें नवरा बायको म्हणालीं—"आम्ही रखवालदार म्हणून राहतों आणि आम्हीच चोरी करूं असें वाटतें का तुम्हांला ? तुम्हींच विचार करा."

दोघांचें म्हणणें ऐकून चियान्गशान म्हणाला—"दोघांचें म्हणणें मला बरोबर दिसतें आहे. खरें कीं खोटें याचा निवाडा मी काय देणार ? देवळांतली नौबत मात्र खरें कीं खोटें सांगूं शकेल."

न्यायाधिशानें चकित होऊन विचारलें—"बरळतो आहेस कीं काय ? जो न्याय निवाडा मी नाहीं करूं शकलों तो ही नौबत देणार आहे का ?"

"हो, खात्रीनें देईल. या नौबतीचा गुण आपण अजून ओळखला नाहीं वाटतें. या नौबतीचें असें आहे कीं ज्याला न्याय हवा असतो त्यानें ही नौबत उचलून न्यायस्थळापर्यंत आणावी लागते. फिर्याद न्याय्य असते तेव्हां आपोआपच नौबत वाजते." फान चियान्गशान म्हणाला.

न्यायाधिशाला हें सर्व विलक्षण व अविश्वसनीय असें वाटलें. परंतु फान चियान्गशान हा गांवातला एक विलक्षण मेधावी नागरिक असल्या कारणानें न्यायाधीश म्हणाला—"बरें तर ज्यांचें धन चोरीला गेलें आहे त्यांनीं आंघोळ करून नवे कपडे घालावे आणि ती नौबत उचलून येथवर घेऊन यावी. पाहूं या काय होतें तें."

दुसऱ्या दिवशीं दोघे शेतकरी आंघोळ करून व नवे कपडे घालून देवळांत गेले. नौबत एका उंच बांकावर ठेवलेली होती. ती उचलण्यासाठीं दोन कड्या होत्या. त्या धरून दोघे नौबत उचलून घेऊन निघाले. नौबत फार जड होती. दोघे शेतकरी दमून गेले. त्यांनीं दम घेण्यासाठीं नौबत खालीं ठेवली.



दोघांपैकीं एक जण म्हणाला—"अरे, आपलें धन गेलें तें गेलेंच आणि वर न्यायाच्या नांवाखालीं ओझें वाहणें कपाळीं आलें आहे. आपण म्हणतों आहों तें खरें आहे हें ही नौबत सांगणार म्हणे. ही नौबत वाजणार नाहीं आणि आपलें धन आपल्याला मिळणार नाहीं."

इतक्यांत नौबत वाजली. दोघां शेतकऱ्यांच्या जिवांत जीव आला. दोघे नौबत उचलून घेऊन न्यायस्थानीं ठेवून आले.

न्यायाधिशानें धर्मशाळेच्या राखणदार नवरा बायकोस बोलावून सांगितलें कीं दोघां

Fullscreen
127
42 / 88







शेतकऱ्यांचें धन चोरीला गेलें आहे हें खरें आहे. नौबत वाजली व त्यांचें म्हणणें खरें ठरलें. आतां तुम्ही तें धन उचललें नाहीं हें खरें ठरविण्यासाठीं नौबत उचलून घेऊन या."

दोघे नवरा-बायको प्रथम 'कांकूं' करूं लागले. परंतु निरुपायानें त्यांना नौबत उचलून घेऊन यायचें काम करावें लागलें.

दुसऱ्या दिवशीं दोघें आंघोळ करून व नवे कपडे घालून देवळांत गेलीं व त्यांनीं नौबत उचलून खांद्यावर घेतली. नौबत त्यांना फार जड वाटली. त्यांनीं विसावा घेण्यासाठीं नौबत जमिनीवर ठेवली व परस्परांशीं बोलूं लागलीं. बायको म्हणाली—

"तें धन कांहीं पचनीं पडेलसें वाटत नाहीं. त्या दिवशीं दुसरा वाटसरू देखील कां येऊं नये? त्याच्यावर आळ टाकून आपण सुटलों असतों." बायको म्हणाली.

"आतां जें झालें तें झालें. आतां मी पाय मागें घ्यायला तयार नाहीं. ही नौबत आमच्या बाजूनें वाजणें शक्य नाहीं!" नवरा म्हणाला.

त्यावेळीं नौबतीचें कातडें आपोआप फाटून गेलें. आंतून कान चिंधानाशान बाहेर येत म्हणाला—"ही गोष्ट तुम्ही न्यायाधिशासमोर कबूल केली असतीत तर तुम्हांला इतके कष्ट झेलावे लागले नसते."

"बाबा! कान धरले तुझ्यासमोर! त्या दोघांचे पैसे आम्ही द्यायला तयार आहों. कोणाजवळ ही गोष्ट बोलूं नकोस. नाहींतर तोंड दाखवायला जागा उरणार नाहीं." नवरा-बायको म्हणालीं.

शेतकऱ्यांना त्यांचें धन परत मिळालें. त्यांनीं त्या नवरा बायकोला माफ केलें व आपल्या गांवीं निघून गेले.





# शकुंतला

हस्तिनापुरचा राजा दुष्यन्त एकदां रानांत शिकारीसाठीं गेला असतां त्याला समोर एक हरिण दिसलें. त्याचा पाठलाग करीत जातां जातां तो एका आश्रमांत शिरला. तो बाण मारणार इतक्यांत त्याच्या कानावर हे शब्द पडले—"थांब, थांब राजा! तो आश्रमांतला मृग आहे त्याला मारूं नकोस." असें सांगत वैखानस ऋषि आपल्या शिष्यांबरोबर समोर आले. त्यांनीं दुष्यंत राजाला आशीर्वाद दिला—"तुझा मुलगा एक चक्रवर्ती राजा होईल." त्यांनीं असेंहि सांगितलें कीं जवळच नदीच्या काठीं कण्व मुनींचा आश्रम आहे. मुनि सोमतीर्थाला गेले आहेत. त्यांची मुलगी शकुंतला सर्व प्रकारें तुझें आतिथ्य करील."

दुष्यंत आश्रमापासून कांहीं अंतरावर रथांतून उतरला आणि परत येईपर्यंत घोड्यांना दाणा वैरण घालण्यास सारथ्याला सांगून आश्रमाच्या दिशेनें पायींच निघाला.

आश्रमांत शकुंतला आणि अनसूया व प्रियंवदा नामक मुनिकन्या झाडांना पाणी घालीत होत्या. त्यांचें मोहक बोलणें ऐकत राजा एका झाडाच्या छायेंत उभा राहिला. इतक्यांत शकुंतलेच्या मुखाभोंवती भोंवरे घिरट्या घालूं लागले. ती ओरडली—"भोंवरे....वांचवा!"

"तुला वांचविण्याचा अधिकार आम्हांला कोठें आहे. सर्वांच्या रक्षणाचा भार दुष्यंत राजावर आहे. त्यालाच बोलाव....!" असें म्हणत सखी मिस्किलपणें हंसूं लागल्या.

लगेच दुष्यंत राजानें पुढें येऊन म्हटलें—पुरुवंशी राजा दुष्यंत हजर असतां तुला भिण्याचें कांहीं कारण नाहीं." मुनिकन्या त्याला पाहून दचकून मागें सरकल्या व



लाजेनें माना खालीं करून एका बाजूला उभ्या राहाल्या.

राजानें विचारलें—"या आश्रमांत ऋषीं-मुनींचें तप निर्विघ्न चालूं आहे ना ?" अतिथि-सत्कार करणें आपलें कर्तव्य समजून अनसूयानें आसन घालून राजाला बसावयास सांगितलें.

"तुम्ही सुद्धां दमलां असाल. बसा थोडा वेळ." राजा म्हणाला. राजाच्या विनंतीस मान देऊन तिघी बसल्या. राजानें अनुसूया व प्रियंवदा यांजकडून शकुंतलेच्या जन्माची कथा काढून घेतली. त्यांनीं सांगितलें कीं विश्वामित्र ऋषींचें तप भंग करण्यासाठीं इंद्रानें मेनका नांवाच्या एका अप्सरेला पाठविलें होतें. शकुंतला ही विश्वामित्र व मेनकेची कन्या आहे. परंतु विश्वामित्रानें आपल्या कन्येचा स्वीकार न केल्यामुळें तिला एकटीला सोडून मेनका निघून गेली. पुढें कण्वमुनींनीं तिला लहा-नाची मोठी केली. योग्य वर मिळाल्यावर ते तिचें लग्न करून देणार आहेत.

दुष्यंत व शकुंतला दोघांनीं परस्परांना पाहिल्यापासून दोघांचें परस्परांवर मन बसलें होतें.

त्यांचें बोलणें चालू असतां आश्रमाच्या बाहेर ओरडा होत असलेला सर्वांनीं ऐकला. राजाचा रथ पाहून एक रानटी हत्ती बिचकला. दोघी मुनिकन्या राजाचा निरोप घेऊन निघून गेल्या. दुष्यंत पण आश्रमाबाहेर निघून गेला. त्याला शोधत त्याचे अधिकारी त्याला येऊन भेटले.

दुष्यंतानें आपला विदूषक माढव्य याचा सल्ला घेतला, शकुंतलेची कशी भेट घ्यावी ? सुदैवानें दोघां मुनिबालकांनीं येऊन राजाजवळ विनंति केली कीं महाराज, आश्रमवासियांची अशी इच्छा आहे कीं आपण येऊन कांहीं दिवस त्यांचें आतिथ्य स्वीकारावें. कण्वमुनि आश्रमांत नाहींत व राक्षस यज्ञकार्यांत विघ्न आणीत आहेत.

पडल्या फळाची आज्ञा मानून दुष्यंत आश्रमांत गेला. त्याच्या धनुष्याचा टंकार ऐकून राक्षस घाबरून पळून गेले. आश्रमांत पोंचल्यावर राजाला हें कळायला वेळ लागला नाहीं कीं शकुंतला त्याच्या सारखीच आतुरतेनें आपल्या भेटीची वाट पहात आहे. राजानें तिला एकांतांत भेटून तिला आपली पट्टराणी करून घेण्याचें वचन दिलें. पण वडील येईपर्यंत होकार देण्यास ती तयार होईना. तेव्हां राजानें तिला सांगितलें कीं तूं क्षत्रियकन्या आहेस व क्षत्रियधर्मानुसार गांधर्व विवाह मान्य आहे. त्याप्रमाणें दोघांचा गांधर्वविवाह झाला. राजानें शकुंतलेला आपली अंगठी देत वचन दिलें कीं या अंगठीवर जितकीं अक्षरें आहेत तितक्या महिन्यांत मी तुला बोलावून घेईन.

त्यानंतर शकुंतलेचा व तिच्या सखींचा निरोप घेऊन राजा राजधानीस परतला.

इकडे शकुंतला सदा दुष्यंत राजाच्याच विचारांत निमग्न राही. अशीच एकदां ती दुष्यंत राजाविषयीं विचार करीत असतां दुर्वासा ऋषि आले. शकुंतलेनें त्यांच्याकडे



वळून देखील पाहिलें नाहीं. ऋषींना त्याचा राग आला व त्यांनीं शाप दिला—"ज्या प्रियकराच्या विचारांत तूं आतिथ्य सत्काराचें आपलें कर्तव्य देखील विसरली आहेस तो प्रियकर तुला ओळखणार देखील नाहीं."

अनसूया व प्रियंवदेच्या कानांवर मुनींचे शब्द पडले. त्यांनीं धांवत येऊन मुनींचे पाय धरले व विनंति केली—"राग करूं नये मुनिवर ! आम्ही आहों आपल्या सत्काराला."

पण मुनि म्हणाले—"मी दिलेला शाप परत घेऊं शकत नाहीं. एवढें सांगतों कीं राजानें अंगठी पाहिली तर माझ्या शापाचा प्रभाव

Fullscreen 127 44 / 88










Fullscreen 127 46 / 88

नाहींसा होईल." राजानें दिलेली अंगठी शकुंतलेच्या बोटांतच असल्यामुळें त्यांना वाटलें कीं विशेष भिण्याचें कारण नाहीं.

दिवसामागून दिवस निघून गेले, पण वचन दिल्याप्रमाणें राजानें शकुंतलेला घेऊन जाण्यासाठीं कोणास पाठविलें नाहीं. दुर्वासा मुनींच्या शापामुळें राजा शकुंतलेला पार विसरून गेला. शकुंतला गरोदर होती.

कण्वमुनींना दिव्यज्ञानानें दुष्यंत शकुंतलेच्या गांधर्व विवाहाची व शकुंतला गरोदर असल्याची गोष्ट कळली होती. त्यांना असें हि कळलें होतें कीं शकुंतलेच्या पोटीं एक महा पराक्रमी चक्रवर्ति जन्मास येणार आहे. म्हणून कण्वमुनींनीं शकुंतलेला पतिगृहीं पाठविण्याची व्यवस्था केली. निरोप देत असतां ज्ञानी कण्व मुनींचें डोळे देखील ओले झाले. त्यांनीं पतिगृहीं कसें रहावें याचा उपदेश करून तिला निरोप दिला.

अनसूया व प्रियंवदेनें शकुंतलेला दुर्वासा मुनींच्या शापाची गोष्ट सांगितली नाहीं. फक्त एवढेंच सांगितलें—"राजानें ओळखलें नाहीं तर ही अंगठी दाखव."



आपल्या प्रियसखींचा व कण्वमुनींचा निरोप घेत असतां शकुंतलेचें हृदय कळवळून आलें. ती म्हणाली—"तुम्हां सर्वांना भेटायचें भाग्य केव्हां मिळेल कोणास ठाऊक ?"

कण्वमुनि म्हणाले—"बाळ! मुलाचा राज्याभिषेक करून तूं व तुझा पति वानप्रस्थाश्रम घ्याल तेव्हां तुम्ही दोघें या !"

शकुंतलेला आश्रमाच्या हद्दीपर्यंत पोंचवायला सर्व आश्रमवासी गेले. तिच्याबरोबर गौतमी नांवाची एक तपस्विनी व कण्व मुनींचे दोघे शिष्य हस्तिनापुरपर्यंत गेले. कण्वमुनींच्या आश्रमांतून शिष्य व स्त्रिया आल्याचें ऐकून राजानें आदरपूर्वक त्यांना घेऊन यायला सांगितलें.

गौतमी व कण्वमुनींचे शिष्य शकुंतलेला घेऊन दरबारांत आले. शकुंतला तोंडावर पदर घेऊन उभी होती. राजानें विचारलें—"आश्रमांत यज्ञ होम आदि कार्यांत कांहीं विघ्न तर येत नाहीं ?"

मुनिशिष्यांनीं कुशल समाचार निवेदन करून म्हटलें—"महाराजांनीं कण्व मुनींची कन्या शकुंतलेशीं गांधर्व विवाह केला होता.



Fullscreen 127 48 / 88



ती गरोदर आहे. म्हणून कण्व मुनींनीं तिला आपणांकडे पाठविली आहे."

शापाच्या प्रभावानें राजा दुष्यंत सर्व कांहीं विसरला होता. म्हणून तो म्हणाला—

"तुम्ही काम म्हणत आहां हें मला नाहीं कळलें." शकुंतलेनें तोंडावरचा पदर बाजूला सारून पतीकडे पाहिलें तरी राजानें तिला ओळखलें नाहीं. तिनें निरनिराळ्या प्रकारें राजाला आठवण करून देण्याचा प्रयत्न केला पण फुकट. तिनें बोटांतली अंगठी दाखविण्यासाठीं बोटाकडे पाहिलें. पण ती शुक्रतीर्थीं स्नान करीत असतां पडून गेली होती.

राजाला वाटलें, भर दरबारांत माझा अपमान करून या तरुणीला माझ्या गळ्यांत बांधण्याचा या लोकांचा विचार दिसत आहे. मुनिशिष्यांना वाटलें कीं राजा स्वत: दिलेलें वचन मोडत आहे. ते शकुंतलेला म्हणाले—"आम्ही आपलें कर्तव्य पुरें केलें. पतिगृहा-शिवाय स्त्रीला दुसरा आधार नाहीं. शकुंतला पाठोपाठ येत असलेली पाहून. त्यांनीं तिला परत फिरविलें.

त्याच वेळीं आकाशांतून एक अप्सरा आली व ती शकुंतलेला उचलून घेऊन परत आकाशांत उडून गेली. राजा दुष्यंतानें तें ऐकलें. पण त्याला त्याचें दु:ख किंवा आश्चर्य वाटलें नाहीं.

पुढें कांहीं दिवसांनीं एक धीवर शुक्र-तीर्थाहून राजाच्या दरबारीं आला व त्यानें एक मासा राजाच्यासमोर आणून ठेवला. त्या माशाचें पोट चिरलेलें होतें. धीवरानें एक अंगठी राजाला दाखवीत म्हटलें—"महाराज ही अंगठी या माशाच्या पोटांतून निघाली आहे. अंगठीवर महाराजाचें नांव आहे." अंगठी पाहतांच दुर्वासा मुनींच्या शापाचा प्रभाव नाहींसा झाला व राजा शकुंतलेच्या विरहदु:खानें शोक करूं लागला. राजानें राज्यांत कोठेंहि आनंदोत्सव करण्याची मनाई केली.

कांहीं काळ लोटल्यावर इंद्रानें राक्षसांशीं युद्ध करण्यासाठीं दुष्यंत राजाची मदत मागितली. इंद्राचा रथ घेऊन मातली दुष्यंत राजाकडे आला.

इंद्राच्या विनंतीस मान देऊन दुष्यंत राजानें राक्षसांचा पराभव केला व राज-धानीस परत येत असतां वाटेंत हेमकूट पर्वतावर मारीचि ऋषींचा आश्रम आहे हें ऐकून त्यांच्या दर्शनासाठीं तेथें उतरला.

आश्रमांत पाऊल टाकतांच त्याला एक विचित्र दृश्य पहावयास मिळालें. एक बालक एका सिंहाच्या छाव्याला धरून त्याला तोंड उघडायला सांगत होता. आश्रमवासी स्त्रिया त्याला अडवीत होत्या. पण तो म्हणाला—"नाहीं, मी त्यांचे दांत मोजणार आहे." त्यानें त्यांचें ऐकलें नाहीं.

जवळच दुष्यंत राजाला उभा पाहून त्या स्त्रियांनीं त्या सिंहाच्या छाव्याला बाजूला करण्याची विनंति केली. त्या मुलाच्या गळ्यांतला ताईत नाहींसा झालेला पाहून




Fullscreen
127




50 / 88



त्या स्त्रिया घाबरून ओरडल्या—"अगबाई, ताईत कोठें गेला?" दुष्यंत राजानें खालीं पडलेला ताईत उचलून दाखवीत म्हटलें—"हा पहा! येथें आहे!"

स्त्रिया चकित होऊन राजाकडे पाहूं लागल्या. मारीचि मुनींनीं तो ताईत त्या मुलाच्या गळ्यांत बांधतांना असें सांगितलें होतें कीं आईबापाशिवाय या ताइताला जो कोणी स्पर्श करील त्याला तो ताईत सर्प होऊन डंसेल. मुनि स्त्रियांकडून ताइताचा महिमा ऐकून हा मुलगा आपलाच आहे व शकुंतला देखील या आश्रमांतच असली पाहिजे या गोष्टीची राजाला खात्री पटली. इकडे कांहीं मुनिस्त्रियांनीं जाऊन शकुंतलेला घडलेलें वृत्त सांगितलें.

शकुंतला मारीचि ऋषींच्या आश्रमांत पोंचल्यानंतर राजाला अंगठी मिळाल्यापासून तो विरह-दुःखानें किती दुःखी झाला आहे व त्यानें राज्यांतले सर्व आनंदोत्सव कसे बंद केले आहेत हें शकुंतलेला अप्सरांच्या तोंडीं कळलें होतें. दुष्यंत आल्याचें ऐकून ती उत्सुकतेनें त्याला भेटायला गेली. तिला पाहून राजा लज्जित झाला व त्यानें तिची क्षमा मागितली. शकुंतला म्हणाली—"चूक माझी आहे. माझें भाग्यच आडवें आलें त्याला कोण काय करणार?" शापाची गोष्ट दोघांनाहि माहीत नव्हती. मारीचि ऋषीकडूनच त्यांना प्रथम ती गोष्ट कळली.

नंतर दुष्यंत युवराज सर्वदमन व शकुंतले-बरोबर हस्तिनापुरास आला. मारीचि ऋषींनीं मुलाचें नांव सर्वदमन असें ठेवलें होतें. हाच सर्वदमन पुढें भरत या नांवानें प्रसिद्ध झाला व त्याच्या नांवावरूनच आपल्या देशाचें नांव भारतवर्ष पडलें.





# शेरसिंह पहिलवान

एका गांवीं एक पहिलवान होता. त्यानें कित्येक पहिलवानांना चीत करून मोठा नांव-लौकिक मिळविला होता. त्यानें एकदां वाघाला उभा चिरून फाडून फेंकून दिला होता. तेव्हां पासून तो स्वतःला शेरसिंह म्हणवूं लागला.

एकदां त्यानें विचार केला कीं आपल्या पोलादी दंडावर सिंहाचें चित्र गोंदवून घ्यावें. तो न्हाव्याकडे गेला आणि सिंहाचें चित्र गोंदवून द्यायला सांगितलें. म्हणाला—"माझा जन्म सिंह नक्षत्रांत झाला आहे. मी वाघाला सुद्धां उभा चिरून फाडून फेंकला आहे."

न्हावी सुई घेऊन गोंदवायला बसला. सुई दंडाला लागतांच पहिलवान ओरडला—"काय, करतो आहेस काय?"

"कांहीं नाहीं सिंहाची शेपटी काढतों आहें!" न्हावी म्हणाला.

"वा रे वा! सर्व मोठमोठे लोक आपल्या कुत्र्यांच्या शेपट्या कापून टाकतात हें माहीत नाहीं वाटतें तुला. शेपटी कापलेला कुत्रा शिकार करण्यांत जास्त पटाईत असतो. मग शेपटी कापलेला सिंह किती शूर निघेल? तूंच पहा! म्हणून शेपटी सोडून बाकी सिंह काढ." पहिलवान म्हणाला.

न्हाव्यानें बरें म्हटलें आणि पुन्हां सुई दंडाला लावली. त्या बरोबर पहिलवान आणखी जास्त जोरानें ओरडला—"आतां काय गोंदतो आहेस?"

"कां? सिंहाचा कान," न्हावी म्हणाला.

"वा रे वा! तुला माहीत नाहीं वाटतें! अरे, शिकारी कुत्र्यांचे कान लोक कापून टाकतात." पहिलवान म्हणाला.

"बरें तर बिना कानाचा सिंह काढ-तों मी!" न्हावी म्हणाला. न्हाव्यानें दंडाला


Fullscreen

127





52 / 88


सुई लावल्या बरोबर पहिलवान तसाच पुन्हां जोरानें ओरडला–"अरे, हें काय चालवलें आहेस तूं?"

"मी सिंहाची कंबर काढीत आहें!" न्हावी म्हणाला.

"वा रे वा! तुला माहीत नाहीं वाटतें कीं सिंहाची कंबर किती नाजूक म्हणजे बारीक असते ती? अरे, मोठ मोठ्या कवींनीं सुंदर स्त्रियांच्या कंबरेला सिंहाच्या कंबरेची उपमा दिली आहे. तुला एवढें देखील माहीत नाहीं वाटतें. कंबर जेवढी बारीक तेवढें मोठें सौंदर्य. म्हणजे कंबर अगदीं अदृश्य असेल तर सौंदर्य किती बरें मोठें होईल? मला वाटलें होतें कीं तुला हें सर्व माहीत असेल. पण तूं गांवठी कामें करणारा अगदीं हजाम दिसतो आहेस."

न्हाव्याला देखील कोणी हजाम म्हटलेलें आवडेल का? त्या शिवाय न्हाव्यानें विचार केला, स्वारीला गोंदवून तर घ्यायचें आहे पण त्या साठीं कळ सोसायची मात्र तयारी दिसत नाहीं. वरच्या गप्पा मारण्यांत पटाईत दिसते आहे स्वारी. म्हणून म्हणाला–"तुम्हांला गोंदवून घ्यायचें दिसत नाहीं. तुमच्या बरोबर सोंगें करीत बसायला मला नाहीं वेळ. आपली वाट धरा. मला पुष्कळ कामें आहेत."

तें ऐकून पहिलवानाला राग येण्या ऐवजीं 'बरें झालें पीडा गेली!' असें वाटलें व तो आनंदानें तेथून पाय काढीत म्हणाला–"तुला हें काम येत नव्हतें तर तूं आधींच सांगावयाचें होतें. मी आणखी कोणाकडे तरी गेलों असतों."

असें सांगत मिशांवर ताव देत पहिलवान निघून गेला आणि न्हावी–"वा रे पहिल-वान! म्हणे, सिंहाला उभा फाडून टाकला होता!"






आपल्या देशांत मोठमोठ्या वीर स्त्रिया होऊन गेल्या आहेत. दुर्गावती, अहिल्या-बाई होळकर, झांशीची राणी लक्ष्मीबाई वगैरे शूर स्त्रियांचें नांव ऐकून आज देखील आपण आदरानें आपली मान वांकवतों. त्यांनीं आपल्या शौर्य व पराक्रमानें कित्येक शूर वीरांची देखील मान खालीं करविली आहे. रुद्रमदेवी अशीच एक शूर स्त्री होती. ती वरंगलच्या काकतीय राजघरा-ण्यांत जन्मली होती. आपले वडील गणपतिदेव वारल्यावर तिनें पन्नास वर्षें अखंड राज्य केलें.

आपल्या देशांत कित्येक हिंदू राज्यघराणीं होऊन गेलीं. त्यांत वेंगीच्या चालुक्य राज-वंशाची राजवट संपत आल्यानंतर आंध्र प्रांतातल्या वरंगल या स्थानी काकतीय साम्राज्य स्थापन झालें. वरंगलच्या या काक-तीय वंशाच्या कारकीर्दीत कला व संस्कृति फार उन्नत होती व प्रजा सुखी होती.

काकतीय वंशाचा राजा गणपतिदेव हा एक महा पराक्रमी राजा होता. त्याला रुद्रम्मा नांवाची एकुलती एक मुलगी होती. वरंगलच्या गादीला तिच्याशिवाय दुसरा कोणी वारस नव्हता. म्हणून राजा गणपतिदेव यानें तिला घोड्यावर स्वारी करणें व शस्त्रविद्या वगैरे शिकवून देण्याची उत्तम व्यवस्था केली होती.

रुद्रमदेवीच्या आईचें नांव नारम्मा होतें. आपल्या एकुलत्या एका मुलीला संगीत, नृत्य व इतर ललितकला शिकवून उत्तम गृहिणी करावें असें तिला वाटे. पण मुलगी तिचें ऐकत नसे व दागदागिन्यांच्या मधुर संगीताच्या जागीं शस्त्रास्त्रांचा खणखणाट तिला जास्त आवडत असे. नारम्मानें पतीला



Fullscreen 127 54 / 88

कितीदां सांगितलें कीं मुलींना हें सर्व शोभत नाहीं. पण गणपतिदेव तिच्या बोलण्याकडे लक्ष देत नसे. फक्त स्मित करून निघून जात असे.

रुद्रम्माच्या मैत्रिणींना पण रुद्रम्माचें हें वागणें आवडत नसे. त्यांनीं तिला अनेक प्रकारें समजावून सांगितलें कीं आई सांगते तसें वागत जावें. बायकांना असें वागणें शोभत नाहीं. पण रुद्रम्मा ऐकत नाहीं असें पाहून एकदां त्यांनीं तिची छान खोड मोडण्याचें ठरविलें. एकदां रुद्रम्मा बागेंत बसली असतां सर्व मैत्रिणी आल्या व चेष्टा करीत म्हणाल्या—"युवराजांचा जय असो! युवराजांचा जय असो!"

तें ऐकून रुद्रम्मा दचकेल व रागावेल असें त्यांना वाटलें होतें. पण रुद्रम्मानें गंभीरपणें विचारलें—"युवराजांकडून तुम्हांला काय पाहिजे?"

तो अनपेक्षित प्रश्न ऐकून सर्व मैत्रिणी चकित होऊन परस्परांचीं तोंडें पाहूं लागल्या.

"काय झालें तुम्हांला! लाजतां कां? मागा न काय पाहिजे तें!" रुद्रम्मा म्हणाली.

मैत्रिणींनीं विचार केला, गंमत करावी. म्हणून खवचटपणानें एक मैत्रीण म्हणाली—"आम्हांला काय पाहिजे विचारतां? या क्वचित मनगटांत बांगड्याच शोभतात. तुम्ही हातांत शस्त्र घेऊं नये, फेंकून द्यावें तें, असें आम्हांला वाटतें. आमचें एवढें मागणें स्वीकार करा!"

रुद्रम्मा तें ऐकून थोडी देखील रागावली नाहीं. ती म्हणाली—"कबूल! पण एका अटीवर. मला खड्ग युद्धांत जर कोणी हारवलें तर मी पुन्हां कधीं हातीं शस्त्र घेणार नाहीं."

मैत्रिणींना तें उत्तर ऐकून आनंद झाला. त्यांना वाटलें होतें कीं कोणीहि पुरुष रुद्रमदेवीला खड्ग युद्धांत खात्रीनें हारवील. म्हणून त्यांनीं ती गोष्ट रुद्रमदेवीची आई नारम्मा हिला जाऊन सांगितली. नारम्माला देखील वाटलें कीं रुद्रम्माला खड्गयुद्धांत हारविणें तितकेंसें कठीण काम नाहीं. तिनें पंतप्रधानांना बोलाविलें आणि म्हणाली—"तुमच्या सैन्यांत खड्ग विद्येंत जो कोणी प्रवीण असेल त्याला घेऊन या."

मंत्री म्हणाला—"राणी सरकार! राजकन्येला खड्ग युद्धांत हारवणें कोणालाहि





Fullscreen 127 56 / 88










शक्य नाहीं. तो नाद आपण सोडून द्यावा." तें ऐकून नारम्माला आश्चर्य वाटलें. म्हणाली– "तुम्ही सुद्धां असें म्हणतां आहां! म्हणजे बायकांशीं युद्ध करण्याची शक्ति सुद्धां तुमच्या पराक्रमी सरदारांत नाहीं म्हणावयाची?"

"राणी सरकार! आपल्या सेनापतींचा मुलगा खड्ग युद्धांत फार निपुण आहे असें मी ऐकलें आहे. त्याला विचारून पाहतों, पाहिजे तर!" असें सांगून पंतप्रधान निघून गेले.

दुसऱ्या दिवशीं रुद्रम्मा व सेनापतींचा मुलगा यांचें द्वन्द्व ठरलें. स्वतः राजाच्या समोर खास महालांत द्वंद्व युद्धाची तयारी करण्यांत आली होती. राणी नारम्मा देखील पंतप्रधानांबरोबर द्वंद्व पाहायला आली होती. चुरशीचें द्वंद्व झालें व रुद्रमदेवीनें सेनापतींच्या मुलाला कांहीं क्षणांत निरायुध केलें.

राणी चकित झाली. परंतु मुलीनें शस्त्रविद्या सोडावी म्हणून तिनें जास्तच हट्ट धरला. तिला वाटलें की मुलगी लग्नच करणार नाहीं. परंतु रुद्रमदेवी लग्नास तयार झाली. म्हणून राणीला आपला हट्ट सोडून द्यावा लागला.

गणपतिदेव स्वर्गवासी झाल्यावर गादीला दुसरा वारस नसल्यामुळें रुद्रमदेवीलाच गादीवर बसविण्यांत आलें. तिच्या राज्यांत प्रजा फार सुखी होती.

गणपतिदेवाप्रमाणें रुद्रमदेवीला देखील मुलगा झाला नाहीं. मुलीच झाल्या. तिनें आपल्या मुलीचा मुलगा प्रतापरुद्र यालाच दत्तक घेतला व तो रुद्रमदेवीच्या मागून गादीवर बसला. त्यानें रुद्रमदेवीच्या हाताखालीं राज्यव्यवस्थेचें शिक्षण घेतलें.

रुद्रमदेवीचा शासनकाळ काकतीय साम्राज्यांतला सुवर्णयुग मानला जातो.





माझें पिल्लूं नाहींसें झालें आहे.
आपल्या वडिलांना सांगून वर्तमान पत्रांत जाहिरात कां नाहीं देत?
काय फायदा? माझ्या पिलाला वर्तमानपत्र वाचायला येईल तर ना?



तूं असें तोंड घट्ट बंद करून बसलास तर कसें? बाळ, हट्ट नको करूस. जरा आ कर पाहूं, म्हणजे डॉक्टर आपले बोट काढून घेतील.



तो दांत नाहीं डॉक्टर! तुम्ही दुसराच दांत काढला वाटतें?
घाबरूं नका! थांबा! मी तो दांत देखील काढून टाकतों. त्यांत काम मोठेसें?



"नशीब बलवत्तर समज, पडलास तर डॉक्टराच्या अगदीं घरासमोर पडलास. नाहींतर काय झालें असतें कोणास ठाऊक."
"अहो पण, मी देखील डॉक्टर आहें."

 Fullscreen 127    58 / 88 

# बुडुक

एका रानांत एका तलावाजवळ ससे रहात असत. ससे तलावाकाठच्या झाडांचीं कंदमुळें खात असत. एकदां झाडाचें एक फळ तलावांत पडलें आणि बुडुक असा आवाज झाला.

"बापरे बाप! बुडुक!" ससे घाबरून वाट फुटेल तिकडे पळत सुटले.

त्यांना वाटेंत एक कोल्हा भेटला. त्यानें विचारलें—"कां, पळतां कां? काय भानगड आहे?"

ससे म्हणाले—"बुडुक येतो आहे बुडुक! पळ!" कोल्ह्याला भीति वाटली आणि तो सुद्धां पळूं लागला.

अशा तऱ्हेनें हळूहळू हरणें, गेंडे, चित्ते, लांडगे सर्व जनावरें पळूं लागलीं.

त्यांना वाटेंत सिंह भेटला. त्यानें विचारलें—"काय झालें काय पळायला?" तो थोडा रागांतच होता.

"बुडुक येतो आहे!" सर्व जनावरें म्हणालीं.

"मी त्याचा समाचार घेतों. दाखवा मला तुमचा तो बुडुक!" सिंह म्हणाला. ससे सिंहाला घेऊन त्या तलावावर आले. बरोबर सर्व जनावरें अर्थातच होतींच. त्याच वेळीं एक फळ पाण्यांत पडलें व त्याचा 'बुडुक!' असा आवाज झाला.

"तो पहा तुमचा बुडुक!" सिंह स्मित करून म्हणाला.






एका गांवीं एक सुतार व लोहार रहात असत. दोघांना आपल्या कलेचा फार अभिमान होता. एकदां दोघांमध्यें वादविवाद झाला—"मी मोठा, मी हुशार!"

शेवटीं भांडण विकोपाला गेलें व दोघांनीं गांवच्या एका राजाकडे फिर्याद केली. राजा हुशार होता. त्यानें विचार केला कीं दोघांच्या चढाओढींत एखादें उपयोगी यंत्र किंवा वस्तु निघाली तर पहावी. म्हणून राजानें सुताराला एवढेंच विचारलें—"तूं काय काय केलें आहेस तें सांग."

सुतार म्हणाला—"मालक! मी जातीचा सुतार आहें. मीं कित्येक सुंदर वस्तु केल्या आहेत. पाहणाराचे डोळे दिपून जातात."

लोहार म्हणाला—"मालक! हा सुतार थापा मारतो आहे. आपण एकदां मी केलेल्या वस्तू पहाव्या व सांगावें कीं मी मोठा कीं हा मोठा."

दोघे म्हणाले—"मालक! आम्ही काय केलें हें पाहून आपणच ठरवावें कीं कोण मोठा व कोण लहान!"

राजा म्हणाला—"हें पहा! तुम्ही कोणत्या वस्तू घडविलेल्या आहेत हें मी पाहिलेलें नाहीं. त्या तुम्ही स्वतःच्या हातानें घडविल्या कीं दुसऱ्या कोणी घडवून दिल्या हें देखील मी पाहिलेलें नाहीं. तेव्हां तुम्ही दोघे आतां घरीं जा. मी तुम्हांला दहा दिवसांचा अवधी देतों. त्या अवधींत जो कोणी उत्तम

 Fullscreen  127     60 / 88 



वस्तु घडवून आणील त्याला मी तो मागेल ती किंमत देईन आणि दोघांपैकीं अधिक हुशार कोण आहे हें देखील सांगेन."

सुतार व लोहार दोघे राजाचा निरोप घेऊन आपापल्या नशिबाची परीक्षा करण्याचें ठरवून विचार करीत घरीं गेले. घरीं गेल्या-बरोबर त्यांनीं कामाला सुरवात केली.

दहा दिवसांनीं लोहार एक लोखंडाचा मासा करून घेऊन आला आणि राजाला दाखवून म्हणाला—"मालक या माशावर आपण पाहिजे तर शंभर पोतीं धान्य ठेवून पहा, हा पाण्यावर तरंगेल."

तें ऐकून राजा हंसला. म्हणाला—"शंभर पोतीं तर काय दहा पोतीं तरी राहतील कीं नाहीं शंकाच!" त्यानें आपल्या नोकरांकरवीं त्या माशाच्या पाठीवर पोतीं टाकवलीं व खरोखरच शंभर पोतीं लादलीं तरी मासा बुडाला नाहीं. सर्वांनीं आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं. राजानें लोहाराच्या कलेची प्रशंसा करून त्याला पुष्कळ बक्षिस दिलें.

थोड्या वेळानें सुतार एक लाकडी घोडा घेऊन आला. तो घोडा पाहून राजा हंसला. म्हणाला—"अरे, हा घोडा करून आणा-वयाला का दहा दिवस लागले. माझीं नातवंडें बसून खेळतील याच्यावर! हा घोडा दाखवून तूं लोहारानें केलेल्या लोखंडी माशाची बरोबरी करणार होय?"

सुतार तितक्याच आत्मविश्वासानें म्हणाला—"मालक! माझ्या या लाकडी घोड्याची बरोबरी लोहाराचा मासा काय करणार? या घोड्याच्या मानेला ज्या कळा बसविलेल्या आहेत त्यांत सर्व जादू आहे. त्यांतली पहली कळ दाबली कीं घोडा आकाशांत उडूं लागेल. दुसरी दाबली कीं घोड्याचा वेग वाढूं लागेल. एका मागून एक कळ दाबीत गेल्यास वेग सारखा



वाढतच जाईल व शेवटची कळ दाबली कीं सूर्याचे घोडे सुद्धां त्याच्या मागें पडतील."

सुतार आपल्या घोड्याचें वर्णन करीतच होता, राजाचा सर्वांत धाकटा मुलगा तेथें येऊन घोड्याचें वर्णन ऐकूं लागला. सर्व वर्णन ऐकल्यावर तो आपल्या बापाला म्हणाला—"बाबा, मी एकदां या घोड्यावर बसून पाहूं का? आकाशांतून जमिनीवरचीं घरें, डोंगर, पर्वत, नद्या कशा दिसतात हें मला पहावयाचें आहे."

राजा म्हणाला—"हा घोडा उडतो कीं नाहीं हेंच अजून मी पाहिलें नाहीं व समज उडूं लागला पण खालीं उतरला नाहीं तर?"

पण सुतार मध्येंच म्हणाला—"मालक! आपण कांहीं भिण्याचें कारण नाहीं. धाकट्या मालकांनीं खुशाल पाहिजे तर घोड्यावर बसावें. हा घोडा वर उडतो व पाहिजे तेव्हां खालीं पण उतरतो."

राजानें आपल्या मुलाला पुष्कळ सम-जावण्याचा प्रयत्न केला. पण धाकटा मुलगा फार लाडका होता. राजा सर्व प्रकारें त्याचे लाड पुरवी. म्हणून त्यानें होकार दिला. पण मुलाला बजावून सांगितलें कीं फक्त पहिलीच कळ दाब.



राजकुमारानें कबूल केलें व त्यानें पहिली कळ दाबली, त्याबरोबर घोडा आकाशांत उडूं लागला. राजकुमारानें दुसरी कळ दाबली, घोडा वायुवेगानें उडूं लागला. खालीं जमिनीवरचीं घरें, झाडें, पर्वत व डोंगर पाहून त्याला मजा वाटूं लागली. हळूहळू तो एकेक कळ दाबीत गेला आणि घोडा इतक्या जोरानें उडूं लागला कीं राजकुमाराला वाटलें कीं आतां आपण झोंक जाऊन पडणार. म्हणून त्यानें एका मागून एक कळ सैल करायला सुरवात केली. शेवटची कळ सैल केली तेव्हां घोडा खालीं उतरूं लागला.


Fullscreen




62 / 88



पक्षी घिरट्या घालतात तसा घोडा एका शहरावर घिरट्या घालूं लागला. राजकुमार खालीं उतरला व घोड्याला खाकेंत घेऊन एका धर्मशाळेंत गेला. तेथें एक खोलींत घोडा ठेवून तो बाजारांत निघाला. त्याला खूप भूक लागली होती. त्यानें एका खानावळींत पोटभर खाऊन घेतलें व नंतर गंमत पहायला निघाला.

तें गांव अगदीं नवीन गांव होतें. एका जागीं त्याला लोक घोळका करून उभे आकाशाकडे पहात असलेले दिसले. हें काय बरें पहात आहेत आकाशांत ? त्याला आश्चर्य वाटलें. कारण आकाशांत त्याला कांहींच दिसत नव्हतें. जवळ जाऊन त्यानें एकाला विचारलें—"काय हो ! तुम्ही असे आकाशाकडे काय पाहतां आहां ? आकाशांत तर कांहींच दिसत नाहीं ?"

तो मनुष्य चकित होऊन राजकुमाराकडे पाहूं लागला. अनोळखी चेहरा पाहून त्यानें विचारलें—"तुम्ही या गांवचे दिसत नाहीं ? नाहींतर हा प्रश्न तुम्ही केला नसता. आमच्या राजाला एक मुलगी आहे. तिचें सौंदर्य अप्सरांना देखील लाजवील असें आहे. राजाची ती एकुलती एक मुलगी असल्यानें फार लाडकी आहे. त्या मुलीवर कोणाची नजर पडूं नये म्हणून राजा फार काळजी वाहतो. राजमहालांत ती मुलगी असेपर्यंत राजाला तिच्या काळजीमुळें झोप देखील येत नसे. म्हणून त्यानें आकाशांत मंत्रबळानें एक महाल बनविला आहे व त्यांत त्यानें आपल्या मुलीला ठेवलें आहे. रोज राजा एकदां आपल्या मुलीला भेटून येतो. आम्ही रोज त्याला जातांना व येतांना पाहातों. आज थोडा उशीर झाला परत यायला, म्हणून आम्हांला थोडें आश्चर्य वाटलें. म्हणून पहात होतों."

राजकुमाराला ती गोष्ट म्हणजे स्वप्नांतल्या अद्भुत रम्य कथेसारखी वाटली. आकाशांत महाल आणि त्यांत अप्सरांना लाजविणारी सुंदर राजकन्या ! काय वाटेल तें झालें तरी चालेल, आपण आपल्या नशिबाची परीक्षा पाहायची ! त्यानें आपल्या मनाशीं ठरविलें.

दिवसभर तो विचार करीत धर्मशाळेंतल्या आपल्या खोलींत पडून राहला. चांगला काळोख पडल्यावर त्यानें आपला घोडा काढला आणि त्यावर बसून आकाशांत उडूं लागला. कांहीं वेळ घिरट्या घातल्यावर






Fullscreen

127





64 / 88





त्याला ढगांत एक महाल दिसला. त्यानें त्या दिशेनें आपला घोडा वळविला व महाला-बाहेर घोडा थांबवून घोड्यावरून उतरून महालांत गेला.

कोणी येत असल्याची चाहूल लागतांच वडील आले असावेत असा विचार करून राजकन्या बाहेर आली. पण एका नवीन तरुणाला पाहून ती चकित झाली. कोणीतरी देवपुरुष असावा. नाहींतर आकाशांतल्या या घरांत तो कसा पोंचेल ? त्याला बसायला आसन देण्याच्या हेतूनें ती खुर्चीवरून उठली.

तिचें तें अपरूप सौंदर्य पाहून राज-कुमाराचा स्वत:च्या डोळ्यांवरच विश्वास बसेना. ही खरोखरच कोणीतरी स्वर्गांतली अप्सराच असली पाहिजे.

राजकुमाराला पाहून राजकन्या देखील मोहित झाली होती. तिला वडिलांची भीति वाटत होती. वडिलांनीं आम्हां दोघांना एकत्र पाहिलें तर या तरुणाचें मुंडकेंच उडवतील. याच्याशीं माझा विवाह झाला तर मी किती सुखी होईन ! पण बाबांना तें कबूल झालें नाहीं तर !

दोघांचें परस्परांवर प्रेम बसलें. दोघांनीं गांधर्व विवाह करून घेण्याचें ठरविलें व लग्न करून घेतलें. राजकुमार रात्रभर त्या महालांतच राहिला आणि उजाडण्यापूर्वी आपल्या घोड्यावर बसून परत धर्मशाळेंत जाऊन पोंचला.

तो गेल्यावर राजा नित्याप्रमाणें आपल्या मुलीला भेटण्यासाठीं महालांत आला. आंत पाऊल टाकतांच त्याच्या संशयी मनाला कोणीतरी येऊन गेलें असावें असें वाटलें. कारण महालांतल्या वस्तू जागच्या जागीं नव्हत्या व राजकुमारी सुद्धां आनंदानें फुलून गेली होती.

Fullscreen 127 66 / 88

तें पाहून राजाला फार वाईट वाटलें. तो मुलीजवळ कांहीं बोलला नाहीं. आपल्या महालांत जाऊन विचार करीत अंथरुणावर पडून राहिला. आतां मनाविरुद्ध त्याला आपल्या मुलीच्या रक्षणासाठीं कांहीं पाहरेकऱ्यांना आकाशांतल्या महालांत न्यावें लागणार. कोण बरें असावा तो—मनुष्य कीं देव ?

राजाला काळजींत पाहून मंत्र्यांनीं कारण विचारलें. राजानें घडलेलें वृत्त सांगून मंत्र्यांचा सल्ला घेतला. म्हणाला—"माझ्या शिवाय आजपर्यंत त्या महालांत कोणी गेला नाहीं. मंत्र बळाशिवाय कोणी तेथवर पोंचूं शकत नाहीं. तो कोण बरें असावा ? त्याला पकडायचें कसें ?"

मंत्री म्हणाले—"आपल्या सैन्यांत एकाहून एक शूर सरदार असतां काळजी कसली. चौघांना घेऊन जावें आणि महालाच्या चार दिशांना रात्रंदिवस पहारा देण्याचें काम त्यांना द्यावें. कोणी चोर सांपडला तर त्याला धरून बांधून ठेवावें."

राजाला नाइलाजानें तो सल्ला मान्य करावा लागला. संशयी वृत्तीचा तो राजा होता. म्हणून त्यानें चार म्हातार्‍या सरदारांची निवड केली व संध्याकाळ झाल्यावर त्यांना महालांत घेऊन गेला आणि त्यांना चारी कोंपर्‍यांवर पहारा देण्यास नेमून परत आला.

परंतु म्हातारे पाहरेकरी थोडा वेळ पहारा देऊन पेंगूं लागले व आणखी कांहीं वेळानें छान घोरूं लागले.

त्या रात्रीं राजकुमार आला व रात्रभर राजकन्येबरोबर महालांतच राहिला. पहाटे उठून राजकन्येचा निरोप घेऊन पुन्हां धर्मशाळेंत परत गेला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]





# अतिथि देवोभव

आंध्रदेशांतल्या एका खेडे गांवांत एक वाणी रहात असे. तसा तो श्रीमंत नव्हता. पण खाऊन-पिऊन सुखी होता, एवढें खास. स्वभावानें तो फार चिक्कू होता. भिकाऱ्याला एक मूठभर तांदूळ देखील तो घालीत नसे.

त्याची बायको देखील त्याच्या सारखीच स्वभावानें फार चिक्कू होती. व्यर्थ खर्च होऊं नये म्हणून काळजी घेणें गैर नाहीं. पण नवऱ्याला किंवा आल्या गेल्याला पोटभर जेवायला वाढणें हा तर प्रत्येक गृहिणीचा धर्म आहे. पण ही बाई स्वभावानें अगदीं निराळी होती.

त्यांना एक मुलगा होता. अजून तान्हाच होता. बाप विचार करी, मुलगा मोठा होईपर्यंत,—सुंदर बांकदार मिशुरड्या निघेपर्यंत मला चैन कोठून मिळणार ! एके दिवशीं सोसाट्याचा वारा सुटला आणि मुसळधार पाऊस पडूं लागला. दार लावून दोघें नवरा-बायको बसली होतीं. पण कोणीतरी दार ठोठावलें. दार उघडून पाहतात तर एक वाटसरू. ओलाचिंब तसाच आंत शिरला. तोंडानें म्हणत होता—"काय पण पाऊस आहे ? किती पुढें जायचें आहे ? परंतु पुढें जाणें आतां कांहीं शक्य नाहीं."

"काय हें ! सगळें घर पहा, कसें भिजून गेलें आमचें !" वाण्याची बायको म्हणाली.

जणुं कांहीं ऐकू आलेंच नाहीं, अशा तऱ्हेनें तो म्हणाला—"दैव माझें, तुमच्या सारख्यांच्या घरीं पाय धरायला जागा मिळाली. जी कांहीं मीठ भाकर वाढाल ती खाऊन पडून राहीन व उद्यां सकाळीं आपल्या वाटेला लागेन."







Fullscreen 127 68 / 88



दोघांना त्याचें तें लाघवी बोलणें आवडलें नाहीं. पण त्याला बाहेर जा म्हणून सांगणें देखील बरें वाटलें नाहीं. पाहुण्याचें वागणें त्यांना सर्वच विचित्र वाटलें. त्यानें आंत आल्याबरोबर निःशंकपणें आपलें गाठोडें सोडलें. वाळलेले कपडे काढून घेतले आणि ओले कपडे बदलून ते वाळत टाकले व पलंगावर बसून गप्पा मारूं लागला. वाण्याच्या बायकोनें नवऱ्याचें पान वाढलें तेव्हां अर्थातच पाहुण्याचें पण वाढावें लागलें. पण या उपटसुंभ्याला नवऱ्याच्या बरोबरीनें जेवायला बसलेला पाहून तिच्या छातीवरून जणूं कांहीं सांपच चालून गेला. तिनें नवऱ्याला भाजी वाढली व पाहुण्याला फक्त चटणी. पण सैंपाकघरांत जाऊन परत येऊन पाहते तर नवऱ्याच्या पानांत चटणी व पाहुण्याच्या पानांत भाजी. थोड्या वेळानें तिनें ताकभाताच्या वेळीं दह्याची कवडी नवऱ्याला वाढली. पण ती भातावर विरघळून गेली. पाहुण्याच्या पानावर खालचें फुटलेलें दही वाढलें तर भातावर त्याची सुंदर कवडी झालेली. वाण्याच्या बायकोला हा सर्व चमत्कार वाटला. हा पाहुणा देव तरी असला पाहिजे नाहीं तर भूत तरी.

जेवणें आटोपल्यावर पाहुण्यानें वाण्याच्या बायकोची फार स्तुति केली. म्हणाला— "गृहिणी असावी तर अशी ! मन तृप्त झालें !"

वाण्याला सुद्धां आश्चर्य वाटलें. बायकोनें फक्त दोघांचाच सैंपाक केला होता. पाहु-ण्याला जेवायला कसें वाढलें ? आतां ती काय खाणार या विवंचनेंत तो होता. पण बायको जेव्हां सैंपाकघरांत गेली तेव्हां तिला देखील आश्चर्यच वाटलें. तशी ती कधीं कांहीं उरवीत नसे. पण त्या दिवशीं नवऱ्या-करितां चार भाकऱ्या सकाळीं केल्या होत्या. आणि नवरा संध्याकाळपर्यंत आलाच नाहीं.



म्हणून त्या भाकऱ्या उरल्या होत्या. त्या खाऊन पाणी पिऊन रहावें या विचारांत ती होती. पण होत्या कुठें भाकऱ्या. चकितच झाली ती. ती बाहेर आल्यावर तो म्हणाला— "बाई समाधान झालें मनाचें ! मागून घ्या पाहिजे तो वर ! तीन वर देतों मी तुम्हांला."

वाण्यानें विचार केला वस्ताद दिसतो आहे. थट्टेखातर म्हणाला—"आम्हांला देवानें तुमच्या कृपेनें काय कमी दिलें आहे ? पण वाटतें, एकदां आमच्या या बाळूला मिसुरडें निघालें कीं आम्हीं मोकळे !"

"बाई, तुम्ही पण सांगा ना तुमच्या मनांत काय आहे तें !" पाहुण्यानें विचारलें.

वाण्याच्या बायकोनें पण गमतीखातर म्हटलें—"आमची काय इच्छा असणार ! देवाची माझ्यावर कृपा असती तर मी देवाजवळ हेंच मागणें मागितलें असतें कीं मी ज्या वस्तूला हात लावीन ती कमींत कमी हातभर तरी लांब व्हावी." बोलतांना तिच्या मनांतला हेतु हा होता कीं दोन वार कापड अडीच वार व्हावें. हातभर लांब पडवळ दोन हात व्हावें !"

पाहुण्यानें विचारलें—"कोठें आहे मुलगा तुमचा ?" दोघे त्याला पाळण्याजवळ



बोलावून घेऊन गेले. पाहतात तर त्या तान्ह्या मुलाला सुंदर मिशा निघालेल्या. पाहून दोघे थक्क झाले. बायकोच्या तोंडाचें तर पाणीच पळून गेलें. ही भुताटकी आहे, तिची खात्री झाली.

तेवढ्यांत तिला एक शिंक आली व तिनें नाकावरून नुसता हात फिरवला. त्याबरोबर तिचें नाक एक हातभर लांब झालें. ती ओरडली—"अहो ! पाहिलेंत का हें ! आतां मी काय करूं ? कोठें जाऊं ? कोणाला तोंड दाखवूं ?" ती आक्रसा बोक्शी रडूं लागली.


Fullscreen

127





70 / 88


दोघं नवराबायको रडूं लागलीं. वाणी पाहुण्याकडे बोट दाखवून म्हणाला–"हें सर्व याचें कृत्य आहे!"

"मी काय करूं? तुम्ही मागितलेंत तें मी दिलें. तुम्ही विचार करून वर मागायला हवा होता. अजून एक वर बाकी आहे. तो तरी विचार करून मागा, म्हणजे झालें." असें म्हणून त्यानें थोडें स्मित केलें.

दोघां नवराबायकोनें त्याच्याकडे केंविलवाण्या मुद्रेनें पाहिलें. पण त्यांना हें पाहून आश्चर्य वाटलें कीं त्यांच्या पाहुण्यांच्या जागीं त्यांना एक निराळीच मूर्ति दिसली. त्याचें तें तेजस्वी रूप पाहून दोघांनीं अपोआप हात जोडले व साष्टांग नमस्कार करून दोघें म्हणालीं–"देवा! चूक झाली आमची. पाहुण्याच्या रूपानें देव येत असतो ही गोष्ट आम्ही दोघं पार विसरलों होतों. क्षमा करा. 'अतिथि देवो भव!' आतां एकच वर द्या. पहिले दोन वर मागून आम्हीं जें मिळविलें तें तुम्ही या तिसऱ्या-वरानें परत घ्या!" असें म्हणून दोघं देवाच्या पायां पडलीं. पण उठून पाहतात तों देव होता कोठें? वाण्याच्या बायकोचें नाक पहिल्यासारखें झालें. ती धांवत पाळण्याजवळ गेली. मुलाच्या ओठावरच्या मिशा नाहीशा झाल्या होत्या. तिनें मुलाची दृष्ट काढली व त्याला घेऊन धांवत नवऱ्याजवळ आली.

दोघं धांवत दार उघडून घराबाहेर गेलीं तेव्हां आकाशांत दूर त्यांना देव हळू हळू अदृश्य होत असलेला दिसला.

त्या दिवसापासून दोघांनीं कान धरला. नीट अतिथि सत्कार करूं लागलीं व त्यांनीं 'अतिथि देवो भव!' चा धडा घेतला.





# शेवटची इच्छा

फार पूर्वी जर्मनींत एक योद्धा होता. त्याच्या पराक्रमाची वाखाणणी देशभर होत होती. पण एका गोष्टीबद्दल सर्व त्याला नांवें ठेवीत–"इतका मोठा वीर, पण लुटेऱ्याचा धंदा करतो!" त्याचें नांव ऐकलें कीं व्यापाऱ्यांच्या अंगाचा थरकांप उडून जाई. म्हणून व्यापारी कधीं एकट्यानें प्रवास करीत नसत. दहादहा वीसवीस व्यापारी मिळून प्रवास करीत असत.

त्या काळांत प्रवास घोड्यावरून किंवा घोड्याच्या गाडींतून करावा लागे. व्यापारी आत्मरक्षणासाठीं छोटेंखानी सैन्य ठेवीत. पण या लुटेऱ्याचे अनुयायी छापा मारून माल लुटून नेत. ते कोठून येत व कोठें निघून जात कोणाला कळत नसे. राजाच्या कानावर चोराच्या विरुद्ध कागाळ्या येऊं लागल्या. राजानें त्याला पकडण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. पण कोणी त्याला पकडूं शकला नाहीं.

देशांत चोराचा कोणी मित्र उरला असेल तर तो त्याचा घोडा होता. तो घोडा खरोखरच एक विलक्षण घोडा होता. त्याच्या अंगांत दैवी शक्ति होती. तो मालकाच्या मनांतली गोष्ट आधींच ओळखत असे. इतके दिवस या लुटेऱ्याला कोणी पकडूं शकला नाहीं याचें कारण म्हणजे त्याचा घोडाच.

परंतु या लुटेऱ्याचे दिवस देखील भरले. राजाच्या शिपायांनीं त्या लुटेऱ्याला व त्याच्या घोड्याला धरलें आणि राजाच्या समोर हजर केलें.

राजानें त्या लुटेऱ्याला फांशीची शिक्षा दिली. म्हणाला–"ह्यानें आजपर्यंत माझ्या प्रजेला जितकें सतावून सोडलें आहे त्या मानानें ही शिक्षा कांहींच नाहीं. याला

Fullscreen 127 72 / 88



एका काळकोठडींत टाका आणि उद्यां सर्वांसमक्ष याला फांशीवर चढवा."

लुटेऱ्याला राजाच्या आज्ञेप्रमाणें काळकोठडींत टाकण्यांत आलें. त्याचा घोडा राजाच्या तबेल्यांत बांधण्यांत आला. किल्ल्यांतच राजमहालासमोरच्या पटांगणांत फांशी देण्यासाठीं एका मंचावर व्यवस्था करण्यांत आली होती. राजाचे शिपाई चोराला धरून घेऊन आले. त्याचे हात पाठीमागें बांधलेले होते. चोराच्या तोंडावर दुःख किंवा निराशा नव्हती जमलेल्या लोकांकडे पाहून तो मोठ्यानें हंसला. म्हणाला—"तुम्ही गंमत पहायला आलां आहां. पहा गंमत, मी आज दाखवणार आहें. मी गेल्यावर तुम्ही टाळ्या वाजवाल, वाजवा, खूप वाजवा!" तो ताठ उभा होता. कोणी कांहीं बोलला नाहीं. तो एकटा होता आणि हजारों लोक जमा होते. पण कोणाची छाती झाली नाहीं तोंड उघडण्याची. तेवढ्यांत तबेल्यांतून घोड्याचें खेंकाळणें सर्वांच्या कानावर पडलें. तें ऐकून चोराचा चेहरा एकदम उतरला.

मंचावरून उडी मारून तो धांवत, राजा बसला होता तिकडे गेला व गुडघे टेकून म्हणाला—"महाराज! एक विनंति, शेवटची विनंति करावयास आलों आहें. मरणापूर्वी मी एकदां आपल्या लाडक्या घोड्याचा निरोप घेऊं इच्छितों. त्यानें इमानें इतबारें माझी सेवा केली आहे. माझें विरहदुःख त्याला असह्य होईल."

राजानें त्याची ती शेवटची इच्छा पूर्ण करण्याचें ठरवून शिपायांना आज्ञा केली—"चोराच्या घोड्याला घेऊन या." दोन शिपायांनीं घोड्याला आणून उभें केलें व त्याच्या पुढें व मागें उभे राहिले.

राजाज्ञेनें चोराच्या हतकड्या काढून टाकण्यांत आल्या. राजानें विचार केला, इतके लोक आहेत, चारी बाजूला भिंत आहे. त्याला जवळचा असा कोणी मित्र किंवा नातेवाईक दुसरा कोण आहे! एकटा घोडाच तर आहे. भेटूं दे खुशाल.

चोर घोड्याजवळ गेला. घोडा मोठ्या उत्कंठेनें आपल्या मालकाकडे पहात होता. आतां आपल्या मालकाची व आपली कायमची ताटातूट होणार हें त्याला कळलें होतें. चोरानें जवळ जाऊन घोड्याच्या मानेवर प्रेमानें हात फिरवला, त्याची पाठ थोपटली. आनंदानें घोड्यानें खेंकाळत एकदां सर्व अंग हलवलें व प्रेमानें आपल्या मालकाकडे पाहिलें. चोराला जणुं कांहीं त्यानें कांहीं खूणच केली. चोरानें लगाम धरून उभा असलेल्या शिपायाच्या मुस्कुटांत एक दिली व त्याच्या हातांतून लगाम काढून घेऊन घोड्यावर उडी टाकली. आपण जिवंत सुटणें शक्य नाहीं हें त्याला माहीत होतें. पण फांशीवर चढून मरण्यापेक्षां दोघां चौघांना यमसदनास पाठवून मरणें बरें असा विचार करून त्यानें हें साहस केलें होतें.

घोड्याला तेंच पाहिजे होतें. राजाचे शिपाई थक उभे राहिले. कोणाला काय



Fullscreen 127 74 / 88



करावें सुचलें नाहीं आणि घोडा वायुवेगानें सुटला तो एका जागीं किल्ल्याच्या भिंतीवर चढण्यासाठीं त्याला जमिनीचा उंचवटा दिसला, तिकडे भरधांव धांवत आला. किल्ल्यावर चढून उभा राहिला. चोरानें डोळे मिटून घोड्याला खूण केली, मार उडी! तूं व मी दोघांनीं एकदमच मेलेलें बरें! घोड्यानें मागचा पुढचा कांहीं एक विचार केला नाहीं व उडी मारली. आणि आश्चर्य म्हणजे खंदकाबाहेर त्याची उडी पोंचली होती. थोडें अंतर चालून घोडा उभा राहिला.

चोरानें डोळे उघडून पाहिलें तों किल्ल्याच्या बाहेर होता. घोड्यानें त्याला पुनर्जन्म दिला. कित्येक वेळां या घोड्यानें त्याला वांचविलें होतें. पण आज तर त्यानें प्रत्यक्ष मृत्यूच्या जबड्यांतून बाहेर काढलें होतें. आपला घोडा इतका बलवान असेल, इतका समजूतदार असेल, इतका इमानदार असेल याची त्याला कल्पना देखील नव्हती. तो घोड्यावरून खालीं उतरला, व घोड्याची पाठ थोपटली. घोड्याला जणुं कांहीं त्याच्या श्रमाचें फळ मिळालें. कृतज्ञतेनें त्यानें आपल्या मालकाकडे पाहून मान हलविली.

इकडे किल्ल्यांत ओरडा झाला—'पकडा चोराला!' राजाचे शिपाई धांवले. घोड्यावर बसून किल्ल्याच्या भिंतीपर्यंत आले. सर्व किल्ला हुडकून पाहिला. किल्ल्याचें दार बंद होतें म्हणून घोडा किल्ल्याबाहेर गेला असेल याची त्यांना कल्पना देखील नव्हती. इतक्यांत एक शिपाई किल्ल्याच्या भिंतीवरून ओरडला—"तो पहा चोर! करा पाठलाग!"

किल्ल्याचें फाटक उघडून राजाचे शिपाई बाहेर येतात, तोंपर्यंत चोर त्यांच्या हातावर तुरी देऊन पळून गेला.





# मान भंग

पौर्णिमेची रात्र होती. दुधासारखें स्वच्छ शुभ्र चांदणें पडलें होतें. आजोबा आराम खुर्चीवर बसतां बसतां दोन्हीं नाकपुड्यांत तपकीर कोंबीत गुणगुणले—

"मानभंगः परकृतो
मानिनां मंगलावहः ;
अनन्तो मानभंगेन
पाण्डित्यं परमं गतः ।"

तो श्लोक ऐकून मुलें धांवत आलीं आणि विचारूं लागलीं—"याचा अर्थ काय आजोबा? याची कांहीं गोष्ट आहे का? ती गोष्ट सांगा!" तपकिरीची डबी कनवटीला ठेवीत आजोबा म्हणाले—"स्वाभिमानी लोक असतात ना त्यांचा कधीं मानभंग झाला तर त्यांत त्यांचें हितच होतें. असा आहे अर्थ याचा." मुलांनीं गिल्ला केला—"असें काय हो आजोबा! नुसता अर्थ नको आम्हांला. गोष्ट सुद्धां सांगा!" "बरें बुवा! सांगतों गोष्ट!" आजोबा म्हणाले आणि गोष्ट सांगूं लागले.

"एकदां अनंत नांवाचा एक स्वाभिमानी मनुष्य होता. तो बायकोसमोर अपमानित झाला. तो होता अशिक्षित. पण त्याला तो अपमान इतका असह्य वाटला कीं तो घर सोडून निघून गेला आणि पुढें विद्याभ्यास करून एक मोठा विद्वान झाला. ती गोष्ट अशी—

चोळ राज्यांत एका गांवीं एका पंडितांचें घराणें होतें. त्या घरांत सर्वच पंडित होते. बायका पुरुष सर्वच पंडित. फक्त अनंतभट्ट काय तो अशिक्षित होता. त्याचे दोघे भाऊ केदारभट्ट व महानंदभट्ट विद्वान व पंडित म्हणून राज्यभर प्रसिद्ध होते. त्यांच्या बायकांना उत्तम संस्कृत बोलतां येत होतें.

 Fullscreen 127  76 / 88

अनंतभट्टाच्या बायकोला सुद्धां छान संस्कृत बोलतां येत होतें.

अनंतभट्टाला संस्कृतचें व्याकरण म्हटलें कीं अंगावर कांटा उभा राही. शब्दरूपावली व धातुरूपावली पाठ करतां करतां त्याचें डोकें पिकून जाई. मग संधीनियम कोठून पाठ होणार?

एकदां तिघे भाऊ जेवायला बसले होते. अनंतनें आपल्या बायकोला संस्कृत भाषेंत आज्ञा केली–"दधिमानय!" हेतु होता, दही आण!

ती आज्ञा ऐकून दोघे भाऊ व भावजयी खदखदां हंसू लागलीं. कारण संस्कृत भाषेंत 'दधि आनय!' अर्थात् 'दध्यानय!' म्हटलें पाहिजे होतें.

पण अनंतभट्टाच्या बायकोला दोघां दिरांचें व जावांचें हंसणें आवडलें नाहीं. त्यांत तिच्या नवऱ्याचा व तिचा अपमान होता. तिनें विचारलें–"काय झालें हो हंसायला खदखदां? ते म्हणाले–'दधि-मानय!' म्हणजे "दधि मा आनय!" अर्थात दही आणूं नकोस. ताक आण! त्यांना नको आहे आज दही. त्यांत हंसायला काय झालें?"

तिनें सर्वांचीं तोंडें बंद केलीं खरीं, पण तिला व तिच्या नवऱ्याला ती गोष्ट लागली. म्हणतात ना, सासूबाईंनीं मारलें म्हणून सुनबाई नाहीं रडल्या पण जाउबाई हंसल्या म्हणून रडल्या!

अनंतभट्टानें विचार केला, माझा मान राखण्यासाठीं माझ्या बायकोला यावें लागलें! तो मानभंग त्याला असह्य वाटला. तो लगेच काशीला गेला, विद्वत्ता संपादन केली व कनक कंकण वगैरे बक्षिसें मिळवून घरीं परत आला. अशा तऱ्हेनें मानभंग अनंत-भट्टाच्या उन्नतीस कारण झाला.



# चार मिनार



आन्ध्र प्रदेशाची राजधानी हैदराबाद ह्या नगराचा आपल्या देशांत पांचवा क्रमांक आहे. गोवळ कोंड्याच्या नवाब मुहम्मद कुली कुतब शहा यानें हें शहर सुमारें ३७० वर्षांपूर्वी वसविलें. कुतुब शहाच्या एका बेगमेचें नांव भाग्यमती असें होतें. ती त्याची फार लाडकी बेगम होती. तिच्या नांवावरून त्यानें या शहराचें नांव भाग्यनगर असें ठेवलें. निजामांची राजवट सुरू झाल्यावर त्यांनां येथेंच आपली राजधानी स्थापन केली.

हैदराबाद शहराच्या मध्यभागीं 'चार मिनार' ही एक सुंदर इमारत आहे. मिनार शब्दाचा अर्थ स्तंभ होतो. याची उंची १८० फूट आहे. इमारत बांधून

इमारतीच्या भिंतीला किंवा स्तंभाला कोठें तडा गेला नाहीं. आपल्या देशाच्या सुंदर व

Fullscreen 127 12 / 84



# कुमणचें औदार्य

कुमण नांवाचा राजा देशभर आपल्या दानशूरपणामुळें फार प्रसिद्ध होता. त्याच्याकडे कोणी भिक्षा मागायला आला तर राजा पात्र किंवा अपात्र याचा विचार न करतां दान करीत असे. त्याचा हा स्वभाव त्याच्या मंत्र्यांना आवडत नसे, म्हणून त्यांनीं कट करून राजाला पदच्युत करण्याचें ठरविलें.

कुमण राजाच्या धाकट्या भावाला आपल्या मोठ्या भावाच्या वैभवाचा नेहमीं हेवा वाटत असे. मंत्र्यांनीं त्याला कटांत सामील करून घेऊन त्याला राज्य देऊं केलें. कट यशस्वी झाला व धाकटा भाऊ गादीवर बसला. मोठ्या भावाला आपला जीव वांचविण्यासाठीं रानांत पळून जावें लागलें.

कुमणला आतां दोन्ही वेळचें जेवण मिळणें देखील कठीण झालें. पण त्याचा दानी स्वभाव बदलला नाहीं. कोणी येऊन त्याच्याकडे कांहीं वस्तु मागितली व ती त्याच्याकडे असली तर तो देऊन टाकी. कधीं मागें पुढें पहात नसे.

धाकट्या भावानें व मंत्र्यांनीं राज्य बळकावलें. पण प्रजेचें हृदय काबीज करूं शकले नाहींत. प्रजा आपल्या जुन्या महाराजांची आठवण काढीत असे. नव्या राजाचा आदर थोडा देखील करीत नसे. हें पाहून मंत्र्यांनीं विचार केला कीं जुन्या महाराजांचा वध केल्याशिवाय प्रजेचें प्रेम मिळणें शक्य नाहीं. त्यांनीं राज्यभर दवंडी पिटविली कीं जो कोणी कुमणचें डोकें आणून देईल त्याला एक लाख रुपये बक्षीस म्हणून दिले जातील.

ही गोष्ट परदेशांतील एका कवीला माहीत नव्हती. तो कुमणच्या दरबारीं मान मिळावा म्हणून आला होता. रानांतून येत असतां एका झाडाखालीं कुमण राजाला बसलेला पाहून त्याला आश्चर्य वाटलें. म्हणाला—"महाराज! मी आपल्याच दर्शनासाठीं आलों होतों. मी एक कवि आहें. आपणाला आपली कविता ऐकविण्याची इच्छा आहे."

कुमण म्हणाला—"महाकवे! मी आज राजभ्रष्ट होऊन या रानांत आयुष्य कंठित आहें. माझ्या भावानेंच माझ्याविरुद्ध बंड करून माझें राज्य बळकाविलें आहे. आतां मी तुम्हांला काय देणार? तरी मी एक उपाय सांगतों. माझ्या भावानें राज्यांत अशी घोषणा काढली आहे कीं जो कोणी माझें डोकें कापून आणून देईल त्याला एक लाख रुपयांचें बक्षीस दिलें जाईल. ही तलवार घ्या व माझें डोकें कापून बक्षीस मिळवा."

तें ऐकून कवीचें हृदय कळवळून आलें. म्हणाला—"मी खरा कवि असेन तर तें बक्षीसच काय आपलें राज्य देखील परत मिळवून देईन."

नंतर त्या कवीनें केळ्याचें मूळ कापून आणून तें डोक्यासारखें दिसेल असें तासून



कोरून तयार केलें. नंतर त्यांत त्यानें रंग भरला. त्यानें तें कुमणच्या डोक्यासारखें तयार केलें. तें घेऊन तो कुमणच्या भावाकडे गेला आणि म्हणाला—"महाराज! मी गरीब ब्राह्मण एक कवि आहें. कुमण महाराज कवींचा आदर करीत असत. आपलें दारिद्य दूर करण्याच्या हेतूनें महाराजांकडे गेलों होतों. आपले वडील बंधु मला रानांत भेटले होते. दान करण्याची शक्ति तेव्हां त्यांच्यांत कोठून असणार? पण आपलें शिर दिल्यानें गरीब कवीला एक लाख रुपये मिळूं शकतील असा विचार करून त्यांनीं

श्री. वा. रा. बापट









Fullscreen 127 14 / 84

आपलें शिर कापून दिलें. तें मी घेऊन आलों आहें. मला माझें बक्षीस द्यावें."

धाकटा भाऊ आज पावेतों मंत्र्यांच्या सल्ल्यानें वागत होता. पण कवीच्या तोंडून वडील भावाच्या औदार्याचें वर्णन ऐकून त्याला फार पश्चात्ताप झाला. भावाची आठवण काढून तो रडूं लागला.

त्यावर कवि म्हणाला—"आतां रडून काय उपयोग ? गेलेला भाऊ परत का येणार आहे ?"

"मला हें राज्य नको. मंत्र्यांच्या हातचें बाहुलें होऊन जगण्यापेक्षां मरण आलेलें पत्करलें, प्रजेचा शाप रोज माझ्या कानावर येत आहे. आज भावाचा हत्यारा म्हणून लोक मला नांवें ठेवणार." राजा म्हणाला.

"जर आपल्या भावाला पुनर्जीवित करून दाखविलें तर त्यांना राज्य द्याल का ? प्रयत्न करून पाहतों." कवीनें विचारलें. "अवश्य देईन ! कोणी दाखवावा जिवंत करून !" असें म्हणत धाकटा भाऊ कवीचे पाय धरून रडूं लागला.

"तर मग चला माझ्या बरोबर रानांत. मी आपल्या भावाला पुनर्जीवित करून दाखवितों." असें सांगून कवि कुमणच्या भावाला, रानांत कुमण होता तेथें घेऊन गेला.

कुमणला जिवंत पाहून धाकट्या भावाला आनंद झाला. त्यानें भावाचें पाय धरून त्याची क्षमा मागितली. मेलेला भाऊ जिवंत कसा झाला हें त्याला कळलें नाहीं.

त्यानंतर कुमण, त्याचा भाऊ आणि कवि राजधानीस परतले. कुमण पुन्हां राजा झाला. बंडखोर मंत्र्यांना राजानें क्षमा केली आणि आपल्या दरबारांत कवीचा सत्कार करून त्याला निरोप दिला.





# स्यमंतकमणि

## द्वितीय अध्याय

दिशा फाकल्या सुवर्ण किरणें
व्याप्त जाहलीं असीमंतांत।
सत्राजितनें रविरायाला
नभीं पाहिलें स्वर्णरथांत॥

दर्शन होतां आदित्याचें
पुलकित झालें त्याचें अंग।
होतां वृष्टी वनस्पतींचें
होतें पुलकित जैसे अंग॥

भक्तीपूर्वक त्यानें केला
नमस्कार रविरायाला।
"धन्य जाहलों प्रभो! कृपेनें
दर्शन दिधलें भक्ताला॥"

वदला रवि स्मित करुनी त्याला-
"वत्स! तुझी रे निष्ठा धन्य!
तुझ्या सारिखा साधक विरळा
भाव भक्ति पण तुझी अनन्य॥

"माग तुला जें काय हवें तें
मागशील जें देइन मी।
देइल तुज जो मान आणि धन
असा मणी देतों तुज मी॥"

सत्राजित तें ऐकुनि वदला-
"तृप्त जाहलें मन माझें।
मनोकामना करिल पूर्ण मणि
वर्णुं काय उपकार तुझे!"

निरोप घेउनि रविरायाचा
धारण करुनी मणी गळ्यांत
घरीं परतला सत्राजित; पण
झाला होता गर्व मनांत॥

तेज स्यमंतकमणिचें पाहुनि
दिपले डोळे सर्वांचे।
नागरिकांनीं खुल्या दिलानें
केलें कौतुक पण त्याचें॥

श्री. भालचंद्र आपटे, हैदराबाद


Fullscreen




18 / 84



बाल्य कृष्ण तरि स्वस्थ बसेलच,
असें म्हणावें कसें कुणीं?
माहित सर्वां जन्मापासुन
बाळ किती हें असे गुणी!

एकुण नव्हती चित्ता स्थिरता,
ठेवावा मणि कुठें कसा;
रात्र उलटली काळजींत त्या
लोळत होता पडुन असा॥

एक सत्यभामेच्या होती
तया काळजी लग्नाची।
एकुलती ती मुलगी तिजवर
पडली दृष्टी कृष्णाची॥

काढुन खुसपट आणिल निश्चित
विघ्न कांहितरि आज उद्यां।
म्हणुन ठरविला सत्यधन्वु वर
कन्यादान तया करुं या॥

त्यास स्यमंतकमणि हा देउन
फेडूं अपलें कन्याऋण।
अनायास ही होतां येइल
दोन्हि ऋणांतुन उद्यां उऋण॥

निश्चय करुनी असा मनाशीं
म्हणे धाकल्या भावाला–
"पहा प्रसेना! सुंदर मणि हा,
आवडला हा फार मला॥

"खुशाल वापर कांहिं दिवस; पण
ठेव जपुन हा जरा बरें।
मागुन घेईन जरूर वाटतां
कपट नाहिं, सांगतों खरें॥

"सोनें देइल रोज तुला हा,
देत जा मला तें सर्व।
चोरुन नेतिल डोळा चुकवुन
शत्रु आपले रे सर्व॥"

धारण करतां मणी स्यमंतक
प्रसेन झाला अतिशय खूष!
नव्हतें माहित परंतु त्याला
भाग्य कुणावर होतें खूष!




[ ६ ]

[ चित्रसेन आपल्या अनुयायांबरोबर आपल्या राजवाड्याकडे जात असतां उग्राक्षानें त्याला बोलावून आणण्यासाठीं कांहीं राक्षसांना पाठविलें. तेथें अमरपाल नांवाच्या अग्निद्वीपांतील एका व्यक्तीची व त्याची ओळख झाली. अग्निद्वीपांतील लोकांविषयीं थोडी माहिती त्याच्याकडून चित्रसेनाला मिळाली. अमरपाल एकाएकीं आकाशाकडे पाहूं लागला. पुढें वाचा— ]

अमरपालाचें तें विचित्र वागणें पाहून चित्रसेनाला थोडें आश्चर्यच वाटलें. उग्राक्ष इतका संतापला होता कीं रागामुळें त्याचें सर्व अंग थरथर कांपत होतें. आपली गदा फिरवीत रागानें तो म्हणाला—"तुझें डोकें फिरलें आहे वाटतें. ह्या गदेनें तें दुरुस्त करूं का जरा?"

अमरपाल थोडा देखील भ्याला नाहीं. उलट उग्राक्षाकडे पहात थोडा हंसला व म्हणाला—"मी मेल्यावर तूं सुद्धां फार वेळ जिवंत राहशील असें समजूं नकोस! त्या नागवर्म्याचें नांव तुला माहीत आहेच. त्यानें कपिलपुर काबीज केलें आहे. त्याच्या मदतीला अग्निद्वीपांतील लोक येत आहेत. त्यांचे ते भयंकर पक्षी तुझ्या अंगाचे लचके तोडून थोड्याच वेळापूर्वी इकडून गेले आहेत, हें तूं विसरलास वाटतें?"

आपल्या अंगावर झालेल्या जखमा पाहून हा आपली थट्टा उडवीत आहे हें ओळखा-

Fullscreen 127 20 / 84



यला उग्राक्षाला वेळ लागला नाहीं. त्यानें गदा उचलली व अमरपालावर धांवला. पण चित्रसेन मधें पडून ओरडून म्हणाला—"उग्राक्षा! तूं एवढ्यांत विसरलास वाटतें, तूं काय वचन दिलें होतेंस तें?"

"हा नराधम, माझी टिंगल उडवतो आहे नाहीं का....याची इतकी हिम्मत?" उग्राक्ष दांत ओठ चावून म्हणाला.

"मनुष्यांना तूं उतका क्षुद्र समजूं नकोस! हा आपली मदतच करील, माझी खात्री आहे. नाहींतर तूं काय वाटेल तें केलें असतेंस तरी मी मधें पडलों नसतों." चित्रसेन म्हणाला.

अमरपाल म्हणाला—"महाराज! आपण वचन दिलंत म्हणून मी झाडावरून खालीं उतरलों व आपली तलवार सेनापतींच्या हातीं दिली. नाहींतर मी दोघां चौघांचा बळी घेतल्याशिवाय मरायला तयार झालों नसतों. या राक्षसांच्या हातीं लागण्यापेक्षां मी आत्महत्या करून घेतली असती."

"कबूल, मी तुला वचन दिलें होतें कीं कोणी तुझ्या अंगाला हात लावणार नाहीं. पण तूंच माझ्या प्रश्नाचें सरळ उत्तर देण्या-ऐवजीं विचित्र वागूं लागला आहेस तेव्हां मी तरी काय करूं. तूं सुद्धां कबूल केल्याप्रमाणें वागायला हवें." चित्रसेनानें तितक्याच कडक आवाजांत उत्तर दिलें.

"क्षमा करा, महाराज! या क्षणापासून मला आपला एक सेवक समजा. राजद्रोही नागवर्माविषयीं अभिमान बाळगण्याचें मला बिलकुल कारण नाहीं. अग्निद्वीपांतल्या त्या पशु तुल्य माणसां विषयीं माझ्या मनांत कधींच आदर उत्पन्न झाला नाहीं. नागवर्मांच्या भीतीनेंच मला त्यांच्या बाजूनें युद्ध करावें लागलें." अमरपालाच्या आवाजांत विनम्रता होता.

"तूं म्हणतोस तें सर्व खरें असेल तर तुला जें कांहीं माहीत आहे तें सर्व सांगून टाक. धवलगिरीवर नागवर्मानें स्वारी केली आहे. त्याच्याबरोबर त्या भयंकर पक्ष्यांवर बसून येणारे लोक सुद्धां असतील का?" चित्रसेनानें विचारलें.

"अशक्य नाहीं. कारण कपिलपुरा-नजीकच्या जंगलांत सुमारें शंभरावर ते पक्षी व त्यांच्यावर स्वारी करून येणारे ते लोकहि लपून बसलेले आहेत. अग्निद्वीपांतील कांहीं लोकांना विकत घेऊन नागवर्मानें आपल्या पदरीं नोकरीला ठेवून घेतलें आहे. म्हणून ते त्याला मदत करतात." अमरपाल म्हणाला.

"या भयंकर पक्ष्यांना ठार करण्याला कांहींतरी सोपा उपाय असेलच कीं नाहीं." उग्राक्षानें विचारलें.

"कां नाहीं? आहे. त्यांच्या चोंची व नखांपासून स्वतःला वांचवितां आलें तर त्यांच्या माना कापतां येतील. त्यांच्या माना व इतर पक्ष्यांच्या माना यांत कांहीं फरक नाहीं." अमरपाल म्हणाला.

"ठीक....पाहातों!" असें म्हणत उग्राक्ष मोठ्यानें हंसला. तो पुढें म्हणाला—"ह्या खेपेस ते पुन्हां आले म्हणजे एकेकाचा मी समाचार घेतों."



इतक्यांत कांहीं राक्षस आणि लोक धांवत ओरडत आले आणि म्हणाले—"महाराज! अनर्थ झाला!"

चित्रसेनाला वाटलें. पुन्हां कांहीं तरी नवीन भानगड किंवा संकट आलें आहे.

लोक म्हणाले—"महाराज, आम्ही आपलीं गुरें चरायला घेऊन गेलों होतों तेव्हां त्या भयंकर पक्ष्यांनीं आमच्यावर स्वारी केली. कित्येक गुरें व माणसें ते उचलून घेऊन गेले. आम्ही थोडे जणच वांचलों आहों तुम्हांला ही बातमी द्यायला. वांचवा आम्हांला व आमच्या गुरांना."



उग्राक्षाकडे जे राक्षस आपलें गाऱ्हाणें घेऊन गेले होते ते खरोखरी गुरें व माणसें चोरून आणायला म्हणूनच गेले होते. पण त्याच वेळीं अग्निद्वीपांतील लोक आपल्या भयंकर पक्ष्यांवर बसून आल्यामुळें त्यांना घाबरून पळून जावें लागलें होतें.

"चित्रसेन! मग या गुराख्यांच्या रक्षणासाठीं जाऊं या का?" उग्राक्षानें विचारलें. पण त्याच्या शब्दांत उत्साह दिसला नाहीं.

"न जाऊन कसें चालेल? गेलेंच पाहिजे. हे दुष्ट लोक प्रजेला असें सतावून सोडीत असतां आपण स्वतःला राजा म्हणवून घेऊन त्यांचें रक्षण न केलें तर कसें चालेल?" चित्रसेनानें विचारलें.

चित्रसेन लगेच जिकडून लोक गाऱ्हाणें घेऊन आले होते त्या दिशेला निघाला. उग्राक्ष सुद्धां बरोबर निघाला. म्हणाला—"आज त्यांची चांगली खोड मोडतों मी."

सर्व लोक कांहीं वेळ झाडींतून चालत होते. अमरपाल थोड्या वेळानें पुढें येऊन म्हणाला—"महाराज! एक विनंति आहे. आतां पावेतों अग्निद्वीपांतील ते लोक निघून गेले असतील. ते गेले नसले तरी आपण त्यांच्या अंगाला देखील हात लावूं शकणार नाहीं. त्यांच्या बाजूनें ते भयंकर पक्षी असे-पर्यंत त्यांना समोरासमोर युद्ध करून युद्धांत जिंकणें अशक्य आहे."

उग्राक्ष दुजोरा देत म्हणाला—"चित्रसेन! अमरपाल म्हणतो, तें खरें आहे. घाई करून काम भागणार नाहीं. रात्रीं घडलेलें कांड तू विसरला नसशीलच."

दोघांनीं असें म्हटल्यावर चित्रसेनानें विचार केला, एकट्यानेंच हट्ट धरून बसण्यांत अर्थ नाहीं. खडकावर डोकें आपटल्यानें का कधीं यश मिळतें. जें करावयाचें तें विचार पूर्वक केलें पाहिजे. आपण हट्टानें युद्ध केलें तर आपलेच लोक मरतील. नागवर्मा धवलगिरीचें राज्य काबीज करून घेतल्यावर माझ्या राज्यावर देखील स्वारी केल्याशिवाय राहील का?

चित्रसेन काय करावें या विचारांत पडला होता. पण अमरपालानें पुढें येऊन म्हटलें—"महाराज, मी आपला एक इमानदार व स्वामिभक्त नोकर आहें. आपण मला आगींत किंवा विहिरींत उडी टाकायला सांगाल तर मी हंसत खेळत उडी टाकीन. पण मी एक सूचना करीत आहें. तिचा विचार करा. आपण सर्वजण मिळून प्रथम कांहींतरी करून कपिलपुरानजीक त्यांनी ज्या राहुट्या बांधल्या आहेत व शिबिर उभारलें आहे त्याचा नाश केला पाहिजे. त्यानंतर वाघाचे कपडे घालून येणाऱ्या या लोकांचा नाश करणें अशक्य नाहीं."

"तूं म्हणालास कीं शंभरावर ते पक्षी आहेत. त्यांना मारणें म्हणजे थट्टा आहे का?" चित्रसेनानें शंका केली.

"त्या पक्ष्यांना ठार करायला मी एक उपाय सांगतों महाराज!" अमरपाल म्हणाला.

"काय उपाय आहे, ऐकूं दे तरी!" चित्रसेन म्हणाला.



उग्राक्ष दोघांचें बोलणें लक्षपूर्वक ऐकत होता. काय उपाय आहे, हें जाणण्याची उत्सुकता त्याच्या मनांत सुद्धां होती. म्हणाला—"अमरपाल! बोल, काय उपाय आहे?"

अमरपालनें एकदां रागानें उग्राक्षाकडे पाहिलें. कारण उग्राक्षावरचा त्याचा राग अजून कमी झाला नव्हता. नंतर चित्रसेनाकडे वळून म्हणाला—"महाराज, कपिलपुरा-नजीकच्या रानांत कांहीं भयंकर पक्षी त्या लोकांनीं आणून ठेवले आहेत, हें मी आपल्याला सांगितलेंच होतें. ते पक्षी

Fullscreen 127 24 / 84













मोठमोठ्या पिंजऱ्यांत बंद आहेत. त्यांच्या पायांत मोठमोठे साखळदंड अडकवून ते पिंजऱ्यांच्या खांबाला बांधलेले आहेत. त्यांच्यावर स्वारी करणारे लोक राहुट्या बांधून त्यांत रहात आहेत. ते पक्षी पिंजऱ्यांत बंद असतांनाच त्यांना मारलें पाहिजे."

"तूं म्हणतोस तें ठीक, पण कसें मारावयाचें हाच तर प्रश्न आहे!" चित्रसेनानें शंका केली.

"महाराज, मी एक उपाय सुचवितों. त्यांना........" अमरपाल चित्रसेनाच्या कानांत कांहींतरी सांगणार होता. परंतु तेवढ्यांत समोरच्या झाडीच्या पलीकडून ओरडा ऐकूं आला. चित्रसेन, उग्राक्ष व त्याचे अनुयायी त्या बाजूला धांवले. पण थोड्या वेळानें थांबले. कारण झाडीच्या आड मैदानांत त्यांना एक भयंकर दृश्य दिसलें.

ते भयंकर पक्षी गुरांढोरांना, मेंढरांना व त्यांच्या गुराख्यांना व धनगरांना उचलून घेऊन चालले होते. घारी किंवा गिधाडें कोंबडीच्या पिलांना जशी उचलून नेते तसेंच त्या असहाय गुरांढोरांना ते पक्षी उचलून नेत होते. तें दृश्य बघवेना म्हणून चित्रसेनानें डोळे मिटून घेतले. कांहीं गुराखी त्या स्थितींतहि शौर्यानें त्या पक्ष्यांवर व त्यांच्यावर बसून येणाऱ्या लोकांवर वार करीत होते. जनावरें घाबरून सैरावैरां पळत होतीं. त्यांचा कोणी वाली नव्हता.

तें भयंकर दृश्य पाहून चित्रसेनासारख्या शूरवीराला सुद्धां कांपरें भरलें. उग्राक्षाची तर बोबडीच वळली. पण त्याचें राक्षसी रक्त खवळलें व तो आपली गदा फिरवीत पुढें जाऊं लागला. पण चित्रसेनानें त्याला मध्येंच अडविलें. म्हणाला—"आतां जाऊन कांहीं उपयोग नाहीं. तुला त्यांनी पाहिलें






Fullscreen

127





26 / 84



तर तूं व तुझ्याबरोबर आम्हा सर्वांना मरावें लागेल. म्हणून घाईनें कांहीच करून भागणार नाहीं. ते पक्षी गेल्यावर जखमी झालेल्यांना घेऊन जाऊन आपण त्यांची सेवा शुश्रूषा करूं या."

थोड्या वेळानें अग्निद्वीपवाले आपापल्या वाहनांवर बसून निघून गेले. ते दृष्टीआड झाल्यावर चित्रसेनाचे अनुयायी व राक्षस घायाळ लोकांच्या सेवेला धांवले. उग्राक्ष मात्र हताश होऊन एका झाडाच्या बुंधाला टेंकून बसून राहिला. तो चित्रसेनाला म्हणाला—"आजपर्यंत भीति ही काय वस्तु असते हें मला माहीत नव्हतें. पण आजचें हें भयंकर दृश्य पाहून माझा धीरच मुळीं खचला आहे. या दुष्टांचा नाश करणें तर दूरच. आपलें रक्षण कसें करून घ्यायचें हाच प्रश्न माझ्या समोर आहे!"

चित्रसेनानें अमरपालाला विचारलें—"अमरपाल! तूं उपाय सांगणार होतास ना, या लोकांचा आणि त्यांच्या भयंकर पक्ष्यांचा नाश करायला."

"ते भयंकर पक्षी ज्या पिंजऱ्यांत आहेत त्यांतच त्यांचा अंत केला पाहिजे आणि त्याला एकच एक उपाय म्हणजे.... पिंजऱ्यांना आग लावणें." अमरपाल म्हणाला.

"आग लावणें म्हणजे गप्पा आहेत का?" चित्रसेन म्हणाला.

"कांहीं अशक्य नाहीं. महाराज माझ्या बरोबर चारपांच सैनिकांना पाठवा. मी कपिल-पूरच्या रानांत जातों. तेथील पाहारेकऱ्यांच्या डोळ्यांत धूळ फेंकून सर्व काम उरकून येतों. सर्व पक्षी जिवंत जाळले गेले नाहींत तर मी नांवाचा अमरपाल नाहीं." अमरपालानें प्रतिज्ञा केली. (पुढील गोष्ट पुढील अंकीं)





पद्मावती नामक नगरींत देवरात व भूरिवसु नांवाचे दोन बाल मित्र रहात असत. त्यांनीं परस्परांचीं मैत्री कायम रहावी म्हणून असें ठरविलें होतें कीं जर एकाला मुलगा झाला व दुसऱ्याला मुलगी झाली तर त्यांचें लग्न करून देऊन आपण व्याही होऊं.

पुढें देवरात विदर्भ देशाच्या राजाच्या पदरीं मंत्री म्हणून काम करूं लागला आणि भूरिवसूची नेमणूक पद्मावतीच्या राजाच्या दरबारीं मंत्री पदावर झाली. देवरातला एक मुलगा झाला. त्याचें नांव त्यानें माधव असें ठेवलें. भूरिवसुला मुलगी झाली. तिचें नांव त्यानें मालती असें ठेवलें.

देवरातला आपल्या लहानपणची आठवण होती. पण त्यानें विचार केला कीं मुला-मुलींच्या मतानेंच ह्या गोष्टी झालेल्या बऱ्या. त्यांनीं परस्परांना पहावें व त्यांचें परस्परांवर प्रेम असेल तर विवाह करावा. ह्या हेतूनें त्यानें आपल्या मुलाला तर्क विद्येचा अभ्यास करण्यासाठीं म्हणून पद्मावती नगरीस पाठ-विलें. त्याच्याबरोबर त्याचा बालमित्र मकरंद व सेवक कलहंस हे देखील गेले.

माधव पद्मावती नगरींत मंत्र्यांच्या घरा-समोरूनच जात येत असे. एकदां सज्ज्यांत मालती उभी होती व माधव बालमित्र मकरंद व कलहंस यांच्याबरोबर घोड्यावरून चालला होता. परस्परांच्या नजरा भिडल्या व परस्परांवर परस्परांचीं मनें बसलीं.

मदयंतिका नांवाची मालतीची एक मैत्रीण होती. तिचा भाऊ नंद हा राजाच्या पदरीं नोकरी करीत असे व त्यानें राजाची मर्जी सर्वप्रकारें संपादन केली होती. मदयंतिकेला पाहाल्याबरोबर माधवचा मित्र मकरंद याचें तिच्यावर मन बसलें.

सौ. गंगादेवी आपटे

Fullscreen

127




28 / 84



पद्मावती नगरींत कामंदकी नांवाची एक योगिनी रहात असे. मालती-माधव यांच्या विवाहाची गोष्ट तिच्या समोरच ठरली होती. तशी कामंदकी ही मालतीची संरक्षिका देखील होती. मालती-माधव यांना विवाह व्हावा यासाठीं ती देखील प्रयत्न करीत होती.

परंतु तिच्या प्रयत्नाविरुद्ध मालतीचा विवाह करून देण्याची तयारी स्वतः राजा करीत असल्याचें तिला कळलें. राजाचा विश्वासपात्र नोकर नंद यानें राजाला सांगून त्याच्या करवीं मालतीचा बाप भूरिवसु याच्याकडे तिच्यासाठीं मागणी घातली.

नंद वयानें मालतीच्या मानानें फार मोठा होता. रंगारूपानें पण वेताचाच होता. मग भूरिवसूला त्याच्याशीं आपल्या लाडक्या लेकीचा विवाह करून देणें कसें आवडेल ? याशिवाय त्यानें त्याचा बालमित्र देवरात याला लहानपणीं वचन दिलें होतें तें त्याला मोडावें लागणार होतें. परंतु राजाची इच्छा म्हणजेच आज्ञा. राजाच्या मर्जीविरुद्ध काम करणें बरोबर नाहीं असा विचार करून त्यानें होकार दिला.

ही गोष्ट अर्थातच कामंदकीला कळली. तिनें आपली शिष्यीण बुद्धिरक्षिता हिला बोलावून सांगितलें कीं मालती-माधव यांचें परस्परांवरील प्रेम वाढत राहील यासाठीं कांहींतरी उपाय कर. दोघं परस्परांच्या प्रेमबंधनांत बांधली गेल्यावर ब्रह्मदेव देखील त्यांची ताटातूट होऊं देणार नाहीं या विचारानें तिनें बुद्धिरक्षितेला नेमलें होतें.

इकडे मालतीनें माधवाला पाहिल्यापासून त्याला आपलें मन देऊन टाकलें होतें. नेहमीं त्याचाच विचार तिच्या मनांत येत असे. एकदां तिनें कल्पनेनें माधवाचें रूप आठवून त्याचें एक चित्र काढलें. लवंगिका नांवाची तिची एक मैत्रीण होती. तिनें हें



चित्र माधवकडे पोंचविण्याचें काम कामंदकीच्या सेविकेकडे सोंपविलें. माधवचा सेवक कलहंस याचें या सेविकेवर प्रेम होतें.

एकदां मन्मथोत्सव झाला. माधव मकरंदबरोबर उद्यानांत आला. तेथें तो एका अशोक वृक्षाच्या छायेंत बसून फुलांची माळ ओंवीत होता. त्याच्या कांहीं वेळ आधीं मालती आपल्या सखींबरोबर मन्मथाच्या देवालयांत गेली होती. ती परत आली ती त्याच जागीं आली. तिला पाहून माधव थोडा लाजला व माळ थोडी वांकडीतिकडी ओंवूं लागला. माळ ओंवून झाल्यावर त्यानें ती आपल्याच गळ्यांत घातली. इतक्यांत मालतीचा हत्ती आला व ती त्यावर बसून निघून गेली.

परंतु मालतीची लाघवी मैत्रीण लवंगिका फुलें तोडण्याचें मिष करून तेथेंच थांबली. ती माधवजवळ जाऊन म्हणाली—"तुमच्या गळ्यांतील ही माळ किती सुंदर आहे ? माझी मैत्रीण मालती हिला अशी माळ फार आवडते." तिचा हेतु न कळण्या इतका माधव भोळा नव्हता. त्यानें गळ्यांतली माळ काढून लवंगिकेला दिली.

लवंगिका निघून गेल्यावर मकरंद माधवला शोधीत तेथें आला. माधवनें मालतीची



दृष्टादृष्ट झाल्याचें सांगून तिच्या मैत्रिणीबरोबर माळ पाठविल्याची गोष्ट पण सांगून टाकली. तो म्हणाला—"माझें मालतीवर इतकें प्रेम असलें तरी तिचें माझ्यावर आहे कीं नाहीं, कोण जाणे ?" इतक्यांत कलहंसानें एक चित्र आपल्या मालकाला आणून दिलें व तें मालतीनेंच काढलेलें आहे, हें देखील सांगितलें.

चित्र पाहाल्यावर मालतीचें सुद्धां आपल्यावर प्रेम आहे हें माधवला कळलें व त्याच्या मनाचें समाधान झालें. मकरंदनें सुचवल्याप्रमाणें त्यानें मालतीचें चित्र त्या

Fullscreen 127 30 / 84



चित्राच्या बाजूला काढलें व त्याच्या खालीं एक श्लोक लिहिला. त्याचें तात्पर्य असें आहे–

"मालतीला पाहून मला जितका आनंद झाला तितकें सुख दुसरी कोणतीहि वस्तु पाहाल्यानें मिळालें नाहीं."

तितक्यांत कलहंसाच्या प्रेमिकेनें येऊन तें चित्र घेतलें व तें लवंगिकेला नेऊन दिलें.

माधवनें ओवलेली माळ आणि तिनें काढलेल्या त्याच्या चित्रा शेजारीं त्यानें काढलेलें तिचें चित्र मालतीकडे पोंचतें झालें. अर्थात मालतीच्या मनांत माधवविषयीं प्रेम द्विगुणित झालें. पण त्याच वेळीं तिच्या प्रेमाची परीक्षाच घेण्यासाठीं जणुं कांहीं कामंदकीनें येऊन सांगितलें कीं राजाज्ञेनें मालतीचें लग्न नंदशीं ठरलें आहे. मालतीवर तर आकाशच कोसळलें. परंतु कामंदकीनें तिची समजूत घातली कीं क्षत्रिय कुळांत गांधर्व विवाह मान्य आहे. राजाच्या आज्ञेचें पालन होण्यापूर्वी तसें लग्न उरकून टाकलें कीं झालें.

कामंदकीनें त्यासाठीं आवश्यक प्रयत्न पण सुरू केले. तिनें शंकराच्या देवळांत झुडपाआड माधवला उभें रहावयास सांगितलें व स्वतः मालतीबरोबर एका शिळेवर बसून माधवावर तिचें किती प्रेम आहे या विषयीं विचारूं लागली. मालतीच्या तोंडून तिचें आपल्यावर प्रेम आहे हें ऐकून माधवला फार आनंद झाला.

परंतु इतक्यांत दुरून ओरडा ऐकूं आला. मालतीची सखी व नंदची बहीण मदयंतिकेवर एका वाघानें झडप घातली. मदयंतिका झुडपाआड गेल्यानें वांचली. त्या बाजूला माधव धांवला. परंतु मकरंद त्याच बाजूनें प्रथम आला व त्याची वाघाशीं झुंज सुरू झाली. वाघाला ठार करून तो स्वतः बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. त्याला बेशुद्ध स्थितींत पाहून व त्याच्या अंगांतून रक्ताच्या धारा वहात असलेल्या पाहून माधव देखील बेशुद्ध होऊन पडला.

आपापल्या प्रियकराला बेशुद्ध स्थितींत पाहून मदयंतिका व मालती घाबरून गेल्या. परंतु कामंदकीनें मंत्रवलेलें पाणी शिंपडून दोघांना शुद्धीवर आणलें.

इतक्यांत मदयंतिकेकडे येऊन एका नोकरानें सांगितलें कीं तिचा भाऊ नंद याच्याशीं मालतीचें लग्न ठरलें आहे व त्यासाठीं मुहूर्त देखील ठरला आहे. आपली मैत्रीण आपली वहिनी होणार हें ऐकून मदयंतिकेला परमानंद झाला.

पण माधव मात्र हताश होऊन बसला. योगिनीनें त्याला धीर दिला आणि सांगितलें कीं तुझ्याशींच मालतीचें लग्न होणार. पण त्याच्या मनाचें समाधान होईना. तो जिवाला कंटाळला आणि भ्रमिष्टासारखा स्मशानांत हिंडूं फिरूं लागला.

त्या स्मशाना शेजारींच शक्तीचें देवालय होतें. त्या देवळांत अघोरघंट नांवाचा कापालिक आपल्या कपालकुंडला नामक शिष्येबरोबर शक्तीची उपासना करीत होता.



देवीला प्रसन्न करून आपली साधना पुरी करण्यासाठीं एका सुंदर कन्येचा बळी दिला पाहिजे असें सांगून त्यानें कपालकुंडलेला पाठविलें. ती मंत्रबळानें मालतीलाच घेऊन आली. त्या वेळीं मालती आपल्या घरीं एकटी झोपलेली होती.

अघोरघंट कापालिकानें मालतीचा वध करण्यासाठीं सर्व तयारी केली. आतां आपला वध निश्चित होणार हें कळल्यावर मालती आई, कामंदकी व सखी लवंगिका यांचें नांव घेऊन मोठ्यानें ओरडली–"वांचवा !" तो आवाज स्मशानांत भटकत असतां माधवच्या

Fullscreen 127 32 / 84



कानीं पडला. तो धांवत धांवत देवळाकडे आला. त्याला पाहून मालती धांवत गेली व त्याला बिलगून ओरडली—"वांचवा !"

त्या वेळीं अघोरघंट कुऱ्हाड घेऊन मालतीला मारण्यासाठीं उभा होता. माधवनें त्याच्या हातांतली कुऱ्हाड हिसकावून घेऊन तिनें त्याचाच अंत केला. त्याच वेळीं मालतीचा शोध काढीत इतर लोक देखील तेथें येऊन पोंचले व मालती सुखरूप घरीं येऊन पोंचली.

कपालकुंडला मंत्र शक्तीनें अदृश्य झाली व पळून गेली. परंतु गुरूचा वध करणाऱ्या माधवशीं तिथें हाडवैर झालें. तिनें सूड घ्यायचें मनाशीं ठरविलें.

तिकडे राजवाड्यांत नंदाच्या लग्नाची तयारी चालू होती. नवरदेव सजून तयार होते. नवरदेवाची स्वारी घोड्यावर बसून निघाली. त्यापूर्वीं कामंदकी मालतीच्या आईकडे जाऊन म्हणाली—"वधूला लग्नापूर्वीं ग्राम देवांच्या दर्शनास गेलें पाहिजे. तेथूनच तिला वधूवस्त्रें नेसवून मी घेऊन येतें." असें सांगून ती मालतीला घेऊन देवळांत गेली. तेथें पूर्वीं ठरल्याप्रमाणें माधव व त्याचा मित्र मकरंद जाऊन बसले होते. ठरल्याप्रमाणें राजानें वधूवस्त्रें व आभूषणें देवळांत पाठवून दिलीं.

कामंदकीनें देवळांत मालती-माधवांचा लग्न समारंभ उरकून घेतला व त्यांना तिच्या विहारांत निघून जायला सांगितलें. नंतर असेंहि सांगितलें कीं मकरंद व मदयंतिका थोड्या वेळानें तिकडेच येतील.

नंतर कामंदकीनें वधूवस्त्रें व आभूषणें मकरंदला देऊन त्याला वधूचा वेष करून यायला सांगितलें व सर्व मिळून लवंगिकेला बरोबर घेऊन भूरिवसूच्या घरीं गेलीं.

मालतीच्या वेषांत आलेल्या मकरंदशीं नंदचा विवाह झाला. कामंदकीनें कोणाला हें कारस्थान कळूं नये यासाठीं सर्व काळजी घेतली. नंद आपल्या नवरीबरोबर वाजत गाजत आपल्या घरीं गेला.

रात्रीं एकांतांत नंद आपल्या बायकोशीं गोडगोड बोलूं लागला. पण तिनें हात झिडकारल्यामुळें त्याला वाटलें बापाची लाडावलेली मुलगी आहे. हळू हळू ठीक होईल. असा विचार करून तो निघून गेला.

रात्रीं सामसूम झाल्यावर कामंदकीची शिष्या बुद्धिरक्षिता व लवंगिका दोघी हळूच मदयंतिकेला जागी करून विहारांत बोलावून घेऊन गेल्या. अर्थातच बरोबर मकरंद पण स्त्री वेषांत होता. वाटेंत तिला कळलें कीं तिच्या भावाशीं मालतीचें लग्न झालें नसून तिचा प्रियकर मकरंद याचें झालें होतें.

मकरंद स्त्री वेषांत व तिघी मैत्रिणी विहाराकडे जात असतां वाटेंत राजाचे शिपाई त्यांना भेटले व त्यांनीं मकरंदाला संदेहास्पद वागणुकीवरून धरून नेलें. बुद्धिरक्षिता मदयंतिका व लवंगिका किंकर्तव्य विमूढ स्थितींत जागच्या जागीं उभ्या असतां माधवचा नोकर कलहंस त्यांना येऊन भेटला व त्यांना मालती माधव जेथें लपून बसलीं होतीं तेथें घेऊन गेला.



मकरंदला राजाचे शिपाई धरून घेऊन जात आहेत हें ऐकून माधव त्याच्या रक्षणासाठीं निघून गेला.

इकडे मालतीला एकटी पाहून कपालकुंडला मंत्रबळानें तिला घेऊन गेली व श्रीशैलच्या मार्गानें जाऊं लागली. गुरूचा वध करणाऱ्यावर सूड उगवण्यासाठीं ती संधीच पहात होती. मदयंतिका वगैरे तिला शोधीत होत्या.

Fullscreen 127 34 / 84

मकरंदनें स्वतःला सोडवून घेण्यासाठीं संधी साधून राजाच्या शिपायांशीं द्वंद्व युद्ध सुरू केलें. सुदैवानें त्याच वेळीं माधव देखील येऊन पोंचला. आतां मारामारीला चांगलाच रंग चढला. राजा दुरून हें सर्व पहात होता. मकरंदनें नंद मालतीचा विवाह मोडण्यासाठीं विघ्न घातलें या गोष्टीचा त्याला फार राग आला होता. पण दोघां तरुणांना शौर्यानें लढत असलेले पाहून त्याला फार आनंद झाला. त्यानें त्यांना बोलावून त्यांचें कुळगोत्र विचारून त्यांना आदरपूर्वक सोडून दिलें. तिघे आनंदानें परत विहारांत आले. तेथें मदयंतिका होती. पण मालती नव्हती.

माधव कामंदकीकडे गेला. पण ती देखील भेटली नाहीं. तो मतिभ्रष्ट होऊन वेड्यासारखा रानांवनांत पशु पक्ष्यांना व झाडा झुडपांना "मालतीला कोणी पाहिलेंत का?" असें विचारीत हिंडूं लागला.

मित्राच्या मनाची ही स्थिति पाहून मकरंद देखील आत्महत्या करण्याचें ठरवून गिरिशिखरावर चढूं लागला.

सुदैवानें कपालकुंडलेला सौदामिनी नांवाची योगिनी भेटली. ही सौदामिनी कामंदकीचीच शिष्या होती. तिनें आपल्या मंत्र बळानें कपालकुंडलेचा पराभव केला व मालतीला वांचविलें. मकरंद गिरिशिखरावर चढत असलेला तिला दिसला. तिनें मालतीची खुशाली कळवून त्याला पण वांचविलें. नंतर तिनेंच मालती-माधवांची भेट घालून दिली.

सर्व गोष्टी कळल्यावर राजानें मालती-माधवांच्या विवाहास होकार दिला. मकरंद मदयंतिका व कलहंस आणि त्याची प्रेमिका यांचा विवाह देखील एका मांडवांत थाटा-माटानें साजरा झाला.

देवरात व भूरिवसु यांना त्याचें बालपणाचें स्वप्न साकार झालेलें पाहून, आनंद झाला.





# ※ भुतांची घंटा ※

फार पूर्वी चीन देशांत दोन भाऊ रहात होते. ते दोघे सख्खे भाऊ होते, पण दोघांच्या स्वभावांत मात्र फार फरक होता. मोठा स्वभावानें दुष्ट व लोभी होता व धाकटा सरळ व उदार.

वडील वारल्याबरोबर वडील भावानें वडिलार्जित संपत्ति आपल्या नांवीं करून घेतली. धाकट्या भावानें त्या विरुद्ध कांहीं केलें नाहीं. तो गांवकऱ्यांना होईल ती मदतच करी. नेहमीं मेहनत करी व जी मजुरी मिळे तीवर आपला उदर निर्वाह चालवी.

एकदां त्याला साखरेचा पाक एका गांवाहून दुसऱ्या गांवीं नेण्याचें काम एका श्रीमंत गृहस्थानें दिलें. वाट डोंगराळ होती. पाऊस पडत होता म्हणून पदोपदीं पाय घसरत होते. तरी धाकटा भाऊ काळजीपूर्वक चालत होता. परंतु एका जागीं त्याचा पाय घसरलाच. तो व पाक भरलेलीं दोन मडकीं त्याच्याबरोबर एका खड्ड्यांत पडलीं. तो पाकांत न्हाऊन निघाला. पाक वाळून त्याचे थर सर्व अंगावर चिकटून बसले. त्याला उठतां देखील येईना. त्यानें विचार केला, आतां आयुष्याची दोरी खुंटलीच. तरी देवावर भरंवसा ठेवून बिचारा पडून राहिला.

तितक्यांत तेथें कांहीं भुतें आलीं. भुतांचा सरदार धाकट्या भावाला पाहून आपल्या साथी भुतांना म्हणाला—"अरे! हा पहा साखरेचा बाहुला. केवढा मोठा आहे!" भुतांनीं आनंदानें नाचत त्याला उचलून आपल्या गुहेंत नेलें व त्याला एका मोठ्या शिळेवर ठेविलें. नंतर चारी बाजूला घोळका करून उभे राहिले आणि साखरेचे पापुद्रे काढून खाऊं लागले.

Fullscreen 127 36 / 84

काांही वेळानें भुतांचा नायक ओरडून म्हणाला—"पुरें आतां. एकाच दिवशीं जास्त साखर खाल्ली तर पोटभर जेवण सुद्धां जाणार नाहीं. चला खाऊन पिऊन मग खेळायला जाऊं."

धाकटा भाऊ तें सर्व ऐकत स्वस्थ पडून होता. कारण हालचाल केली तर ते आपल्याला ठार करून खाऊन टाकतील हें त्याला माहीत होतें.

भुतांच्या नायकाला दोन शिंगें होतीं. त्यानें एक जादूची घंटा वाजवल्याबरोबर खाण्या पिण्याचे निरनिराळे पदार्थ त्यांच्यासमोर हजर झाले. भुतांनीं मिटक्या मारीत पोटभर जेवून घेतलें. नंतर एका जागीं ती घंटा ठेवून उड्या मारीत व ओरडत तीं गुहेबाहेर निघून गेलीं.

धाकटा भाऊ हें सर्व पहात पडून होता. भुतें निघून गेल्यावर व चहूकडे सामसूम झाल्यावर त्यानें घंटा उचलून घेतली आणि गुहेबाहेर पाय काढला. वाटेंत कांहीं विघ्न आलें नाहीं व तो सरळ घरीं गेला आणि घंटा एका जागीं लपवून ठेवून दिली. आतां त्याला पोटा पाण्याची काळजी उरली नाहीं. भूक लागली कीं जादूची घंटा वाजवावी व समोर पंचपक्वान्नांचीं ताटें वाढून येत.



धाकटा भाऊ सुखानें दिवस काढूं लागलेला पाहून मोठ्या भावाला हेवा वाटूं लागला. त्याच्या बायकोच्या पोटांत तर गोळाच उठला. ती नवऱ्याला म्हणाली—"स्वारी कोठून तरी चोरीचा माल घेऊन आली आहे. नाहींतर या भिकारड्याकडे हीं पंचपक्वान्नें कोठून आलीं?" अर्थातच वडील भावानें धाकट्या भावाला दरडावून त्याच्याकडून भुतांच्या गुहेची माहिती काढून घेतली व एक दिवस साखरेच्या पाकाची मडकीं घेऊन तो त्याच डोंगराळ वाटेनें चालूं लागला. पण निसर्गानें साथ दिली नाहीं. त्या दिवशीं पाऊस नसल्यामुळें तो खड्ड्यांत पडला नाहीं. पण त्यानें स्वतःच त्या खड्ड्यांत उडी मारली आणि मडकीं फोडून सर्व पाक अंगाला फासून घेतला.

थोड्या वेळानें भुतें त्या बाजूला आलीं व मोठ्या भावाला साखरेच्या पाकानें माखलेला पाहून म्हणालीं—"साखरेचा बाहुला आपली घंटा घेऊन पळून गेला होता ना? तोच हा आहे पहा! ह्याला उचलून घेऊन जाऊं या."

तें ऐकून मोठ्या भावाला आनंद झाला. आतां आपण भुतांच्या गुहेंत जाऊन कांहीं












Fullscreen 127 38 / 84



तरी कामाची वस्तु उचलन घरीं घेऊन जाऊं या विचारानें तो गुरफ़ून गेला होता.

भुतांनीं त्याला गुहेंत नेल्यावर त्यांचा नायक म्हणाला—"मागच्या खेपेस या साखरेच्या बाहुल्यानें आपली घंटा चोरून नेली होती. म्हणून या खेपेस ह्याला थोडें ऊन करून खाऊं या."

भुतांनीं मोठ्या भावाला एका मोठ्या रांजणांत टाकलें आणि त्यांत पाणी घालन खालीं जाळ केला. पाणी ऊन होऊं लागलें तसतसा मोठ्या भावाचा जीव कासावीस होऊं लागला. त्यानें रांजणाबाहेर उडी मारली आणि गुहेंतून पळूं लागला. पण इतक्या भुतांच्या हातांतून निसटून जाणें शक्य नव्हतें. भुतांनीं त्याला धरून आणलें.

भुतांचा नायक म्हणाला—"याची खोड मोडेल अशी शिक्षा देऊन याला सोडूं या." असें सांगून त्यानें मोठ्या भावाचें नाक ओढलें. त्याबरोबर तें एक वीत लांब झालें. नायकाच्या मागून पाळी पाळीनें इतर भुतांनीं पण त्याचें नाक ओढलें. अशा तऱ्हेनें त्याचें नाक सात फुटावर लांब झालें व जमिनीवर लोळूं लागलें. त्यानंतर सर्व भुतांनीं मिळून मोठ्या भावाला खूप बडवून गुहेबाहेर धक्के मारून काढलें.

आपलें विद्रूप नाक हाताला गुंडाळून बिचारा घरीं आला.

त्याची बायको वाट पहात होती कीं नवरा कांहींतरी जादूची वस्तु घेऊन येईल. म्हणून दरवाज्यावर थाप पडतांच तिनें दरवाजा उघडला. नवऱ्याचें तें रूप पाहून ती दचकून मागें सरकली व विचारूं लागली—"हें काय ?"

भुतांच्या गुहेंत त्याचे कसे हाल झाले हें सांगून तो म्हणाला—"तुझें नशीब बलवत्तर म्हणून मी जिवंत तरी परतलों."



बायको म्हणाली—"भुतांनीं केलेलीं कामें हीं! त्यांनींच कांहीं केलें तर नाकांत सुधारणा होईल, नाहींतर जन्मभर हें नाक घेऊन रडत बसावें लागेल."

नंतर ती आपल्या दिराकडे गेली व आपलें रडगाणें सांगून म्हणाली—"तुम्हीच हातभार लावलात तर या संकटांतून मुक्तता मिळेल."

तो म्हणाला—"आतां भुतांच्या गुहेंत जाणें म्हणजे वाघाच्या गुहेंत जाण्यासारखें आहे. दादासाठीं मी संकटांतहि उडी घ्यायला तयार आहें. तेथें गेल्याशिवाय दुसरा उपाय देखील नाहीं."

दुसऱ्या दिवशीं धाकटा भाऊ भुतें गुहेंत येण्यापूर्वीच त्यांच्या गुहेंत जाऊन एका दगडाआड लपून भुतें काय बोलतात व करतात हें पहात उभा राहिला.

खाणें पिणें आटोपल्यावर एका गिड्डया भुतानें येऊन नायकाला विचारलें—"सरदार! तो साखरेचा बाहुला निघून गेला आहे ना, त्याच्या नाकाचें काय झालें असेल बरें ?"

"थोडी अकल त्याला असेल तर त्याचें नाक पुन्हां जसेंच्या तसें होईल. ती घंटा आहे ना त्याच्या जवळ ती घंटा वाजवून



Fullscreen 127 40 / 84

तो जर 'ल्हान हो' म्हणेल तर प्रत्येक घंटेच्या ठोक्याला तें ल्हान होऊं लागेल." नायक म्हणाला.

भुतें निघून गेल्यावर संधी साधून धाकट्या भावानें तेथून पाय काढला व सरळ घरीं आला. त्यानें पेटींत ठेवलेली घंटा काढून आपल्या भावजयीच्या हातांत दिली आणि म्हणाला—"ही वाजवा वहिनी! आणि घंटेच्या प्रत्येक ठोक्यावरोबर 'नाका, ल्हान हो!' असें म्हणा.

मोठ्या भावाच्या बायकोनें हळूच एकदां घंटा वाजवली, त्यावरोबर नाक एक बोट ल्हान झालें. तिनें पुन्हां एक दोनदां घंटा वाजवली. आणखी दोन बोटें नाक ल्हान झालें. पण नाक तर सात फुटावर लांब होतें. म्हणून भरभर नाक ल्हान व्हावें म्हणून ती भरभर घंटा वाजवूं लागली व तोंडानें 'नाका ल्हान हो!' चा जप करीत राहिली. तिच्या इच्छेप्रमाणें खरोखरच नाक भरभर ल्हान होऊं लागलें. तिचा दीर "थांबा, वहिनी! सावकाश वहिनी!" म्हणतच राहिला. पण त्याच्याकडे दुर्लक्ष करून ती घंटा वाजवीत राहिली. तिला वाटलें कीं मोठ्या भावाचें हें वैगुण्य दाखवून त्याची थट्टा उडविण्यासाठीं दिरानें थांबायला सांगितलें असेल. परंतु नवऱ्याचें ओरडणें ऐकून जेव्हां ती थांबली तेव्हां नवऱ्याला पाहून तिनें मान खालीं घातली. नाक नुसतें ल्हानच झालें नव्हतें तर नाहींसें देखील झालें होतें. तो कायमचा नकटा झाला.

त्यानें थोडी अक्कल लढविली असती तर घंटा वाजवून "नाका, मोठा हो!" असें त्याला म्हणतां आलें असतें. पण तीच नव्हती. म्हणून आयुष्य भर आपल्या नशिवाला दोष देत रडत रहावें लागलें.





# पोपट पंजी

एका गांवीं एक म्हातारी रहात असे. खाऊन पिऊन ती सुखी होती. तिची एक नात तेवढी तिच्यावरोबर रहात असे. तिची आई वारल्यावर तिला तिच्या वडिलांनीं आजीकडे पोंचती केली. म्हातारी थोडी कडक स्वभावाची होती. नातीला ती कोठें जाऊं देत नसे व हिंडूं खेळूं देत नसे. बिचारी मुलगी अगदीं कंटाळून गेली. बरोबरीच्या मुलींबरोबर खेळण्याची सुद्धां चोरी!

नातीला घर म्हणजे कोंडवाडा वाटूं लागला. घरांत आजीनें एक पोपट पाळला होता. त्याच्या बरोबरच खेळण्यांत तिचा वेळ जाऊं लागला. पण मुलगीच ती. शेजारपाजारच्या मुली खेळूं लागल्या कीं त्यांच्याकडे पाहून तिला आपल्या आजीवर राग येई. पण आजीला ती भीत असे. म्हणून तिच्यासमोर कधीं तोंडांतून ब्र देखील काढीत नसे. पण म्हातारी कोठें गेली कीं मोठ्यानें ओरडे—"म्हातारी मरेल तर सुटेन मी!"

तें ऐकून ऐकून पोपटानें पोपट पंजी सुरू केली—"म्हातारी मरेल तर सुटेन मी!" म्हातारीनें तें ऐकलें तेव्हांपासून ती फार संतापली.

तिला आश्चर्य वाटत होतें कीं पोपट हें शिकला कोठून? नात तर असलें कांहीं शिकवणार नाहीं. बिचारी गरीब आहे. सोन्यासारखी माझी नात. ती हें सर्व कां शिकवील?

एकदां शेजारची एक म्हातारी मुलीच्या आजीला भेटायला आली. तिनें घरांत पाऊल टाकल्यावरोबर पोपट बडबडूं लागला—"म्हातारी मरेल तर सुटेन मी!" तें ऐकून

श्री. रा. गो. पाटील


Fullscreen






42 / 84



ती म्हातारी इतकी चिडली कीं तिनें एक दांडकें उचललें आणि "मेल्या! मी मेलें तर तूं सुटशील होय?" असें म्हणत पिंजऱ्याकडे धांवली. पण नात किंचाळली म्हणून तिनें हातांतलें दांडकें टाकून दिलें आणि शेजारणीला म्हणाली—"हा कुलक्षणी पोपट घरांत कशाला बाळगला आहेस बाई?"

म्हातारीनें विचार केला, काय वाटेल तो उपाय करून पोपटाची ही संवय मोडली पाहिजे. शेजारीं एक उत्तर हिंदुस्थानी ब्राह्मणाचें घर होतें. त्याच्याकडे पण एक पोपट होता. कोणी कांहीं म्हटलें कीं ब्राह्मण—"बहुत अच्छा!" म्हणत असे. पोपटानें तेंच शिकून ठेवलें होतें. म्हातारीनें त्या ब्राह्मणाकडे जाऊन आपल्या पोपटा-विरुद्ध तक्रार सांगून कांहींतरी उपाय करायला सांगितलें.

ब्राह्मण म्हणाला—"त्यांत काय? सोपा उपाय आहे आजी! तुम्ही माझ्या पोपटाला घेऊन जा आणि आपल्या पोपटाबरोबर त्याला पिंजऱ्यांत ठेवून द्या. कांहीं दिवसांनीं आमच्या पोपटाच्या संगतींत तो कांहींतरी शुभ बोलायला शिकेल."

म्हातारीला तो सल्ला पसंत पडला व तिनें ब्राह्मणाच्या पोपटाला आपल्या पोपटाबरोबर नेऊन ठेवला. तिला वाटलें कीं देव पावला.

परंतु तिचें दुर्दैव! ब्राह्मणाच्या पोपटाला पिंजऱ्यांत ठेवल्याबरोबर तिचा पोपट ओर-डला—"म्हातारी मरेल तर सुटेन मी!" लगेच ब्राह्मणाचा पोपट म्हणाला—"बहुत अच्छा!" म्हातारीला इतका राग आला कीं तिनें रागानें पिंजरा बाहेर नेला आणि दोन्ही पोपटांना सोडीत म्हणाली—"जा व्हा चालते!" त्यावर ब्राह्मणाचा पोपट म्हणाला—"बहुत अच्छा!"



# तीन नवरे मुलगे

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत काढून खांद्यावर घेतलें व स्मशानाच्या दिशेनें निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ बोलूं लागला—"राजा, तुला मी किती सांगितलें कीं हा नाद सोड. पण तूं कांहीं हट्ट सोडीत नाहींस. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी एक गोष्ट सांगतों." त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

एकदां उज्जयनी नगरींत पुण्यसेन नांवाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या पदरीं एक ब्राह्मण मंत्री होता. त्याचें नांव हरिस्वामी. हरिस्वामीला देवस्वामी नांवाचा एक गुणी मुलगा होता. त्याला सोमप्रभा नांवाची एक रूप गुण संपन्न मुलगी पण होती.

मुलगी मोठी झाली तशी बापाला मुलीच्या लग्नाची काळजी लागली. पण मुलीचा आग्रह होता कीं तिचा पति असामान्य महा पराक्रमी तरी असावा किंवा ज्ञानी किंवा वैज्ञानिक.

वेताळाच्या गोष्टी

Fullscreen 127 44 / 84

असा वर मिळेपर्यंत माझें लग्न करूं नये असा तिनें हट्ट धरला. तिची आई, वडील व भाऊ सर्वांना ही गोष्ट मान्य होती व त्यांनीं तिची ही अट पुरी करण्याचें आपापल्या मनाशीं ठरविलें.

त्याच सुमारास दक्षिणेकडील एका राजानें उज्जयनीवर स्वारी केली. पुष्पसेन महाराजांनीं त्या राजाशीं संधी करून टाकायचें ठरविलें व त्यांनीं आपला मंत्री हरिस्वामी याला दूत म्हणून या कामावर पाठविलें. हरिस्वामीनें आपली कामगिरी चोख बजावली आणि उज्जयनीला परतला.

त्यावेळीं त्याला भेटायला एक ब्राह्मण तरुण आला व नमस्कार करून म्हणाला– "आपल्या गुणी मुलीशीं विवाह करण्याच्या हेतूनें मी आपणांकडे आलों आहें."

हरिस्वामी म्हणाला–"मी माझ्या मुलीचें लग्न सामान्य माणसाशीं करूं इच्छित नाहीं. कोणी असामान्य शूर किंवा ज्ञानी किंवा वैज्ञानिक वर मिळाला तरच मी तिचें लग्न करणार आहें. तूंच सांग या तिन्ही पैकीं असामान्य असा कोणता गुण तुझ्यांत आहे ?"

"मी एक असामान्य वैज्ञानिक आहें." तो तरुण म्हणाला.



"पाहूं या तरी तूं कोणता शोध लावला आहेस तो." हरिस्वामीनें विचारलें.

त्या तरुणानें एक विमान तयार केलें होतें. त्या विमानांत हरिस्वामीला बसवून तो आकाशांत उडाला व आकाशांत दोन तीन फेऱ्या मारून त्याला परत घेऊन आला. हरिस्वामी इतका खूष झाला कीं त्याचें वचन दिलें कीं मी माझ्या मुलीचें लग्न तुझ्याशीं लावून देईन. एक मुहूर्त देखील ठरला.

त्याच दिवशीं सोमप्रभाच्या भावानें देखील एका ब्राह्मण तरुणाला पाहिलें. तो तरुण म्हणाला–"मी अस्त्र विद्येंत अद्वितीय आहें." देवस्वामीनें त्याची परीक्षा घेतली व समाधान झाल्यावर म्हणाला–"मी माझ्या बहिणीचें लग्न तुझ्याशीं करून द्यायचें वचन देतों." त्यानें देखील तोच मुहूर्त ठरवून त्याला यावयास सांगितलें.

त्याच दिवशीं सोमप्रभाच्या आईनें एका मुलाला पाहिलें. तिनें अट सांगून विचारलें– "सांग तुझ्यांत कोणता असामान्य असा गुण आहे ?"

तो म्हणाला–"मी त्रिकालज्ञानी आहें. कोठें केव्हां काय होतें हें मी बसल्या जागीं सांगूं शकेन. नंतर त्यानें आतांपर्यंत केलेले









Fullscreen 127 46 / 84

प्रयोग ऐकवून सोमप्रभाच्या आईची खात्री पटवून दिली. तिचें समाधान झालें कीं मुलीनें सांगितलेली अट पुरी करून दाखविण्याची शक्ति या मुलांत आहे. तिनें देखील तोच मुहूर्त ठरविला आणि नवऱ्या मुलास एका आठवड्यानें यावयास सांगितलें.

अशा तऱ्हेनें हरिस्वामी, देवस्वामी व सोमप्रभाची आई तिघांनीं तिनें सांगितलेल्या तीन गुणांपैकीं एक गुण असलेला असा एक वर शोधून मुहूर्त देखील ठरवून टाकला. पण कोणालाहि दुसऱ्यानें देखील वर पाहिला असेल ही गोष्ट सुचली नव्हती.

हरिस्वामीनें घरीं आल्यावर बायकोला आनंदानें सांगितलें कीं मी सोमप्रभा करितां एक वैज्ञानिक मुलगा पाहिला आहे व लग्नाचा मुहूर्त देखील ठरवून आलों आहे. तें ऐकून त्याची बायको म्हणाली—"अगो-बाई ! मी देखील एका त्रिकालज्ञानी मुलाला आजच पाहून आलें आहें व मी देखील तोच मुहूर्त ठरविला आहें. देवस्वामीनें अस्त्र विद्येंत निपुण असा वर पाहून आल्याची गोष्ट सांगितली. तिघांना कोडें पडलें. कारण मुहूर्त पण एकच ठरला होता.

एक आठवडा गेला आणि ठरलेल्या मुहूर्तावर तिघे वर हजर झाले. आईवडील व भाऊ या विचारांत होते कीं ह्या पेचप्रसंगांतून सुटकेसाठीं कशी तोड काढावयाची ? पण तितक्यांत एका दासीनें येऊन सांगितलें कीं सोमप्रभा नाहींशी झाली आहे. सर्व वाडा पालथा घातला पण ती कोठें सांपडली नाहीं.

तेव्हां हरिस्वामीनें त्रिकालज्ञानी नवरदेवाला विचारलें—"तूं खरोखरच त्रिकालज्ञानी असशील तर सांग, मुलगी आतां कोठें आहे ?"

"विन्ध्य पर्वतांतील अरण्यांत धूम्रशिखा नामक एक मायावी राक्षस आपल्या मुलीला पळवून घेऊन गेला आहे. ती त्याच्या महालांत आहे." ज्ञानी नवरदेव म्हणाले.

"कुठें विन्ध्य पर्वत ? तेथपर्यंत आतां कसें जायचें आणि त्या राक्षसाच्या महालांतून तिला कसें सोडवून आणावयाचें ? कोण करणार सहाय्य मला ?" हरिस्वामी रडूं लागला "अगदीं काळजी करूं नका तुम्ही ! मी एका क्षणांत आपल्या विमानांत बसवून सर्वांना तेथें घेऊन जातो." वैज्ञानिक नवरा मुलगा म्हणाला.

सर्व विमानांत बसले. शस्त्रास्त्र विद्येंत पारंगत तिसरा नवरा मुलगा पण विमानांत आपलीं शस्त्रास्त्रें घेऊन बसला. क्षणार्धांत सर्व विंध्य पर्वतांत धूम्रशिखा राक्षसाच्या महालाजवळ येऊन पोंचले.

विमानाचा आवाज ऐकून राक्षस महाला-बाहेर आला व सर्वांच्या अंगावर धांवला. पण तिसऱ्या नवऱ्या मुलानें एक अर्धचंद्र बाण सोडून त्या राक्षसाचें मुंडकें उडविलें. सर्व सोमप्रभेला जाऊन भेटले आणि त्यानंतर पुन्हां विमानांत बसून उज्जयनीला आले. मुहूर्त टळला नव्हता. पण सोमप्रभेच्या आई-वडिलांसमोर एक प्रश्न दत्त म्हणून उभा होता, तिघांपैकीं कोणाची निवड करावयाची ? तिघे



Fullscreen 127 48 / 84

लग्नासाठीं आले होते. तिघांनीं आपापल्या शक्तीप्रमाणें सोमप्रभेचा शोध काढण्यास मदत केलेली होती.

ज्ञानी म्हणाला—"मी सांगितलें नसतें तर तुम्हां सर्वांना कसें कळलें असतें कीं सोमप्रभा कोठें आहे. म्हणून सोमप्रभेशीं माझेंच लग्न झालें पाहिजे."

वैज्ञानिक म्हणाला—"ती कोठें आहे हें नुसतें सांगितल्यानें का ती मिळणार होती? मी विमानांतून नेलें म्हणून तुम्ही सर्व तेथपर्यंत जाऊं शकलांत व तिला उज्जयनीला आणूं शकलांत. तिच्याशीं लग्नाला मीच अधिकारी आहें."

"अरे हो, पण राक्षसाला मारून मीच तिला नाहीं का सोडविलें. मग तिचें लग्न कोणाशीं करून यावें हें कोणी सांगायला हवें आहे का?" शस्त्रविद्येंत निपुण वर म्हणाला.

हरिस्वामी डोकें धरून बसून राहिला. काय करावें, त्याला सुचेना.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून राजाला विचारलें—"राजा! तूंच सांग, तिघांपैकीं कोण अधिक योग्य वर ठरेल? उत्तर माहीत असून दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर पडतील."

राजा म्हणाला—"माझ्या मतें या तिघांत तो शस्त्रविद्येंत निपुण वरच अधिक योग्य आहे. कारण त्यानेंच आपला जीव धोक्यांत घालून सोमप्रभेला सोडविलें. त्रिकालज्ञानी व वैज्ञानिकानें तर त्याला फक्त मदत केली होती."

राजाचें मौन अशा प्रकारें भंग झाल्यामुळें वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला व झाडावर लोंबकळूं लागला.






# मृतात्म्यासाठीं

टर्की देशांत मुजो नांवाचा एक मनुष्य रहात होता. त्याला अकालीं मरण आल्यामुळें त्याच्या बायकोनें दुसरें लग्न करून घेतलें. तिचा दुसरा पति एक श्रीमंत शेतकरी होता. दोघें नवरा बायको शेतावर जात. एकदां शेतांत काम करून दुपारीं दोघं विश्रांति घेण्यासाठीं एका झाडाखालीं येऊन बसलीं. नवरा म्हणाला—"मी जाऊन घोड्याला पाणी पाजून येतों तोंपर्यंत तूं खाण्यापिण्याची तयारी कर." नवरा निघून गेल्यावर बायको झाडाखालीं जरा आडवी झाली आणि "या अल्ला!" म्हणून डोळे मिटणार तितक्यांत तिला झाडावरून आवाज ऐकूं आला—"कोण आहे?" तिनें डोळे उघडून पाहिलें तर एक विचित्र कपडे घातलेला मनुष्य, झाडावरून उडी मारून उभा. तिनें विचारलें—"कोण रे तूं आणि इथें कशाला आला आहेस?" "मी या जगांतला मनुष्य नाहीं." तो मनुष्य म्हणाला.

"तरमग तूं परलोकांतून आला आहेस वाटतें? तेथें माझा पहिला पति मुजो भेटला होता का कधीं? नुकताच वारला तो. त्याची मला सारखी आठवण येते!" बायको म्हणाली.

"मुजो न? मला रोज भेटतो. तो सारखा आपल्या प्रियतमेची आठवण काढतो. स्वर्गांत त्याला एकाहून एक सुंदर पऱ्या बघायला मिळतात. पण त्याला आपल्या बायकोच्या बरोबरीची एकहि दिसत नाहीं." तो मनुष्य म्हणाला.

"होय का? त्यांना तेथें आराम आहे ना?" स्त्रीनें विचारलें.

"कोठला आराम? येथली गरिबी परवरली. तेथली गरिबी नको. नको जीव

श्री. र. मा. देसाई








Fullscreen 127 50 / 84



झाला आहे बिचाऱ्याला. पैशाशिवाय स्वर्गांत सुद्धां कोणाला सुख नाहीं, बाई! कधीं विडी मागायला तर कधीं एक कप चहा घ्यायला त्याला माझ्या घरीं यावें लागतें." तो मनुष्य म्हणाला.

तिचें हृदय पतिप्रेमानें कळवळून आलें. पदरानें डोळे पुशीत ती म्हणाली—"तूं परत केव्हां जाणार? मी पैसे दिले तर पोंचते करशील का?"

"त्यांत काय? मित्राला मदत नाहीं करावयाची तर कोणाला करावयाची?" तो मनुष्य म्हणाला.

ती बाई उठली व नवऱ्याच्या कोटांत ठेवलेली पैशाची पिशवी काढून घेऊन आली. ती त्या माणसाला देत म्हणाली—"हे मुजोला नेऊन दे बाबा! सांग, तुम्हांला लागतील तेव्हां निरोप पाठवा. उगीच जिवाला जास्त त्रास करून घेऊं नका. मी दुसरें लग्न केलें असलें तरी त्यांचीच आठवण सारखी होत असते."

त्या माणसानें पैशाची पिशवी खिशांत टाकली आणि शेजारच्या झाडींत नाहींसा झाला. कारण दुरून त्या बाईचा दुसरा पति घोड्यावरून येत असलेला त्याला दिसला होता. ती बाई त्याच्याकडे टक लावून पहात राहिली. नवरा अगदीं जवळ येई-पर्यंत तिनें त्याला पाहिलें देखील नाहीं.

"कोण तो मनुष्य?" नवऱ्यानें तिला विचारलें?

बायकोनें घडलेलें वृत्त जसेंच्या तसें सांगितलें. नवऱ्याला फार राग आला. पण रागाच्या भरांत बायकोला रागवण्यांत वेळ घालविण्यापेक्षां चोराचा पाठलाग करण्याचें त्यानें ठरविलें. तो घोड्यावर बसून तावडतोब झाडींत शिरला. ओढ्याच्या काठच्या झाडी-पलीकडे एक पवनचक्की होती. तींत तो चोर शिरला. त्यानें दुरून त्या बाईच्या नव-ऱ्याला तिकडे येत असलेला पाहिलें. त्यानें पवनचक्कीच्या मालकाला म्हटलें—"पाहिलेंस तो तुर्की येतो आहे इकडे. तुझ्यावर त्याचा, कां कोणास ठाऊक राग आहे. पळ काढ, नाहींतर चामडी लोळवील."

बावळट पवनचक्कीवाल्याला सर्व खरेंच वाटलें. कारण त्यानें खिडकींतून पाहिलें. त्या तुर्की माणसाच्या हातांत उपसलेली तलवार होती. चोराच्या सूचनेवरून दोघांनीं झटपट आपापल्या कपड्यांची अदलाबदल केली आणि पवनचक्कीच्या मागच्या दारानें त्यानें पाय काढला. तो झपझप टेकडीवर चढत झाडींत नाहींसा झाला.

त्याच वेळीं तुर्की शेतकरी पवनचक्कींत आला. शेतकऱ्यानें त्याला ओळखलें नाहीं व त्यालाच विचारलें, आतांच एक काळी टोपी घातलेला माणूस आंत शिरला तो कोठें आहे? पवनचक्कीच्या आवाजांत कांहींच ऐकूं आलें नाहीं असें दाखवीत चोर कांहींच बोलला नाहीं. त्याला ऐकूं आलें नसेल असें समजून त्या तुर्की शेतकऱ्यानें त्याचा हात धरून त्याला पुन्हां विचारलें—"आतां एक मनुष्य आंत आला होता तो कोठें आहे?"



चोरानें मागच्या दरवाज्याकडे बोट दाखविलें व कामांत गुंतल्याचा आव आणला. शेतकऱ्यानें मागच्या दारांत जाऊन पाहिलें तेव्हां त्याला एक मनुष्य टेकडीवरच्या झाडींत शिरत असलेला दिसला. त्याचे कपडे त्यानें पाहिलेल्या चोरासारखेच होते. घोडा घेऊन जाणें अशक्य होतें म्हणून घोड्याला तेथेंच ठेवून तो "थांब! कोठें चाललास?" असें ओरडत त्याच्या पाठीमागें धांवला.

त्याचा आवाज ऐकून पवनचक्कीचा मालक जास्तच जोरानें धांवूं लागला. या धांवपळींत

Fullscreen 127 52 / 84

पाय घसरून तो खालीं पडला. उठून पुन्हां पळूं लागण्यापूर्वीच शेतकऱ्यानें येऊन त्याला धरलें आणि दरडावून विचारलें—"काढ पैशाची पिशवी ? नाहींतर ही तलवार पाहतोसच आहेस."

"कोणती पिशवी ?" पवनचक्कीच्या मालकानें चकित होऊन विचारलें.

"माझ्या बायकोला फंसवून लुच्चेगिरीनें पळवून आणलेली—मुजोला परलोकांत देण्यासाठीं सांगून ! लपवालपवी केलीस तर माझ्याशीं गांठ आहे, लक्षांत ठेव." शेतकरी म्हणाला.

"तुझी बायको कोण आणि हा मुजो कोण ? मला कांहीं माहीत नाहीं. त्यानें येऊन मला सांगितलें कीं तूं मला मारण्यासाठीं येत आहेस म्हणून ! मी पवनचक्कींत काम करीत होतों. त्यानें आपले कपडे काढून मला दिले आणि माझे कपडे स्वतः घातले.

शेतकऱ्याला हळू हळू सर्व उलगडा झाला कीं खरा चोर पवनचक्कींतच आहे आणि तेथें पोंचेपर्यंत तो घोडा देखील घेऊन गेला असेल. आणि तेंच झालें. दोघे पवनचक्कींत येऊन पोंचले तोंपर्यंत तो चोर तेथें नव्हता व घोडा पण नव्हता.

तो पायीं परत आलेला पाहून बायकोनें विचारलें—"खाल्ल्या प्याल्याशिवाय कोठें गेलां होतां ? आणि घोडा कोठें आहे ? पायीं कां आलांत ?"

"घोडा होय ? बिचाऱ्या मुजोला उन्हांतान्हांत पायीं चालावें लागतें म्हणून त्याच्या त्या मित्राबरोबर घोडा देखील पाठवून दिला आहे." स्मित करून शेतकरी म्हणाला आणि खायला बसला.





# हंडा भरून सोनें

एका जमीनदाराच्या गांवांत एक गरीब शेतकरी रहात असे. जमीनदारानें त्याला थोडीशी पडीत जमीन दिली होती. शेतकरी दिवसभर शेतांत काम करी. संध्याकाळच्या वेळीं जवळच्या तलावांत जाळें टाकून चार मासे धरून घेऊन येई. त्याची बायको स्वभावानें अगदीं भोळी होती.

एकदां शेत नांगरीत असतां त्याचा नांगर कोणत्यातरी वस्तूस लागून अडला. शेतकऱ्यानें जवळ जाऊन पाहिलें तर एक हंडा होता. त्यानें जमीन खणून हंडा बाहेर काढला तेव्हां त्याला सोन्याच्या मोहरा भरलेला हंडा सांपडला.

त्यानें विचार केला, दिवसां हा हंडा घेऊन जाणें बरोबर होणार नाहीं. लोक विचारतील व जमीनदार सर्व हंडा आपल्या घरीं घेऊन जाईल.

पण हंडा मोठा होता. बायकोला मदतीला बोलावण्याचें त्यानें ठरविलें. पण बायकोच्या पोटांत कोणतीहि गुप्त गोष्ट पचत नाहीं हें त्याला माहीत होतें. म्हणून त्यानें विचार करून एक बेत केला.

संध्याकाळ झाल्यावर त्यानें बाजारांत जाऊन कांहीं मासे व एक कोंबडी विकत घेतली. त्यानें मासे कोंबडी ठेवायच्या टोपल्यांत भरले आणि कोंबडी जाळ्यांत घालून जाळें पाण्यांत टाकून आला.

बायको म्हणाली—"रोज रिकाम्या हातांनीं येतां, काय शिजवूं आणि काय वाढूं ?"

"उगाच तक्रार करायची तुला संवयच झाली आहे. बाहेर पाहून तर ये कीं टोपल्यांत काय आहे तें. तलावांत जाळें टाकून आलों आहें. कदाचित त्यांतहि कांहीं सांपडलेंच असेल." शेतकरी म्हणाला.

श्री. वा. रा. मराठे


Fullscreen 127




54 / 84





दोघे बाहेर आले. कोंबड्याच्या टोपलींत मासे पाहून बायकोला आश्चर्य वाटलें—"अगोबाई! एवढे मोठे मासे?" तळ्यांतून जाळें काढलें तर त्यांत कोंबडी. ती चकित झाली.

तो म्हणाला—"अग! एवढेंच काय आपल्या शेतांत धान्यच काय सोनें देखील पिकतें. आज सोन्यानें भरलेला हंडा सांपडला आहे मला. पण हें पहा, ही गोष्ट या कानाची त्या कानाला कळतां कामा नये. जर बोललीस तर हंड्यांतली एक मोहर देखील आपल्याला मिळावयाची नाहीं."

दोघें रात्रीं काळोखांत शेतांत गेलीं. तेथें शेतकऱ्यानें पहिल्यापासून एका भांड्यांत तांबडें पाणी व एक ल्हानशी डहाळी जवळ तोडून ठेवली होती. शेतकऱ्यानें डहाळी त्या पाण्यांत भिजवून बायकोच्या अंगावर पाणी शिंपडलें.

बायको ओरडली—"अगोबाई! पाऊस पडतो आहे कीं काय?" तिनें आकाशाकडे पाहिलें, आकाश अगदीं निरभ्र होतें. ती म्हणाली—"निरभ्र आकाशांतून पाऊस कसा बाई!"

"अग! निरभ्र आकाशांतून पाऊस पडतो ना तेव्हां रक्ताचा पाऊस पडतो!" शेतकरी म्हणाला.

नंतर दोघांनीं मिळून हंडा बाहेर काढला आणि घरीं घेऊन गेलीं. घरीं जात असतां जमीनदाराच्या गोठ्यांत गाई ओरडूं लागल्या. शेतकऱ्याच्या बायकोनें विचारलें—"हें काय बाई?"

"कांहीं नाहीं! जमीनदाराला भुतें उचलून घेऊन गेलीं आहेत. म्हणून गाई रडत आहेत." शेतकऱ्यानें थाप मारली.

बायकोला सर्व गोष्टी खऱ्याच वाटल्या. दोघें नवरा बायको तो हंडा घेऊन सुखरूप घरीं पोंचलीं. त्यांनीं एका जागीं जमिनीखालीं तो हंडा पुरून ठेवला. बायको दमून गेली होती. म्हणून लगेच झोंपीं गेली. परंतु शेतकऱ्याला झोंप येईना. बायकोला छान झोंप लागल्यावर तो उठला व जमिनींत पुरलेला हंडा काढून त्यांतल्या सर्व मोहरा त्यानें दुसरीकडे पुरून ठेवल्या आणि हंडा पुन्हां मागच्या जागीं पुरून ठेवला. नंतर तो देखील झोपला.

सकाळीं उठल्यावर बायकोनें नवऱ्याजवळ चार मोहरा मागितल्या. म्हणाली—"दोन चार नवीं लुगडीं घ्यावीं म्हणतें."

नवरा म्हणाला—"असा खर्च करूं लागलीस तर लोकांना कळेल कीं तुझ्याकडे पुष्कळ पैसे आहेत!"

नवरा बायकोचें त्यावरून भांडण झालें. बायको विहिरीवर पाण्याला गेली तेव्हां शेजारणींना म्हणाली—"घरांत एवढा सोन्याच्या मोहरांनीं हंडा भरला आहे, पण आमचे हे ऐकतील तर ना!"

शेजारणीनें विचारल्यावरून तिनें कानांत सांगितलें कीं कोणाजवळ सांगूं नकोस आम्हांला शेतांत सोन्यानें भरलेला एक हंडा सांपडला आहे."







Fullscreen 127 56 / 84

संध्याकाळपर्यंत गांवभर ही बातमी पसरली. जमीनदाराला सुद्धां कळली. त्याला राग आला. शेतकऱ्याच्या घरीं गांवकऱ्यांना बोलावून घेऊन गेला आणि रागानें म्हणाला— "तुला मी पडीत शेत होतें म्हणून नांगरीत जा म्हटलें. शेतांत सोन्यानें भरलेला हंडा सांपडला आणि मला बातमीच नाहीं ?"

"सोन्याचा हंडा ! कोणी सांगितलें मालकांना ? मालकांचा कांहींतरी गैरसमज झाला आहे !" खरी गोष्ट लपवीत शेतकऱ्यानें बतावणी केली.

"तूं आणि तुझी बायको दोघं शेतांतून नाहीं का आणलात हंडा ? तुझ्याच बायकोनें सांगितलें !" जमीनदार म्हणाला.

शेतकऱ्यानें बायकोकडे डोळे वटारून पाहिलें तेव्हां ती म्हणाली—"डोळे वटारून पाहल्यानें काय होतें आहे ? आपण दोघांनीं नाहीं का तो हंडा उचलून आणला ?"

"केव्हां ?" शेतकऱ्यानें चकित होऊन विचारलें.

"मी विसरलें असें वाटतें होय तुला ? ज्या दिवशीं माशांच्या जागीं कोंबडी तुझ्या जाळ्यांत सांपडली होती त्या दिवशीं !" म्हणाली.

तें ऐकून सर्व लोक खदखदां हंसूं लागले. शेतकरी सुद्धां मोठ्यानें हंसला.

बायकोनें विचारलें—"हंसायला काय झालें ? त्या दिवशीं रात्रीं आकाश निरभ्र होतें आणि रक्ताचा पाऊस पडला. जमीनदाराला भुतें धरून नेत होतीं म्हणून गाई रडूं लागल्या.

आतां मात्र जमीनदाराची खात्री पटली कीं शेतकऱ्याच्या बायकोला वेडच लागलें असावें. "या वेडीच्या बोलण्यावर काय जातां ?" म्हणत सर्व लोक निघून गेले.

शेतकरी काम फत्ते झाल्याबद्दल आनंदानें हंसत घरांत निघून गेला.





# नवा जावई

जेवण झाल्यावर आजोबा चांदण्यांत आराम-खुर्ची टाकून बसले व नाकांत तपकीर कोंबीत त्यांनीं हा श्लोक म्हटला—

"आहारे व्यवहारे च
त्यक्तलज्जः सुखीभवेत्;
अन्यथास्यात् परीभवी
दुःखभाक च नसंशयः ।"

तो श्लोक ऐकून मुलें म्हणूं लागलीं— "आजोबा, याचा अर्थ सांगा ! आम्हांला नाहीं कळला अर्थ !"

"या श्लोकाचा अर्थ असा आहे कीं आहारांत व व्यवहारांत लाजलज्जा दाखवून भागत नाहीं. न लाजणाराच सुखी होतो. पण जो संकोच करतो किंवा लाजतो त्याला अपमान व कष्ट सहन करावा लागतो !" आजोबा म्हणाले.

"बरोबर आहे, आजोबा तुमचें म्हणणें. आज डाळिंबा काय छान झाला होता. मी खूप हात मारला डाळ ब्यांवर." एक नातू म्हणाला.

"थांब रे ! मधें नको बोलूस. आधाशी ठाळांबा खाणारा ! आजोबा पुढें सांगा गोष्ट !" दुसरा नातू म्हणाला.

त्यावर दोघांचें भांडण सुरू झालें. त्यांना थांबायला सांगून आजोबा गोष्ट सांगूं लागले. एका गांवीं गणेश नांवाचा मुलगा होता. तो स्वभावानें फार संकोची होता. पुढें कांहीं दिवसांनीं त्याचें लग्न झालें. सासुरवाडीं त्याला जावें लागलें, दिवाळी साठीं. सासुरवाडचीं मंडळीं सर्वच नवीं. तो कोणाशीं बोलत नसे. त्याला त्या गांवीं चुकल्या चुकल्यासारखें वाटूं लागलें.

दिवाळीसाठीं निरनिराळ्या प्रकारचीं पक्वान्नें सासुरवाडीं तयार केलीं होतीं. पक्वान्नें पानांवर वाढायला आलीं तरी

श्री. मा. गो. सरदेसाई


Fullscreen




58 / 84


संकोच केल्यामुळें त्याला पोटभर खायला नाहीं मिळालीं. आग्रह करून त्याला जीं पक्वान्नें वाढली होतीं तीं देखील त्यानें लोक हंसतील, खादाड म्हणतील असें समजून खाल्लीं नाहींत.

एकदां त्याच्या सासूबाई चटण्या कोशिंबिरीं बरोबर तिळकूट वाढायला घेऊन आल्या. त्यानें तिळकुटाला हात देखील लावला नव्हता. पण गोड पदार्थांबरोबर तोंडी लावायला म्हणून बरें लागत होतें. त्यानें तिळकूट नको म्हटलें. पण खाल्ल्यावर त्याला इतकें आवडलें कीं त्याला आणखी खावें असें वाटलें चूक झाली आपली. पहिल्यानेंच खाऊन पाहिलें असतें तर नको नसतें म्हटलें.

जेवणें आटोपल्यावर सर्व झोपले. पण गणेशला झोंप येईना. तो उठला आणि तिळकुटाचा डबा हुडकूं लागला. तिळकूट खाण्याची इच्छा त्याच्या मनांत अनावर उत्पन्न झाली.

हिंडत हिंडत तो खलबत्त्याजवळ आला. तेव्हां तिळकुटाचा खमंग वास त्याला आला. खलबत्ता पडवींतच ठेवलेला होता. त्यानें बत्ता उचलला आणि चाटूं लागला. नंतर त्यानें खलांत तिळकूट होतें तें चाटायला सुरवात केली आणि त्याच्या दुर्दैवानें त्याचें डोकें आंत अडकलें.

खुडबुड ऐकून लोक जागे झाले. पाहतात तर जांवईबापूंचें डोकें खलांत अडकलेलें. अर्थातच लोकांनीं थोडी खटपट करून खल काढला. पण एवढ्याशा तिळकुटाकरितां त्याची व त्याच्या बायकोची मान खालीं झाली. जर निस्संकोचपणें तिळकूट वेळींच मागून खाल्लें असतें तर कांहीं बिघडलें असतें का ?






[ २ ]

दुसऱ्या दिवशीं राजा आकाशांतील रंगमहलांत पोंचला तेव्हां त्याला त्या रात्रीं सुद्धां कोणी तरी आल्याचें दिसलें. त्यानें नेमलेले पाहारेकरी घोरत पडले होते हें देखील त्याला कळलें. पण कोणाला बोलणार व कोणाला विचारणार ? रागामुळें त्याच्या तोंडांतून शब्द निघेना.

राजधानींत बातमी पसरली कीं आकाशांतील रंगमहालांत राजकन्येबरोबर विहार करायला कोणीतरी रोज रात्रीं येतो जातो. कोणीतरी पक्का बस्ताद दिसतो ! लोकांची कुजबुज सुरू झाली—"राजा तिचें लग्न कां नाहीं करून टाकीत ?" त्यामुळें राजाला स्वतःच्या राजधानींतच तोंड दाखविणें कठीण झालें.

राजानें आपल्या एका हुशार मंत्र्याला बोलावून त्याचा सल्ला विचारला—"रंगमहालांत शिरणारा हा उपटसुंभ्या कोण आहे याचा शोध काढण्यासाठीं कांहींतरी युक्ति सांगा."

तो म्हणाला—"महाराज एक उपाय आहे. महालांतील प्रत्येक वस्तूवर लाल किंवा हिरवा रंग टाकून ठेवा. कोणी येऊन चिकटून उभा राहिला किंवा नुसता बसला तरी त्याच्या

Fullscreen 127 60 / 84



कपड्यांना रंग लागेल. मग त्याला पकडणें तितकेंसें कठीण जाणार नाहीं."

तो उपाय राजाला पसंत पडला. रात्रीं तो आकाशांतील रंगमहालांत गेला आणि तिथल्या खुर्च्यांवर व पलंगावर रंगाचा छिड-काव करून ठेवला. नेहमींप्रमाणें राजकुमार रात्रीं महालांत आला. रात्रभर महालांतच राहिला. सकाळीं उठून पुन्हां लाकडी घोड्यावर बसून तो निघाला. बाहेर उजेडांत आल्यावर त्याला कपड्यांना लागलेला रंग दिसला. त्याला संशय आला कीं कांहींतरी भानगड आहे. त्यानें आपला कोट काढून फेंकून दिला. त्या कोटाला हिरे मोती व जर होती. पण त्यांची पर्वा करून कसें चालेल, असा विचार करून त्यानें तो कोट टाकला होता.

राजधानींत एक म्हातारा गरीब माणूस रहात असे. तो पहाटे उठून गांवभर फिरे. रस्त्यावर जें कांहीं मिळे उचलून घेऊन जाई. त्या दिवशीं सुद्धां तो नित्याप्रमाणें हिंडत असतां त्याला आनंद झाला. त्यानें उचलून पाहिला तर जर व मोती त्यावर त्याला दिसले. त्याला जणुं कांहीं हर्षरोगच झाला.

"त्या अल्लाची मेहेरबानी दिसते आहे. आयुष्यभर मनोभावें त्याची प्रार्थना केली त्याचें फळ आज लाभलें." त्यानें जमिनीला डोकें टेंकून देवाचे आभार मानले आणि आनंदानें कोट घेऊन घरीं गेला.

रोज संध्याकाळच्या नमाजीला लोक मशीदींत येत. त्यावेळीं तो कोट घालून मोठ्या ऐटींत मशीदींत गेला. पण बिचाऱ्याला कोठें माहीत होतें कीं त्याच्यावर केवढें मोठें संकट आलें आहे तें. कोणी आपल्या कोटा-कडे पाहून कौतुक करतो का पहात तो चालला होता.

मशिदीच्या दरवाज्यावर राजाचे शिपाई येणाऱ्या जाणाऱ्यांच्या कपड्यांकडे पहात






बसले होते. त्यांची नजर नेमकी ह्या म्हाताऱ्याच्या कपड्यावर पडली. तो नमाज करी-पर्यंत कोणी त्याच्या अंगाला हात लावला नाहीं. पण तो उठून परत जाऊं लागल्या-बरोबर त्यांनीं त्याला धरलें व त्याच्या मुसक्या बांधून त्याला राजासमोर हजर केला.

त्या म्हाताऱ्याला पाहून व त्याच्या अंगावरील रंग लागलेले कपडे पाहून राजा इतका भडकला कीं त्यानें म्हाताऱ्याच्या तोंडांत दोन सडकावल्या आणि विचारलें—"कोठें गेला होतास रात्रीं? आणि हा कपड्यावरचा रंग कोठें लावून घेतलास?"

"महाराज, मी गरीब फकीर आहें. मला हा कोट आज सकाळीं गल्लींत पडलेला सांपडला. मी रात्रीं कोठें गेलों नाहीं." म्हातारा म्हणाला.

"चल चल! तुझे छक्के पंजे माझ्याजवळ नाहीं चालणार!" असें सांगून त्यानें शिपायांना त्याला काळ कोठडींत टाकायला आणि अपराध कबूल करीपर्यंत बडवून काढायला सांगितलें.

त्याचा कांहीं अपराध नसून कदाचित सुटका मिळेल, निदान मार तरी खावा लागणार नाहीं असा विचार करून म्हाताऱ्यानें रात्रीं महालांत गेल्याचें कबूल केलें. राजानें त्याला फांशीच्या शिक्षेचा हुकूम सोडला. शिपाई त्याला घेऊन वध्यस्थाना-कडे निघाले.

त्या अपराध्याला पाहण्यासाठीं हजारों नागरिक जमा झाले होते. गांवांत चोर पकडला गेल्याची वार्ता पसरली होती. म्हणून गंमत पाहणारांची खूप गर्दी होती.

पण त्या म्हाताऱ्याला पाहून लोकांना आश्चर्याचा झटकाच बसला—"या म्हाताऱ्यावर का राजकुमारी भाळली!" लोकांनीं पूर्वी त्या म्हाताऱ्याला पाहिलें होतें. तो

Fullscreen 127 62 / 84




कधीं आकाशांतल्या महालांत जाईल या गोष्टीवर कोणाचा विश्वासच बसेना. ह्या म्हाताऱ्याला फांशी देणें म्हणजे चवाठ्यावर जमा होऊन बिचाऱ्याचा खून करण्यासारखें आहे.

राजकुमाराला जेव्हां ही गोष्ट कळली तेव्हां तो आपला घोडा घेऊन वध्यस्थानीं आला. तो तेथें पोंचला तोंपर्यंत त्याच्या गळ्यांत फांस अडकवण्यांत आला होता. तो ओरडला—"थांबा! त्या म्हाताऱ्याला फांशी नका देऊं. अपराधी मी आहें. मला फांशी द्या. त्या गरीब म्हाताऱ्याच्या अंगावर जो कोट आहे तो माझा आहे. तो निरपराध आहे. सोडा त्याला."

राजकुमाराचा तो आवाज ऐकून कोतवालाला तें खरें वाटलें व त्यानें म्हाताऱ्याच्या गळ्यांतला फांस काढायला सांगितलें. त्यानें राजाकडे एका शिपायाला पाठवून वस्तुस्थिति कळवून पुढें काय हुकूम आहे विचारून यायला सांगितलें. त्या माणसानें जाऊन सलाम केला व निवेदन केलें—"महाराज! कोणीतरी तरुण आला आहे व त्यानें तो खरा अपराधी असल्याचें सांगितलें आहे. कोतवाल साहेबांनीं विचारलें आहे कीं आतां त्याला फांशी द्यायची कीं म्हाताऱ्याला?"

"ज्या तरुणानें अपराध स्वीकार केला आहे त्याला फांशी देण्यांत यावी!" असा राजानें हुकूम दिला. त्यानें विचार केला, शक्य आहे, तोच शिरला असेल महालांत.

राजाची आज्ञा मिळतांच म्हाताऱ्याच्या गळ्यांतला फांस काढण्यांत आला व त्या तरुणाला धरण्यासाठीं शिपाई धांवले. परंतु त्या पूर्वींच राजकुमारानें आपल्या लाकडी घोड्यावर बसून कळ दाबली होती. राजा दुरून तें दृश्य पाहून दांत ओठ चावून ओरडूं लागला—"पकडा त्याला! पकडा त्याला!" पण काय उपयोग?

राजकुमार सरळ आकाशांतल्या महालांत जाऊन राजकुमारीला भेटला. म्हणाला—"आतां एवढें सारें झाल्यावर आपण दोघांनीं पळून तरी गेलें पाहिजे नाहींतर आपल्या दोघांची ताटातूट तरी होणार."

राजकुमारी म्हणाली—"आतां मी तुझ्याशिवाय एक क्षणभर देखील जिवंत राहणें शक्य नाहीं. आतां तूं नेशील तिकडे यायला मी तयार आहें."

राजकुमार म्हणाला—"तर मग चल!" असें सांगून राजकुमार आपल्या लाकडी घोड्यावर राजकुमारीला घेऊन बसला व दोघें आकाशांत उडूं लागलीं.

तीं दोघें उडत उडत पुष्कळ दूर निघून गेलीं. एका वाळवंटावरून उडत जात असतां राजकुमारी म्हणाली—"अहो, पण एक चूक झाली. आपल्याला परत जावें लागणार."

"कां?" राजकुमारानें विचारलें.

"लहानपणीं माझ्या आईनें दोन रत्नहार पेटींत ठेवले होते आणि म्हणाली होती कीं माझें लग्न होईल तेव्हां ते माझ्या सासू-







सासऱ्यांना अहेर म्हणून द्यायचे. घाईंत मी ते काढून घ्यायला विसरले. ते घेतल्या शिवाय जाणें मला बरें वाटत नाहीं." राजकुमारी म्हणाली.

"जाऊं दे. ते गेले तर गेले. आपण आतां किती दूर आलों आहों!" राजकुमार म्हणाला.

"नाहीं! ते घेतल्याशिवाय मी नाहीं येणार सासरीं. लग्नाच्या वेळीं ते रत्नहार नाहीं द्यायचे तर केव्हां द्यायचे? आयुष्य-भर मला सासरीं खालीं पहावें लागेल." राजकन्या म्हणाली.

























आपल्या प्रेमिकेच्या त्या हट्टाकडे दुर्लक्ष करणें राजकुमाराला देखील रास्त वाटलें नाहीं. म्हणून त्यानें घोड्याची कळ सैल केली आणि वाळवंटांत उतरला. म्हणाला— "मी येथें तुझी वाट पहात राहीन. तूं लवकर ते रत्नहार घेऊन परत ये!" कळ कशी दाबायची हें राजकुमारीला सांगून त्यानें राजकुमारीला निरोप दिला.

राजकुमारी घोड्यावर बसून ज्या वाटेनें आली होती त्याच वाटेनें आपल्या महालांत येऊन पोंचली.

तिकडे राजा, राजकुमार आकाशांत उडून गेल्यावर व शुद्ध आल्याबरोबर प्रथम आकाशांतील महालांत पोंचला. पण तोपर्यंत राजकन्या राजकुमाराबरोबर पळून गेली होती. तो हताश होऊन छाती बडवून रडूं लागला. पण त्याच वेळीं त्याला दुरून राजकन्या घोड्यावर बसून उडत येत असलेली दिसली. म्हणून त्याला आनंद झाला.

राजा एका पलंगामागें लपून उभा राहिला. ती महालांत आल्याबरोबर त्यानें तिचा हात धरला व तिला आकाशांतल्या महालांत ठेवण्याचा विचार सोडून तिला घेऊन आपल्या महालांत आला.






Fullscreen 127 66 / 84

आजपर्यंत राजानें आपल्या मुलीचें लग्न करावयाचें नाहीं असा विचार केला होता. पण त्याचा विचार आतां बदलला. त्यानें मुलीचें लग्न लवकर उरकून घेण्याचें ठरविलें. त्यानें मुलीकरितां चांगला वर शोधण्याचें काम आपल्या मंत्र्यांकडे दिलें. पण या राजकन्येबरोबर लग्न कोण करणार? राजधानींतच नव्हे तर राज्यभर आकाशांतल्या महालांत घडलेल्या प्रकाराची बातमी पसरली होती. पाण्यासारखा पैसा ओतून राजा मुलीचें लग्न करून द्यायला तयार होता.

पूर्वीं दूर देशांतल्या एका राजाचा मुलगा सांगून आला होता. राजकन्येच्या सौंदर्याचें वर्णन ऐकून त्यानें राजकन्येला मागणी घातली होती. पण तेव्हां राजानें नकार दिला होता. "आमची मुलगी अजून लहान आहे. लग्नाचें वय झाल्यावर आम्ही स्वतःच निरोप पाठवूं." असें त्यानें कळविलें होतें.

ती गोष्ट राजाला आठविली. त्यानें विचार केला कीं आकाशांतल्या महालांत घडलेला प्रकार इतका दूरवर कोणाला कळला नसेल. मी आपली मुलगी द्यायला तयार आहे असें कळविलें तर ते लोक धांवत येतील असें राजाला वाटलें.

त्यानें एका विश्वस्त माणसाला बोलावून निरोप पाठविला कीं आमच्या राजकन्येला आपल्या राजकुमारासाठीं आपण मागें एकदां मागणी घातली होती. पण त्यावेळीं मुलीचें वय विवाह योग्य नव्हतें म्हणून नाइलाजानें आम्हांला नकार द्यावा लागला. आतां आमची मुलगी विवाह योग्य झाली आहे. तरी आपल्याला हा संबंध मान्य असेल तर आपली पसंती कळवावी म्हणजे लग्नाची तयारी सुरू करण्यास बरें पडेल. या विवाहानें दोन दूरचीं राजघराणीं जवळ येणार आहेत वगैरे वगैरे! [पुढील गोष्ट पुढील अंकीं]





# काजीहून पाजी थोर

एका सुल्तानाच्या मनांत एकदां लहर आली कीं आपल्या काजीला एखादी पदवी बहाल करून त्याचा सत्कार करावा. म्हणून त्यानें काजीला बोलावून म्हटलें—"मी तुम्हांला एक पदवी बहाल करण्याचें ठरविलें आहे. पण त्या पदवीच्या लायक तुम्ही आहां कीं नाहीं हें पाहण्यासाठीं मी तीन प्रश्न विचारतों. पहला प्रश्न खुदा (ईश्वर) कोठें राहतो? दुसरा प्रश्न, तो कोणत्या दिशेला पाहतो? व तिसरा प्रश्न आहे, तो काय करतो?"

लहरी सुल्तान! प्रश्नांचीं उत्तरें समाधान कारक मिळाली नाहींत तर शिक्षा केल्या-शिवाय राहणार नाहीं हें ओळखून काजीनें एका आठवड्याची मुदत मागितली. सुल्ता-नानें मुदत दिली. काजी घरीं जाऊन रात्रंदिवस विचार करूं लागला कीं काय उत्तर द्यावें. पण उत्तर सुचेना.

एक आठवडा जायला किती उशीर? पण उत्तर सुचलें नाहीं. म्हणून टाळाटाळ करण्यासाठीं त्यानें आपल्या नोकराच्या हातीं निरोप पाठवायचें ठरविलें. तो नोकराला नेहमीं पाजी म्हणूनच हाक मारी.

हाक मारल्याबरोबर पाजी हजर झाला. काजी म्हणाला—"जा, बादशहांना जाऊन सांग कीं काजी साहेब आजारी आहेत?"

पाजीनें विचारलें—"पण मालक, आजारी पडायला आपणांला काय झालें?"

काजी रागानें म्हणाला—"तुला मी उगीच नाहीं पाजी म्हणत!" पण शेवटीं नाइलाजानें त्याला खरें कारण सांगावें लागलें. पाजी म्हणाला—"या प्रश्नांचीं उत्तरें मी सांगतों. लिहून द्या. आपल्या तर्फे मी हीं उत्तरें पोंचती करतों. सुल्तानाला राग आला तरी तो माझेंच डोकें कापील."

सौ. मंगला पाटणकर


Fullscreen
127




68 / 84



पाजीनें सांगितलेलीं उत्तरें एका कागदावर लिहून काजीनें दिलीं. तीं उत्तरें वाचल्या शिवायच सुलतानानें पाजीला विचारलें— “मी काजी साहेबांना जे प्रश्न विचारले होते त्यांचीं उत्तरें तूं देऊं शकतील का?”

“हुजूर, मी उत्तर द्यायला तयार आहें. पण एका अटीवर, आपण मला गुरु मानलें पाहिजे!” पाजी म्हणाला.

सुलतानानें त्याला चांगले कपडे घालायला दिले व सिंहासनावर बसून उत्तरें द्यायला सांगितलें.

“खुदा कोठें राहतो?” काजीनें विचारलें.

पाजी म्हणाला—“दुधांत लोणी असतें पण कोठें सांगूं शकाल का? तसाच खुदा सर्व जग व्यापून राहतो.”

सुलतानानें दुसरा प्रश्न केला—“खुदा कोणत्या दिशेला पाहतो?”

पाजी म्हणाला—“दिव्याचा उजेड कोणत्या दिशेला पडतो? सर्वच दिशांना. तशीच खुदाची नजर सर्वच बाजूंना असते.”

“खुदा करतो काय?” सुलतानानें शेवटचा प्रश्न केला.

पाजी म्हणाला—“मी उत्तर सांगतों पण काजीसाहेबांसमोर. त्यांना बोलवा.”

सुलतानाचा हुकूम, काजीसाहेबांना दरबारांत हजर व्हावें लागलें. पाजीला सिंहासनावर बसलेला पाहून काजीसाहेब चकित झाले व म्हणाले—“हुजूर या पाजीला सिंहासनावर बसविलेंत?”

पाजी म्हणाला—“हुजूर! आपल्या शेवटच्या प्रश्नाचें हेंच उत्तर आहे. रंकाला राजा, राजाला रंक, पाजीला काजी आणि काजीला पाजी करणें हेंच काम खुदा करतो.”

सुलतान उत्तर ऐकून खूष झाला व त्यानें पाजीला काजीच्या पदावर नेमलें.





# शेतकऱ्याचें गाऱ्हाणें

एका गांवीं एक शेतकरी रहात असे. तो दिवसभर शेतावर काम करी. त्याच्याकडे एक गाय होती पण गाईला चारा आणायला देखील त्याला सवड मिळत नसे. गाय कधीं कधीं उपाशीच राही.

शेतकऱ्याच्या घरा शेजारींच एका श्रीमंताचें घर होतें. त्यानें आपल्या घराभोवतीं गुरांसाठीं पुष्कळ गवत लावून एक कुरण वाढवलें होतें. एकदां शेतकऱ्याची गाय दावें तोडून पळाली आणि त्या श्रीमंताच्या कुरणांत शिरली.

त्या श्रीमंताच्या नोकरानें येऊन त्या गाईच्या टाळक्यांत एक मोठें लाकूड मारलें. तिरिमिरी येऊन भुकेली गाय खालीं पडली व तेथेंच गार झाली.

बिचारा शेतकरी त्या श्रीमंताकडे नोकराविरुद्ध तक्रार घेऊन गेला. श्रीमंतानें त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें आणि नोकराला बोलावून शेतकऱ्याला धक्के मारून घराबाहेर काढण्यास सांगितलें. नोकरानें त्याला घराबाहेर ढकलून एका खांबाला बांधलें आणि ढोरासारखें बडविलें.

बिचारा शेतकरी बेशुद्ध होऊन पडला तेव्हां नोकरानें त्याला सोडलें. शेतकरी घरीं आला. त्याची बायको त्याला म्हणाली— “तूं राजदरबारीं जा! हा श्रीमंत नाहीं कसाई आहे. राजाच्या कानावर गाऱ्हाणें गेलें तर तो खात्रीनें न्याय करून अपराध्याला दंड करील.”

पण अर्ज लिहून कोण देणार? सगळे शिकलेले लोक श्रीमंताचीच बाजू घेणार. गरिबाचा वाली कोण? शेतकऱ्याला लिहितां वाचतां येत नव्हतें. पण घरांत मुलाची पाटी होती. ती घेऊन शेतकऱ्यानें तिच्यावर

श्री. का. ना. नवरे

Fullscreen 127 70 / 84



पेन्सिलीनें कांहीं खुणा केल्या. त्याचें घर, श्रीमताचें घर, कुरण, गाय कोठें मेली, नोकरानें त्याला कोठें मारलें वगैरे, सर्व गोष्टींचें जणुंकांहीं छान चित्रच त्यानें त्या पाटीवर रेखाटलें.

बायकोनें पण चित्र पाहिलें आणि म्हणाली—"काय छान चित्र आहे ? राजाला सर्व कळेल. जाऊन द्या."

तिनें झुणका भाकर करून दिली. ती घेऊन शेतकरी निघाला. दुपारच्या वेळीं कडक ऊन पडल्यावर तो एका ओढ्याकाठीं पोंचला. तेथें झाडाखालीं एक शिकलेला माणूस पाहून तो जवळ गेला आणि म्हणाला—"दादा ! मी राजाकडे चाललों आहे हा अर्ज घेऊन." त्यानें त्या माणसाला पाटीवरचें चित्र दाखविलें व तोंडानें गाय कशी कुरणांत शिरली. नोकरानें तिला कोठें ठार केलें व त्याला कोठें बांधून मारलें वगैरे गोष्टींचें छान वर्णन करून सांगितलें.

तें चित्र पाहून व शेतकऱ्याच्या तोंडून सर्व वर्णन ऐकून तो मनुष्य म्हणाला—"तुझा अर्ज तर अगदीं बरोबर आहे. राजाला नेऊन दे. राजा खात्रीनें तुझ्या बाजूनेंच न्याय देईल. तो श्रीमंत मनुष्य नाहीं, राक्षस असला पाहिजे आणि तो नोकर नोकर नसून कसाई असला पाहिजे."

तें ऐकून शेतकरी खूष झाला. त्यानें त्या माणसाला आशीर्वाद दिला—"बाबा ! देव तुला पुढल्या जन्मीं राजा करील." नंतर आपली शिदोरी सोडीत म्हणाला—"ये, थोडी झुणका भाकर खा आणि पाणी पी ! दुपार झाली आहे."

त्या माणसानें झुणका व अर्धी भाकरी शेतकऱ्याबरोबर बसून खाल्ली. शेतकऱ्यानें पण भाकरी खाल्ली व ओढ्याचें पाणी पिऊन झाडाखालींच आडवा झाला. तो मनुष्य



शेतकऱ्याचा निरोप घेऊन निघून गेला. जातांना म्हणाला—"देवाच्या दयेनें पुन्हां कधीं भेट झाली तर भेटूं व बोलूं." शेतकरी झाडाखालीं पडून विचार करूं लागला—"हा मनुष्य कोणी मोठा मनुष्य दिसतो आहे. किती प्रेमानें बोलला ? किती प्रेमानें वागला. दिसतो आहे श्रीमंत. पण माझा शेजारी श्रीमंत कोठें आणि हा कोठें ? विचार करीत असतां त्याचा डोळा लागला. त्याला स्वप्न पडलें. स्वप्नांत त्याला पुन्हां तो मनुष्य दिसला. पण तो सिंहासनावर बसला होता. त्याच्या अंगांत ते साधे स्वच्छ कपडे नव्हते. मुकुट व राजाचा पोशाख होता.

पण त्याची झोंप मोडली तेव्हां तो त्या झाडाखालींच होता. त्याला आश्चर्य वाटलें.

दुसऱ्या दिवशीं शेतकरी पाटी हातांत घेऊन राजाच्या दरबारीं पोंचला. राजा दरबारांत सिंहासनावर बसला होता. त्यानें स्वप्नांत पाहिला होता तसाच पोशाख व तसाच मुकुट. पण दूर बसला असल्या-कारणानें त्याचा चेहरा मात्र शेतकऱ्याला दिसला नाहीं. राजाच्या दोन्ही बाजूला दरबारी बसले होते. अगदीं टोंकाला बस-



लेल्या दरबाऱ्यानें विचारलें—"कोण रे तूं ? कशाला आला आहेस इथें ?"

शेतकरी म्हणाला—"मालक ! अर्ज आहे हा ! न्याय मागायला आलों आहे राजा-कडे !" असें सांगत त्यानें ती पाटी त्या दरबाऱ्याच्या हातांत दिली.

दरबाऱ्यानें पाटी पाहिली. त्यावर कांहीं रेघा, फुल्या, ठिंबे वगैरे पाहिलीं. पण त्याला कांहीं त्यांचा अर्थ कळेना. म्हणून त्यानें आपल्या शेजारच्या दरबाऱ्याच्या हातीं ती पाटी देत विचारलें, तुम्हांला कळलें का कांहीं ?" दुसऱ्यानें तिसऱ्याला, तिसऱ्यानें

Fullscreen 127 72 / 84

चवथ्याला व अशा तऱ्हेनें एका मागून एक सर्वांनीं आपल्याहून पुढल्याला ती पाटी देत तोच प्रश्न विचारला. पण कोणालाहि त्या पाटीवरच्या रेघोट्यांचा बोध झाला नाहीं. शेवटीं शेतकऱ्यानें राजाच्या हातांत पाटी दिली. त्यानें राजाकडे पाहिलें तेव्हां त्याला ओळख पटली. त्याच्याबरोबर झुणका भाकर खाणारा तोच मनुष्य राजा आहे तर. स्वप्नां-तली गोष्ट खरी ठरली.

राजानें दरबाऱ्यांना विचारलें—"तुम्हांला नाहीं का कळलें कीं याचा अर्थ काय आहे हें. मग त्याला कां नाहीं विचारलेंत?" नंतर त्यानें शेतकऱ्याला प्रत्येक खुणेचा अर्थ विचारला आणि म्हणाला—"मी वाचला तुझा अर्ज. आतां तूं घरीं गेलास तरी चालेल. तुला घरीं गेल्यावर मी न्याय काय दिला हें कळेल." असें सांगून राजानें त्याला त्याची पाटी देऊन निरोप दिला.

शेतकरी सर्व दरबाऱ्यांकडे मोठ्या ऐटीनें पहात निघून गेला. त्याच्या मनाचें समाधान झालें होतें कीं आपल्याला न्याय मिळणार.

राजानें आपल्या शिपायांना पाठवून चवकशी करविली आणि त्या श्रीमंताला व नोकराला धरून दरबारांत हजर करण्यास सांगितलें. दोघांच्या जबान्या घेऊन न्याय दिला कीं श्रीमंतानें प्रथम शेतकऱ्याची माफी मागावी. त्याला पांच गाई द्याव्या व त्या गाईंना एक वर्षभर पुरेल इतका चारा द्यावा. नंतर त्यानें त्या अत्याचारी नोकराला शेतकऱ्याच्या घरीं सहा महिने शेणगोठा करण्याची शिक्षा दिली.

राजाचा न्याय ऐकून शेतकऱ्याची बायको म्हणाली—"राजा असावा तर असा, गरिबाचा वाली."

राज्यभर राजाच्या न्यायाची प्रजेनें वाखाणणी केली.





"मी म्हटलें तशी तुम्ही रात्रीं खिडकी उघडी ठेवून झोपला होता कीं नाहीं? वाऱ्याबरोबर तुमची डोकेंदुखी उडून गेली असेल!"

"नाहीं हो–डोकेंदुखी वाढली. माझें घड्याळ आणि पर्स चोरीला गेली!"



"खरें सांगतों तुम्हांला, मी आयुष्यांत पाऊल ठेवलें तेव्हां खिशांत एक दिडकी देखील नव्हती माझ्या!"

"आणि मी जन्माला आलों तेव्हां फाकीटच काय कपडे किंवा खिसा देखील नव्हता."



"तूं म्हणतोस कीं हें तेल लावल्यानें केस खात्रीनें येतील?"

"हें काय विचारतां राव? मग काय थासलेट वाटलें आपल्याला? उद्यां वेळेवर सांपड-णार नाहीं म्हणून बरोबर एक फणी सुद्धां ठेवली आहे."



"तर मग तुम्हांला ठीक दिसत नाहीं म्हणतां? या बोर्डावर तुम्हांला किती ओळी वाचतां येतात पहा!"

"ओळी त्या देवालाच ठाऊक. प्रथम बोर्ड कोठें आहे, सांगा!"

चित्रकार : एस. शंकरनारायण

Fullscreen 127 12 / 84



# उषा

ब्रह्मदेवानें जेव्हां जगताची सृष्टि केली तेव्हां पाण्यांतून जमीनवर आली. भूचर, जलचर खेचर सर्वप्रकारचे प्राणी जन्मास आले. पण सूर्य नव्हता. सर्व प्राणी काळोखांतच हिंडत फिरत. मनुष्याच्या जातीला काळोखाचें व हिंस्र श्वापदांचें अधिक भय वाटे. काळोखामुळें मनुष्याला आपलीं कामें करणें देखील अशक्य होतें.

असाच कांहीं काळ लोटल्यावर मानवांच्या जातींत एक ज्ञानी पुरुष जन्मास आला. तो म्हणाला—"ब्रह्मदेवानें जेव्हां जगताची सृष्टि केली तेव्हांच त्यानें सूर्याची सृष्टि सुद्धां केली. आपल्याच पैकीं कोणी तरी तपश्चर्या करून सूर्याला प्रसन्न केलें तर तो आपल्याला प्रकाश व उष्णता देईल. मानवांच्या जातीचें जीवन सुखाचें होईल.

सर्वांना त्याचें म्हणणें पटलें. पण तपश्चर्या कोणीं करावयाची व सूर्याला कोणीं आळवून घेऊन यावयाचें ?

साठ वर्षांचा एक वृद्ध म्हणाला—"हें पहा ! मी वृद्ध झालों आहें. मी जगलों काय, मेलों काय, एकच ! परंतु माझ्या पायांत अजून जी शक्ति उरली आहे तिचा उपयोग करण्याचें मी ठरविलें आहे. मी सूर्याकडे जातों."

त्यावर एक तरुण म्हणाला—"काका ! हें तुम्हां वृद्धांचें काम नाहीं. कारण किती दिवस प्रवास करावा लागेल हें सांगणें शक्य नाहीं. मी जातों. सर्व हाल अपेष्टा सहन करण्याची शक्ति माझ्या अंगांत आहे. मीच जातों."

एक मुलगा म्हणाला—"हा प्रवास फार दिवसांचा आहे ना ? माझें वय फक्त दहा वर्षांचें आहे. वृद्ध होईपर्यंत मी सूर्यापर्यंत खात्रीनें पोंचूं शकेन. आपल्यापैकीं एकहि देखील हा दूरचा प्रवास पुरा करूं शकणार नाहीं."

सर्वांनीं विचार केला, त्या मुलाचें म्हणणें बरोबर दिसतें आहे.

पण एका तरुण स्त्रीनें पुढें येऊन म्हटलें—"तुम्ही सर्व चुकतां आहां. हा प्रवास एका पिढींत संपेल असा नाहीं. मीच ती जबाबदारी उचलतें. मला जाऊं द्या. माझ्या पोटांत मूल आहे. मी सूर्यापर्यंत पोंचूं शकणार नाहीं. पण माझा मुलगा सूर्यापर्यंत खात्रीनें पोंचूं शकेल. मानवांच्या जातीला खात्रीनें यश मिळेल."

त्या स्त्रीचें नांव उषा होतें. तिचें म्हणणें सर्वांस पटलें. निघतांना ती म्हणाली—"मी ज्या दिशेनें जात आहें त्या दिशेकडे डोळे लावून बसा. काम झाल्याबरोबर मी एक मोठा जाळ करून किंवा आपल्या मुलाकडून करवून सूचना देईन कीं सूर्याचें दर्शन मला झालें."

ती एका दिशेला चालूं लागली. सतत आठ महिने ती चालत राहिली. तेथें तिला थांबावें लागलें. तिला एक मुलगा झाला.












Fullscreen 127 14 / 84

नंतर मुलाला घेऊन ती प्रवास करूं लागली. दोघें पुष्कळ दूर निघून गेलीं.

उषाला जाऊन सत्तर वर्षें झालीं. ती एक म्हातारी झाली. तिनें एके दिवशीं आपल्या मुलाला बोलावून म्हटलें—"बाळ! आतां पुढें माझ्यानें चालवणार नाहीं. पुढला प्रवास तूंच पुरा कर. सूर्याचें दर्शन झालें व कार्य सिद्ध झालें म्हणजे एक मोठा जाळ कर. आपलीं जात भाई मंडळी वाट पहात बसली आहेत. जाळ पाहून कार्य सिद्ध झाल्याचें त्यांना कळेल.

उषानें जाळ करीन असें जातांना म्हटलें होतें. तो उजेड पाहण्यासाठीं लोक ज्या दिशेनें ती गेली होती त्या दिशेकडे डोळे लावून बसले होते. ती गेली तेव्हां पासून बरोबर शंभर वर्षांनीं लाल लाल उजेड दिसला. लोकांना आनंद झाला. "पहा, उषानें वचन दिल्याप्रमाणें काम पुरें केलें. आतां सूर्योदय होणार! चला कामाला लागूं या." असें म्हणत सर्व आपापल्या कामाला लागले.

सूर्योदय झाला. लोकांना प्रकाशाबरोबर सुख, संपत्ति व आरोग्य तिन्ही मिळालीं. जग सुखी झालें.

आज देखील लोक रोजचें काम सुरू करण्यापूर्वीं उषा ज्या दिशेला गेली होती त्या दिशेला पाहतात. लाल लाल उजेड दिसूं लागला म्हणजे उषेचें दर्शन झालें असें मानून कामाला लागतात. तिच्या पाठोपाठ सूर्याचें दर्शन होतें.

उषेच्या चरित्रावरून मनुष्याला हा देखील संदेश मिळाला आहे कीं कांहीं कांहीं मोठीं कामें एका मनुष्याच्या हातून पुरी होत नाहींत. कांहीं तर एका पिढींत देखील पुरी होत नाहींत. कित्येक पिढ्यांची मेहनत यशप्राप्तीस लागते.





# स्यमंतकमणि

## तृतीय अध्याय

उज्वल मणि तो गळयांत घालुन  
फुलून गेला प्रसेनजित।  
शिकारिला अन् नटुन निघाला  
मित्रांसंगें तो अगणित॥

घोड्यावरती करून स्वारी  
घेउनि शस्त्रें अनेक ते।  
वनीं पोंचले; करित कल्पना  
अपुल्या शौर्याची होते॥

दुरून पाहुन त्यांना हरणें  
पळूं लागलीं सोडुनि धीर।  
पाहुनि त्यांच्यावरती निर्दय  
प्रसेन सोडित होता तीर॥

वनांत आनंदानें होतीं  
चरत बागडत जीं हरणें।  
पळूं लागलीं प्राणभयानें  
तीव्र अतां सोडुन चरणें॥

अशी धांवपळ सुरू जाहली  
कीं वन दुमदुमलें सारें।  
चकित होउनी पाहुं लागले  
पशुपक्षी तिकडे सारे॥

प्रसेनजितला दिसलें तेव्हां  
हरिण एकटें एकिकडे।  
भटकत होतें गरिब बिचारें  
कळप सोडुनी तें तिकडे॥

पाठलाग तो करीत त्याचा  
शिरला रानामध्यें दाट।  
सुटले साथी पाठी मागें  
नव्हती ध्यानामध्यें वाट॥

बाण सोडला हरणावरती  
नेम धरुनिया त्यानें एक।  
तेव्हां नव्हतें दिसत तयाला  
मागें पुढतीं कांहीं एक॥


Fullscreen

127





18 / 84



विचार करुनी कृष्ण म्हणाला-
"येतों जाउन शिकारिला!"
प्रसेनजितचा शोध काढण्या
रानामध्यें तो शिरला ॥

साथि मित्रगण सर्वे निघाले
मदतीसाठीं वनामधें,-
कृष्ण एकटा, सदा राहती
हिंस्र श्वापदें वनामधें ॥

भूकनि तहान विसरुनि गेली
दुसरें नव्हतें ध्यानिं मनीं।
नाहिं मिळाला प्रसेनजित तर
त्यजुनि जगा राहुं या वनीं ॥

फिरत फिरत हरि जाऊं लागला
पाय दिशेला ज्या ज्या नेत।
चकित जाहला एका ठायीं
एकाएकीं पाहुनि प्रेत।

प्रेत प्रसेनाचें ओळखलें
गळ्यांत नव्हता मणि त्याच्या।
विचित्र अन् मेलेला दिसला
जवळि सिंह मोठा त्याच्या ॥

जवळपास कोठें ही नव्हता
मणि तेजस्वी पडलेला।
स्पष्ट पावलें दिसलीं,-कोणी
गुहेंत तिकडुन गेलेला ॥

होतिं पावलें अस्वलाचिं तीं
ओळखलीं कृष्णानें छान।
उभा राहुनी गुहेजवळ तो
ऐकुं लागला लावुनि कान ॥

मित्रां वदला-"जाउनि येतों
आंत, तुम्ही बाहेर रहा।
कोण काय हें पाहुनि येतों
राहुनि येथें वाट पहा!

"नका काळजी करूं व्यर्थ, मी
लवकर फिरुनी हा आलोंच!"
बोलत बोलत शिरला; झाला
गुहेंत प्रतिध्वनि, "हा आलोंच!"






[ ७ ]

[अग्निद्वीपांतल्या लोकांपैकीं अमरपाल नांवाचा एक सैनिक मागें राहिला. चित्रसेनानें त्याला स्वतःकडे बोलावून घेतलें. त्याच्याकडून चित्रसेनाला राजद्रोही नागवर्मा संबंधी अनेक गोष्टी कळल्या. अमरपालनें चित्रसेनाला अग्निद्वीपांतले लोक आपल्या शंभर वर पक्ष्यांसह कोठें लपून बसले आहेत हें सांगून त्या पक्ष्यांचा संहार कसा करतां येईल हें देखील सांगितलें. त्यानें ती जबाबदारी स्वतःवर घेतली. —पुढें वाचा.]

अमरपालचें म्हणणें ऐकून घेतल्यावर चित्रसेनानें उग्राक्षाचें काय मत आहे हें जाणण्यासाठीं त्याच्याकडे पाहिलें. उग्राक्षाचा अमरपालच्या बोलण्यावर विश्वास बसेना. तरी तो म्हणाला—"मी आपल्या दोघां नोकरांना बरोबर पाठवितों. अमरपालनें हें काम पार पाडलें तर तो मागेल तें बक्षीस मी त्याला देईन.

चित्रसेन क्षणभर विचार करून म्हणाला—"मला वाटतें, याच वेळीं कपिलपुरावर देखील स्वारी केली तर? कारण नागवर्मा धवल-गिरीवर चालून गेला आहे. फार थोडें सैन्य कपिलपुरांत असणार. ही संधी हातची गेली तर पुन्हां कपिलपुर जिंकणें अशक्य होईल."

चित्रसेनाची सूचना ऐकून उग्राक्ष आनंदानें नाचूं लागला. म्हणाला—" चित्रसेना! तुझें


Fullscreen

127





20 / 84





डोकें खरोखरच सुपीक आहे. आपण कपिलपुरावर स्वारी करून वीरसिंह महाराजांची मुलगी कांतिमती हिला देखील सोडवूं. तूं तरी अजून कुंवाराच आहेस. इकडे कपिलपुर काबीज होईल व तिकडे तुझ्या लग्नाचा मांडव पडेल. तुझें राज्य दुप्पट वाढेल व त्याबरोबर तुझें लग्न होऊन तुझा संसार थाटेल." असें म्हणत उग्राक्ष जोरानें हंसला.

उग्राक्षाची ही थट्टा चित्रसेनाला आवडली नाहीं. कपिलपुराचा राजा जिवंत असेपर्यंत त्याचें राज्य बळकावून घेणें त्याला आवडलें नाहीं. कांतिमतीच्या इच्छेविरुद्ध किंवा तिच्या वडिलांच्या इच्छेविरुद्ध तिच्याशीं लग्न करणें देखील त्याला पसंत नव्हतें आणि तिनें दुसऱ्या कोणाला मनानें वरलें असलें तर तिच्याशीं लग्न करणें हें अगदीं बरोबर होणार नाहीं. ह्या राक्षसाला आमच्या-मनुष्यांच्या भावना काय कळणार? असा विचार करून चित्रसेन म्हणाला—

"उग्राक्षा! आतां आपलें प्रथम कर्तव्य म्हणजे नागवर्माचा पराभव करणें हें आहे. कारण पुढें मागें तोच सर्वांचें राज्य गिळंकृत करणार. कपिलपुराचें राज्य जिंकल्यावर त्याचा जो न्याय्य अधिकारी असेल त्यालाच तें राज्य मिळालें पाहिजे. वीरसिंह जिवंत असतां त्याचें राज्य बळकावून घेणें आपणांस बरोबर होईल का? परंतु सर्वांत आधीं या भयंकर पक्ष्यांची विल्हेवाट लावली पाहिजे. हे ह्या राज्यांत असेपर्यंत आपण किती मोठें सैन्य उभें केलें तरी कांहीं फायदा नाहीं. उलट आपणच त्यांच्या हातांत सांपडून आपला जीव गमावून बसूं."

त्या भयंकर पक्ष्यांचा संहार करण्याची जबाबदारी माझ्यावर टाका. तुम्हांला कांहीं काळजी करण्याचें कारण नाहीं. तुम्हीं रानांत झुडपाआड आपलें सैन्य घेऊन लपून बसा. प्रथम हें काम उरकून टाकूं या. त्या पक्ष्यांचा संहार झाल्यावर कपिलपुर हस्तगत करतां येईल." अमरपाल म्हणाला.

बेत ठरला. चित्रसेन व उग्राक्ष दोघांनीं आपापला होकार दिला. त्यानंतर अमरपालाच्या बरोबर दोन राक्षस व चित्रसेनाचे चार अनुयायी ठरल्याप्रमाणें निघाले.

अमरपाल त्यांना बरोबर घेऊन निघाला आणि थोड्या वेळानें झाडीआड दिसेनासा झाला. चित्रसेन आणि उग्राक्ष दोघांनीं आपापल्या सैनिकांना तयार रहावयास सांगितलें.

या अवधींत अमरपाल सैनिकांना बरोबर घेऊन रानांतून लपत छपत दुपारच्या सुमारास कपिलपुरानजीकच्या जंगलांत पोंचला. त्या जंगलांत शंभरावर पक्षी मोठमोठ्या लाकडी पिंजऱ्यांत बंद करून ठेवलेले होते. त्यांची राखण करणारे लोक जवळपास झुजुवी घरें बांधून त्यांत रहात होते.

अमरपालानें झाडींत आपल्या साथी मित्रांना उभें राहायला सांगून त्यानें राखणदारांचीं घरें दाखविलीं व म्हणाला—"ह्या प्रदेशाची मला चांगली माहिती आहे. राखणदारांपैकीं प्रत्येकाला मी छान ओळखतों.



मी त्यांना सर्वांना एकत्र करणार आहें. सर्व एकत्र झाल्यावर मी खूण करीन तुम्ही एकाएकीं छापा मारून सर्वांना यमसदनास पाठवा. त्यानंतर आपण सर्व मिळून त्या भयंकर पक्ष्यांना पिंजऱ्यांत जाळून मारून टाकूं या. कळलें ना?"

सर्वांना तो बेत पसंत पडला. त्यानंतर अमरपाल राखणदारांच्या घरांकडे ओरडत धांवत गेला—"मी सुटलों! त्यांच्या हातावर तुरी देऊन मी आलों आहे."

तें ऐकून सर्व राखणदार धांवत आले. त्यांनीं अमरपालाला घेरलें व निरनिराळ्या


Fullscreen

127





22 / 84






प्रकारचे प्रश्न करूं लागले—"तूं कसा सुटलास? कसा आलास?"

तो म्हणाला—"थांबा, सर्व सांगतों. थोडा वेळ दम घेऊं दे." सर्व त्याच्या चारी बाजूला घोळका करून बसले.

अमरपाल बोलूं लागला—"गड्यांनो! मी मरणारच होतों. पण जिवाची दोरी अजून बळकट आहे. सुटका मिळवून घ्यायला मला किती किती युक्त्या लढवाव्या लागल्या? बरें पण आपले सर्व पक्षी ठीक आहेत ना! कुठें पिंजऱ्यांतच आहेत कीं मोकळे?"

"सर्व पिंजऱ्यांत बंद आहेत. नागवर्मा महाराज धवलगिरीवर स्वारी करायला गेले आहेत. कपिलपुराच्या रक्षणाची जबाबदारी पण आमच्यावरच आहे. किल्ल्यांत कांहीं सैनिक आहेत. पण किल्ल्याच्या रक्षणाची जबाबदारी त्यांच्यावर नाहीं. राजकन्या कांतिमती कोठें पळून जाऊं नये म्हणून तेथें त्यांना नेमण्यांत आलें आहे. महाराज नागवर्मा सर्व सैन्य घेऊन धवलगिरीवर चालून गेले आहेत. धवलगिरीला सर करून नंतर चित्रसेनाच्या राज्यावर स्वारी करण्यास ते जाणार आहेत." ते म्हणाले.

तें ऐकून अमरपाल जोरानें हंसला व आनंदानें अगदीं नाचूं लागला. त्यांत त्याचा खरा हेतु आपल्या साथ्यांना खूण करण्याचा होता. ठरल्याप्रमाणें त्यानें खूण केली. खूण ओळखून दोघे राक्षस व सैनिक थांबले व त्यांनीं पाहरेकऱ्यांवर अचानक हल्ला केला. अमरपालानें देखील आपली तलवार उपसली व पाहरेकऱ्यांना मारूं लागला. पाहरेकरी निशस्त्र होते. म्हणून परत आपापल्या राहुटींत जाण्यापूर्वीच ठार झाले.

नंतर अमरपाल, राक्षस व सैनिक पाहरेकऱ्यांच्या घरांत शिरले व त्यांच्याच मशाली पेटवून त्यांचीं घरें व पक्ष्यांचे पिंजरे जाळूं












लागले. आगीचे लोट आकाशांत उंच दिसूं लागले. पक्षी बांधले असल्यामुळें पळूं शकले नाहींत व पिंजऱ्यांतल्या पिंजऱ्यांत तडफडून मेले. त्यांचा आक्रोश ऐकून व आगीचे लोट पाहून आग लावणाऱ्या राक्षसांना देखील धडकी बसली. पण त्यांनीं जें दिव्य केलें होतें त्याच्या आनंदांत ते नाचूं लागले. कांहीं पक्षी आपली सर्व शक्ति एकवटून साखळदंड तोडून बाहेर आले व उडूं लागले. पण अंग पोळून गेल्यामुळें व पंख जळून गेल्यामुळें जमिनीवर आदळले व मरून गेले.

तें दृश्य दुरून चित्रसेन व उग्राक्ष पहात होते. तें आपलें सैन्य घेऊन कूच करीत निघाले. त्यांच्या रणभेरीचा आवाज अमरपाल व त्याच्या साथी मित्रांना ऐकूं आला अमरपाल म्हणाला—"चित्रसेन महाराज येत आहेत." नंतर त्यानें आपल्या एका साथी राक्षसाला पुढें निरोप सांगायला पाठविलें कीं काम फत्ते झालें आहे.

दोघे राक्षस आनंदानें उड्या मारीत, जणूं कांहीं जग जिंकून आले आहेत, अमरपालानें सांगितल्याप्रमाणें निरोप सांगायला निघाले.

उग्राक्ष व चित्रसेन आपापल्या अनुयायांसह तासाभरांत येऊन पोंचले. तें दृश्य पाहून उग्राक्षानें आनंदाच्या भरांत अमरपालाला एखाद्या मुलासारखा उचलून त्याचें कौतुक केलें व त्याला शाबासकी दिली. अमरपाल आपल्याला धोका देत तर नसेल ही धास्ती त्याला वाटत होती ती त्याच्या मनांतून पार नाहींशी झाली. तो म्हणाला—"अमरपाल! आज तूं जें शौर्य दाखविलें आहेस तें आम्हां राक्षसांत देखील नाहीं. काय वाटेल तें बक्षीस माग!"

या आनंदांत तूं उड्या मारीत आहेस. पण माझा जीव कासावीस होऊं लागला आहे. जमिनीवर आदळलों तर प्राणास मुकावें लागेल!" असें म्हणत अमरपाल हंसला.

उग्राक्षानें विचारलें—"एखादा पक्षी निसटून तर गेला नसेल ना?"

"एक देखील बाहेर गेला नाहीं. पण त्यांच्या स्वारांपैकीं कांहीं वांचले असण्याचा संभव आहे. त्यांच्यापैकीं वीसजणांचा येथें मुडदा पडला आहे. बाकी कपिलपूरच्या किल्ल्यांत असावे असा माझा अंदाज आहे." अमरपाल उग्राक्षाला उद्देशून म्हणाला.

"आतां ते कोठें जातात पाहतों." किल्ल्याला वेढा घालून किल्ला जमीन दोस्त करूं!" उग्राक्ष आपली गदा फिरवीत म्हणाला.

"पण तें बरोबर होणार नाहीं. कारण राजकन्या कांतिमतीचा जीव धोक्यांत पडण्याचा संभव आहे. हा किल्ला सर करण्याची जबाबदारी माझ्यावर सोड, उग्राक्ष!" चित्रसेन म्हणाला.

"अरे हो! मी त्या पोरीची गोष्ट पार विसरून गेलों होतों. किल्ल्याकडे जाण्यांत अर्थ नाहीं. तुझें म्हणणें बरोबर आहे!" उग्राक्ष म्हणाला.



नंतर चित्रसेनानें आपले कांहीं हुशार व निवडक स्वार कपिलपुराकडे तिकडील माहिती काढून आणण्यासाठीं म्हणून पाठविले. बाकी सैनिक सैंपाकाच्या तयारीला लागले.

सूर्यास्ताची वेळ होती. सूर्य पश्चिमेकडील पर्वताआड जाऊं लागला होता. सैनिक खाणेंपिणें आटोपून निजाऱ्याची जागा पाहून आराम करीत होते. इतक्यांत एका स्वारानें बातमी आणली कीं पन्नासावर अग्निद्वीपवाले सैनिक राजकन्या कांतिमतीला एक पालखींत बसवून किल्ल्याबाहेर तिला पळवून नेत आहेत.

Fullscreen 127 26 / 84

तें ऐकून चित्रसेन व उग्राक्ष चकित होऊन परस्परांकडे पाहूं लागले, ही काय भानगड आहे? चित्रसेन म्हणाला–"कपिल-पुरांतल्या सैनिकांनीं रानांतील ही जाळपोळ पाहिली असणार व पक्ष्यांचें किंचाळणें ऐकलें असणार. आतां कपिलपुराच्या किल्ल्यांत राहणें शहाणपणाचें नाहीं असें समजून त्यांनीं कांतिमतीला सुरक्षित स्थानीं नेण्याचा विचार केला असावा. म्हणून वेळींच उपाय केला पाहिजे."

नंतर त्यानें थोडा विचार करून आपल्या विश्वासपात्र अशा सुमारें पन्नास स्वारांना निवडलें व पायींच रानांतील वाटेनें राजकन्या कांतीमतीची पालखी ज्या बाजूनें जात होती त्या बाजूला निघाला. इतर सैन्याला हुकूम दिला कीं, अमरपालाच्या नायकात्वाखालीं कपिलपुराचा किल्ला सर करावा.

गुप्तचर स्वार वाट दाखवीत पुढें चालला होता. चित्रसेन थोड्या वेळानें व्याघ्रचर्म घालून ते सैनिक चालले होते तेथें येऊन पोंचला. चार भोई पालखी उचलून घेऊन जात होते. पुढें मागें दहा दहा, वीस वीस अग्निद्वीपवाले सैनिक होते. सर्व आपापल्या तलवारी उपसून तयार होते.

चित्रसेनाला दुरून येत असलेला पाहून त्यांचा सरदार ओरडला–"मेणा खालीं ठेवा. मेण्याच्या चारी बाजूला उभे रहा! प्राण असेपर्यंत मेण्याचें रक्षण करा. कांतिमति शत्रूच्या हातीं लागतां कामा नये. आप-ल्यापैकीं जो शेवटपर्यंत जिवंत राहील त्यानें कांतिमतीला ठार करून स्वतः मरावें! ही महाराज नागवर्मा यांची आज्ञा आहे. विसरूं नका."

(पुढील गोष्ट पुढील अंकीं)





# सीता वनवास

रावणाचा वध करून राम सीतेसह अयोध्येला परत आला. त्याच्या राज्यांत प्रजा फार सुखी होती. रामाची बहीण शांता हिचे पति ऋष्यश्रृंगमुनि यांनीं एक यज्ञ करण्याचें ठरविलें होतें. यज्ञांत भाग घेण्यासाठीं वसिष्ठ, अरुंधती, कौशल्या, कैकेयी, सुमित्रा वगैरे सर्व थोर मंडळी गेली होती. सीता गरोदर होती. म्हणून ती जाऊं शकली नाहीं. रामाला सुद्धां अयोध्या सोडून म्हणूनच जातां आलें नाहीं.

अर्जुन नांवाच्या एका चित्रकारानें राम-चरित्र चित्रित केलें होतें. तीं चित्रें पाहून त्यांतल्या त्यांत वनवासांतली चित्रें पाहून सीतेला वाटलें कीं आपण पुन्हां एकदां तसेंच रानांवनांत हिंडावें. गंगेच्या काठीं हिंडण्याची अनिवार इच्छा तिच्या मनांत उत्पन्न झाली. तिनें रामाजवळ ती इच्छा प्रकट केली. डोहाळपणांत गरोदर स्त्रीच्या हौशी पुरवावयाच्या असतात असें वडीलधाऱ्या लोकांनीं सांगितलें असल्यानें रामानें सीतेची इच्छा पूर्ण करण्यासाठीं लक्ष्मणाला रथ तयार करून घेऊन यायला सांगितलें. लक्ष्मण निघून गेल्यावर सीता रामाच्या मांडीवर डोकें टेंकून झोंपी गेली.

इतक्यांत दुर्मुख नांवाच्या एका गुप्तचरानें येऊन रामाला राजाविषयीं प्रजा काय म्हणत आहे हें सांगितलें. दुर्मुखानें प्रजा रामाची कशी प्रशंसा करीत आहे हें वर्णन करून सांगितल्यावर रामानें विचारलें कीं कोणी कांहीं माझ्या विरुद्ध बोलला नाहीं का? बोलला असेल तर तें देखील सांग. रामाच्या आग्रहावरून दुर्मुख म्हणाला–"प्रभो! कित्येक लोक असें म्हणत होते कीं, परक्याकडे कित्येक दिवस राहून आलेल्या सीतेला


Fullscreen

127





28 / 84


रामानें स्वीकारलें, हें कांहीं बरोबर केलें नाहीं."

तें ऐकून रामाचें सर्व अंग थरारून गेलें ? स्वत:च्या कानावर त्याला विश्वास होईना. अग्निपरीक्षा करून ज्या सीतेचा मी स्वीकार केला तिच्यावर लोकांचा संशय ? पण ईक्ष्वाकु वंशाचा धर्म पालन केला पाहिजे. प्रजेची इच्छाच राजाची इच्छा असली पाहिजे.

रामानें दुर्मुखाला आज्ञा केली—"तूं जाऊन लक्ष्मणाला माझी आज्ञा म्हणून सांग कीं, सीतेला रानांत सोडून यावें. असेंहि सांग कीं, ही राजाज्ञा आहे." त्यानंतर रामानें सीतेचें डोकें मांडीवरून खालीं ठेवलें आणि तेथून निघून गेला. सीतेची झोप मोडली तेव्हां रथ तयार होता. ती आनंदानें रथांत जाऊन बसली. रथ गंगाकाठावर वाल्मीकि ऋषींच्या आश्रमापाशीं येऊन पोंचला. लक्ष्मणानें रामाची आज्ञा सीतेला सांगितली व तिला तेथेंच सोडून तो रथ घेऊन निघून गेला. तें ऐकून सीतेला इतकें दुःख झालें कीं तिनें गंगेंत उडी टाकली.



तेथेंच तिला दोन जुळीं मुलें झालीं. गंगा व भूदेवी तिला पाताळ लोकांत घेऊन गेल्या व तेथें त्यांनीं सीतेचें रक्षण केलें. मुलें थोडी वाढल्यावर गंगेनें दोन्ही मुलांना वाल्मीकि ऋषींच्या आश्रमांत नेऊन ठेवलें. वाल्मीकि ऋषींच्या आश्रमांतच तीं मुलें लहानाचीं मोठीं झालीं व त्यांनीं तेथेंच सर्व विद्याभ्यास केला.

बारा वर्षें लोटलीं. रामानें अश्वमेध यज्ञ करावयाचें ठरविलें. पत्नीच्या जागीं रामानें सीतेची एक सुवर्णमूर्ति ठेवली होती. अश्वमेध यज्ञाचा घोडा देशो देशीं हिंडत होता. त्याच्या रक्षणार्थ लक्ष्मणाचा मुलगा चंद्रकेतु एक मोठी सेना घेऊन बरोबर येत होता.

तिकडे ऋष्यशृंग मुनींचा यज्ञ संपला व वसिष्ठ अरुंधती, कौशल्या आदि राजमातां-सह अयोध्येला परतले. सीता-वनवासाची वार्ता ऐकून त्यांनीं राजधानींत प्रवेश देखील केला नाहीं. जोंपर्यंत सीता परत अयोध्येला येत नाहीं तोंपर्यंत त्यांनीं वाल्मीकि ऋषींच्या आश्रमांतच राहण्याचें ठरविलें. वसिष्ठादि सर्व वाल्मीकि ऋषींच्या



Fullscreen
127
30 / 84











आश्रमांत जाऊन राहूं लागलीं. राजा जनक देखील तेथेंच येऊन राहूं लागला.

एके दिवशीं वाल्मीकि ऋषि तमसा नदीवर स्नानासाठीं गेले होते. तेथें त्यांनीं एका क्रौंच पक्ष्याच्या जोडप्यापैकीं एकाला शिकाऱ्यानें मारल्याचें एक भयंकर दृश्य पाहिलें. तें दृश्य पाहून कवीच्या कोमल हृदयांत दुःख व करुणा उत्पन्न झाली. त्या आवेगांत त्यांनीं एक कविता म्हटली. त्याच वेळीं ब्रह्मदेवानें प्रत्यक्ष दर्शन देऊन रामाची गोष्ट पद्य रूपांत लिहून काढण्याची प्रेरणा महामुनीला दिली. त्यानंतर वाल्मीकि ऋषींनीं रामायण लिहिण्यास प्रारंभ केला व त्यांतच ते निमग्न होऊन गेले.

इकडे अयोध्येला एका ब्राह्मणानें आपल्या मृतपुत्राचा देह अयोध्येच्या राजद्वारासमोर आणून ठेवला आणि म्हणाला—" या राज्यांत पापकर्म घडलें आहे, नाहींतर माझ्या मुलाला अकाल मरण आलें नसतें !" तो आक्रोश करून रडूं लागला. रामाला फार वाईट वाटलें. चवकशी करतां रामाला कळलें कीं शंबूक नामक एक शूद्र कोठें तरी तप करीत आहे. हें धर्मविरुद्ध कार्य आहे. त्याचा परिणाम अशा तऱ्हेनें झाला. त्या शंबूकाच्या शोधार्थ राम पुष्पक विमानांत बसून निघाला. शंबूक जनस्थानांत तपश्चर्या करीत होता. राम शंबूकाचा वध करण्यासाठीं जवळच्या अगस्त्य आश्रमांत जाऊन पोंचला. गंगेनें विचार केला कीं सीतेला रामाचें दर्शन करण्यास ही संधी चांगली मिळाली आहे. तिनें तमसेबरोबर सीतेला अदृश्यपणें पाठवून दिलें.

एकदां सकाळीं सीता स्नानादि आटोपून सूर्यपूजेसाठीं फुलें तोडीत असतां तिच्या पाळलेल्या लहान हत्तीवर एका मत्त हत्तीनें हल्ला केला. सीतेच्या तोंडांतून संवयीप्रमाणें हें वाक्य निघालें—" आर्यपुत्र ! माझ्या हत्तीचें रक्षण करावें !" तें वाक्य तोंडांतून यायला व पंचवटींत घडलेल्या सर्व गोष्टी आठवायला एक गांठ पडली. ती आठवण होतांच सीता बेशुद्ध होऊन खालीं पडली. तमसेनें तिची सर्व प्रकारें सेवा शुश्रूषा करून तिला शुद्धीवर आणलें.

त्यावेळीं राम त्याच बाजूला आला. त्याला सर्व जुन्या गोष्टी आठवल्या. सीते-बरोबर तो ज्या जागीं फिरला होता ती जागा पाहून रामाला मूर्च्छा आली. तमसेनें सुचवल्यावरून सीतेनें स्पर्श केल्याबरोबर रामाची मूर्च्छा गेली. सीतेच्या स्पर्शाचा आभास रामाला झाला. परंतु सीता अदृश्य असल्यामुळें त्याला दिसली नाहीं. त्याला वाटलें कीं तो नुसता भ्रम होता.

तिकडे वासंती नांवाच्या वनदेवतेनें रामाच्या मदती शिवायच सीतेच्या लाडक्या हत्तीचें रक्षण केलें. नंतर तिनें रामाजवळ येऊन व नाना प्रकारचे प्रश्न करून कीं, त्यानें सीतेला कां वनवासांत धाडलें, रामाला लज्जित केलें. रामानें विचार केला कीं, आपण केलें तें बरोबर केलें नाहीं. बिचारी रानावनांत कोठें फिरत राहिली असेल. तिला श्वापदांनीं खाऊन देखील टाकलें असेल.



त्या विचारानें रामाला रडूं कोसळलें. सीतेला रामाचा तो कष्ट असह्य वाटूं लागला.

रामाचें दुःख थोडें कमी करण्यासाठीं वासंतीनें रामाला त्या वनांतील अनेक रमणीक स्थानें दाखविलीं. पण त्यापैकीं प्रत्येक स्थानाशीं सीतेचा संबंध असल्यामुळें रामाचें दुःख कमी होण्याऐवजीं वाढतच गेलें. शेवटीं राम पुन्हां बेशुद्ध होऊन पडला.

सीतेनें पुन्हां स्पर्श केल्यावर राम शुद्धीवर आला. मोहामुळें तिनें लगेच हात काढून घेतला नाहीं म्हणून, रामाच्या हातांत तिचा हात आला. तो आनंदानें ओरडला—" ही

Fullscreen 127 32 / 84

पहा सीता! तिचा हात माझ्या हातांत आहे!" वासंतीनें चकित होऊन विचारलें—"कोठें? मला तर नाहीं कोणी दिसत." तोंपर्यंत सीतेनें आपला हात काढून घेतला होता. सीता अदृश्य असल्यामुळें रामाला तें सर्व स्वप्नासारखें वाटलें.

तिकडे वाल्मीकि ऋषींच्या आश्रमाजवळ यज्ञाचा घोडा पोंचला. आश्रमांतल्या सर्व मुलांनीं त्याला धरून आश्रमांत बांधून ठेवला. त्यांनीं घोड्याविषयीं ऐकलें होतें. पण प्रत्यक्ष पाहिला नव्हता. त्या घोड्याच्या मस्तकावर एका सुवर्णफलकावर लिहिलें होतें—"हा घोडा राजा रामाचा आहे. याला जो धरील त्याचा गर्व भंग करण्यासाठीं रामाची सेना तयार आहे."

तेजस्वी लवाला त्या गर्वोक्तीचा राग आला. त्यानें घोड्याला धरून ठेवलें. सैनिकांनीं त्याला येऊन सांगितलें कीं मुकाट्यानें घोडा सोडून दे. नाहींतर राजकुमार चंद्रकेतु येऊन तुझा वध करतील."

लवानें त्याला विचारलें—"जगांत रामाशिवाय कोणी वीर नाहीं वाटतें?" त्यानें बाणवृष्टि सुरू केली व रामाच्या सैन्याला पळवून लावलें. चंद्रकेतूनें येऊन सैन्याची जमवाजमव केली. चंद्रकेतूचा हुकूम होतांच सर्व सैन्य पुढें येऊं लागलें. लवानें जृम्भिकास्त्राचा प्रयोग करून सैन्याला जागच्या जागीं उभें केलें. ह्या अस्त्राचें ज्ञान एकट्या रामाला होतें. पण या मुलानें या अस्त्राचा कसा प्रयोग केला? चंद्रकेतूला आश्चर्य वाटलें.

नंतर चंद्रकेतु व लव यांचें युद्ध झालें. त्या दोघांचें युद्ध रामानें विमानांतून पाहिलें व दोघांच्या मधोमध उतरला. रामाच्याविषयीं लवाच्या मनांत थोडा देखील आदर नव्हता. पण रामाला प्रत्यक्ष समोर पाहून त्याच्या मनांत आदर उत्पन्न झाला. रामाच्या सांगण्यावरून त्यानें जृम्भिकास्त्र परत घेतलें. त्यानें रामाला सांगितलें कीं, त्याला व त्याच्या थाकट्या भावाला जन्मतःच तें अस्त्र अवगत आहे.

तितक्यांत कुश देखील तेथें आला. वाल्मीकि ऋषींनीं भरतमुनींकडे आपलें रामायण पाठविलें होतें. त्याच्या रक्षणासाठीं बरोबर कुश गेला होता. भरत मुनींनीं अप्सरांच्या मदतीनें रामायणाचा नाट्य प्रयोग





Fullscreen 127 34 / 84

करण्याचें ठरविलें होतें. लवकुशांनी रामाच्या आग्रहानें रामायणांतला कांहीं अंश म्हणून दाखविला.

वाल्मीकि ऋषींनीं गंगा काठावर एक नाट्यशाला तयार करविली. तेथें उत्तरकांडाचा अभिनय करण्यांत आला. त्यावरून सीतेला जुळीं मुलें झालीं, त्यांचें पाताळ लोकीं पालन झालें, सीतेनें त्यांना जृम्भिकास्त्र दिलें व वाल्मीकि ऋषींच्या आश्रमांत त्यांनीं विद्याभ्यास केला वगैरे गोष्टी रामाला कळल्या." नाटक पहात असतां राम बेशुद्ध होऊन पडला.

इतक्यांत भूदेवीनें व गंगेनें सीतेला अरुंधतीच्या हातीं सोंपविलें. तिच्या अनुज्ञेनें सीतेनें रामाचा स्पर्श केल्याबरोबर त्याला शुद्ध आली. सीता व अरुंधतीला पाहून रामाची नजर लाजेमुळें वर झाली नाहीं.

नाटक पहायला वसिष्ठादि मुनि कौशल्यादि राजमाता, लक्ष्मणादि राजबंधु व सर्व वर्णांचे नागरिक उपस्थित होते. अरुंधतीनें सर्वांना संबोधन करून विचारलें—"अग्नीनें ग्वाही दिली कीं सीता पतिव्रता आहे. भूदेवी व गंगा देखील तेंच म्हणत आहेत. आतां तुमचें काय म्हणणें आहे. रामानें सीतेचा स्वीकार करावा कीं नाहीं?"

सर्वांनीं एक मुखानें आपली संमति दिली. त्यानंतर अरुंधतीच्या सांगण्यावरून रामानें सीतेचा स्वीकार केला. लक्ष्मणानें तिला नमस्कार करून क्षमा मागितली.

वाल्मीकि ऋषींनीं लवकुशांना बोलावून रामाची ओळख करून दिली—"हे तुमचे वडील आहेत. राजा जनक तुमचे आजोबा व लक्ष्मण तुमचे काका." त्याच वेळीं लवणासुराचा वध करून शत्रुघ्न देखील येऊन पोंचला. त्यानंतर सीता राम आपल्या राजकुमारांनाबरोबर घेऊन अयोध्येला आलीं. रामराज्यांत प्रजा फार सुखी झाली.





# खरें - खोटें

एका गांवीं दयाराम नांवाचा एक श्रीमंत सावकार रहात असे. तो जितका श्रीमंत होता, तितकाच दानी व उदार पण होता. जवळच्या गांवीं धनीराम नांवाचा दुसरा एक श्रीमंत सावकार रहात असे. तो स्वभावानें लोभी होता. तो धक्के मारून भिकाऱ्यांना घराबाहेर काढीत असे. म्हणून लोक त्याला चिक्कू मारवाडी म्हणत. त्याला आपली अपकीर्ति असह्य वाटूं लागली.

त्याच्याकडे एक विश्वासू नोकर होता. त्याला त्यानें बोलावून कांहींतरी उपाय सुचवायला सांगितलें. नोकर म्हणाला—"लोक आपणांला दानी उदार म्हणोत किंवा न म्हणोत. पण दयाराम आपल्याला दानी व उदार म्हणेल असा उपाय मी करतों. एकदां त्याला आपण जेवायला बोलवा. तो जेवायला आला म्हणजे मी अनेक प्रकारचीं सोंगें घेऊन भीक मागायला येईन. प्रत्येक वेळीं दयारामच्या समोर तुम्ही मला शंभर शंभर मोती देत जा. दयाराम तुमचें औदार्य पाहून तुमची वाखाणणी करील. सर्व लोक ऐकून तुमची प्रशंसा करतील. एक पै खर्च केल्याशिवाय तुम्हांला मोठी ख्याति प्राप्त होईल."

मालकाला नोकरानें सुचविलेला उपाय पसंत पडला. त्यानें दयारामाला दुसऱ्या दिवशीं आपल्या घरीं जेवायला बोलाविलें. दयारामाला तर आश्चर्याचा धक्काच बसला. इतका चिक्कू मारवाडी आहे आणि मला जेवायला बोलावितो आहे! चंद्रावरचा डाग अदृश्य झाला तर जगावर संकट कोसळणार कीं काय असें भय वाटतें, म्हणें. म्हणून त्यानें निरोप घेऊन येणाऱ्या नोकराला विचारलें—"काय रे! तुझ्या मालकाला वेड-


Fullscreen

127





36 / 84




बीड तर नाहीं लागलें ? अरे जो कधीं पोटच्या पोराला देखील पोटभर खाऊं घालीत नाहीं त्याला हें काय सुचलें,—माझ्या सारख्याला जेवायला बोलवायला ?"

नोकर म्हणाला—"मालक ! आमच्या मालकांविषयीं आपला गैरसमज झालेला दिसतो आहे. लोकांच्या बोलण्यावर आपण सुद्धां विश्वास केलात तर ! खरें बोलायचें तर आमच्या मालकांसारखा उदार व दानी मिळावयाचा नाहीं साऱ्या मुलखांत. भिकाऱ्याला देखील शंभर शंभर मोती भिक्षा म्हणून घालतात. परंतु ते आपल्या औदार्याचा टेंभा नाहीं मिरवीत. ते गुप्तदान करतात. पाहिजे तर आपण स्वतः येऊन पाहून जावें. तर मग मी येतों. आपल्या मालकाला मी काय सांगू ?"

दयारामानें विचार केला बोलावलेंच आहे तर जावें जेवायला. म्हणाला—"सांग येणार आहें !"

नोकर नमस्कार करून निघून गेला. घरीं जाऊन आपल्या मालकाला त्यानें दयारामाशीं झालेलें बोलणें खूप तिखटमीठ लावून सांगितलें. मालकानें त्याच्या चातुर्याबद्दल त्याला शाबासकी दिली.

दुसऱ्या दिवशीं दयाराम धनीरामाच्या घरीं जेवायला गेला. दयारामानें प्रेमानें त्याला बसायला सांगून विचारलें—"एकटेच ? नोकराला नाहीं बरोबर आणलेंत ?"

"नोकराला काम होतें, म्हणून एकटाच पुढें आलों. काम संपल्यावर तो देखील येईल !" दयाराम म्हणाला.

दोघे बोलत ओटीवर बसले होते. इतक्यांत एक भटजी आले. धनीरामानें त्यांच्या हातांत जवळ ठेवलेल्या मोत्यांच्या थैलींतून शंभर मोती काढून देत म्हटलें—"आज सांबाच्या देवळांत अभिषेक करा बरें का ?"

भटजी नमस्कार करून निघून गेल्यावर धनीराम म्हणाला—"धर्मकार्य करावेंच लागतें ! कोठें चुकतें का ? हो पण एक विनंति आहे. कोणाजवळ बोलूं नका कीं मी हें असें दान करतों. मला नांवलौकिकाची थोडी देखील हाव नाहीं."

भटजी निघून गेल्यावर एक बैरागी आला. त्याला देखील धनीरामानें शंभर मोती दान केले. नंतर अवघ्या अर्ध्या तासांत एका मागून एक मुका, एक आंधळा, एक लंगडा असे एकंदर दहाजण भिकारी आले. प्रत्येकाला धनीरामानें शंभर शंभर मोती दिले. मनांतल्या मनांत तो आपल्या नोकराच्या कौशल्याची प्रशंसा करीत होता कीं इतका भराभर वेष पालटून कसा काय आला बुवा !

दयाराम धनीरामाच्या दानशूरतेची स्तुति करीत म्हणाला—"तुमचा दानधर्म पाहून तर माझे डोळे दिपून गेले. त्यांत विशेष म्हणजे तुम्ही एवढें दान करतां पण कोणाला याची वार्ता देखील नाहीं. तुमच्या सारखा दानी स्वतः कर्ण तरी होता कीं नाहीं शंकाच." "तें जाऊं द्या हो, त्यांत काय मोठेंसें ?" निर्लोभी व संकोची वृत्तीचा



       

Fullscreen 127 38 / 84

आव आणून धनीराम म्हणाला. आपला यत्न यशस्वी झाल्याबद्दल मनांतल्या मनांत त्याला फार आनंद झाला.

जेवणें आटोपलीं. दोघे पानसुपारी खात पुन्हां ओटीवर येऊन बसले. पुन्हां भटजी आले. या वेळीं त्यांच्या हातांत एक तबक होतें. म्हणाले–“प्रसाद घेऊन आलों आहें!” “याया! आटोपला वाटतें अभिषेक असें म्हणत धनीराम भटजींबरोबर घरांत गेला.” आंत गेल्याबरोबर धनीरामानें आपल्या नोकराची पाठ थोपटली. म्हणाला–“काय बेमालूम कार्य आटोपलेंस?”

नोकर म्हणाला–“मालक! आपलें मीठ खातों आहें. एवढें देखील केलें नाहीं तर कसें चालेल! हे घ्या आपण दिलेले पांचशें मोती!” धनीराम चकित होऊन म्हणाला–“पांचशें!! अरे मी तर दहा वेळां शंभर शंभर मोती दिले!” “मालक मी त पांचदांच आलों व एकूण पांचशेंच घेतले आपल्या हातून.” नोकर म्हणाला.

“खोटें नको बोलूस! पोलीस ठाण्याव जायचें आहे वाटतें तुला?” धनीरामाने विचारलें.

तितक्यांत दयारामानें आंत येत म्हटलें–“तुमचा नोकर खोटें नाहीं खरेंच बोलतो आहे! बाकी पांचशें मोती हे घ्या! माझ्या नोकरानें आणून दिले आहेत!”

धनीराम आश्चर्यानें डोळे फाडून दयारामच्या तोंडाकडे पाहूं लागला. दयाराम म्हणाला–“पांच वेळां माझा नोकर आला होता.” दयाराम मोत्यांची पिशवी ठेवून, धनीरामाला जास्त लज्जित करणें बरोबर होणार नाहीं असा विचार करून कांहीं एक बोलल्याशिवाय निघून गेला.





# लांडग्याचा उपवास

एका रानांत एक लांडगा रहात असे. तो आपल्या कळपाबरोबर रहात नसे. कळपांत असेपर्यंत त्याला पोटभर खावला मिळे. पण कळप सोडल्यापासून त्याची उपासमार चालू होती. कारण एकट्यानें शिकार करणें त्याला साधलें नाहीं.

दोनतीन दिवस उपाशीच त्याला झोपावें लागलें. तिसऱ्या दिवशीं स्वप्नांत त्यानें कित्येक जनावरें ठार केलीं व त्यांना खाऊन टाकलें.

झोप मोडली तेव्हां तो आनंदानें विचार करीत उठला कीं आज पोटभर खायला मिळणार. नाहीं तर या स्वप्नाचा दुसरा काय अर्थ असणार?

तो शिकारीसाठीं निघाला. थोड्या अंतरावर त्याला एक बकरी आपल्या पिलांबरोबर चरत असलेली दिसली. जिभल्या चाटीत तो तिच्याजवळ गेला व म्हणाला–“ए बकरे! तूं पिलांचा निरोप घे लवकर मी त्यांना व तुला खाणार आहें.”

बकरी म्हणाली–“होय का बाबा! तर मग आम्हांला देवाची प्रार्थना करून तरी घेऊं दे! प्रार्थना करून आम्ही मरायला तयार होतों.”

लांडग्यानें त्यांना परवानगी दिल्यावर बकरी व पिलें गुडघे टेकून “बें....बें....” करूं लागलीं. त्यांचा आवाज धनगराच्या कुत्र्याच्या कानावर पडला. तो धांवत त्या बाजूला आला. त्याला पाहून लांडग्यानें पाय काढला. मनांत विचार करूं लागला–“किती मूर्ख आहें मी. तोंडांतलें सावज आपल्या मूर्खपणामुळें घालवून बसलों.”

असला मूर्खपणा करून भागावयाचें नाहीं, असा विचार करून तो आणखी थोडा पुढें निघून गेला. अगदीं समोर त्याला


Fullscreen

127





40 / 84




एक छान लठ्ठ कोंबडा दिसला. त्याच्या अंगावर धांवला. जवळ जाऊन म्हणाला— "किती दिवसापासून उपाशी आहें मी! पण देवाच्या दयेनें माझें जेवण स्वतःच्या पायानें माझ्या समोर चालत आलें आहे"

"असें होय! मला खाऊन आपली भूक भागव! मला एकदां पोटभर आरवून घेऊं दे!" कोंबडा म्हणाला.

"या गप्पा नाहीं चालायच्या माझ्या जवळ. ओरडून चारसहा कोंबड्यांना जमा करणार आहेस वाटलें? तें नाहीं चालायचें!" लांडगा म्हणाला.

"अरे वेड्या! माझें आरवणें ऐकून कोंबडे कां येतील? कोल्ह्यालांडग्यांची जात वाटली होय तुला? बरें तर, तूं मला कोणत्या बाजूनें खाणार? चोंचीकडून खाऊं लागलास तर चोंच बोचेल!" कोंबडा म्हणाला.

"मी शेपटी कडून खाणार आहें!" लांडगा म्हणाला. लांडग्यानें शेपटी तोंडांत धरल्या बरोबर कोंबड्यानें ती हलवली. शेपटीचा पंख घशाला लागल्यामुळें लांडग्याला ठसका लागला व तो खोकूं लागला. ती संधी साधून कोंबडा उडून उंच झाडावर जाऊन बसला.

काय मूर्ख आहें मी! कोंबड्याच्या बोलण्यावर विश्वास करून मी त्याची शेपटी आधीं खाऊं लागलों व तोंडांत आलेलें सावज घालवून बसलों. तर मग मला आज देखील उपाशी मरावें लागणार कीं काय? प्रयत्नांतीं परमेश्वर! प्रयत्न सोडून भागणार नाहीं. असा विचार करीत तो थोडें अंतर चालत गेला. समोर त्याला एक घोडी आपल्या गोजिरवाण्या शिंगराबरोबर चरत असलेली दिसली. जिभल्या चाटीत तो पुढें गेला व म्हणाला—"ए घोडे! आज मी तुम्हां दोघांना फराळ करणार आहें!"



"मला व माझ्या शिंगराला तूं खाणार? परवानगी घेऊन आला आहेस का माझ्या मालकाची? कारण माझ्याजवळ एक आज्ञापत्र आहे कीं, जो कोणी मला खाईल त्याला ठार करून गिधाडांसमोर त्याला फेंकून देण्यांत येईल." घोडी म्हणाली.

लांडग्यानें चकित होऊन विचारलें— "आज्ञापत्र! कोठें आहे? पाहूं दे!"

"दाखवितें!" असें सांगून घोडीनें आपला पाय उचलीत म्हटलें—"माझ्या खुरांत आहे तें." असें सांगून घोडीनें आपला पाय वर केला. लांडगा जमिनीवर डोकें टेंकून आज्ञापत्र पाहूं लागला. घोडीनें त्याच्या तोंडावर आपला पाय ठेवून जोरानें दाबला. लांडगा असह्य वेदनेमुळें ओरडत बेशुद्ध होऊन पडला. घोडी आपल्या शिंगराबरोबर पळून निघून गेली.

शुद्ध आल्यावर लांडगा मनांतल्या मनांत म्हणूं लागला—"माझ्यासारखा मूर्ख मीच. दोनदां फसलों पण अक्कल नाहीं आली. विचार करीत तो थोडें अंतर आणखी पुढें गेला. समोर त्याला एक एडका दिसला. त्याला पाहून तो म्हणाला—"एडक्या! तुला मी खाणार आहें. कळलें का? अशी




Fullscreen

127





42 / 84


भूक लागली आहे कीं तुझें मांसच काय, हाडें, चामडें व केस देखील सोडणार नाहीं."

"खा बावा! माझा जन्मच त्या साठीं झाला आहे. तूं नाहीं खालेंस तर दुसरा कोणीतरी मला मारून खाईल. तुला भूक सुद्धां लागली आहे. म्हणून तुझ्या पोटीं गेलों तर मला पुण्यलाभ तरी होईल. मी स्वतःच तुझ्या पोटांत शिरायला तयार आहें. तुला व्यर्थ श्रम कशाला! तूं आ करून तोंड उघडून बस! मी तुझ्या तोंडांत स्वतःच शिरतों." बोकड म्हणाला.

लांडगा तोंड उघडून बसला. विचार करूं लागला, काय मूर्ख आहे हा एडका! एडका खालीं डोकें करून दुरून जोरानें धांवत आला आणि इतक्या जोरानें त्यानें लांडग्याला ढुशी दिली कीं लांडगा रक्त-बंबाळ होऊन जमिनीवर लोळूं लागला.

थोड्या वेळानें अंग झाडून पुन्हां उठून उभा राहिला. एका झाडाला टेंकून बसला व विचार करूं लागला, माझ्या पाठीस शनि लागलेला दिसतो आहे. माझी ही साडेसाती संपेल तेव्हां खरी! रात्रीं किती छान स्वप्न पडलें. आज वाटलें होतें कीं इतक्या दिवसांच्या उपासाचें पारणें फिटेल. देवानें सावजामागून सावजें पाठवून दिलीं. पण थोडी अक्कल कां नाहीं पाठवून दिली. आतां आपली शेपटी कापून घेऊन तोंड लपविण्याशिवाय काय उपाय उरला आहे? लांडगा असा विचार करीत असतां त्याच्या मागून एक शिकारी आपला परशु घेऊन आला व त्यानें जोरानें आपला परशु उचलून लांडग्यावर मारला. पण वार चुकून तो शेपटीवर जाऊन पडला. शेपटी तुटली व लांडगा रानांत पळून गेला.





# तीन प्रवीण

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरचें प्रेत काढून खांद्यावर घेतलें आणि स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! मलाच कंटाळा आला आहे. तुला कसा येत नाहीं कोण जाणें. तुझें थोडें तरी मनोरंजन व्हावें म्हणून मी तुला एक गोष्ट सांगतो. ऐक." त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

अंग देशांत वृक्षपुर नांवाचें एक गांव होतें. त्या गांवीं विष्णुस्वामी नांवाचा एक ब्राह्मण रहात असे. तो श्रीमंत होता व विद्वान पण होता. त्याला तीन मुलगे होते. तिघे गुणी होते. प्रत्येक मुलगा एकेका विद्येंत प्रवीण होता.

मोठा मुलगा, जेवणांत कांहीं दोष असेल तर तो ओळखत असे. मधला मुलगा बाय-कांतील वैगुण्य ओळखण्यांत निपुण होता

Fullscreen 127 44 / 84

आणि सर्वांत धाकटा बिछान्यांत कांहीं दोष असेल तर तो ओळखत असे. त्याला झोंपच येत नसे त्या बिछान्यावर.

एकदां विष्णुस्वामीनें कच्छप यज्ञ करण्याचें ठरवून आपल्या तिघां मुलांना समुद्रांतलें एक कांसव धरून आणायला सांगितलें. तिघे समुद्रकिनाऱ्यावर गेले व परिश्रम करून त्यांनीं एक कांसव धरलें. आतां तें घरीं घेऊन जावयाचें होतें. मोठा भाऊ आपल्या दोघां धाकट्या भावांना म्हणाला–“तुमच्यापैकीं कोणीतरी हें घेऊन चला घरीं. मी नाहीं हात लावणार याला.”

“पण बाबांनीं तिघांना हें काम दिलें आहे. थोडें अंतर तूं घेऊन चल. आम्हीं सुद्धां थोडा हात भार लावतों.” धाकटे दोघे भाऊ म्हणाले.

“मी ह्या घाणेरड्या कांसवाला हात लावला तर या जन्मांत मी अन्नाला शिवूं शकणार नाहीं. मला जी विद्या प्राप्त आहे ती कायम रहावी म्हणून मला हें व्रत करावें लागत आहे. त्याला माझा नाइलाज आहे.” मोठा भाऊ म्हणाला.

मधला भाऊ म्हणाला–“आपल्या विद्येचा एवढा टेंभा मिरवण्याची कांहीं गरज नाहीं.



मी सुद्धां एक विद्या प्राप्त केली आहे. तिच्या रक्षणासाठीं मला देखील व्रत पाळावें लागतें.”

धाकट्या भावानें तसेंच उत्तर दिलें. कांसवाला कोणी उचलून न्यावें या एका गोष्टीवर तिघांचें भांडण इतकें विकोपाला गेलें कीं, तिघांनीं राजाकडे जाऊन न्याय करून घ्यायचें ठरविलें.

त्या गांवाचें नांव विटंकपुर होतें. तेथें प्रसेनजित नांवाचा राजा राज्य करीत असे. राजानें त्यांना आदरपूर्वक बोलावून येण्याचें कारण विचारलें.

मोठ्या भावानें कारण सांगून निवेदन केलें कीं, मीं कित्येक वर्षें तप करून एक विद्या संपादन केली आहे. उत्तमांत उत्तम व स्वादिष्ट पक्वान्नांत काय दोष आहे हें मी सांगूं शकेन.

दुसरा म्हणाला–“मला स्त्रियांतले अज्ञात असें वैगुण्य कळतें.”

तिसरा म्हणाला–“बिछान्यांत कांहीं दोष असेल तर तो मी ओळखूं शकतों.”

नंतर तिघांनीं विचारलें आमच्या तिघां पैकीं कोणाची विद्या मोठी आहे हें आपण सांगावें.



Fullscreen 127 46 / 84

तिघांचें बोलणें ऐकून राजानें विचार केला. यांच्या विद्येची परीक्षा करून पाहणें बरें. त्या शिवाय न्याय देतां येणार नाहीं. म्हणून त्यानें तिघांना आपल्या बरोबर जेवायला बोलाविलें.

राजाच्या पंक्तीला तिघे जेवायला बसले. भात वाढून झाल्यावर वरण आलें. मोठा भाऊ म्हणाला—"मला हें नको. परत घेऊन जायला सांगा. मला यांत हाडांचा वास येत आहे."

सर्वांनीं वरण वाढून घेतलें. कोणाला वास आला नाहीं. चवकशी करतां असें कळलें कीं ज्या शेतांत तुरी लावण्यांत आल्या होत्या त्या शेतांत शेणखताबरोबर हाडांचें खत पण घालण्यांत आलें होतें. तें ऐकून राजा थक झाला. त्यानें मोठ्या भावाच्या त्या विद्येची मुक्त कंठानें प्रशंसा केली.

जेवणें आटोपल्यावर तिघे विश्रांति घेण्या साठीं गेले. कांहीं हवें आहे का चवकशी करण्यासाठीं दुसऱ्या भावाकडे एक दासी आली. तिला येत असलेली पाहून दुसरा भाऊ ओरडला, "बाहेरूनच बोल. मला बकरीचा वास येत आहे. राजाला ऐकून



आश्चर्य वाटलें. चवकशी करतां कळलें कीं त्या दासीची आई अंगावरचें दूध तुटल्यावर मुलीला बकरीचें दूध पाजीत असे. त्याचा असा प्रभाव पडला. तें ऐकून राजा चकित झाला. त्यानें दुसऱ्या भावाच्या विद्येची पण फार स्तुति केली.

त्या दिवशीं रात्रीं राजानें धाकट्या भावाला झोंपण्यासाठीं बिछाना तयार करविला. नोकरांना सांगितलें होतें कीं बिछान्यांत थोडा देखील दोष राहतां कामा नये. म्हणून नोकरांनीं प्रथम पलंग साफसूफ केला, त्यावर सात मोठमोठ्या गाद्या घातल्या. त्यावर दुधा सारखा स्वच्छ पांढरा पलंगपोस घातला.

बिछाना घालून झाल्यावर त्यांनीं धाकट्या भावाला झोंपायला सांगितलें. तो झोंपला. तासाभरानें तो दचकून उठला व मोठ्यानें ओरडूं लागला—"या बिछान्यांत केस आहे. मला बोचतो आहे. पहा माझ्या अंगावर केवढा वण आहे तो."

लोकांनीं जवळ येऊन पाहिलें तर खरोखरच एक मोठा वण त्याच्या अंगावर दिसला व तो केसाचाच होता.

तें ऐकून राजा धांवत आला. त्याच्या बरोबर दोघे भाऊ पण आले. राजानें



नोकरांकरवीं सातहि गाद्या तपासून पाहिल्या. त्यांत एकहि केस दिसला नाहीं. पण पलंगावर एक केस होता. तो केस अंगावर उठलेल्या वणासारखाच होता. तो कोणा तरी नोकराचा केस होता. गाद्या घालतांना पडला असावा. तें पाहून राजाला आश्चर्य वाटलें व त्यानें धाकट्या भावाच्या विद्येची पण वाखाणणी केली.

दुसऱ्या दिवशीं तिघे भाऊ राजाकडे गेले व म्हणाले—"महाराज! आपण आमच्या विद्येची परीक्षा करून पाहिली आहे आतां आमच्या पैकीं कोणाची विद्या श्रेष्ठ याचा निर्णय द्यावा." पण राजा विचारांत पडला.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें राजाला विचारलें—"राजा! तूंच सांग कीं तुझ्या मतें त्या तिघांपैकीं कोणाची विद्या श्रेष्ठ ठरेल व कां? या प्रश्नाचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर लक्षांत आहे ना काय परिणाम होईल तो?"

विक्रमार्क म्हणाला—"मोठ्या व मधल्या भावांची विद्या खरी आहे कीं खोटी ह्याचें प्रत्यक्ष प्रमाण कांहींच नाहीं. त्यांनीं कल्पनेनें किंवा पूर्वीपासून माहिती काढून आपल्या विद्येचा चमत्कार दाखविला असेल. पण सर्वांत धाकट्याच्या विद्येचें तसें म्हणतां येणार नाहीं. त्याच्या विद्येविषयीं मला थोडा देखील संशय वाटत नाहीं. कारण सातसात गाद्यांखालीं पडलेल्या एका केसाचा वण प्रत्यक्ष डोळ्यांना दिसत होता. तो कल्पनेचा खेळ किंवा अंदाज नव्हता. प्रत्यक्ष सत्य होतें. म्हणून माझ्या मतें त्याची विद्याच खरी होती.

अशाप्रकारें राजाचें मौन भंग झाल्याबरोबर वेताळ नाहींसा झाला व पुन्हां झाडावरच्या फांदीवर जाऊन लटकूं लागला.





# ❋ सुवर्णहस्त ❋

फार पूर्वी दक्षिणेकडील सुप्रसिद्ध मदुरा नगरींत पांड्य राजा राज्य करीत असे. तो एक प्रजावत्सल राजा होता. त्याच्या राज्यांत सर्वदा सुख व शांति नांदत असे. त्या काळांतलें तें एक रामराज्यच जणुंकाहीं होतें. राज्यांत प्रजेला कांहीं कष्ट होऊं नये म्हणून राजानें गुप्तचर नेमले होते. हे गुप्तचर प्रजेला कांहीं कष्ट असेल तर त्याची माहिती राजाकडे पोंचती करीत व प्रजेचें गाऱ्हाणें येण्या पूर्वींच राजा योग्य ती व्यवस्था करीत असे. राजा स्वत: देखील वेष पालटून राज्यांत फिरत असे व प्रजेच्या सुखासाठीं झटत असे.

एके दिवशीं राजा रात्रीं वेष पालटून फिरत असतां सुमारें १०-११ वाजतां एका ब्राह्मणाच्या घरीं कोणी बाई रडत असल्याचा आवाज त्याला ऐकूं आला. कोणी तरी त्या बाईची समजूत घालीत आहे हें देखील राजानें ऐकलें. राजा भिंती आड उभा राहून त्यांचें बोलणें ऐकूं लागला.

तें एका ब्राह्मणाचें घर होतें. घरांत फक्त नवरा बायकोच होतीं. कोणी मूलबाळ नव्हतें. दुसऱ्या दिवशींच ब्राह्मणाला कांहीं कामानिमित्त काशीला जावयाचें होतें. तो येईपर्यंत एकटीनें कसें रहावयाचें हा विचार करून ती बाई रडत होती.

"मी पुढल्या अमावास्येला नक्की परत येतों. घरांत लागणारें सर्व समान मी आणून ठेवलेंच आहे. मग तुला कसली काळजी? वेळ प्रसंग आला म्हणजे एकटीनें नको का रहायला?" नवरा समजूत घालीत होता.

"घरांत लागणारें सामान कोणा आणील याची काळजी नाहीं मला. मी बाई माणूस व पुन्हां एकटी म्हणून भीति वाटते. एक

Fullscreen 127 50 / 84

दोन दिवस नाहीं, चांगलें दोन पंधरवडे एकटीनें रहावयाचें. कोणी घरांत शिरला तर मी काय करूं?" बायको म्हणाली.

"वेडी आहेस तूं! पांड्य राजाच्या राज्यांत चोरी करायला कोण येईल? कधीं राज्यांत चोरी झालेली तूं ऐकली आहेस का? जो राजा इतक्या मोठ्या राज्याचें रक्षण करीत आहे. तो तुझें रक्षण नाहीं का करणार? खुळेपणा सोडून दे पाहूं!" नवरा म्हणाला.

दोघांचें बोलणें राजा लक्ष देऊन ऐकत होता. पण तो कांहीं बोलल्याशिवाय निघून गेला. दुसऱ्या दिवशीं तो ब्राह्मण काशीला निघून गेला.

त्या दिवशीं रात्रीं राजा त्या गल्लींत पुन्हां वेष पालटून आला आणि रात्रभर घराच्या आसपास गस्त देत राहिला. पुढें रोज पहारा देऊं लागला.

होतां होतां एक महिना निघून गेला व अमावास्या आली. त्या दिवशीं देखील राजा गस्त देण्यासाठीं आला. त्याला घरांत कोणी तरी बोलत असल्याचा भास झाला. जवळ जाऊन त्यानें कानोसा घेतला. त्यानें दरवाज्यावर थाप दिली. परंतु दाराच्या फटींतून त्याला नवरा बायको बोलत असलेली दिसली. कोणी परपुरुष घरांत शिरलेला नाहीं या गोष्टीची खात्री त्यानें करून घेतली. पण त्यानें विचार केला कीं आपण दरवाजा ठोठावला ही चूक झाली. कारण त्या ब्राह्मणाच्या मनांत असा संशय येणें शक्य आहे कीं त्याच्या बायकोकडे मधून मधून कोणीतरी येत असावा. ही चूक सुधारण्याच्या हेतूनें त्यानें गल्लींतल्या आणखी कांहीं घरांचे दरवाजे ठोठावले व काळोखांत नाहींसा झाला.

दरवाजा कोणी ठोठावला हें पाहण्यासाठीं प्रत्येक घरांतली बायकापुरुष मंडळी चकित होऊन बाहेर आलीं. सर्वांना वाटलें कीं हें चोराचें काम असावें. त्या गल्लींतच नव्हे, तर राजधानींत कोठेंहि पूर्वी तसें कधीं झालें नाहीं. म्हणून सर्वांनीं राजाकडे जाऊन तक्रार करण्याचें ठरविलें.

दुसऱ्या दिवशीं सर्व लोक राजदरबारीं आपापली तक्रार घेऊन गेले. म्हणाले—"महाराज! आपल्या राज्यांत आम्ही सर्व सुखी आहों. पण आज अशी एक घटना झाली आहे कीं त्यामुळें आम्हांला भय वाटूं लागलें आहे. आपल्या कीर्तीला बट्टा लागेल. म्हणून आम्हीं आपणांकडे गाऱ्हाणें घेऊन






Fullscreen

127





52 / 84



आलों आहों. कोणीतरी चोर काल रात्रीं अपरात्रीच्या वेळीं आमच्या गल्लींत शिरला आणि त्यानें आमचें दार ठोठावलें आहे. आम्ही जागे होऊन बाहेर येऊन पाहतों तर कोणी नाहीं. खात्रीनें कोणीतरी पक्का चोर असावा. तरी आपण चवकशी करून चोराला योग्य दंड द्यावा."

राजानें पंतप्रधानांकडे वळून विचारलें— "ह्यांनीं वर्णन केलेला अपराध कोणी केला असेल तर त्याला तुमच्या मतें काय शिक्षा द्यावी?"

पंतप्रधान कांहीं विचार करून उत्तर देणार तेवढ्यांत तक्रार घेऊन आलेले नागरिक म्हणाले—"त्याचा उजवा हात कापून टाकावा, महाराज! ह्या अपराधाला दुसरा दंड नाहीं." पंत प्रधानांनीं पण त्याला दुजोरा दिला.

राजानें लगेच आपली कट्यार काढली व डाव्या हातानें स्वतःच उजवा हात कापून टाकला. नंतर त्यानें त्या रात्रीं घडलेलें खरें वृत्त वर्णन केलें. तें ऐकून प्रजा फार दुःखी झाली. या सद्‌विचारी राजानें त्या ब्राह्मण कुटुंबाच्या हितासाठींच सर्वांचे दरवाजे ठोठावले होते तर! केवढी मोठी चूक झाली!

नंतर त्यांनीं एक सोन्याचा हात तयार करून राज्याच्या उजव्या हाताच्या जागीं बसविला. नंतर सुंदरेश्वरस्वामी नांवाच्या देवाल्यांत जाऊन शंकराचा धांवा केला कीं, देवा, आमची चूक पोटांत घेऊन राजाचा हात राजाला परत दे. देवानें राजाचा हात जशाचा तसा करून दिला.

सोन्याचा हात बसवून घेणारा तो राजा सुवर्ण हस्त पांड्य राजा या नांवानें आजपर्यंत इतिहासांत प्रसिद्ध आहे.





# आंधळा कारभार

एकाकाळीं हैद्राबाद शहरानजीकच्या एका खेड्यांत शकूर नांवाचा एक गरीब मुसलमान रहात असे. त्यानें हैद्राबादला जाऊन नोकरी करण्याचें ठरविलें. त्याकाळीं दोन तीन रुपये पगारांत देखील एका कुटुंबाचा उदरनिर्वाह छान चालत असे.

शकूरनें हैद्राबादला येऊन नोकरीकरितां पुष्कळ प्रयत्न केला. पण नोकरी मिळाली नाहीं. त्यानें कित्येक अर्ज टाकले. पण मोठ्या वशिल्याशिवाय त्याला नोकरी कोण देणार? त्याचे सर्व अर्ज कचऱ्याच्या टोपलींत जाऊन पडले.

पण हैद्राबादलाच राहून पोट भरायचें असें मनाशीं ठरवून त्यानें एक युक्ति काढली. त्या कामांत तुरुंगवास व फांशीची शिक्षा होणें सुद्धां शक्य होतें, पण नशिबाची परीक्षा पहावयाचीच असा मनाचा निश्चय करून त्यानें धाडस केलें. तो एका मोहर करणाऱ्याकडे गेला व एक मोहर तयार करवून घेतली. ती घेऊन तो कोर्टाच्या कचेरीच्या दरवाज्यांत समोर एक टेबल व दउत टाक ठेवून बसूं लागला. कोणी अर्ज घेऊन आला कीं, तो त्याच्याकडून एक पैसा वसूल करून घेई व अर्जावर मोहर लावून आंत पाठवी.

लोकांना वाटे कीं, सरकारनें ही नवी व्यवस्था केलेली दिसते आहे. कोणी फारशी चवकशी केली नाहीं. लोक एक पैसा देऊन व आपल्या अर्जावर मोहर लावून घेऊन कोर्टांत अर्ज दाखल करूं लागले. कोर्टांतल्या एकाहि अधिकाऱ्यानें फिकर केली नाहीं कीं, ही नवीन मोहर कसली. असें महिना पंधरा दिवस चालूं होतें. शेवटीं तो एक प्रघातच पडून गेला. शकूरला पुष्कळ प्राप्ति होऊं लागली. पण त्याला भीति पण वाटूं लागली


Fullscreen

127





54 / 84



कीं, जर हें रहस्य कोणाला कळलें व चवकशी झाली तर फांशी होईल.

म्हणून त्यानें दुसरा एक उपाय केला. तो एका पैशाऐवजीं दोन पैसे वसूल करूं लागला. त्यांतला एक पैसा निराळा ठेवूं लागला.

होतां होतां दहा वर्षें लोटलीं. पण एका दिवशीं कांहीं कारणानें शकूर कोर्टासमोर जाऊं शकला नाहीं. त्या दिवशीं अर्जावर त्याची मोहर नव्हती. कारकुनानें अर्ज स्वीकारला नाहीं. ही गोष्ट मोठ्या अधि-काऱ्यांच्या कानावर पोंचली. त्यांनीं मोहर कसली व लावणारा कोण याची चवकशी सुरू केली.

जुने अर्ज काढून मागवून तपासून पाहिले. त्यांवर लिहिलें होतें, "आंधळें सरकार पितळी दरवाजा, शकूर मुहरा." ही गोष्ट नबाबाच्या कानावर गेली. त्यानें शकूरला धरून आणण्यासाठीं हुकूम केला. शिपायांनीं शकूरला हजर केलें. केव्हांतरी रहस्य स्फोट होणार हें त्याला माहीत होतेंच. म्हणून तो जमा केलेले पैसे बरोबर घेऊन नबाबासमोर हजर झाला.

नबाबानें त्याला विचारलें—"तुला ही मोहर लावून पैसे वसूल करण्याचा अधिकार कोणी दिला?"

शकूरनें कांहीं लपवालपव केल्याशिवाय खरें खरें सर्व सांगितलें आणि म्हणाला—"सरकारचे म्हणून तीस हजार रुपये मी निराळे काढून ठेवले होते ते घेऊन आलों आहें." असें सांगुन त्यानें तीस हजार रुपयांची थैली नबाबासमोर ठेवली.

नबाबानें त्याच्या चातुर्याचें कौतुक करून त्याला त्याच नोकरीवर नेमलें. फक्त त्या मोहरेवर कोरलेल्या शब्दांपैकीं 'आंधळें' हा शब्द काढून टाकला. सरकारला प्राप्ति होऊं लागली व शकूरला नोकरी मिळाली.





## पूर्ण विश्वास

एके दिवशीं कांहीं गवळणी दूध दही विकून घरीं परत जात होत्या. एका घरीं शास्त्रीबुवा ओसरींत बसून पुराण वाचीत होते. उभ्या राहून पुराण ऐकायला त्यांना वेळ नव्हता. पण शास्त्रीबुवांनीं सांगितलेली एक गोष्ट मात्र त्यांच्या कानावर छान पडली. शास्त्रीबुवा म्हणाले—"ॐ, ह्या एका अक्षराचा उच्चार श्रद्धा व भक्तिपूर्वक केला तर महासागर देखील पायीं चालून पार करणें शक्य आहे!"

गवळणींच्या मनावर शास्त्रीबुवांच्या त्या वाक्याचा ठसा उमटला. प्रत्येक शब्द त्यांना खरा वाटला. रोज नदी पार करतांना तरीवाल्याला चार पैसे द्यावे लागत होते. शास्त्रीबुवाच सांगत आहेत तेव्हां ॐ अक्षराचा उच्चार करून नदी पार करतां आली तर नावेची काय गरज? रोजचे चार पैसे तरी वांचतील. शास्त्री बुवांच्या बोलण्यावर गवळणींचा पूर्ण विश्वास बसला.

त्या दिवशीं त्या नदी काठीं पोंचल्यावर डोळे मिटून "ॐ" म्हणाल्या व नदींत उतरल्या आणि खरोखरच त्या नदीपार चालत गेल्या. त्या दिवसापासून गवळणींचा एक पैसादेखील नावेखातर खर्च झाला नाहीं. रोज त्या नदी पार करून शास्त्री-बुवांच्या गावीं येत व पुन्हां पायींच नदी पार करून जात. एक महिना झाला. गवळणी आपसांत बोलत—"शास्त्रीबुवांच्या कृपेनें आपले चार पैसे वाचूं लागले. नदी पार करण्याचें हें रहस्य त्यांनीं आम्हांला सांगितलें नसतें तर आपण नदी पलीकडे पैशाशिवाय जाऊं शकलों असतों का? शास्त्रीबुवाचे आभार मानले पाहिजेत. एकदां त्यांना आपल्या गांवीं बोलावून घेऊन

Fullscreen 127 56 / 84

जाऊन शिधा दक्षिणा देऊन त्यांचा सत्कार केला पाहिजे.

गवळणींनीं त्या प्रमाणें एके दिवशीं शास्त्रीबुवांना आपल्या गांवीं बोलाविलें. शास्त्रीबुवांनीं होकार दिला. एक गवळण त्यांना बोलावून घेऊन यायला शास्त्रीबुवांच्या गांवीं गेली. शास्त्रीबुवा गवळणीबरोबर नदी किनाऱ्यावर आले. शास्त्रीबुवा काठावर उभे राहून नाव येण्याची वाट पाहूं लागले.

त्या गवळणीनें त्यांना विचारलें—"शास्त्री बुवा, चला ना! थांबलांत कां?"

"नाव तर येऊं दे!" शास्त्रीबुवा म्हणाले.

"कां? पायीं पार करतां येणार नाहीं का? चला ना!" ती गवळण म्हणाली आणि पाण्यांत उतरली. पण शास्त्रीबुवा तिच्या पाठोपाठ पाण्यांत उतरले नाहींत. तें पाहून ती परतली व विचारूं लागली—"तुम्हीच ना पुराण सांगत असतां. म्हणालां होतां कीं, श्रद्धा व भक्ति पूर्वक "ॐ" अक्षराचा उच्चार केल्यास महासागर देखील पायीं पार करणें शक्य आहे? आपण म्हटल्याप्रमाणें आम्ही गवळणी रोज पायींच नदी पार करतों. मग आपल्याला नावेची गरज कां भासावी? आश्चर्य वाटतें आम्हांला!"

"असें होय? तर मी सुद्धां "ॐ" चा उच्चार करून पाण्यांत उतरतों." शास्त्रीबुवा म्हणाले. नंतर त्यांनीं कमरेला एक दोरी बांधली व दोरीचें दुसरें टोक काठावरच्या लोकांच्या हातांत देत म्हणाले—"मी बुडूं लागलों तर मला वर काढा."

पण शास्त्रीबुवांचा 'ॐ' अक्षराच्या उच्चारावर पूर्ण विश्वास नव्हता, म्हणून ते बुडाले व लोकांनीं त्यांना वर ओढून काढलें.






आजोबा चांदण्या रात्रीं बाहेर पडवींत आराम खुर्चीवर येऊन बसले. मुलें घोळका करून त्यांच्या चारी बाजूला बसलीं. संवयी प्रमाणें आजोबांनीं कांहींच श्लोक म्हटला नाहीं. जणुं कांहीं आजोबांनीं मुलांची सत्वपरीक्षाच पाहायचें ठरविलें होतें. मुलें अगदीं गप्प बसून आजोबा कोणता श्लोक म्हणतात याची उत्सुकतेनें वाट पहात होतीं.

इतक्यांत झाडावरच्या फांदीवर पंख फड-फडल्याचा आवाज ऐकून मुलें—"काय आहे तें?" विचारूं लागलीं. पुष्कळ तर्कवितर्क करूं लागलीं. आजोबांनीं नाकपुड्यांत तपकीर कोंबीत हा श्लोक म्हटला—

"शब्द मात्रन्नभेतव्य
मज्ञात्वा शब्द कारणं;
शब्दहेतुं परिज्ञाय
सुमन्त्रो गौरवं गतः।"

आणि मुलांनीं कांहीं विचारल्याशिवाय स्वतःच म्हणाले—"तुम्हांला या श्लोकाचा अर्थ हवा असेल नाहीं? बरें ऐका, सांगतों. याचा अर्थ असा आहे कीं, नुसता आवाज ऐकून त्या आवाजाचें कारण जाणल्याशिवाय घाबरून जाणें बरें नाहीं. सुमंत्राला आवाजाचें मूळ कारण शोधून काढल्यामुळेंच आदर मिळाला."

मुलांना आनंद झाला. टाळ्या वाजवून म्हणाले—"आजोबा! आतां गोष्ट सांगा. हा सुमंत्र कोण आणि त्यानें कोणता आवाज ऐकून त्याचें काय कारण शोधून काढलें?"

"ऐका हे सांगतों गोष्ट!" असें सांगून आजोबांनीं गोष्ट सांगायला सुरवात केली.

श्रीपर्वत नांवाच्या प्रदेशांत ब्रह्मपुर नांवाचें एक गांव होतें. तेथें श्रीधर नांवाचा राजा राज्य करीत असे. मी मघां सुमंत्राचा उल्लेख

Fullscreen 127 58 / 84

केला होता ना ? तो होता त्याचा मंत्री. श्रीधरच्या राज्यांत जी सुख व शांति नांदत होती त्याचें खरें श्रेय या मंत्र्यालाच होतें.

बरं मग, एकदां काय झालें, गांवांत अशी बातमी पसरली कीं घंटाकर्ण नांवाचा राक्षस श्रीपर्वतावर आलेला आहे. नुसती बातमी नव्हती उडाली, खरोखरच घंटेचा आवाज ऐकूं येई व लोक घाबरून जात. घंटाकर्णाच्या भयानें लोक आपलें गांव सोडून पळून जाऊं लागले. जे लोक राहिले ते नाइलाज म्हणूनच राहिले.

हें पाहून राजा काळजींत पडला. त्यानें सुमंत्राला बोलावून विनंति केली—"मंत्री, लोकांच्या मनांतले हें भय घालवलें पाहिजे. कांहींतरी उपाय करा."

सुमंत्रानें ती जबाबदारी स्वतःवर घेतली. मंत्री चतुर होता. त्यानें घंटेचा आवाज कोठून व कसा येतो हें स्वतः प्रथम पाहण्याचें ठरविलें. आवाज ज्या दिशेनें येत होता त्या दिशेनें मंत्री रानांत निघाला. तेथें राक्षस बिक्षस कोणी नव्हता. एक माकड रानांत हिंडत होतें. त्याच्या हातांत एक घंटा होती. ती घंटा त्याला कोठें तरी सांपडली असावी. तें चालूं लागलें कीं घंटा वाजे किंवा मधून मधून गमतीखातर तें ती वाजवी.

घंटा कां वाजत होती हें कळलें ना ? सुमंत्रानें कांहीं फळें आणून माकडाला दाखवून झाडाखालीं ठेवलीं. माकड झाडाखालीं उतरून आलें. घंटा एका बाजूला ठेवून फळें उचलून खाऊं लागलें. सुमंत्रानें घंटा उचलून घेतली. खरी गोष्ट कळल्यावर लोकांचें भय नाहींसें झालें व सुमंत्र मंत्र्याचा आदर त्यांच्या मनांत वाढला.

म्हणून नुसता आवाज ऐकून भिऊं नये. आवाज कोठून व कां येत आहे. ह्याचा पत्ता लावावा." आजोबांनीं गोष्ट संपविली.






[ ३ ]

इकडे राजा आपल्या मुलीच्या लग्नाची तयारी करीत होता आणि त्यावेळीं बिचारा राजकुमार त्या वाळवंटांत राजकुमारीची वाट पहात बसला होता.

त्यानें पुष्कळ वेळ वाट पाहिली. पण राजकुमारी परत आली नाहीं. कशी येणार ? तिच्या बापानें तिला कैद केलें होतें. पण ही गोष्ट राजकुमाराला माहीत नव्हती.

तो वाळवंटांत निर्जन स्थानीं बसून होता. दूरवर जिकडे पहावें तिकडे वाळवंटच वाळवंट. वाळूचे ढिगारे जागोजागीं दिसत. कोठें हिरवळ म्हणून नजरेस येईना.

त्याला भूक लागली. बसून तरी कोणाची व किती वेळ वाट पाहणार ? दूर कोठें तरी ओढा किंवा तळें तर पहावें असा विचार करून तो उठला व वाळूच्या ढिगाऱ्यावर चढून दूरवर पाहूं लागला. तो अगदीं दमून गेला होता. प्रत्येक पाऊल वाळूंत घसरत होतें, म्हणून मोठ्या कष्टानें तो तासाभरांत चार फर्लांग चालून गेला. वाळूच्या एका टेकडीवर चढून त्यानें चारी बाजूला पाहिलें. दूर त्याला हिरवळ दिसली. मळा असावा असें त्याला वाटलें. बागेंत फळझाडें असतील तर भूकतहान भागवतां येईल असा विचार


Fullscreen

127





60 / 84





करून त्यानें त्या दिशेनें जायचा विचार केला. सारी शक्ति एकवटून तो त्या बागेपर्यंत पोंचला. सूर्य डोक्यावर येऊं लागल्यामुळें तो अगदीं घामाघूम झाला होता. परंतु झाडांवर ताजीं फळें पाहून त्याला आनंद झाला. त्यानें हात जोडून देवाला नमस्कार केला आणि बागेंत शिरला. कांहीं फळें हिरवीगार होतीं तर कांहीं तांबूस. तांबूस फळांचा गोड वास सुटला होता. त्यानें मागें पुढें कांहीं पाहिलें नाहीं व झाडावर चढून भराभर हाताला आलीं तीं फळें तोडून खाऊं लागला. कांहीं फळें त्यानें खिशांत भरून घेतलीं. त्यानें पोटभर फळें खाल्लीं व झाडाखालीं आडवा झाला. उन्हांत दमून भागून आल्यामुळें जमिनीला अंग टेकल्याबरोबर त्याला झोंप लागली.

झोंपून उठल्यावर त्यानें डोक्यावर हात फिरवून तोंडावर हात फिरवला तर त्याच्या हाताला लांबच लांब केस लागले. हा काय प्रकार आहे? ही दाढी कोठून आली. आपण तीं फळें खाल्लीं त्यांचाच हा परिणाम असावा असा विचार करून तो फार दुःखी झाला. परंतु विचित्र गोष्ट अशी कीं बराच विचार करीत असतां त्याच विचारांत त्याला सपाटून भूक लागली.

पण या खेपेस फळ खाण्याची हिम्मत त्याला होईना. लाल फळें खाल्ल्याचा जो परिणाम झाला तो त्यानें अनुभवलाच होता. कदाचित हिरवीं फळें खाल्लीं तर दाढी नाहींशी होईल असा विचार करून त्यानें हिरवीं फळें खाल्लीं. हीं फळें पण गोड होतीं. त्यानें चार पांच फळें तोडून खाल्लीं आणि झाडाच्या बुंधाला टेंकून बसला. बसल्या बसल्याच त्याला झोंप लागली.

सूर्यास्ताच्या सुमारास त्याची झोंप मोडली तेव्हां काळोख पडूं लागला होता. जांभई देत तो मागें सरकला. पण त्याचें डोकें झाडाला घेंकल्याशिवाय आपटल्यासारखें झालें. त्यानें हात लावून पाहिला तर डोक्याला दोन्हीं बाजूला दोन शिंगें. एवढेंच नव्हे तर त्याची दाढी देखील पांढरी झाली होती. आपल्या रूपाची कल्पना करूनच त्याच्या मनांत धडकी भरली. तो विचार करूं लागला—"माझ्या नशिबीं हें काय आलें आहे? राजकुमारी गेली ती परतली नाहीं आणि आतां परतली तरी काय उपयोग? न आलेलीच बरी. मला ती ओळखणार देखील नाहीं आणि ओळखलें तरी ती माझ्याशीं लग्न कसें करील? तिनें न ओळखलें तर माझ्याशीं ती घृणा तरी करणार नाहीं. फार तर कोणी तरी परका माणूस असेल असें समजून दूर निघून जाईल. व मी तरी कोणत्या तोंडानें तिला लग्न कर म्हणून विनवूं? मी सर्वस्वाला मुकलों—स्वदेश, राजकुमारी, लाकडी घोडा आणि शेवटीं माझें स्वतःचें रूप! तो पिसाळल्यासारखा त्या काळोखांत इकडून तिकडे आणि तिकडून इकडे भटकूं लागला. शेवटीं कंटाळून पुन्हां झाडाखालीं बसला. थोड्या वेळानें त्याला झोंप लागली.



 Fullscreen  127      62 / 84 

झोपेंत त्याला एक स्वप्न पडलें, एका म्हाताऱ्या माणसानें येऊन त्याच्या पाठीवर प्रेमानें हात फिरवीत विचारलें—"बाळ! काय झालें तुला?" त्यानें त्याच्यावर ओढवलेल्या प्रसंगाचें वर्णन केलें.

म्हातारा म्हणाला—"असा हातपाय गाळून बसूं नकोस. हा सर्व भुताटकीचा परिणाम आहे. तूं लवकर येथून पाय काढ. झाडावरचीं फळें खाल्यानें दाढी येते किंवा शिंगें निघतात. खालीं पडलेलीं फळें खालीस तर तुझी दाढी व शिंगें पार नाहींशी होतील."

राजकुमार दचकून जागा झाला. पण समोर कोणींच नव्हतें. तरमग हें स्वप्न होतें. तरी एक विचार त्याच्या मनांत आला,—कदाचित देवाला दया आली असेल व त्यानें स्वप्नांत येऊन मला सांगितलें असेल. असा विचार करून म्हाताऱ्यानें सांगितल्याप्रमाणें त्यानें झाडावरून खालीं पडलेलें एक फळ उचलून खालें. त्याबरोबर त्याची दाढी व शिंगें उडून गेलीं त्याला आश्चर्य वाटलें. गमती खातर त्यानें कांहीं हिरवीं व कांहीं लाल फळें झाडावर चढून तोडून घेतलीं व झाडाखालीं पडलेलीं फळें पण उचलून आपल्या खिशांत भरलीं. नंतर खजुरीच्या पात्या काढून त्यानें एक लहानशी टोपली विणून घेतली आणि त्यांत तीं सर्व फळें भरून तो पुढें निघाला.

त्याला स्वदेशीं जावयाचें होतें. पण कसें जायचें! वाट फुटेल तिकडे जात रहावयाचें व नशिबाची परीक्षा पहायची? एवढेंच त्यानें ठरविलें. आतां त्याच्या मनांत त्या फळांची भीति उरली नाहीं. भूक लागली कीं फळें खायचीं. दाढी व शिंगें निघालीं कीं दुसरीं फळें खाऊन तीं नाहींशी करावयाची. असे चार दिवस गेले. पुढें पांचव्या दिवशीं त्याला एक रस्ता लागला. जिवांत जीव आल्यासारखें वाटलें त्याला.

थोड्या वेळानें एक मनुष्य खेचरावर बसून येत असलेला त्याला दिसला. राजकुमारानें त्याला विचारलें तेव्हां त्याला कळलें कीं पूर्वेकडे गेल्यास तो स्वदेशीं पोंचेल व पश्चिमेकडे गेल्यास राजकुमारीच्या देशांत पोंचेल.

आतां त्याच्या समोर प्रश्न पडला कीं स्वदेशीं जावयाचें कीं राजकुमारीच्या देशांत? लाकडी घोडा मी घालवून बसलों आहें. राजकुमारी पण कोठें गेली कोणास ठाऊक?





Fullscreen 127 64 / 84










हें तोंड नेऊन कोणाला दाखवूं ? काय वाटेल तें होवो, आतां राजकुमारीला घेऊनच परत जाईन, नाहीं तर या जगाचा कायमचा निरोप घेईन. असा विचार करून तो राजकुमारीच्या देशाकडे चालूं लागला.

तो थोडें अंतर चालून गेला असेल, पाठी मागून घोड्यांच्या टापांचा आवाज त्याला ऐकूं आला. त्यानें मागें वळून पाहिलें, कित्येक घोडेस्वार येत असलेले त्याला दिसले. मध्यभागीं एका मोठ्या गाडींत कोणीतरी राजपुरुष येत असावासा त्याला वाटलें. कारण त्याला मखमली झालरी होत्या. सोनेरी खिडक्या होत्या सर्वच राजघराण्याचा थाट होता. तो स्वतः एक राजकुमार असल्यानें त्याला हें कळायला वेळ लागला नाहीं कीं, कोणत्या तरी राजकुमाराची स्वारी कोठेंतरी चालली असावी.

त्या घोडे स्वारांना वाट देण्यासाठीं म्हणून राजकुमार रस्त्याच्या बाजूला उभा राहून गंमत पाहूं लागला. परंतु हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें कीं, त्या राजकुमाराची स्वारी एकाएकीं तो उभा होता तेथें थांबली. कां, हें त्याला कळेना. कोणी आपल्याला ओळखलें तर नसेल ! हे लोक आपल्या देशांतलेच तर नसतील ? निरनिराळे विचार त्याच्या मनांत येऊं लागले.

इतक्यांत घोडेस्वारांच्या नायकानें त्याच्या जवळ येऊन त्याला विचारलें, तूं फळें विकतोस वाटतें ? आमच्या थाकल्या सरकारांना फार भूक लागली आहे. आमच्याजवळ जेवढी रसद होती ती संपुष्टांत आली आहे. तुझ्या जवळच्या या फळांची जी किंमत असेल ती मागून घे."

राजकुमार म्हणाला—"मी फळेंविक्या नाहीं. माझ्याजवळ हीं जी फळें आहेत तीं विकण्यासाठीं नाहींत."





Fullscreen 127 66 / 84

"तसें नव्हे रे! आमचे हे राजकुमार लग्नाला चालले आहेत. फार भुकेले आहेत. तूं काय वाटेल ती किंमत घे आणि हीं एवढीं फळें दे." असें सांगून त्यानें दोन मोहरा पुढें केल्या.

राजकुमारानें अर्थातच विचारलें कीं, कोठें जात आहेत आपले राजकुमार? ते राजकुमारीच्या देशांत चालले आहेत व राजकुमारीशींच त्यांचें लग्न होणार आहे हें ऐकून राजकुमारानें विचार केला—"असें काय! पाहातों स्वारीचें लग्न कसें होतें!" तो त्या सरदाराला म्हणाला—"हीं फळें मी स्वतः खाण्यासाठीं घेऊन जात आहें. पण तुमचे राजकुमार लग्नालाच चालले आहेत. यावेळीं हीं फळें खायाचीं नाहींत तर केव्हां खावयाचीं? म्हणून मी हीं फळें देतों." असें सांगून त्यानें तांबूस व हिरवीं अशीं दोन्ही फळें त्याला दिलीं व मोहरा ठेवून घेतल्या.

नायकानें तीं फळें युवराजांस खावयास दिलीं व युवराजांची स्वारी आपल्या वाटेनें पुढें निघाली. फळें खाल्ल्याबरोबर युवराज गाढ झोंपीं गेले. थोड्या वेळानें युवराज झोंपेत कुशीला वळूं लागला तर डोक्याला अधांत्रीं वाटूं लागलें. तोंडावर हात फिरवला तर दाढी. तो मोठ्यानें ओरडूं लागला. त्याचें ओरडणें ऐकून मंत्री धांवत आले. पाहतात तर गाडींत युवराज नसून कोणीतरी नरपशू होता. शरीर माणसाचें पण दोन शिंगें होतीं व लांब पिकलेली दाढी.

तीं फळें खाल्ल्यानेंच युवराजाची ही स्थिति झाली असावी हें कळायला मंत्र्यांना फार वेळ लागला नाहीं. त्या फळवाल्यालाच आतां धरलें पाहिजे. आतां तो फळवाला येईपर्यंत येथेंच थांबावयाचें, असें ठरवून युवराजांची स्वारी लव्याजम्यासह तेथेंच थांबली. [ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]





नोकरीवर लागून किती दिवस झाले रे तुला?
पेटींतलीं पत्रें काढायला केव्हां शिकणार?
पूर्वी कोणता धंदा होता तुझा?
कां? असा काय बघतोस?



"काय बाळोबा? घरांत कोण कोण आहे रे?"
तुम्ही चॉकलेट आणलें आहे मला!
तुझी ताई आहे का रे?
आणखी एक द्या!



"अरे ह्या मिशा कोठून आल्या?"
आई म्हणाली—"बाळू तिच्यासारखा दिसतो." त्यावर बाबांना राग आला. म्हणून ह्या मिशा लावल्या. दिसतो कीं नाहीं हो बाबा तुमच्या सारखा आतां!



"एका पैशाचें अननस दे!"
"एका पैशाची पिन दे!"

चित्रकार : एस. शंकरनारायण

Fullscreen 127 68 / 84



# महाकवि भारवी

संस्कृत भाषेचा सुप्रसिद्ध कवि भारवी याचें नांव तुम्ही ऐकलेंच असेल. त्याचे वडील भारवी सारखेच संस्कृत भाषेंत मोठे विद्वान व पंडित गणले जात. त्यांना वाटे कीं त्यांच्या मुलानें देखील त्यांच्या सारखेंच, किंबहुना त्यांच्याहून मोठें विद्वान व्हावें. त्यांनीं आपल्या मुलाच्या विद्याभ्यासाची फार काळजी घेतली. म्हणूनच भारवी संस्कृत भाषेचा महाकवि होऊं शकला.

पंडित सभेंत भारवीला लहान वयांतच मोठा नांवलौकिक मिळाला. फक्त त्याचे वडील त्याच्या पांडित्याची वाखाणणी करीत नसत. उलट ते म्हणत,—"त्याला काय येतें आहे. अजून पोरकटपणा गेला नाहीं त्याचा!" तें ऐकून भारवीला फार वाईट वाटे, एवढेंच नव्हें, तर त्याला वडिलांचा राग येऊं लागला व त्यानें त्यांच्याशीं भाषण करण्याचें सुद्धां सोडून दिलें.

एकदां पंडितांची मोठी सभा झाली. भारवीनें मोठमोठ्या पंडितांना शास्त्रार्थांत पराजित केलें. सर्वांनीं त्याच्या पांडित्याची स्तुति केली. पण वडील म्हणाले—"माहीत आहे मला त्याची विद्वत्ता!"

भारवीला तें ऐकून राग आला. भर सभेंत वडिलांनीं केलेला अपमान त्याला असह्य वाटला. घरीं गेल्यावर तो आईला म्हणाला—"आतां मी या घरांत राहणार नाहीं. बाबा इतरांसमोर नेहमीं माझा अपमान करतात. म्हणतात,—'याला कांहीं येत नाहीं!' मग मी कशाला राहूं या घरांत?"

संध्याकाळीं भारवी उशिरां घरीं आला. त्याचे आई वडील बोलत होते. आड उभा राहून त्यानें त्यांचें बोलणें ऐकलें

आई म्हणाली—"भारवी इतका का मूर्ख आहे? तो इतका रागावला आहे कीं घर सोडून जायला निघाला होता."

वडील म्हणाले—"मग मूर्ख आहे हेंच खरें! शाहणा असता, तर हे विचार त्याच्या मनांत आले नसते. तूंच विचार कर, बापानें मुलाच्या तोंडावर त्याची प्रशंसा केली व मुलाला त्यांत आनंद वाटला तर त्यांत बापाचें काय शहाणपण व मुलाचें तरी काय शहाणपण? भारवी विद्वान आहे. आजच्या सभेंत त्यानें विद्वानांना पराजित केलेलें पाहून मला फार आनंद झाला. पण त्यानें विद्वत्ता जास्त संपादन करावी म्हणून मी म्हटलें, त्याला काय येतें आहे? विद्येला मर्यादा नसते. शिकावी तेवढी थोडी. पण विद्ये-बरोबर माणसांत विनय पण असला पाहिजे."

वडिलांचें तें वाक्य ऐकून त्यांच्यावर व्यर्थ राग केल्याचा भारवीला पश्चात्ताप वाटला व त्यानें वडिलांची क्षमा मागितली व मनांत का होईना वडिलांचा अपमान केल्याचें प्रायश्चित्त काय असें त्यांना विचारलें.

वडील म्हणाले,—"एक वर्षभर सासुरवाडी रहा!" भारवी सासुरवाडी गेला. रीती-प्रमाणें जांवयाचा आदर सत्कार झाला.



पण एक दिवस गेला, दोन दिवस गेले, तीन दिवस गेले. तरी जांवईबापू परत जात नाहींतसें पाहून सासऱ्यानें विचारलेंच. तेव्हां खरें कारण लपवून भारवी म्हणाला—"वडिलांशीं भांडण झालें आहे. म्हणून निघून आलों."

पाहुण्याचा आदर तीन दिवस. या न्यायानें जांवईबापूंचा आदर एकाएकीं थांबला. घरच्या पुरुष मंडळींबरोबर त्यांना सुद्धां सर्व कामें करावी लागूं लागलीं. वडि-लांनीं सांगितलेलें प्रायश्चित्त म्हणून भारवी मुकाट्यानें सर्व कामें करूं लागला. सासुर-

Fullscreen 127 70 / 84

बाडची घरची शेती होती. शेत नांगरावें लागे. लावणी करावी लागे व शेवटीं रात्रभर जागून शेतावरच राखण करावी लागे. नवरा बायको रात्रीं शेतांत जात. बायकोला नवऱ्याचा हा अपमान सहन होईना. भावजयांसमोर नेहमीं तिची मान खालीं होऊं लागली.

श्रावण महिना आला. बायको म्हणाली–"मंगळागौर पुजायची आहे. पण अंगा-खांद्यावर कांहीं नाहीं. सर्व बायका नटून येतील. मात्र.....!" असें सांगून ती रडूं लागली.

भारवीनें तिची समजूत घातली व एका सावकाराचें नांव सांगून एक ताडपत्र तिच्या हातांत देत म्हणाला–"हें ताडपत्र त्याच्या कडे गहाण म्हणून ठेव व तुला पाहिजे असतील तेवढे पैसे घेऊन ये."

बायकोनें त्याप्रमाणें त्या सावकाराला तें ताडपत्र दिलें व पैसे घेऊन निघून गेली. सावकारानें तें ताडपत्र एका नळकांड्यांत घालून ठेवून दिलें.

भारवी शेतावर राखण करायला जाई तेव्हां वेळांत वेळ काढून किरातार्जुनीय नांवाचें काव्य लिहूं लागला होता. त्या




काव्यांतला एक श्लोक त्या ताडपत्रावर होता. पुढें कांहीं दिवसांनीं त्या सावकाराला व्यापाराच्या निमित्तानें परदेशीं जावें लागलें. समुद्रावरचा प्रवास होता. एक तुफान आलें आणि त्या तुफानांत त्याचें जहाज एका अपरिचित बेटाला जाऊन लागलें. तो गेला तेव्हां त्याची बायको गरोदर होती तिला मुलगा झाला.

भारवीनें 'किरातार्जुनीय' काव्य सासुर-वाडींच एका वर्षांत पुरें केलें. पण सावकाराचें कर्ज फेडल्याशिवाय तें प्रसिद्ध करावयाचें नाहीं असें ठरवून तो आपल्या बायकोला घेऊन आपल्या गांवीं गेला. सावकार अठरा वर्षांनंतर अनेक प्रकारचे कष्ट व यातना सहन करून स्वदेशीं परतला. तेव्हां त्याच्या बायकोनें मुलाला बोलावून आपल्या बाबांच्या पायां पडायला सांगितलें. सावकाराला परदेशीं जाते वेळीं बायको गरोदर होती हें देखील माहीत नव्हतें. त्या मुलाला समोर पाहून सावकाराला बाय-कोच्या पातिव्रत्याचा संशय आला व रागाच्या भरांत तिला काय वाटेल तें बोलला. त्यानें खिळ्याला टांगलेलें नळकांडें काढलें आणि बायकोला मारण्यासाठीं काठीसारखें उगारलें.











तेवढ्यांत नळकांड्यांत ठेवलेलें ताडपत्र खालीं पडलें व त्यावर लिहिलेल्या श्लोकावर सावकाराची नजर पडली तो श्लोक असा :–

"सहसा विदधीतनक्रिया
अविवेक: परमापदां पदं
वृणुतेहि विमृश्यकारिणं
गुणलब्धा: स्वयमेव सम्पद:"

तात्पर्य,–घाईंत कोणतेंहि काम करूं नये. अविवेकानें केलेल्या कामाचा परिणाम दुःखकारकच होतो. गुणानुरूप संपत्ति मिळते व विवेकी मनुष्यच गुणवान असतात.

त्यानें बायकोवर हात उगारला खरा, पण श्लोक वाचल्याबरोबर तो थांबला. चवकशी केल्यावर त्याला सर्व परिस्थिति कळली. भारवीनें तो श्लोक लिहून जणु कांहीं त्याच्या कुटुंबाचें व त्याचें रक्षणच केलें.

तो पर्यंत भारवी एक विख्यात कवि म्हणून देशभर प्रसिद्ध झाला होता. सावकार स्वदेशीं परत आल्याचें कळल्यावर तो कर्जाची फेड करण्यासाठीं व आपलें ताडपत्र सोडवून आणण्यासाठीं सावकाराच्या घरीं आला व त्याचे आभार मानून पैसे देऊं लागला.

तें पाहून सावकार कृतज्ञतापूर्वक त्याला नमस्कार करून म्हणाला–"महाकवे ! आपल्या ह्या ताडपत्रानें माझ्या संसारावरचें एक मोठें संकट टळलें आहे. त्याबद्दल आपले आभार मानावे तितके थोडेच. कर्जफेड करण्याकरितां आपण आलांत. ह्यांत आपला थोरपणाच दिसत आहे. तुम्ही आणलेले हे पैसे ठेवून घ्या आणि माझा संसार सुखाचा करण्यासाठीं तुम्ही जो हात-भार लावला त्याबद्दल फूल नाहीं फुलाची पाकळी म्हणून ही भेट स्वीकार करा. असें सांगून एक ताटभर मोहरा आणून त्यानें भारवीला दिल्या.



# घारापुरचीं लेणीं

याचें नांव 'एलिफेंटा केव्हस' असें इंग्रजींत आहे. हीं लेणीं मुंबईपासून ६-७ मैलांवर स्थित एका लहानशा बेटावर आहेत. ह्या बेटाच्या दक्षिणेकडील खडकावर एक दगडाचा हत्ती होता. इ. स. १८६४ मध्यें तो मुंबईला आणण्यांत आला. ह्या हत्तीवरूनच ह्या लेण्यांचें नांव इंग्रजींत 'एलिफेंटा केव्हस' असें पडलें. हीं लेणीं आठव्या शतकांतलीं आहेत.

येथें आठ लेणीं आहेत. हीं लेणीं देवाची सृष्टी नसून मनुष्यकृतच आहेत. ह्यांपैकीं मोठी गुहाच फार महत्वाची आहे. तिच्या भिंतीवर शंकराच्या कथांवर आधारलेलीं चित्रें कोरलीं आहेत. हीच गुहा पहिली. इतर गुहेंतलें कोरीव काम अर्धवट राहून गेलें आहे. ह्या लेण्यांत सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे महेशाची मूर्ति. ही वीस फूट उंच आहे.

कित्येक मूर्ति खाऱ्या हवेमुळें किंवा इतर कारणांनीं विकृत होऊन गेल्या आहेत. १७१२ मध्यें पोर्तुगीज लोकांनीं ह्या लेण्यांचें मूळ रूप बरेंच बिघडवून टाकलें. मोठ्या गुहेंत तर त्यांनीं दारूगोळाच सांठवून ठेवला होता. १७५० मध्यें सहाव्या गुहेचा उपयोग चर्च सारखा देखील केला गेला होता.



Fullscreen 127 12 / 80




# पदरीं पडलें नि पवित्र झालें

एका गांवीं शेतकऱ्याचें एक जोडपें रहात असे. शेतकऱ्याचें नांव होतें विठू व त्याच्या बायकोचें रखुमाई. विठू रोज सकाळीं शेतांत काम करायला निघून जाई व संध्याकाळीं खूप उशिरां घरीं परत येई. रखुमाई घरचें काम संभाळून कोंबड्या पाळी व नवऱ्याच्या कमाईला हातभार लावी. रखुमाईकडे नेहमीं वीस पंचवीस कोंबड्या असत. कधीं कधीं ती देखील नवऱ्याबरोबर शेतांत कामाला जाई.

विठूला कोंबडीचें मांस फार आवडे. त्यानें पुष्कळदां बायकोला कोंबडीचें मांस रांधायला सांगितलें. पण तिनें कधीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. विठूनें देखील आपला हट्ट सोडला नाहीं. त्यानें एकदां घरीं येऊन बायकोला सांगितलें कीं, मला शेतांत एक देव भेटला. तो आपल्या शेताजवळच्या पिंपळावर बसलेला असतो. मी त्याला विचारलें—"मी इतकीं वर्षें शेतांत काम करीत आहें. पण मना सारखें पीक एकावर्षी देखील आलें नाहीं. काय कारण आहे ?"

तो म्हणाला—"हें पहा, मी तुझ्या शेताची राखण करतों. तुझ्या घरीं इतक्या कोंबड्या आहेत. पण कधीं तूं कोंबडीचें मांस मला खायला घातलेंस का ? मी उपाशी राहतों म्हणून तुझ्या शेतांतलें अर्धें पीक खाऊन टाकतों."

तें ऐकून रखुमाई घाबरली. म्हणाली—"होय का ? तर मग दर शनिवारीं मी कोंबडीचें मांस शिजवून पिंपळाच्या झाडाच्या खुराड्यांत ठेवून येत जाईन."

त्या दिवसापासून रखुमाई दर शनिवारीं कोंबडीचें मांस शिजवून स्वतः पिंपळाच्या खुराड्यांत जाऊन ठेवूं लागली. रखुमाई निघून गेल्यावर विठू खुराड्यांतलें मांस काढून खाऊं लागला. आपली युक्ति यशस्वी झाल्याचा त्याला अपरंपार आनंद झाला.

परंतु शेतांतलें उत्पन्न वाढलें नाहीं व कोंबडी मागून कोंबडी मात्र मरत होती. रखुमाईला संशय आला. म्हणून एके दिवशीं खुराड्यांत मांस ठेवून घरीं परत न जातां एका झाडाआड ती लपून बसली. विठू झाडावरच होता. पण त्याला रखुमाई लपली असल्याचें कळलें नाहीं. ती गेली असेल असें समजून तो झाडावरून खालीं उतरला आणि खुराड्यांतलें कोंबडीचें मांस व भाकरी काढून खायला बसला. तें पाहून रखुमाईला नवऱ्याचा इतका राग आला कीं, ती कांहीं बोलल्याशिवाय तेथून निघून गेली.

संध्याकाळीं विठू घरीं आला तेव्हां ती त्याच्याशीं कांहींच बोलली नाहीं. विठूला तिच्या त्या दिवशीच्या वागण्यांत अगदीं निराळाच असा फरक दिसून आला. बराच वेळ तो देखील कांहीं बोलला नाहीं. पण राहवलेंच नाहीं म्हणून म्हणाला—"काय आज एवढा अबोला धरला आहेस आज ?"

"आपल्या त्या झाडावरच्या देवाला जाऊन कां नाहीं विचारीत ?" रखुमाई म्हणाली. नंतर पुढें असेंहि म्हणाली—"मी





Fullscreen 127 14 / 80

उद्यां माहेरी जाणार आहें. ह्या घरची चाकरी आतां माझ्यानें होणार नाहीं !"

असें म्हणत तिनें एका मोठ्या टोपलींत आपलें सामान सुमान भरलें आणि नवऱ्याशीं कांहीं एक न बोलतां झोंपी गेली.

रखुमाई उजाडत उठली व शेजारणींचा निरोप घेऊन यायला म्हणून निघून गेली. इकडे विठू उठला आणि टोपलींतलें कपडे काढून आंत बसला आणि वरचें सामान तसेंच डोक्यावर ठेवून घेतलें.

रखुमाईला हें कांहीं कळलें नाहीं. तिनें टोपली उचलून डोक्यावर घेतली व चालूं लागली. टोपली जड असल्याचें तिला भासलें. पण नवरा उठायच्या आंत निघून जाण्याच्या हेतूनें ती थांबली नाहीं.

माहेरी पोंचल्यावर तिनें घडलेला सर्व वृत्तांत आपल्या म्हाताऱ्या आईला वर्णन करून सांगितला व म्हणाली—"आतां मी त्या घरची पायरी देखील चढणार नाहीं !"

आई म्हणाली—"असें होय ? ठीक ! त्या मेल्याचें तोंड देखील पाहूं नकोस !"

थोड्या वेळानें म्हातारी टोपलींतलें सामान काढून ठीक लावूं लागली तेव्हां विठूनें उभें राहून सासूला नमस्कार केला व म्हणाला—"मी आहें, विठू ! अशा रागावलांत तर कसें चालेल ?"

तिला वाटलें, दोघां नवराबायकोनें मिळून हा डाव रचलेला दिसतो आहे. फुकटांत माहेरीं कांहीं दिवस घालविण्यासाठीं जोडपें आलेलें दिसतें आहे. म्हातारी रागानें उठली आणि म्हणाली—"माझ्या जवळ अशी थट्टा करतां होय ?" आणि खूप शिव्या हासडून दोघांना घरांबाहेर काढलें.

रखुमाईनें विचार केला आतां कांहीं उपाय नाहीं—"पदरीं पडलें आणि पवित्र झालें. असें समजून स्वस्थ रहावें.





# स्यमंतकमणि

## चतुर्थ अध्याय

द्वार गुहेचें लहान होतें
गुहा होति पण मोठी आंत।
काळोखाच्या मुळें चांचपत
कृष्ण चालला होता आंत ॥

अंतर थोडें गेल्यावरती
वाटूं लागलें दिसलसें।
आणि पुढें तर त्यास भासलें
गुहेंत कोणी असेलसें ॥

वाटूं लागला उजेड हळुहळु
दिसूं लागलें दृश्य नवीन।
अंतःपुर तें होतें, झाला
चकित, काय हें एक नवीन !

अंतःपुर तें होतें निश्चित
अतिशय सुंदर सजलेलें।
पाळण्यांत अन् दिसलें सुंदर
मूल कुणाचें निजलेलें ॥

जवळ बसुनिया तेथें कोणी
तरुणी होती झोंके देत।
गोड गळ्यानें ओव्या म्हणुनी
होति मनाला ओढुनि घेत ॥

जणूं खेळणें, लोंबत होता
मणि तेजस्वी, पाहुनि त्या,
शिशु किलकाऱ्या मारित होता
घ्यावें ओढुन मण्यास त्या ॥

एकाएकीं परक्या पुरुषा
पाहुनि तरुणी घाबरली।
"पहा कोण हा ! धांवा, बाबा !"
जोरानें ती ओरडली ॥

हांक मुलीची पडतां कानीं
पिसाळून अस्वल तत्काल,
धांवत आलें धरण्या कृष्णा,
सावध होता पण गोपाल ॥


Fullscreen

127





18 / 80



"पूर्ण जाहलें वचन प्रभूचें
तृप्त जाहलें मन माझें।
स्पर्शानें तव चरणधूलिच्या
पवित्र झालें घर माझें॥

क्षणार्ध दिसलें रूप मनोहर
धनुर्धारि प्रभु रामाचें।
जांबवाननें तत्क्षण धरले
चरण कमल यदुरायाचे॥

रामदर्शनें जांबुवंतला
हुरूप चढला एक नवीन।
करून स्मित पण एकाएकीं
विचारांत तो झाला लीन॥

आनंदानें कृष्णा वदला–
"झालों प्रभु मी आज सनाथ।
कन्या माझी जांबुवती ही,
वरुन करावें तिला सनाथ॥

दिधलि दक्षिणा, मणी स्यमंतक
वरास करुनी कन्यादान।
दिला जांवया निरोप, करुनी
सर्व प्रकारें मान नि पान॥

"आला! आला! कृष्ण सखारे!
आला नटवर मुरलीधर!"
पाहुन कृष्णा प्रेमोन्मादें।
गद्‌गद् झालें सचराचर॥

वसुदेवाचें अन् देवकिचें
झालें अतिशय हर्षित मन।
कृष्णा संगें जांबुवतीला
चकित पाहुनी यादवगण॥

नाचुं लागलें मन रुक्मिणिचें
घेउनि आरति ती आली।
नवदंपतिला अतिप्रेमानें
घरांत घेउनि ती गेली॥






[ ८ ]

[अमरपालबरोबर जे सैनिक गेले होते, त्यांनीं त्या भयंकर पक्ष्यांचे पिंजरे जाळून त्यांचा संहार केला. नंतर राजकन्या कांतिमतीला एका मेण्यांत बसवून शत्रू पळून जात आहेत हें कळल्यावर चित्रसेन व उग्राक्ष तिला सोडविण्यासाठीं आपल्या अनुयायांसह धांवले. त्यांनीं मेणा थांबविला. शत्रूच्या सरदारानें राजकन्येचा वध झाला तरी चालेल पण ती चित्रसेनाच्या हातीं लागू नये अशी आज्ञा दिली. पुढें वाचा—]

शत्रूच्या सरदाराची राजकन्येचा वध करण्यास आज्ञा झाली असेल नसेल, तेवढ्यांत चित्रसेन व त्याचे सैनिक आणि उग्राक्ष व त्याचे सैनिक सर्वांनीं मिळून कांतिमतीचा मेणा व त्याचे रक्षक यांना चारी बाजूंनीं घेरलें. व्याघ्रचर्मवाले सैनिक किती वेळ टिकाव धरून उभे राहणार? एका मागून एक सर्व मरून किंवा जखमी होऊन पडले. आतां सुटका होणें अशक्य आहे हें पाहून सरदारानें एका हातांत तलवार व दुसऱ्या हातांत भाला घेतला आणि मोठ्यानें ओरडला—"आपल्याला मरायचें तर आहेच. पण कांतिमतीला ठार केल्याशिवाय नाहीं. ठार करा तिला!"

चित्रसेनाला वाटलें, आतां राजकन्येचें रक्षण करणें अशक्य आहे. कारण सुमारें

Fullscreen 127 20 / 80



आठ दहा सैनिक त्याची वाट अडवून मध्यें उभे होते.

तरी चित्रसेनानें त्वेषानें पुढें होऊन दोघां तिघां सैनिकांना कापून काढलें आणि मेण्याकडे वळला. तितक्यांत मेण्यांतून कांतिमती बाहेर आली. तिनें एका मृत सैनिकाच्या हातांतली तलवार काढून घेतली आणि तिचा वध करण्यासाठीं पुढें येणाऱ्या व्याघ्रचर्मवाल्यांवर वार करूं लागली.

उग्राक्ष तिचें शौर्य व साहस पाहून ओरडला—"कांतिमती! घाबरूं नकोस. मी येत आहें तुझ्या मदतीला. वाह वा! काय पण शौर्य! खरोखरच तूं क्षत्रिय कन्या आहेस." असें म्हणत उग्राक्ष व्याघ्रचर्मवाल्यांना उचलून दूर फेंकीत व गदेनें मारीत मेण्यापर्यंत येऊन पोंचला, चित्रसेन देखील त्याच वेळीं मेण्याजवळ येऊन पोंचला. कांतिमतीची तलवार रक्तानें माखलेली होती, हें सर्वांनीं पाहिलें.

"हे आमचे चित्रसेन महाराज आहेत. माझें नांव उग्राक्ष. हें सारें जंगल माझेंच आहे." उग्राक्ष म्हणाला.

कांतिमतीला उग्राक्षाचें तें बोलणें आवडलें नसावें. तिनें एकदां रागानें त्याच्याकडे पाहिलें व आपलें तोंड फिरवून घेतलें. नंतर ती मेण्यांत जाऊन बसली. आपल्या रक्षणकर्त्यांचे आभार मानायचे तर दूरच, त्यांच्याकडे रागारागानें पहात ती तोंड फिरवून बसली.

राजकन्या कांतिमतीची ही तऱ्हेवाईक वागणूक चित्रसेनाला बिलकूल पसंत पडली नाहीं. त्याला तिच्यावर रागच आला. स्वतःच्या प्राणाची पर्वा न करतां तो राजकन्येच्या शत्रूशीं लढला होता व तिचें रक्षण केलें होतें, त्याबद्दल कृतज्ञतेचे दोन शब्द देखील बोलूं नयेत अशी वागणूक कोणाला बरें आवडेल? अर्थातच चित्रसेनाला त्यांत आपला अपमान वाटला.

"उग्राक्ष! संपलें आपलें कर्तव्य! चल, आपण धवलगिरीच्या मार्गानें आपलें सैन्य घेऊन जाऊं!" चित्रसेन म्हणाला.

चित्रसेनाचें बोलणें ऐकून उग्राक्षाला आश्चर्य वाटलें. कारण त्यांनीं कपिलपुरावर स्वारी करण्याचें पूर्वीं ठरविलें होतें. त्या कामावर अमरपाल गेला देखील होता. पूर्वीं त्यांचा विचार कपिलपुर हस्तगत करून नागवर्माला यमसदनास पाठविण्याचा होता. पण चित्रसेन आतां कांहीं वेगळेंच बोलूं लागला होता.

"चित्रसेन! प्रथम कपिलपुराच्या किल्ल्याला वेढा द्यायचा ठरला होता, नाहीं का? सुदैवानें राजकन्येचें रक्षण करण्याचा योग वाटेंतच आला." उग्राक्ष थोडा अडखळत बोलला.

"आपण राजकन्येची रक्षा केली? कोण म्हणतो? राजकन्येनेंच आपणां सर्वांचें रक्षण केलें नाहीं का?" चित्रसेन राजकन्येच्या विचित्र वागण्यावर आपला असंतोष तिला कळावा म्हणून असें म्हणाला. नंतर उग्राक्षाला उद्देशून म्हणाला—"अमरपालनें



आपल्याला हें पूर्वींच सांगितलें होतें कीं, नागवर्मानें अग्निद्वीपवाल्यांना फितूर होऊन वीरसिंह महाराजांना कैद करून अग्निद्वीपांत पाठवून दिलें आहे. आतां कपिलपुर हस्तगत केल्यावर कोणाला गादीवर बसवावयाचें?" चित्रसेन कांतिमतीवर राग काढीत म्हणाला.

चित्रसेनचें बोलणें संपण्यापूर्वींच कांतिमती मेण्यांतून बाहेर आली. तिनें सशंकित दृष्टीनें एकदां चित्रसेनाकडे पाहून विचारलें—"माझ्या वडिलांना धरून राजद्रोही नागवर्मानें अग्निद्वीपांत पाठविलें आहे असें सांगणारा हा अमरपाल कोण?"

Fullscreen 127 22 / 80



“तो कपिलपुराचाच राहणारा आहे. तो पूर्वी नागवर्माच्या सैन्यांत भर्ती झाला होता. पुढें तो कैदी होऊन आमच्या हातीं लागला. त्यानें नागवर्मा व अग्निद्वीपांतले लोक यांच्या सैन्यांतील सर्व मुख्य मुख्य गुपितें आम्हांला सांगितली आहेत.” चित्रसेन एवढेच म्हणाला. “पण त्यानें माझ्या वडिलांविषयीं सांगितलेलें सर्व खोटें आहे. माझे वडील किल्ल्यांत भुयारांत कैदेंत खितपत आहेत.” कांतिमती म्हणाली.

“असें होय!” चित्रसेन एवढेंच म्हणाला. पण प्रत्यक्ष कांहीं करण्यास त्यानें उत्साह दाखविला नाहीं. उग्राक्ष म्हणाला—“चल, आपण त्यांच्या मदतीला जाऊं!”

“आमच्या मदतीची गरज कोणाला असेल तर ना!” चित्रसेन उपरोधिकपणें म्हणाला.

“मी सांगतें, तुम्ही मदत करावी!” कांतिमती म्हणाली.

“थोड्या वेळापूर्वी तुम्ही तर असा तोरा दाखविला होता कीं, जणूं कांहीं मी तुमचा कोणी मांडलिक राजा आहें. तुम्हांला माहीत असेलच कीं, हें सर्व जंगल व तो डोंगरावरील अद्‌भुत महाल माझा आहे.” चित्रसेन म्हणाला.

“हें जंगल त्याचें आहे हें थोड्या वेळापूर्वी तुमचा हा राक्षस म्हणाला होता.” कांतिमती म्हणाली.

चित्रसेनानें एकदां डोळे वटारून रुद्राक्षाकडे पाहिलें. हेतू होता, तुझ्या बोलण्याचा काय परिणाम झाला कळला ना! त्यावर रुद्राक्ष म्हणाला—“हो हें जंगल माझें आहे. पण मी चित्रसेनाचा सेवक आहें. या नात्यानें हें जंगल त्याचें देखील आहे.”

“ठीक! कपिलपुरचे महाराज वीरसिंह यांची ही एकुलती एक मुलगी कांतिमती चित्रनगरचे महाराज चित्रसेन यांची मदत मागत आहे. माझी आणखी एक प्रार्थना आहे कीं, राजद्रोही नागवर्मा याला त्यानें अन्यायपूर्वक आपल्या राजाला इतके दिवस बंदी करून ठेवलें या बद्दल शिक्षा देण्यांत यावी.” कांतिमती म्हणाली.

कांतिमतीच्या तोंडचे ते शब्द ऐकून चित्रसेनाला बरें वाटलें. त्यानें उग्राक्षाकडे वळून म्हटलें—“कळलें ना तुला! असावधपणें बोलल्याचा कसा उलटा परिणाम होतो तो!”

“चुकलो! आतां पुन्हां ही चूक होणार नाहीं. मी तुझा सेवक आहें. तुझी आज्ञा शिरोधार्य आहे.” रुद्राक्ष म्हणाला, आणि त्यानें प्रथम चित्रसेनाला व नंतर कांतिमतीला लवून नमस्कार केला.

तें सर्व पाहून कांतिमतीनें स्मित केलें. परस्परांवरचा राग व संदेह दूर झाले व समेटाचें गोड वातावरण निर्माण झालें. चित्रसेन उत्साहानें म्हणाला—“व्याघ्रचर्म घालून आलेल्या नागवर्माच्या सैनिकांपैकीं कोणी निसटून पळून तर गेला नसेल? चला तर कपिलपुराकडे. कांतिमतीसाठीं मेणा तयार करा.” असें सैनिकांना सांगून



चित्रसेन कांतिमतीला म्हणाला—“राजकुमारी! मेण्यांत बसावें!”

“महाराज! मी आतां बंदी नसून एक स्वतंत्र राजकन्या आहें. म्हणून मला देखील एक घोडा मिळाल्यास मी घोड्यावर बसून यायला तयार आहें.” कांतिमती म्हणाली.

“आतां त्यांना तलवार हातीं घेण्याची गरज काय? घोड्यावर बसून त्या आमच्या बरोबर आल्या तरी पुरें! कपिलपुरचा किल्ला सर करणें, आणि वीरसिंह महाराजांना मुक्त करणें हें सर्व आमचें काम आहे. त्या करितां जें युद्ध वगैरे करावें लागेल तें

Fullscreen
24 / 80



सर्व आपण व आपले सैनिक पाहून घेऊं!" चित्रसेन म्हणाला.

चित्रसेन एका घोड्यावर व कांतिमती दुसऱ्या घोड्यावर बसून पुढें निघाले आणि चित्रसेन व उग्राक्ष या दोघांचीं सैन्यें तुकड्या करून मागें चालूं लागलीं. कपिलपूरच्या तटाजवळ पोंचेपर्यंत पोंचायला सुमारें तास दोन तास लागले. किल्ला एका डोंगराआड होता. किल्ल्याच्या बुरुजावर त्यांना शत्रु-सैनिक उभे असलेले व दोन भयंकर पक्षी आकाशांत उडत पहारा देत असलेले दिसले. त्या पक्ष्यांना पाहून चित्रसेन व उग्राक्ष दोघांना आश्चर्य वाटलें. उग्राक्ष म्हणाला–"महाराज येथें देखील हे पक्षीच आडवे येणार असें दिसतें. सैन्य देऊन आपण अमरपालला पुढें पाठविलें होतें. तो कोठें दिसत नाहीं. ते सर्व शत्रूच्या हातांत तर नाहीं फंसले?"

चित्रसेनानें पाहिलें कीं, किल्ल्याचे दरवाजे आंतून बंद आहेत. समोर युद्ध झाल्याचीं चिन्हें दिसत नव्हतीं. तर मग अमरपाल बाहेरच कोठें तरी लपून बसला असेल व आपली वाट पहात असेल.

चित्रसेनाच्या मनांत हे विचार घोळत होते त्याच वेळीं त्याला झाडींतून कोणी तरी येत असल्याचा भास झाला. वळून पाहिलें तर अमरपाल घोड्यावरून येत होता. तो जवळ येऊन म्हणाला–"पाहिलेंत महाराज! नागवर्मा धवलगिरीवर चालून गेला तेव्हां कपिलपुरच्या किल्ल्याच्या रक्षणाची चांगली व्यवस्था पण करून गेला."

"मी हेंच आतांपर्यंत पहात होतों. ते दोन पक्षी किल्ल्यावर घिरट्या घालीत आहेत. ह्या दोन पक्ष्यांशिवाय दुसरे पक्षी किल्ल्यांत असतीलसें मला वाटत नाहीं. बुरुजावर पहारा देणारे सैनिक तसे जास्त दिसत











Fullscreen 127 26 / 80

नाहींत. तरी पण विचार केला कीं, आपल्या जवळच्या लहान तुकडीच्या बळावर किला सर करणें शक्य होणार नाहीं. म्हणून मी आतांपर्यंत आपली वाट पहात बसलों होतों." अमरपाल म्हणाला.

"तूं घाई केली नाहींस हें बरें झालें. नाहींतर तुम्ही त्या पक्ष्यांच्या तोंडी बळी पडला असतां आणि फायदा कांहींच झाला नसता." असें सांगून चित्रसेन उग्राक्षाकडे वळून म्हणाला—"आतां एकच उपाय उरला आहे. किल्ल्याचें फाटक तोडून आपण आंत शिरलें पाहिजे. हें काम तुझ्या अनुयायांना सहजीं करतां येण्यासारखें आहे.

उग्राक्षानें प्रथम चित्रसेनाकडे व नंतर भयंकर पक्ष्यांकडे पाहिलें व डोकें खाजवून म्हणाला—"आपल्या कांहीं अनुयायांना किल्ल्याचें फाटक तोडण्यासाठीं व कांहींना किल्ल्याची भिंत पाडण्यासाठीं पाठवूं शकलों असतों. पण या भयंकर पक्ष्यांना काय करणार?"

"ते आपल्यावर हल्ला करूं शकणार नाहींत ह्याची जबाबदारी माझ्यावर!" अमरपाल म्हणाला.

"तें कसें? अशक्य!" चित्रसेन म्हणाला.

"आज सकाळीं जेव्हां या पक्ष्यांच्या पिंजऱ्यांना आग लावून मी यांना ठार केलें तेव्हां मला एक गोष्ट आढळून आली. हे पक्षी आगीला फार भितात. म्हणून आपण आपल्या निवडक सैनिकांच्या हातांत एकेक मशाल देऊं. या सैनिकांच्या हातांतली मशाल म्हणजे या पक्ष्यांच्या विरुद्ध ढाल समजा, महाराज! या उपायानें पक्ष्यांच्या हातून स्वतःचा बचाव करून घेणें शक्य आहे!" अमरपाल म्हणाला.

(पुढील गोष्ट पुढील अंकीं)





# मातीची गाडी

उज्जयनी नगरींत चारुदत्त नांवाचा एक ब्राह्मण युवक रहात असे. त्याला जो कांहीं जमीनजुमला मिळाला होता तो सर्व त्यानें दान-धर्म करण्यांत खर्च केला. त्याच्या बायकोचें नांव धूतांबा असें होतें. त्यांना रोहसेन नांवाचा एकुलता एक मुलगा होता. चारुदत्त गरिबींत दिवस कंठीत असला तरी त्याचा एक बालमित्र मैत्रेय, वर्धमान नांवाचा नोकर, रदनिका नांवाची दासी यांचा भार त्याच्यावरच होता. सर्वांत विचित्र गोष्ट म्हणजे अशा या गरीब ब्राह्मण तरुणावर उज्जयनीची वसंतसेना नांवाची वेश्या प्रेम करीत असे.

एके दिवशीं वसंतसेना एकटीच रात्रीं घरीं परत जात असतां राजाचा मेहुणा शकार ह्यानें तिला पाहिलें व त्यानें तिचा जणुंकांहीं पाठलागच सुरू केला. स्वरक्षणासाठीं निरुपाय म्हणून ती चारुदत्ताच्या घरांत शिरली. तिनें आपले दागिने काढून चारुदत्ताकडे आपली ठेव म्हणून ठेवून दिले. तिनें असेंहि सांगितलें कीं, शकार त्या दागिन्यांसाठींच तिचा पिच्छा पुरवीत आहे. चारुदत्त तिला सोबत म्हणून पोंचवायला तिच्या घरापर्यंत जाऊन आला. त्यानें दागिन्यांच्या रक्षणाचें काम वर्धमान व मैत्रेय यांच्यावर टाकलें. दोघे आळी पाळीनें दिवसां व रात्रीं दागिन्यांचें रक्षण करीत.

चारुदत्ताच्या घरीं पूर्वी संवाहक नांवाचा नोकर काम करीत असे. चारुदत्ताच्या घरीं गरिबी असल्यामुळें त्याला नोकरी सोडावी लागली. उदर निर्वाहासाठीं त्यानें जुगार खेळायला सुरवात केली. त्याच्या डोक्यावर कर्जाचें ओझें वाढत चाललें. म्हणून तो

Fullscreen 127 28 / 80








आपलें तोंड लपविण्यासाठीं एका पडक्या देवळांत राहूं लागला. कर्ज देणारे तेथें आले आणि पट मांडून खेळूं लागले. खेळ ऐन रंगांत येऊं लागल्यावर संवाहक स्वतःची परिस्थिति विसरून मध्येंच ओरडला— "हा डाव माझा आहे!" पण तेवढ्यांत आपली चूक त्याच्या लक्षांत आली व त्यानें तेथून पाय काढला, तो सरळ वसंतसेनेच्या घरीं आला. तो चारुदत्ताचा नोकर आहे हें ओळखून वसंतसेनेनें त्याचें सर्व कर्ज फेडलें. संवाहकचें मन ह्या एका घटनेमुळें पालटलें व तो एक बौद्ध भिक्षु झाला.

उज्जयनीला शर्वीलक नांवाचा एक ब्राम्हण रहात असे. त्याचें प्रेम वसंतसेनेची दासी मदनिका हिच्यावर होतें. मदनिकेबरोबर लग्न करण्याची व संसाराचा खर्च चालविण्याची लायकी त्याच्यांत आहे कीं नाहीं ह्या गोष्टीची परीक्षा करण्यासाठीं वसंतसेनेनें थोडें धन आधीं द्यायला सांगितलें. पण शर्वीलक याच्याकडे एक दिडकी देखील नव्हती. म्हणून त्यानें इतर शास्त्रांच्या अभ्यासा बरोबर चौर्यकलेचा अभ्यास सुरू केला. त्यानें चारुदत्ताच्या घरांत शिरून वसंतसेनेचेच दागिने चोरून ते तिला आणून दिले.

दागिने चोरीला गेलेले ऐकून चारुदत्ताला वाईट वाटलें. त्यानें त्या दागिन्यांच्या जागीं त्यांची किंमत म्हणून आपल्या बायकोचा रत्नहार वसंतसेनेकडे मैत्रेयाच्या हातीं पाठवून दिला. शर्वीलकच्या चोरीमुळें चारुदत्ताला हा सर्व त्रास झाला हें वसंतसेनेला अर्थातच कळल्याशिवाय राहलें नाहीं. पण ती उघड कांहींच बोलली नाहीं व मदनिकेला शर्वीलक बरोबर पाठवून दिलें. दोघे गाडींत जात असतां शर्वीलकला कळलें कीं, राजानें आर्चक नांवाच्या एका व्यक्तीला गुन्हेगार म्हणून धरून नेलें आहे.

आर्चक हा एका गवळ्याचा मुलगा होता व तो शर्वीलकचा मित्रगण होता. लोकांना वाटलें कीं कोणी सिद्धपुरुषानें असें भविष्य वर्तवलें होतें कीं, आर्चक राजा होणार. म्हणून राजानें त्याला कैद केलें आहे.

शर्वीलक गाडींतून उतरला व त्यानें गाडीवाल्याला आपल्या एका परिचित गायकाकडे मदनिकेला पोंचवायला सांगितलें. तो आर्चकाला सोडविण्यासाठीं निघाला व वसंतसेना, मैत्रेयानें दिलेला रत्नहार घेऊन चारुदत्ताकडे निघाली. तिनें मैत्रेयाच्या हातीं, ती येत असल्याचें चारुदत्ताला कळविलें होतें. पावसाळी रात्र असल्या कारणानें चारुदत्ताच्या घरींच तिला ती रात्र काढावी लागली.

दुसऱ्या दिवशीं उजाडतांच चारुदत्त मैत्रेयाबरोबर बाहेर बागेंत गेला. त्यानें आपला नोकर वर्धमान यास वसंतसेनेला एका बंद गाडींत बसवून बागेंत घेऊन यायला पाठविलें.

वसंतसेना सकाळीं उशिरां उठली. ती रत्नहार चारुदत्ताच्या बायकोला देऊं लागली. पण तिनें तो घेतला नाहीं. म्हणाली—"स्त्रीला पति हेंच सर्वांत मोठें आभूषण आहे. त्यांनीं होऊन तुला तो दिला असतां मी कसा परत घेऊं?"



चारुदत्ताचा मुलगा रोहसेन याच्यासाठीं मदनिका एक मातीची गाडी घेऊन आली. तेव्हां त्यानें ती दूर फेंकून दिली व म्हणाला— "शेजारच्या मुलाच्या गाडीसारखी सोन्याची गाडी हवी मला!" आणि रडूं लागला.

वसंतसेनेला राहवेना. तिनें गळ्यांतले दागिने काढून देत म्हटलें—"हे घे. सोन्याची गाडी करवून घे."

थोड्या वेळानें वर्धमान चारुदत्ताच्या आज्ञेप्रमाणें बंद गाडी घेऊन आला व वसंतसेनेकडे त्यानें निरोप पाठविला कीं, गाडी तयार आहे. वसंतसेनेनें परत निरोप


Fullscreen
127




30 / 80


पाठविला कीं, वेणीफणी करून यायला थोडा वेळ लागेल. वर्धमान गाडींत गाद्या घालायला विसरला होता. तो गाद्या घेऊन यायला तेथून निघून गेला.

चारुदत्ताच्या घराजवळच गल्लींत कांहीं गाड्या उभ्या होत्या. एका गाडीचें चाक निघाल्यामुळें पुढच्या मागच्या गाड्या अडकून पडल्या होत्या. तेवढ्यांत तेथें आणखी एक गाडी आली. ती गाडी शकारची होती. त्याचा नोकर ती गाडी शकार करितां घेऊन आला होता. वाटेंत गाड्या अडलेल्या पाहून त्यानें आपली गाडी पण चारुदत्ताच्या घरासमोरच उभी केली आणि गाडीवाल्याच्या मदतीला धांवला.

त्याच वेळीं वसंतसेना बाहेर आली. समोर एक बंद गाडी पाहून व चारुदत्तानें पाठविलेली गाडीच ही असावी असें समजून ती आंत जाऊ बसली. तिनें खिडक्या बंद करून घेतल्या. गाडीची दुरुस्ती झाल्याबरोबर वाट मोकळी झाली. शकारचा नोकर परत आला व तो गाडी घेऊन सरळ शकारच्या बागेंत गेला.

शर्विलक चौरविद्येंत प्रवीण असल्या कारणानें तुरुंगांत शिरला. तेथें एका अधि-



काऱ्याला ठार करून आर्चकाला सोडवून घेऊन आला. सैनिक आर्चकचा शोध काढीत होते. आर्चकाला तें कळलें. तो चारुदत्ताच्या घरांत मागल्या दारानें शिरला व एका कोपऱ्यांत लपून बसला.

तिकडे वर्धमान गाडींत गाद्या घालून ओरडला—"गाडी तयार आहे. वसंतसेनेला सांगा !" तें ऐकून आर्चक बोलल्याशिवाय गाडींत येऊन बसला. वर्धमान गांवाबाहेर चारुदत्ताच्या बागेंत गाडी घेऊन गेला.

गाडी आल्याबरोबर चारुदत्तानें पुढें होऊन गाडीचा दरवाजा उघडला. पण आंत


Fullscreen

127





32 / 80




आर्चकाला पाहून त्याला आश्चर्य वाटलें. आर्चकनें आश्रय मागितल्यावर चारुदत्तानें अभयदान देऊन त्याच गाडींत त्याला वाटेल तिकडे जायला सांगितलें.

तिकडे शकार आपल्या एका मित्राबरोबर गाडीची वाट पहात उभा होता. तेव्हां त्याला संवाहक भेटला. तो आपली पीतवस्त्रें धुऊन वाळत घालायला त्या बाजूला येत होता. पण शकारनें त्याला शिव्या हासडून व मारहाण करून तेथून पाठवून दिलें. त्याच वेळीं गाडी बागेंत आली. तींत वसंतसेना होती.

शकारला पाहून वसंतसेना घाबरली. शकारला मात्र आनंद झाला. त्यानें वसंतसेनेची पुष्कळ मनधरणी केली. पण तिनें लाथ मारली म्हणून त्याला आपला अपमान वाटला. त्यानें आपल्या मित्राला सांगितलें कीं, ह्या बाईला चोपून काढ. मागशील तें धन देईन. पण त्याचा मित्र म्हणाला—"तें काम माझ्याकडून व्हावयाचें नाहीं." गाडीवालापण तेंच म्हणाला.

"अरे, मी हें सर्व थट्टेंत म्हटलें होतें. तुझ्या हातून तिला बडविणें मला आवडलें असतें असें का वाटतें तुला?" तुम्ही दोघे होतां म्हणून वसंतसेना लाजली. असें सांगून शकारनें दोघांना निघून जायला सांगितलें. नंतर त्यानें वसंतसेनेशींच पुन्हां लवळपणानें बोलायला सुरवात केली, पण ती ऐकत नाहीं असें पाहून त्यानें तिचा गळा दाबला. वसंतसेना बेशुद्ध होऊन पडली. शकारला वाटलें कीं ती मेली. शकारचा मित्र व गाडीवाला परत आले. त्यांनी वसंतसेनेचा अमानुषपणें वध झाल्याचें पाहिलें. शकारचा मित्र त्याला रागावूं लागल्यावर शकारनें त्याला विचारलें—"वसंतसेनेचा वध करून तूं मलाच उलट बोलत आहेस? चोराच्या उलट्या बोंबा? थांबा, पाहतो!"

मित्राला शकारच्या त्या बोलण्याचा जास्तच राग आला. त्यानें तलवार काढली व 'पाहून घेईन' असें सांगून निघून गेला. तो राजद्रोही लोकांच्या पक्षांत सामील झाला. शकारनें गाडीवाल्याला लांच द्यायचा प्रयत्न केला. पण त्यानें नकार दिल्यावर त्याला कैद करून आपल्या घरांत कोंडून ठेवण्याचा व वसंतसेनेच्या खुनाचा अपराध चारुदत्तावर लावण्याचा शकारनें बेत केला.

वसंतसेनेच्या अंगावर वाळलेलीं पानें टाकून तो तेथून निघून गेला. थोड्या वेळानें बौद्ध भिक्षु पुन्हां तेथें आला. त्यानें वसंतसेनेलाच अज्ञानानें एक पानांचा ढीग समजून आपले कपडे वाळत घालायचें ठरविलें. वाऱ्यामुळें पानें थोडी बाजूला सरकल्याबरोबर त्याला आंत वसंतसेना दिसली. त्यानें चकित होऊन तिच्या तोंडावर थोडें पाणी शिंपडलें व तिला शेजारच्या बौद्ध विहारांत घेऊन गेला. तिनें त्याचें रक्षण केलें होतें हें तो विसरला नव्हता.

शकारनें न्यायाधिशाला सांगितलें कीं, मी वसंतसेनेचा वध केला नाहीं. कोणीतरी



तिचे दागिने पळविण्यासाठीं तिचा वध केलेला दिसतो आहे.

न्यायाधिशानें आपल्या कर्तव्याचें पालन करण्याचें ठरवून चवकशी सुरू केली. वसंतसेनेच्या आईनें साक्ष दिली कीं, माझी मुलगी चारुदत्ताच्या घरीं गेली होती. चारुदत्ताला विचारलें तेव्हां तो म्हणाला—"ती माझ्या घरून निघून गेली होती."

चवकशीचें काम सुरू झाल्याबरोबर मैत्रेय वसंतसेनेकडे निघाला. कारण चारुदत्तानें त्याच्या हातीं वसंतसेनेनें मुलाला सोन्याची गाडी घेण्यासाठीं दिलेले दागिने








Fullscreen
34 / 80

परत पाठविले होते. जात असतां वाटेंत त्याला राजाचे शिपाई चारुदत्ताला धरून घेऊन गेल्याचें कळलें. तें ऐकून तो न्यायास्थानाकडे धांवला. त्याच्याकडे वसंत-सेनेचे दागिने सांपडल्यामुळें चारुदत्तावर लावलेला आरोप खरा ठरला. न्यायाधिशानें चारुदत्ताला फांशीची शिक्षा सांगितली. वध्यभूमीकडे जात असतां चारुदत्त नें एकदां आपल्या मुलाला पाहण्याची इच्छा दर्शविली.

रोहसेननें चांडाळाचे पाय धरून विनंती केली कीं, माझ्या वडिलांना फांशीची शिक्षा देऊं नका, मला शिक्षा द्या.

तिकडे वसंतसेना बौद्ध भिक्षूबरोबर चारुदत्ताच्या घरीं गेली. तेथें चारुदत्ताला फांशीची शिक्षा ऐकविण्यांत आल्याचें कळलें. ती वध्यभूमीकडे धांवली. ती ओरडली—"त्यांना फांशी देऊं नका, मी जिवंत आहें." चांडाळानें चारुदत्ताला सोडलें.

वसंनसेनेला जिवंत समोर आलेली पाहून शकार पळून जाऊं लागला. परंतु राजाच्या शिपायांनीं त्याला धरलें. वसंतसेनेनें डडलेला सर्व वृत्तांत सांगितला.

त्याच वेळीं आर्यकानें यज्ञवेदींतच राजाचा वध केला व स्वत: राजा झाल्याची घोषणा केली. त्यानें आपली कृतज्ञता व्यक्त करण्यासाठीं म्हणून वेणु नदीच्या काठचा कुशावती प्रदेश चारुदत्ताला दान केला. ही बातमी शर्वीलकनें चारुदत्ताला येऊन सांगितली.

चारुदत्त वसंतसेनेबरोबर घरीं आला तेव्हां त्याची बायको धूतांचा, पती फांशी गेला असेल असें समजून सती जाण्याच्या तयारींत होती. परंतु पतीला समोर पाहून तिला आनंद झाला. चारुदत्तानें शकारला सोडून देण्यास नव्या राजाजवळ विनंति केली. पुढें चारुदत्ताचा संसार सुखाचा झाला.





# चित्रकाराचें चातुर्य

जय आणि विजय नांवाचे दोन चित्रकार होते. त्यांच्या चित्रकलेचें कौशल्य पाहून सर्व त्यांची वाखाणणी करीत. कोणाला फक्त एकदां पाहिलें तरी ते त्याचें हुबेहूब चित्र कल्पनेनें काढून दाखवीत. नुसतें वर्णन ऐकून देखील ते एकेकाचें चित्र काढीत.

त्यांनीं आपल्या या कलेचें प्रदर्शन कित्येक राजदरबारांत केलें. कित्येक राजे व त्यांचे मंत्री या दोघांच्या कलेचें कौतुक करून त्यांच्या कलेचा आदर करीत असत.

माधववर्मा नांवाच्या कलिंग देशाच्या राजानें दोघां चित्रकारांना आपल्या दरबारीं बोलाविलें व म्हणाला—"तुमच्या कलेची एवढी प्रशंसा ऐकून दरबारी थाटानें सत्कार व्हावा म्हणून बोलाविलें आहे. पण रीतीप्रमाणें मी तुमची परीक्षा घेणार आहें. तुमच्या कलेची परीक्षा तुम्ही स्वत:चेंच चित्र काढून द्या. तें तुम्ही काढून दाखविलेंत तर मी तुम्हांला मागाल तें बक्षीस देईन.

तें ऐकून चित्रकारांचा चेहरा उतरल्या-सारखें राजाला दिसलें. म्हणून तो पुन्हां म्हणाला—"तुम्ही आरशांत आपापलीं तोंडें पाहतांच कीं नाहीं? मग कल्पनेनें चित्र काढणें तुम्हांला कां कठीण वाटावें. मी सुद्धां तुम्हांला अगदीं सोपी जावी म्हणून ही परीक्षा घ्यायचें ठरविलें आहे. मग बोला, कोठें बसणार चित्र काढायला? मी सर्व व्यवस्था करून देतों!"

जयनें आणि विजयनें परस्परांकडे हेतु-पूर्वक एकदां पाहिलें. परस्परांशीं त्यांचें कांहीं तरी मौन भाषण झालें. इतरांना तें काय कळणार? थोड्या वेळानें ते म्हणाले—"ठीक आहे महाराज! आम्ही ही परीक्षा द्यायला तयार आहों!"

Fullscreen 127 36 / 80








राजानें एका नोकराला बोलावून सांगितलें कीं, दोघांना निरनिराळ्या खोलींत जाऊन बसव. त्यांना ज्या ज्या वस्तूची गरज असेल ती नेऊन दे. चित्रें पुरी झाल्यानंतर तीं घेऊन ये. आणखी हें पहा, खोलींत आरसा किंवा स्वतःचें प्रतिबिंब दिसेल अशी एकहि वस्तु असतां कामा नये. समजलें !"

राजानें नोकराला बजावून पाठवून दिलें. नोकरानें दोघांना राजाज्ञेप्रमाणें निरनिराळ्या खोलींत बसायला जागा दिली.

स्वतःचें चित्र काढणें तेवढें सोपें काम नाहीं. आरशांत जरी स्वतःचें रूप पाहून काढावयाचें म्हटलें तरी डावी उजवी बाजू व मागची बाजू बरोबर दिसत नाहीं. म्हणून स्वतःचें चित्र काढावयाचें ठरविलें असतें तरी जय व विजय आपल्या कामांत यशस्वी झाले नसते.

परंतु त्यांनीं दुसरीच युक्ति करावयाचें ठरविलें. त्यांनीं स्वतःचें चित्र काढण्याऐवजीं परस्परांचें चित्र काढण्याचें ठरविलें. त्यामुळें चित्र तयार व्हायला फार वेळ लागला नाहीं. त्यांनीं नोकराला सांगितलें कीं, चित्र काढण्याचें काम पुरें झालें आहे. त्यांनीं आपापलें चित्र एका सुंदर पेटींत घालून राजाकडे पाठवून दिलें.

राजानें दोघांचीं चित्रें पेटी उघडून पाहिलीं. राजानें किंवा नोकरानें चित्र किंवा पेटी पूर्वीं पाहिलेली नव्हती. कोणत्या पेटींतलें चित्र कोणी काढलें हें देखील पाहिलें नव्हतें. म्हणून राजानें दोघांनीं काढलेलीं चित्रें पेटींतून उघडून पाहाल्यावर हें समजून कीं, ज्यांनीं त्यांनीं आपापलीं चित्रें काढलीं असावीं, चित्रकारांना बोलावून त्यांची तोंड भरून प्रशंसा केली व त्यांचा सत्कार करून त्यांना पूर्वीं वचन दिल्याप्रमाणें बक्षीस दिलें.



# देव भावाचा भूकेला !

एका गांवा बाहेर ग्रामदेवतेचें एक पडकें देवूळ होतें. परगांवचा एक मनुष्य त्या गांवीं कांहीं कामासाठीं आला. वाटेंत एका कुंपणाजवळ त्याला खड्डा दिसला. तो पार करून जायला एका लांबट दगडाची जरूर होती. त्यानें अज्ञानामुळें देवीचा दगडच खड्ड्यांत टाकला व त्यावर पाय देऊन निघून गेला.

त्यानंतर त्या गांवचा एक मनुष्य त्याच वाटेनें आला. त्यानें खड्ड्यांत मूर्ति पडलेली पाहून सरळ उभी करून जागच्याजागीं ठेवून दिली. तें पाहून ती मूर्ति म्हणाली—"प्रतिष्ठा अशीच का करावयाची असते नारळ फोडल्या शिवाय ?"

खांबावर कोरलेल्या इतर देवतांनीं तें ऐकून विचारलें—"तुझ्या अंगावर पाय देऊन जाणाऱ्याला तूं कांहींच बोलली नाहींस, आणि ह्या बिचाऱ्यानें तुला सरळ उभी करून ठेवली तर उलट त्याच्यावरच राग ?" ज्याच्या मनांत भावनाच नाहीं त्याला मी काय म्हणूं देव भावाचा भूकेला ? धर्मावर विश्वास ठेवणारालाच त्रास सोसावा लागतो.



Fullscreen 127 38 / 80



# नवीन शासनकर्ता

कर्नाटकचा राजा चामुंडराय ह्याच्या पदरीं गुंडप्पा नांवाचा एक पुरोहित नोकरी करीत असे. राजघराण्यांतली सर्व धर्मकार्यें व मंगल कार्यें गुंडप्पांच्या हातूनच होत असत. गुंडप्पा भटजींवर राजाची खास मर्जी होती.

एकदां चामुंडरायांनीं गुंडप्पा भटजींना बोलावून म्हटलें—" गुरुजी, गेलीं कित्येक वर्षें तुम्ही या राज्याची मनोभावें सेवा केली आहे. पण तुमची गरीबी पाहून मला देखील लाज वाटूं लागली आहे. तुम्ही काय वाटेल तें मागून घ्या. तुम्हांला कोणत्याहि गोष्टीची कमतरता भासतां कामा नये. काय वाटेल तें मागून घ्या."

गुंडप्पांनीं विचार केला कीं, मागून घ्यायलाच सांगितलें आहे तर पोट भरून मागून घ्यावें. नंतर वाटायला नको कीं, संधी आली असून आपल्या भोळसटपणामुळें घालवून बसलों. उघड म्हणाले—" महाराज ! आपण इतकें म्हणालांत एवढेंच पुरें. माझी इच्छा पूर्ण झाली. तरी पण आपण आग्रहच करीत आहां म्हणून मागत आहें. मला कोणत्या तरी जिल्ह्याचा किंवा प्रदेशाचा शासक नेमावें."

राजा म्हणाला—" तथास्तु ! " त्यानें नंजनगूड प्रदेशाचा शासक म्हणून गुंडप्पांची नेमणूक केली. त्यानें विचार केला, गरीब ब्राह्मण आहे. ज्ञानी विद्वान आहे. अन्यायानें प्रजेचें पालन करणार नाहीं.

गुंडप्पांनीं राजघराण्यांत भिक्षुकीचें काम केलें होतें. जबाबदारीच्या जागेवर शासक म्हणून कधीं काम केलें नव्हतें. म्हणून नेमणूक करतांना राजानें त्यांना शासन कार्यासंबंधीं कांहीं महत्वाच्या गोष्टी गांठीला बांधून ठेवण्यास सांगितल्या. शासकानें आपल्या वागणुकींत थोडें गांभीर्य दाखविलें पाहिजे. अर्थात लोकांसमोर थट्टा मस्करी करूं नये. कोणाचा सल्ला घ्यायचा झाला तर घ्यावा पण ह्या कानाची गोष्ट त्या कानाला कळतां कामा नये. हाताखालच्या लोकांची शेंडी नेहमीं आपल्या हातांत ठेवली पाहिजे.

राजाचें बोलणें ऐकून गुंडप्पा सर्व समजल्या सारखें मुंडी हालवीत म्हणाले—" ठीक आहे महाराज ! कळलें मला सर्व ! "

राजानें त्याला नियुक्तिपत्र दिलें. तें घेऊन व राजाचा निरोप घेऊन गुंडप्पा हंसत खुशींत आपल्या घरीं गेले.

गुंडप्पा निघून गेल्यावर राजानें नंजनगूडच्या लहान थोर अधिकाऱ्यांना ही नेमणूक झाल्याची बातमी कळविली व नव्या शासनकर्त्याच्या स्वागताची व्यवस्था करावयास सांगून पाठविलें.

नवीन जिल्हाधिकाऱ्याच्या स्वागताची जय्यत तयारी सुरू झाली. गांवकरी व नागरिक गुंडप्पा येणार होते त्या दिवशीं नंजनगूडच्या वेशीवर स्वागतासाठीं हजर झाले.

गुंडप्पांनीं आपलें सामान सुमान व कपडे एका गाठोड्यांत बांधले व दर्भांचा एक



पुंजका पण संवयी प्रमाणें बरोबर बांधून घेतला. गाठोडें डोक्यावर घेऊन गुंडप्पा पायींच नंजनगूडला निघाले.

दुपारीं ऐन उन्हांत दमून भागून गुंडप्पा नंजनगूडला येऊन पोंचले. जे लोक नव्या शासनकर्त्यांच्या स्वागतासाठीं वाट पहात होते, वाट पाहून दमून गेले होते. गुंडप्पांना समोर येतांना पाहून त्यांना वाटलें कीं, कोणी गुरुजी येत असतील. त्यांनीं गुंडप्पांना विचारलें—" गुरुजी ! नवीन जिल्हाधिकारी येत आहेत म्हणून महाराजांच्या निरोप होता. आम्ही त्यांची वाट पहात


Fullscreen

127





40 / 80


आहों. आपल्याला वाटेंत कोठें भेटले का ते ?"

नियुक्तिपत्र गुंडप्पांच्या हातांतच होतें. त्यांनीं तें विचारणाऱ्यांच्या हातीं देऊन वाचायला सांगितलें.

गांवकरी चकित होऊन गुंडप्पांच्याकडे पहात होते. गुंडप्पा गंभीर मुद्रा करून नुसते उभे होते. ग्राम अधिकाऱ्यांनीं नियुक्तिपत्र वाचलें व चकित होऊन मुजरा केला. गांवकरी जास्तच चकित झाले. गुंडप्पांना एका पालखींत बसवून गांवभर त्यांची मिरवणूक काढण्यांत आली.

ग्रामाधिकाऱ्यानें गुंडप्पांना आपल्या घरीं जेवायला बोलाविलें. जेवायला बसतांना संवयीप्रमाणें गुंडप्पांनीं तिसुपर्ण म्हणायला सुरवात केली व यजमानाला उदक सोडायला सांगितलें. त्याला कांहीं उलगडा होईना.

गुंडप्पा पोटभर जेवले. जेवून उठल्यावर म्हणाले—"बरें तर आतां निरोप द्या. दक्षिणा तांबूल द्या म्हणजे जाऊन थोडा वेळ वामकुक्षी करीन म्हणतों."

ग्रामाधिकाऱ्याला वाटलें तांबूल दक्षिणेचा अर्थ लांच बीच असेल. म्हणून त्यानें एका पिशवींत शंभर मोहरा ठेवून गुंडप्पांना दिल्या व नमस्कार केला. गुंडप्पा म्हणाले—"तसें नव्हें उदक सोडून द्या!" ग्रामाधिकारी जास्तच चकित झाला. महाराजांनीं कांहीं तरी खास चूक केलेली दिसते आहे. पण महाराजांच्या आज्ञेसमोर बोलण्याची कोणाची शाज्ञा ?

गुंडप्पा घरीं निघून गेले. जातांना, मी लवकरच कचेरींत येतों, तुम्ही पुढें जाऊन कामाला लागा, असें सांगून गेले.

ग्रामाधिकारी कचेरींत गेला.

गुंडप्पांनीं घरीं जाऊन विचार केला कीं, महाराजांनीं ज्या सूचना केल्या आहेत त्या चांगल्या आठवून मग कचेरींत जावें. त्याप्रमाणें त्यांनीं चेहरा गंभीर दिसावा म्हणून कपाळाला व तोंडाला चंदन अर्चन करून घेतलें.

कचेरींत गेल्यावर त्यांचें तें रूप पाहून सर्वांना खदखदून हंसूं आलें. पण तें आवरून सर्व अदबीनें बोलूं लागले.

महाराजांनीं दुसरी गोष्ट सांगितली होती कीं, ह्या कानाची गोष्ट त्या कानाला कळतां कामा नये. म्हणून गुंडप्पा बोलतांना किंवा ऐकतांना एका कानावर हात ठेवीत असत. हें त्यांचें वागणें सर्वांसच विचित्र वाटलें.












Fullscreen 127 42 / 80

तिसरी गोष्ट महाराजांनीं सांगितली होती कीं, हाताखालच्या लोकांची शेंडी नेहमीं बळकट हातांत ठेवली पाहिजे. गुंडाप्पांनीं त्याची पण तयारी ठेवली होती. पण संधीची वाट पहात होते.

नवे अधिकारी म्हणून कोणी तोंडांतून ब्र अक्षर देखील काढीत नव्हता. गुंडाप्पा देखील बोलत नव्हते. बसून बसून लोक कंटाळून गेले. कांहीं लोक जांभया देऊं लागले तर कांहीं पेंगू लागले. संध्याकाळ झाली काळोख पडला तरी गुंडप्पा खुर्चीवरून हलले नाहींत. अधिकारी उठेपर्यंत कोण उठणार ? शेवटीं लोक बसल्या बसल्याच हळू हळू आडवे होऊं लागले. गुंडप्पा ह्याच संधीची वाट पहात होते. खुर्चीवरून उठले व खिशांतून कात्री काढून ग्रामाधिकाऱ्याची शेंडी कापून घेतली. नंतर एका मागून एक दोघां तिघांच्या शेंड्या कापून गुंडप्पा घरीं निघून गेले. राजानें सांगितलेल्या सर्व सूचनांचा आपण छान अंमल केला असें मनाशीं अभिमानानें म्हणत गुंडाप्पा दुसऱ्या दिवशीं सकाळीं राजाच्या दर्शनास निघाले. राजा आपली पाठ थोपटील व आपणांस मोठें बक्षीस पण देईल असें त्यांना वाटत होतें.

गुंडाप्पांनीं आपला पराक्रम निवेदन केला. राजाला आपल्या कानांवर विश्वास देखील होईना.

इतक्यांत नंजनगूडहून एक अधिकारी राजाकडे आपल्या गांवचें गाऱ्हाणें घेऊन आला. त्यानें नव्या शासनकर्त्याचा पराक्रम वर्णन करून सांगितला. राजानें विचार केला,—चूक आपलीच. गुंडप्पांचा काय दोष ? गुंडाप्पांना आपणच ह्या कामावर नेमलें. शेवटीं राजानें भटजींना पुन्हां त्यांच्या जुन्याच पदावर नेमलें.





# पापांचीं कारणें

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. पुन्हां झाडाजवळ गेला व प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाच्या दिशेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांतला वेताळ बोलूं लागला—"राजा, पुरुषांना आयुष्यांत ज्या हाल अपेष्टा सहन कराव्या लागतात त्याच्या मुळाशीं स्त्रिया असतात असें साधारणपणें आपण समजतो. परंतु तूं हे जे कष्ट सहन करीत आहेस त्याच्या मुळाशीं कोणी स्त्री असेलसें मला वाटत नाहीं. आज तुला मी एक अशी गोष्ट सांगणार आहे कीं, स्त्री जातीमुळेंच मनुष्य पाप-कर्मांत गुरफटूं लागतो. पण खरोखरीं पुरुषच आपल्या सर्व प्रकारच्या पाप कर्मास कारण असतो असें चंद्रसिंहाला कां वाटलें हें ऐक!" त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

मांडव्य ऋषि तपश्चर्या करीत होते. राजाचे शिपाई एका चोराचा शोध काढीत


Fullscreen
127




44 / 80


त्यांच्या आश्रमांत आले व त्यांनाच चोर समजून धरून घेऊन गेले. पुढें त्यांना त्यांनी मृत्यु दंड देखील देऊन टाकला.

यमदूतांनीं मांडव्य ऋषींना यमासमोर नेऊन उभें केलें. त्यांनीं यमाला जाऊन विचारलें—"माझा काय अपराध? कां मला ही एवढी मोठी शिक्षा?"

यम म्हणाला—"तुम्ही पायांखालीं चिरडून कित्येक किडे व मुंग्या मारल्या म्हणून!"

"माझ्या हातून नकळत घडलेल्या या लहानशा पापाकरितां मला एवढी मोठी शिक्षा!! तर मग जा! तुला मी शाप देतों कीं, तुला शूद्राच्या पोटीं जन्मास येऊन मृत्यु लोकीं जावें लागेल." मांडव्य ऋषींनीं रागाच्या भरांत यमाला शाप दिला.

त्या शापाचा परिणाम असा झाला कीं, यम विदुर होऊन मृत्युलोकीं आला. तो शंभर वर्षें जगला. तों पर्यंत यमलोकाचें राज्य अर्भय नांवाच्या आदित्याकडे होतें.

यमानें मनुष्य प्राण्यांना अन्यायानें दंड दिला होता म्हणून त्याला मांडव्य ऋषींचा शाप झाला हें लक्षांत ठेवून अर्भय जास्त सावधगिरीनें न्याय निवाडा देऊं लागला. कोणी किती पाप केलें आहे ह्याची पुरी चवकशी करून मगच तो त्यांना शिक्षा देत असे.

अर्भयला एक विचित्र गोष्ट आढळून आली. नरकयातना भोगणारांपैकीं नव्वद टक्के लोक म्हणत कीं, त्यांच्या हातून जीं पापकर्में घडलीं त्यांच्या मुळाशीं त्यांचीच बायको अगर दुसरी कोणी स्त्री होती. अर्भयला वाटलें, कदाचित ही गोष्ट खरी असूं शकेल. यम शापमुक्त होऊन यमलोकीं परत आल्यावर अर्भयनें, त्यानें काढलेला निष्कर्ष यमाला सांगितला.

यमानें बराच वेळ या गोष्टीवर विचार केला. जर पापकर्मांच्या मुळाशीं स्त्रीजात असेल तर पुरुषांना दंड देणें चुकीचें आहे. दंडाचा मुख्य वांटा स्त्रियांना देखील मिळाला पाहिजे.

यमाला स्वतःच्या लहानपणची एक गोष्ट आठवली. त्याची आई संज्ञादेवी यमाचा जन्म झाल्यावर यमाचे वडील सूर्य याच्या-जवळ आपली सांवली म्हणजे छाया सोडून माहेरी निघून गेली. छाया यमाच्याविषयीं सावत्र भाव दाखवूं लागली व तिनें यमाचा फार छळ केला. एकदां यमानें चिडून





Fullscreen 127 46 / 80



जाऊन रागाच्या भरांत तिला लाथ मारली. छायानें यमाला शाप दिला—"तुझा तो पाय गळून जमिनीवर पडेल!" पण यम आपले वडील सूर्यनारायण यांच्या पाठीशीं लपला. वडिलांच्या कृपेनें यम शापमुक्त झाला.

ती जुनी आठवण ताजी झाल्यानें यमाला देखील वाटलें कीं, कदाचित सर्व पापांचें मूळ कारण अर्भय म्हणतो तशा स्त्रियाच असाव्यात. परंतु विचार केल्या शिवाय आपलें मत देणें रास्त नाहीं असें वाटून यमानें आपल्या विश्वासपात्र आशा अनुयायां-पैकीं चंड यास दहा वर्षें मृत्युलोकांत जाऊन संसार थाटायला सांगितलें. परत येऊन सांसारिक कष्टांचें कारण स्त्रिया आहेत कीं आणखी कोणी हें पाहून यायला मी तुला पाठवीत आहें, हें देखील बजावून सांगितलें. पुढें असें हि म्हणाला—"मृत्युलोकांत पैशाची फार गरज भासते. म्हणून एक लाख सुवर्ण-मुद्रा तुला देऊन ठेवतों आणि चित्रगुप्ताला सांगून ठेवतों कीं, तुझ्या हातून कांहीं पाप घडल्यास त्यानें कानाडोळा करावा. कारण मी तुला मृत्युलोकीं पाठवीत आहें. तुझ्या अपराधामुळें नव्हें."

चंड भूलोकांत जायला तयार झाला. तेथें दहा वर्षें काढणें त्याला कठीण वाटलें. पण प्रत्यक्ष यमाचीच आज्ञा. ती मोडण्याची प्राज्ञा कोणांत असणार?

यमाच्या आज्ञेनें चंड चंद्रसिंह या नांवानें तीस वर्षांचा तरुण होऊन मृत्युलोकांत इंद्रप्रस्थ नगरींत उतरला. भारतांत तें नगर वैभव आणि सभ्यता यांच्या कळसाला पोंचलेलें होतें. त्या काळांत भारतांतील तें अद्वितीय असें नगर होतें.

चंद्रसिंह काश्मीर देशाचा एक व्यापारी म्हणून इंद्रप्रस्थ नगरींत राहूं लागला. त्यानें श्रीमंतीचा खूप थाट ठेवला. अजून त्याचें लग्न झालेलें नाहीं हें ऐकून कित्येक कुलीन मुली त्याला सांगून आल्या. त्यानें सौदामिनी नांवाच्या एका रूपकुलशील संपन्न मुलीशीं लग्न केलें. सौदामिनी एका गरीब घराण्यांत वाढलेली होती. आई वडिलांची ती लाडकी कन्या होती. परंतु गरीबीमुळें आई वडील तिच्या हौशी पुरवूं शकले नव्हते.





सौदामिनी गरीब होती, पण एक स्वाभि-मानी स्त्री होती. तिला आपल्या माहेरच्या कुळाचा अभिमान वाटे. अभिमान करण्या-सारख्याच कुळांत तिचा जन्म पण झाला होता. उच्च कुळाला साजेसें रूपलावण्य व शील पाहून चंद्रसिंह तिच्यावर इतका भाळून गेला होता कीं, तिनें सहज एखाद्या वस्तूचा उल्लेख केला तरी तो वाटेल ती किंमत देऊन ती वस्तु विकत घेऊन आणून देत असे व आपल्या बायकोच्या सर्व हौशी पुरवीत असे. कारण चंद्रसिंहाकडे पैशाचा तोटा नव्हता.

लग्न झाल्यानंतर सौदामिनीच्या स्वभावांत हळूहळू बदल होऊं लागला. पति तिच्या सर्व हौशी पुरवूं लागल्यावर तिच्या हौशी वाढत गेल्या. चंद्रसिंहाला तिची प्रत्येक इच्छाच जणूं आज्ञा वाटूं लागली. तो तिचा पति म्हणजे स्वामी होता, पण स्वतःच्या वागणुकीमुळें तो तिचा दास म्हणजे गुलाम झाला. तिचा 'स्वाभिमान' नकळत हळूहळू 'अहंकारांत' बदलूं लागला. परंतु चंद्रसिंहानें कधीं तिचें मन मोडलें नाहीं. तिला आनंद वाटला कीं, त्यांतच तो देखील आनंदाचा अनुभव करी. सौदामिनीला वाटे कीं, तिच्या नवऱ्याकडे अक्षय खजीना आहे. म्हणून तिनें आपल्या बहिणींचीं लग्नें थाटामाटानें लावून दिलीं. तिच्या ज्या ज्या हौशी राहून गेल्या होत्या त्या सर्व तिनें पुऱ्या करून घेतल्या.

तिनें आपल्या दोघां भावांना नवऱ्याकडून पैसा मागून घेऊन कामधंदा सुरू करायला


Fullscreen

127




48 / 80


सांगितलें. नवऱ्याकडे अलोट संपत्ति आहे तर आपल्या भावंडांनीं गरीबींत दिवस कां काढावे, असें तिला वाटे. तिनें व्यापार-धंद्यासाठीं आपल्या दोघां भावांना परदेशांत पाठविलें.

चंद्रसिंहाच्या घरीं बायकोच्या हट्टामुळें सदा सदाव्रत चालू असे. राजांना व महा-राजांना मेजवान्या दिल्या जात. सणावारीं ब्रह्मभोज होई. दानधर्म करण्यांत त्याची बायको सर्वांत पुढें असे.

परंतु हें ऐश्वर्य किती दिवस चालू राहणार? यमानें दिलेल्या एक लाख सुवर्ण मुद्रा संपुष्टांत आल्या. चंद्रसिंहाची गांवभर पत होती. त्यानें नुसतें सांगून पाठविलें कीं, लोक तो मागेल तें पाठवून देत. म्हणून त्याला कोणत्याहि गोष्टीची कमतरता म्हणून भासली नाहीं. परंतु स्वतःजवळच मांडवल उरलें नाहीं तर बाजारांतली पत किती दिवस राहूं शकणार?

चंद्रसिंहानें आतां हात टेकले. बायकोच्या हौशी पुऱ्या करणें त्याला अशक्यप्राय झालें. त्यामुळें बायको सुद्धां त्याच्यावर तोंडसुख घेऊं लागली. तिचें चंडिका रूप पाहूनच तो थरारून जाई. म्हणून बायकोला भेटणें सुद्धां त्यानें सोडलें. आतां त्याला एकच आशा उरली होती. त्याचे मेहुणे परत आल्यावर सर्व कर्जफेड करून गमावलेली पत पुन्हां मिळवितां येईल. तोच एक भरंवसा उरला होता.

दोघे परत आले. पण एकाचें जहाज समुद्रांत बुडालें व सारा माल त्याबरोबर बुडून गेला. तोच मोठ्या कष्टानें जिवानिशी घरीं परत येऊं शकला. दुसऱ्यानें व्यापार केला व जो फायदा झाला तो चैनींत उधळून टाकला. एकूण चंद्रसिंहाला निराश व्हावें लागलें.

म्हणून चंद्रसिंहानें मित्रांना थापा मारून त्यांच्याकडून पैसे घेऊन उदरनिर्वाह सुरू केला. कर्ज देणाऱ्यांचा ससेमिरा सुरू झाला तेव्हां चंद्रसिंह तोंड लपवीत फिरूं लागला.

शेवटीं त्याच्या विरुद्ध तक्रारी राज-दरबारीं जाऊं लागल्या. राजाचे शिपाई त्याला धरायला आले. चंद्रसिंह घोड्यावर बसून त्यांच्या हातावर तुरी देऊन दूर पळून गेला. पण लोकांनीं त्याचा पिच्छा पुरवला. तो वेष पालटून हिंडूं लागला. कोणी त्याला ओळखलें तर तो त्याला ठार करी. पुढें चंद्रसिंहाचें उरलेलें आयुष्य,—म्हणजे यमानें





 Fullscreen 127    50 / 80 

दिलेला अवधी संपेपर्यंत,—चोरी, दरोडेखोरी व लटमार करण्यांत गेलें. त्याची त्यालाच खंत वाटूं लागली.

यमानें त्याला पाहतांच विचारलें—"आलास चंडा! सांग आतां, पुरुषांच्या हातून घडणाऱ्या पापांचें मूळ कारण स्त्रीच आहे कीं नाहीं? मुख्य वांटा त्यांचाच असतो कीं नाहीं त्यांत?"

चंड म्हणाला—"यमधर्मराज! पुरुष जीं पापें करतात त्यांत स्त्रियांचा यत्किंचितहि दोष नसतो. पुरुषच त्याला जबाबदार असतात!"

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें—"राजा! आतां तूंच सांग! सौदामिनी-मुळेंच चंद्रसिंहाला आपल्या जिवाचा कंटाळा आला होता कीं नाहीं? मग त्यानें असें विक्षिप्तपणाचें उत्तर कां द्यावें? ह्याचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर तुला परिणाम माहीत आहेच! तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर आदळतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला—"चंडनें जें उत्तर दिलें त्यांत मला कांहीं गैर नाहीं वाटत. त्याला जो अनुभव आला, त्यावरून त्याचें म्हणणें बरोबर आहे कीं नाहीं, तूंच पहा! पुरुष स्वतःच्या सुखासाठीं व स्वार्थासाठीं स्त्रियांना डोक्यावर बसवून घेतात. त्यांच्या चुका दुरुस्त करण्याऐवजीं स्वतःचा तोल सोडून त्यांच्या बोलण्याप्रमाणें नाचूं लागतात. त्यांना नटी बनवतात पुरुष. मग त्या नटूं लागल्यावर मात्र त्यांना दोष देण्यांत काय अर्थ आहे! चंद्रसिंहानें मोहानें व उपभोगलालसेनें सौदामिनीला मालकीण व स्वतःला तिचा दास बनवून घेतलें. म्हणून दोष सौदामिनीचा नसून चंद्रसिंहाचाच आहे."

राजाचें मौन भंग झाल्यावर वेताळ पुन्हां झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





# जाळें वाघुरचें

दूर एक देशांत एका सरोवराच्याकाठीं एक शेतकरी रहात असे. त्याचें घर म्हणजे एक झोपडीच होती. शेतकऱ्याला तीन मुलें होतीं. आई बाप वारल्यावर दोघां वडील भावांनीं जमीन जुमला विकून चैन केली. आतां फक्त राहतें घर आणि घरांतलें सामान मात्र उरलें.

थोरला म्हणाला—"मी घर घेणार!"

मधला म्हणाला—"घरांतलें सामान माझें!"

"आणि मला?" धाकट्यानें विचारलें.

"तुला? हें घर आणि घरांतलें सामान सोडून जें कांहीं उरलें असेल तें तुला!" दोघे भाऊ म्हणाले.

तिसऱ्यानें सर्व घर सोडून बाहेर कोपऱ्यांत नारळीचीं सालें सोलपटें पडलीं होतीं तीं पाहिलीं. त्यानें तीं घेऊं का विचारलें. दोघां भावांनीं हंसत म्हटलें—"खुशाल घेऊन जा!"

धाकटा भाऊ तीं उचलून खांद्यावर घेऊन सरोवराच्या कांठीं गेला.

सरोवराकांठच्या एका झाडाला टेंकून तो विचार करीत बसला होता कीं, पोटापाण्याची काय व्यवस्था करावी? तेवढ्यांत त्याला एक खार दिसली.

त्यानें विचार केला कीं, नारळीचीं सालें भिजवून दोरी वळतां येईल. दोरीचें जाळें करून मासे धरण्याचें काम करतां येईल. जमलें तर एखादें हरण किंवा सांबर देखील या जाळ्याच्या सहाय्यानें धरतां येईल. मासे विकून व हरणां सांबरांचें चामडें विकून आपलें पोट भरतां येणें शक्य आहे. त्यानें गमती खातर एक फांस तयार करून खारीला धरलें. पण तिला मारून खावेंसें त्याला वाटलें

Fullscreen 127 52 / 80



नाहीं. म्हणून त्यानें जुन्या मोडक्या फळ्या घेऊन त्यांचा एक पिंजरा तयार केला आणि त्यांत तिला ठेवलें. त्यानंतर त्यानें एक ससा धरला. त्यांना सुद्धां त्यानें पिंजऱ्यांत बंद करून ठेवलें.

तो नदीकाठीं बसून जाळें विणूं लागला. त्याच्या समोरच एक अस्वल एका गुहेंत शिरलें. तें त्यानें पाहिलें. त्याला थोडी भीति वाटली त्याची.

तो जाळें विणीत असतां त्याला पाण्यांत कोणी पोहोत असल्याचा आवाज ऐकूं आला. त्यानें डोकें वर करून पाहिलें तेव्हां एक आडदांड तरुण एक दगड धरून पाण्यांत उभा असलेला त्याला दिसला.

त्या सरोवरांत एक राक्षस रहात असे. तो पाण्याबाहेर कधीं येत नसे. कोणी पाण्याजवळ आला कीं, तो राक्षस जादू मंत्र करून त्याला पाण्यांत ओढून नेत असे. शेतकऱ्याच्या मुलानें तें ऐकलें होतें. त्या राक्षसानें कित्येक प्रवाश्यांना धरून त्यांचें सोनें लुटून घेतलें होतें. तो तरुण त्या राक्षसाचा मुलगा होता.

राक्षसाच्या मुलानें शेतकऱ्याच्या मुलाला विचारलें—"तूं आमच्या सरोवराच्या कांठीं बसून काय करतो आहेस रे?"

"मी हें सरोवर जाळ्यांत धरून घेऊन जाणार आहें!" शेतकऱ्याचा मुलगा म्हणाला. राक्षसाच्या मुलानें ती गोष्ट आपल्या बापाला जाऊन सांगितली.

"तो आपलें सरोवर धरून नेणार आहे? इतकी त्याची हिंमत! तूं वर जा आणि त्याच्याशीं झाडावर चढण्याची चढाओढ लाव. तो दमला म्हणजे त्याला पाण्यांत ढकलून दे." राक्षसानें आपल्या मुलाला सांगून पाठविलें.

राक्षसाच्या मुलानें बाहेर येऊन शेतकऱ्याच्या मुलाला विचारलें—"झाडावर कोण जास्त लवकर चढतो, आपण पाहूं या."

"मी काम करतों आहे. तुला दिसत नाहीं का? मला वेळ नाहीं. हा माझा धाकटा भाऊ आहे. त्याच्या बरोबर पैज लाव पाहिजे तर!" शेतकऱ्याचा मुलगा म्हणाला. असें सांगून त्यानें खारीला पिंजऱ्याबाहेर काढलें व फांस काढून घेऊन तिला झाडावर सोडलें. खार एका मिनिटांत झाडाच्या टोंकाला जाऊन पोंचली.

राक्षसाच्या मुलानें तें सर्व आपल्या बापाला जाऊन सांगितलें.

"आतां तूं जाऊन पळायची पैज लाव. तो दमला म्हणजे दे ढकलून सरोवरांत!" राक्षस म्हणाला.

राक्षसाच्या मुलानें बाहेर येऊन शेत-कऱ्याच्या मुलाला म्हटलें—"बरें तर ये! पळायची पैज लावूं या आपण!"

"तुला दिसत नाहीं का, मी कामांत गुंतलों आहें. माझ्या या धाकट्या भावाशीं लाव पैज तूं!" असें सांगून शेतकऱ्याच्या मुलानें सश्याला सोडलें. सोडल्याबरोबर ससा टुणुक टुणुक उड्या मारीत पळूं लागला व एक मिनिटांत दूर पळून गेला.



राक्षसाच्या मुलानें तें देखील आपल्या बापाला जाऊन सांगितलें.

"असें काय! या खेपेस त्याला कुस्तीला आव्हान कर! त्याला उचलून पाण्यांत टाक!" राक्षस म्हणाला.

राक्षसाच्या मुलानें पाण्याबाहेर येऊन शेतकऱ्याच्या मुलाला कुस्ती खेळायला बोलाविलें. तेव्हां तो म्हणाला—"माझें काम अजून संपलें नाहीं. ती गुहा आहे ना त्यांत माझे आजोबा घोरत पडले आहेत. पहा विचारून त्यांना येतात का तुझ्याशीं कुस्ती खेळायला." शेतकऱ्याचा मुलगा म्हणाला.

 Fullscreen 127     54 / 80 

राक्षसाच्या मुलानें गुहेंत जाऊन अस्वलाला हालवून उठविलें. अस्वलानें पिसाळून राक्षसाच्या मुलाला आपल्या अणकुचीदार नखांनीं खूप ओरबाडून काढलें. तो ओरडत आपल्या बापाकडे गेला. तें पाहून राक्षस भ्याला. हा कोणीतरी शेरास सव्वा शेर दिसतो आहे. याच्या एका भावानें झाडावर चढण्यांत व दुसऱ्यानें पळण्यांत माझ्या मुलाला हारवलें. याच्या म्हाताऱ्या आज्यानें तर माझ्या मुलाला ठार करण्याचा बेत केला होता. खरोखरच हा जाळें तयार करून माझें सरोवर, माझा मुलगा व मी सर्वांना धरून घेऊन जाणार आहे असें दिसतें. तो आपल्या मुलाला म्हणाला—"तूं जाऊन विचारून ये कीं, किती सोनें दिलें तर आपलें सरोवर धरून नेण्याचा विचार तो सोडील."

त्यानें जाऊन शेतकऱ्याच्या मुलाला विचारलें. तो म्हणाला—"तुला जितकें सोनें उचलून डोक्यावर घेऊन येतां येईल तितकें!"

राक्षसाच्या मुलानें तें जाऊन बापाला सांगितलें. त्यानें निमूटपणें त्याच्याकडे जितकें सोनें होतें तें सर्व मुलाच्या डोक्यावर ठेवून त्याला पाठवून दिलें.

राक्षसाच्या मुलानें जाऊन सोनें दिलें आणि म्हणाला—"आतां माझ्याजवळ एक गुंज भर सोनें देखील नाहीं."

शेतकऱ्याचा मुलगा जाळें विणायचें सोडून तें सोनें घेऊन घरीं गेला. तें सोनें पाहून त्याचे दोघे भाऊ चकित झाले. त्या दोरीमुळेंच त्याला एवढें सोनें मिळालें हें ऐकून त्यांनीं ती दोरी मागून घेतली आणि तिच्या जागीं आपलें घर व सामान सुमान धाकट्या भावाला देऊन टाकलें.

त्या दोरीचा त्यांना फायदा झाला कीं नाहीं हें कोणाला कळलें नाहीं.





"काय रे छोटू आमच्या अंबूशीं लग्न करशील का!"

"मी नाहीं करणार! कारण आमच्या घरांत नात्यांतच लग्न करण्याची रीत आहे. दादानें वहिनींशीं लग्न केलें, मामांनीं मामींशीं आणि काकांनीं काकूशीं...!!



"कसलें रे चित्र हें?"

"देवाचें चित्र आहे!"

"देव कसा असतो हें तुला रे काय कळणार?"

"मी काढतों आहे ना चित्र: तें पाहिलें म्हणजे कळेल कीं नाहीं?



"अरे हें काय नाक बंद करून दूध पितो आहेस?"

"नाक बंद नाहीं केलें तर दुधाचा खमंग वास येईल. वास आला कीं तोंडाला पाणी सुटेल. मग दुधांत पाणी पडेल आणि दूध बेचव होईल.



"रात्रीं मी एक मोठें भूत पाहिलें रे! अगदीं घाबरगुंडी उडाली बघ!

"भितीबर होतें नाहीं का? जसा तूं तशी तुझी सांवली. भीति वाटेल नाहीं तर काय?

चित्रकार : एस. शंकरनारायण








Fullscreen 127 56 / 80



# विचित्र प्रतिक्रिया

विशाळनगर म्हणून एक नगर होतें. तेथें विकेकवन्त नांवाचा राजा राज्य करीत असे. तो दर रोज सकाळीं व संध्याकाळीं आपल्या राजवाड्याच्या सज्जांत उभा राहून सूर्योदय आणि सूर्यास्ताची शोभा पहात बराच वेळ उभा रहात असे.

दररोज त्याच वेळीं एक लाकूडतोड्या सकाळीं रानांत लाकडें तोडायला जात असे व सायंकाळीं लाकडें तोडून त्यांची मोळी डोक्यावर घेऊन येत असे.

दररोज त्याला राजा पहात असे. तो रानांत निघाला म्हणजे राजा मनांत म्हणे,— “बिचारा किती गरीब आहे? त्याची सर्व हाडें बाहेर निघालीं आहेत. पण बिचारा काय करणार? त्यानें इतकी मेहनत केली नाहीं तर त्याचें पोट तरी भरेल कीं नाहीं शंकाच.”

संध्याकाळीं लाकूडतोड्या मोळी घेऊन परत आला कीं, कां कोणास ठाऊक, राजाला राग येई—“पापी कुठला, याची चामडी लोळविली तरी पाप लागणार नाहीं.”

राजाला स्वतःच आश्चर्य वाटूं लागलें कीं, एकाच माणसाला सकाळीं पाहिलें तर एका तऱ्हेचे विचार माझ्या मनांत येत आहेत व संध्याकाळीं पाहिलें तर ठीक त्याच्या विरुद्ध विचार मनांत येतात! काय बरें कारण असावें?

त्यानें आपल्या प्रधानांना बोलावून त्याचें कारण विचारलें. प्रधानांनीं उत्तर द्यायला तीन दिवसांचा अवधी मागून घेतला. म्हणाला— “प्रश्न थोडा अवघड आहे. विचार करून उत्तर देतों, महाराज!”

दुसऱ्या दिवशीं प्रधान वेष पालटून लाकूडतोड्याच्या मागें मागें रानांत गेले. तो तेथें किती मेहनत करतो हें त्यांनीं स्वतः डोळ्यांनीं पाहिलें. संध्याकाळीं देखील ते त्याच्या पाठोपाठ आले.

त्या लाकूडतोड्याच्या विषयीं राजाच्या मनांत कां दया उत्पन्न होई हें प्रधानांना कळलें. पण राजाला त्याच्यावर राग येण्याचें काय कारण आहे, हें प्रधानांना कळलें नाहीं.

दुसऱ्या दिवशीं प्रधानांनीं एक साधूचा वेष केला आणि त्या लाकूडतोड्याच्या घरीं गेले. एका साधूला घरीं येत असलेला पाहून लाकूडतोड्याची बायको उठून उभी राहली आणि आदरपूर्वक नमस्कार करून साधूला बसायला सांगितलें.

प्रधानांना चंदनाचा वास आला. घरभर सुगंध दरवळत होता. म्हणाला—“घरांत चंदनाची लाकडें फोडून ठेवलीं आहेत वाटतें. मग तीं विकून सुखानें कां नाहीं रहात? इतक्या कष्टांत दिवस कंठायची काय गरज आहे!” प्रधानानें सहानुभूति दाखवीत विचारलें.

“बुवा! हळू बोला! ते लाकडें तोडून आणतात तेव्हां कधीं कधीं चंदनाचीं लाकडें सुद्धां मिळतात. आम्ही तीं लाकडें निवडून आंत निराळीं जमा करून ठेवलीं आहेत. कधीं राजा मरेलच कीं नाहीं, तेव्हां



 Fullscreen 127    58 / 80 

चंदनाच्या लाकडांची गरज पडेल." लाकूडतोड्याची बायको म्हणाली.

प्रधानांना आतां कळलें कीं, राजाला लाकूडतोड्यावर कां राग येतो. परत येतांना चंदनाचीं लाकडें राजाला मोळींत दिसत असावीत. चंदनाचीं लाकडें राजा मेला म्हणजे त्याला जाळायला वापरतात. राजा मनांत विचार करीत असावा, हा लाकूडतोड्या कोणासाठीं बरें हीं लाकडें फोडीत असेल ? माझ्यासाठीं तर नव्हेत ! किती स्वार्थी आहे म्हातारा ? या विचारानें राजाला राग येत असावा.

राजाच्या मनांतले विचार आणि लाकूडतोड्याच्या मनांतले विचार एकच. जणूं परस्परांचें प्रतिबिंबच ?

प्रधान लाकूडतोड्याच्या बायकोचा निरोप घेऊन परतला.

दुसऱ्या दिवशीं तो नित्याप्रमाणें दरबारांत हजर झाला. राजानें विचारलें—"प्रधान ! मग कारण कळलें का ?"

"महाराज ! कारण कळलें. एका अटीवर मी कारण निवेदन करायला तयार आहें. आपण प्रथम लाकूडतोड्याला अभयदान दिलें पाहिजे." असें सांगून राजाला त्यानें खरें वृत्त सांगितलें.

राजानें विचार केला, माझ्या मृत्यूचा विचार माझ्या मनांत आला तोच लाकूडतोड्याच्याहि मनांत आला. माझ्याच विचाराचें तें प्रतिबिंब नव्हे काय ? मग राग करण्याचें काय कारण ? दोघांची परिस्थिति भिन्न एवढेंच. त्याची गरीबी दूर करावी, म्हणजे त्याच्या मनांत चांगले विचार येऊं लागतील. असा विचार करून राजानें त्याला शंभर मोहरा बक्षीस दिल्या.






[ ४ ]

लवकरच त्यांना राजकुमार भेटला. मंत्र्यानें पुढें होऊन त्याला विचारलें—"मघां जीं फळें तूं आम्हांला विकलीस तीं चांगलीं होतीं का रे ?"

"म्हणजे ! मी वाईट फळें कशाला विकूं ? आणि तीं तुमच्या युवराजांसाठीं ? मी स्वतः आपल्या हातांनीं तोडून आणलीं होतीं तीं !" राजकुमार म्हणाला.

"पण तीं खाल्ल्यावर आमच्या युवराजांना दोन शिंगें कां निघालीं आणि लांब पांढरी दाढी कां आली ? म्हणून विचारलें आम्हीं तुला !" मंत्री म्हणाला.

तें ऐकून राजकुमारानें आश्चर्याचा जणूं झटका लागला असें दर्शविलें. पण मनांत तो खूप हंसला. कारण फळें खाल्ल्याचा परिणाम काय होईल हें त्याला माहीत होतें. तरी आश्चर्य वाटल्याचें सोंग करून म्हणाला—"मी तरी तींच फळें खातों आहें. पण मला कधीं तसा अनुभव आला नाहीं." थोड्या वेळानें विचार केल्यासारखें दाखवून विचारलें—"तुमच्या युवराजांनीं जेवण झाल्यावर ताणून तर नाहीं ना दिली !"

"निजणार कां नाहींत ? निजले होते." मंत्री म्हणाला.

Fullscreen 127 60 / 80




"मग बरोबर आहे! मला वाटतें म्हणूनच हा सर्व प्रकार घडला असावा असें मला वाटतें! तुम्ही परदेशी दिसतां म्हणून ह्या देशांतले रीति रिवाज तुम्हांला माहीत नसतील. जेवल्यानंतर झोपतां कामा नये! झोपलें कीं आली दाढी!" राजकुमार म्हणाला.

तें ऐकून मंत्र्यानें कपाळावर हात मारला आणि म्हणाला—"कर्म आमचें!" तो विचार करूं लागला, चूक युवराजांची आहे. पण आतां काय करणार? राजकुमारी अशा स्थितींत युवराजांशीं लग्नाला कशी तयार होईल? तो उघड बरोबरच्या सरदारांना म्हणाला—"आपण नवरदेव म्हणून युवराजांना पुढें उभें केलें तर, बस! मारच खावा लागेल! त्यापेक्षां उलट पावलीं परत गेलेलें काय वाईट?"

एक वृद्ध सरदार म्हणाला—"माझी एक सूचना आहे. कोणाला तरी धरून नवरदेव म्हणून उभें करूं या. त्याला तो मागेल ती मजुरी देऊं. लग्न झालें कीं, राजकुमारी आपल्या देशांत गेल्यावर काम करूं शकेल!"

सर्वांना ती युक्ति पसंत पडली, आतां कोणातरी तरुण माणसाला धरून आणणें तेवढें कठीण नव्हतें. मंत्र्यानें पुन्हां विचार केला कीं, तो फळविक्या दिसायला बरा आहे. मग त्यालाच कां नाहीं उभें करूं? चार पैसे हातावर ठेवले कीं झालें.

मंत्र्यांनीं येऊन राजकुमाराला विचारलें—"काय रे, आम्ही सांगूं तें काम करशील का? तूं मागशील ती मजुरी मिळेल!"

राजकुमार म्हणाला—"काम तर कळूं दे! मग सांगेन मजुरी!"

"काम नाहीं. लग्न होईपर्यंत नवरदेव म्हणून उभें रहावयाचें." मंत्री म्हणाला. ऐकून राजकुमाराला अपार आनंद झाला. पण तो व्यक्त न करतां म्हणाला—"हे सर्व धंदे आपल्याकडून नाहीं बुवा होणार! मला आहे दुसरें काम!"

मंत्र्यानें जास्त आग्रह केला तेव्हां राजकुमारानें होकार दिला. नंतर मजुरी ठरली. मंत्र्यानें दहा मोहरा देऊं केल्या. राजकुमारानें शंभर मागितल्या. शेवटीं पंचाहत्तर मोहरांवर सौदा पटला.

राजकुमाराला नवरदेवाचा पोशाख घालायला देण्यांत आला. सजवलेल्या गाडींत त्याला बसविण्यांत आलें. खरे नवरदेव एका घोड्यावर बसून मागें मागें येत होते. राजधानींत वऱ्हाड पोंचल्यावर एका खोलींत त्याची राहण्याची व्यवस्था करण्यांत आली व नकली नवरदेव वऱ्हाडाबरोबर राजवाड्यांत उतरलें.

स्वतः राजा स्वागत करण्यासाठीं गांवाबाहेर आला होता. आपल्या जांवयाचें रूपलावण्य पाहून त्याला फार आनंद झाला. वरपक्षाकडून नजराणा व अहेर खूप आला होता. पाहून राजाचे डोळे दिपून गेले.

तरी राजा मनांतल्या मनांत भीत होता. राजकन्या आकाशांतील महालांतून कोणाबरोबर तरी पळून गेली होती ही गोष्ट जर




त्यांना कळली तर लग्न मोडायचें. एकदां लग्न मोडलें कीं, पुन्हां लग्न होणें अशक्य.

म्हणून राजानें विवाहाची खूप तयारी करून ठेवली होती. कोणाला नांवें ठेवायला जागा नव्हती. एक आठवडाभर मेजवान्या चालू होत्या. नवरदेव व त्यांचे नातेवाईक यांच्याजवळ कोणी राजधानींतला माणूस पोंचूं नये याची त्यानें काळजी बाळगली. नाचण्या गाण्यांत वऱ्हाडी मंडळी गर्क झाल्यावर इतर गोष्टी करायला वेळच मिळणार नाहीं म्हणून त्यानें मनोरंजनाच्या कार्यक्रमाची खास तयारी ठेवली होती.


Fullscreen



62 / 80


राजवाड्यांत जिकडे पहावा तिकडे उत्सव, मेजवान्या, दिवे, दारूची सरबत्ती, नळे, चंद्रज्योति, नृत्य व गायन. पण राजकुमारीच्या महालांत औदासिन्य पसरलें होतें. राजकुमारी रडत होती. एक क्षणभर देखील ती आपल्या प्रियकराला विसरली नव्हती. म्हणून तिनें तोंड वर करून व बुरखा बाजूला सारून नवऱ्या मुलाला पाहिलें देखील नाहीं.

शेवटच्या दिवशीं मेजवानीच्या वेळीं नवरामुलगा व नवरीमुलगी दोघांना एका कोचावर बसविण्यांत आलें. राजकुमार हळूंच म्हणाला—" मी आलों आहें ! मला ओळखलें नाहींस का ? "

ओळखीचा आवाज ऐकून राजकुमारीनें वर पाहिलें. स्वतःच्या डोळ्यावर विश्वासच होईना. आपण स्वप्न तर नाहीं पहात! बाबांनीं या विवाहाला होकार कसा दिला ?

राजकुमारीनें परिस्थिति ओळखली नाहीं हें राजकुमाराला कळलें. त्यानें तिला सावध केलें. हळूच म्हणाला—" तुला कांहींच माहीत नाहीं असें दाखव. सर्व नाटक कसें बेमालूम पार पडलें पाहिजे." दोघांचें परस्परांशीं बरेंच बोलणें झालें व कशी सुटका करून घ्यायची याचा बेत पण ठरला राजकुमारी सरळ उभी राहलेली पाहून व लग्नकार्याचा सर्व सोहळा सुरळीत चालल्याचें पाहून राजाला वाटलें, राजकुमारीनें गत्यंतर नाहीं म्हणून नशिबांत जें आहे त्यांत सुख मानायचें कबूल केलें असावें. राजकुमारानें राजकन्येच्या कानांत हळूच म्हटलें—" सासरी जातांना वडिलांकडून तो लाकडी घोडा मागून घ्यायला विसरूं नकोस."

दुसऱ्या दिवशीं पाठवणीच्या वेळीं माहेरची मंडळी पुष्कळ रडली. राजा, दरबारी मंडळी व सरदार मंत्री सर्वांच्या डोळ्यांना टिपें आलीं. राजकुमारी वडिलांचा निरोप घेतांना म्हणाली—" बाबा ! तो लाकडी घोडा द्या ! माहेरची ती एकच आठवण मी मागून घेत आहें. तुम्ही मला सर्व दिलें आहे. पण तो घोडा घेऊन गेलें नाहीं तर मला माहेरची सारखी आठवण येईल. राजानें ' हो ना ' करतां करतां शेवटीं लाकडी घोडा द्यायचें कबूल केलें. कारण त्याला मुलीचें मन मोडवेना.

नोकर घोडा घेऊन आले. राजकुमारीनें तो घोडा उचलून घेतला. नंतर वऱ्हाड राजकन्येला बरोबर घेऊन निघालें.





Fullscreen 127 64 /80



कित्येक दिवसांचा प्रवास होता. शिपायांची नजर सारखी नकली नवरदेवांवर होती. खऱ्या नवऱ्या मुलाचें गांव जवळ येऊं लागलें तसतशी राजकुमारीची काळजी वाढूं लागली. सर्वांची नजर चुकवून पळून जाणें सोपें नव्हतें. सुदैवानें राजकुमाराला एक उपाय सुचला. त्यानें राजकन्येला तो सुचविला.

प्रवास संपला. वऱ्हाड नवऱ्या मुलाच्या राजधानींत पोंचलें. मध्यंतरी घडलेलें वृत्त राजधानींत कोणासच माहीत नव्हतें. राजवाड्यासमोर वरात पोंचल्याबरोबर राज-कुमारीनें मंत्र्याला जवळ बोलावून सांगितलें कीं, आमच्या घरीं गृह प्रवेशाच्या वेळीं सोन्याचीं नाणीं लुटण्याची पद्धत आहे. तरी दहा हजार मोहरा घेऊन याव्या. राजकुमारीच्या आज्ञेनें एकेका तबकांत हजार या प्रमाणें दहा तबकें भरून आणण्यांत आलीं. राजकुमारीनें सर्व मोहरा फेंकायला सुरवात केली. त्या घेण्यासाठीं नोकरचाकर सैनिक शिपाई सर्व धांवले.

या संधीचा फायदा घेऊन राजकुमार लाकडी घोड्यावर बसला व त्यानें राज-कुमारीला सुद्धां बसवून घेतलें. नंतर त्यानें घोड्याची कळ दाबली त्याबरोबर घोडा आकाशांत उडूं लागला. कोणाला कांहीं कळण्यापूर्वीच घोडा आकाशांत उडूं लागला होता व हळू हळू दिसेनासा झाला. सर्व किंकर्तव्य विमूढ होऊन आकाशाकडे नुसते पहात उभे राहाले.

राजकुमाराचे वडील इतके दिवस काळजी करीत होते कीं, मुलगा कोठें गेला. त्यांनीं सुताराला तुरुंगांत टाकलें. म्हणाले—"तूं घोडा करून आणलास म्हणून माझा मुलगा त्याच्या बळी पडला. जर तूं घोडा आणला नसतास तर माझा मुलगा कोठें गेला नसता


Fullscreen




127

66 / 80

का ?" राजानें त्याला असेंहि सांगितलें कीं, एका महिन्याच्या आंत माझा मुलगा परत आला नाहीं तर तुला फांशीची शिक्षा देण्यांत येईल.

राजाला एक शंका आली, घोडा समुद्रांत तर पडला नसेल ? त्यानें लोहाराला बोलावून त्याला आपल्या लोखंडी माशाच्या सहाय्यानें समुद्र पालथा घालायला सांगितलें.

राजवाड्यांतले उत्सव आणि मेजवान्या बंद पडल्या. एक महिन्याचा अवधी संपला तेव्हां राजानें त्याला बोलावून फांशीची शिक्षा दिली. शिपाई सुताराला धरून वध्यस्थानाकडे निघाले.

ऐन वेळीं आकाशांत घोडा उडत येत असलेला राजाला दिसला. जमिनीवर उतरल्यावर दोघां नवरांनवरीनीं राजाचें व इतर थोर मंडळींचें पद्धतीप्रमाणें अभिवादन केलें. नंतर राजकुमारानें आपल्या प्रवासाचें रसभरीत वर्णन करून राजाला सांगितलें. म्हणाला—"अब्बा ! ह्या घोड्यासारखी आश्चर्यजनक वस्तु या जगांत मिळणें दुर्मीळ. ह्या घोड्याच्या मदतीनेंच तर मी देश विदेश फिरून आलों व एका त्रिपुर सुंदरीला घेऊन आलों आहें. ह्या सुताराला जितकें बक्षीस द्यावें तेवढें थोडेंच आहे."

मुलाच्या तोंडीं प्रवासाचें वर्णन ऐकून राजाला आनंद झाला. सुताराला आपण उगाच त्रास दिला याबद्दल त्याला मनापासून पश्चात्ताप वाटला व त्यानें त्याची माफी मागितली. नंतर त्याला पुष्कळ बक्षिसें देऊन निरोप दिला.

राजकुमार व राजकुमारी यांचें पुन्हां थाटामाटानें लग्न झालें. नंतर त्यांचें आयुष्य सुखाचें झालें.

[ संपूर्ण ]






# गुपित

पुन्हां पौर्णिमा आली. रात्रीचीं जेवणें आटोपल्यावर आजोबा चांदण्यांत आराम-खुर्ची टाकून बसले. मुलें घोळका करून चारी बाजूला बसलीं होतीं. आजोबांनीं नाकांत तपकीर कोंबीत हा श्लोक म्हटला :—

> रहस्य मात्मनो धीमान,
> शत्रुभ्यो न प्रकाशयेत्
> अन्यथा वंचितस्तप्ये
> चन्द्रवर्मेव राक्षसः ।

"आजोबा अर्थ सांगा श्लोकाचा !" मुलांनीं गलका करायला सुरवात केली.

"नुसता अर्थ सांगून थोडेंच भागणार आहे. अर्थ सांगून झाला म्हणजे मग गोष्ट सांगा म्हणून पाठीस लागाल. हो कीं नाहीं ?" अजोबांनीं विचारलें.

"हो, अर्थ सांगा व गोष्ट पण सांगा !" मुलें म्हणालीं.

"या श्लोकाचा असा अर्थ आहे. आपलें गुपित शत्रूला कळूं देतां कामा नये. जर आपण आपलें गुपित सांगून टाकलें तर चंडवर्मा राक्षसाची गत व्हायची. समजलें ?" अजोबांनीं अर्थ सांगून विचारलें.

"राक्षसाचें काय गुपित होतें ? तें त्यानें कोणाला सांगितलें ? नंतर त्यामुळें कोणाची फसवणूक झाली. सर्व सर्व सांगा आजोबा." मुलांनीं प्रश्नांची सरबत्ती सुरू केली.

"थांबा थांबा, थांबा ! सर्व सांगतों." त्यांनीं गोष्ट सांगायला सुरवत केली.

गोदावरी नदीच्या काठीं एक मोठें रान होतें. त्यांत चंडवर्मा नांवाचा राक्षस रहात असे. रानांतल्या वाटेनें कोणी जाऊं येऊं लागला कीं, राक्षस त्याला पकडे व त्याच्या खांद्यावर चढून त्याला शेजारच्या तलावापर्यंत घेऊन जायला सांगे. तलावांत स्नान







Fullscreen 127 68 / 80

फरून तो राक्षस त्या माणसाला खाऊन टाकी. असा त्याचा उदरनिर्वाह चालत असे.

एकदां एक ब्राह्मण चंडवर्माच्या वाटेनें येत होता. राक्षस त्याच्या खांद्यावर बसला आणि म्हणाला—"चल तलावाकडे!" बिचारा ब्राह्मण काय करणार. राक्षसाचें ओझें उचलून चालूं लागला.

ब्राह्मण चतुर व हुशार होता. एक गोष्ट त्याला आढळून आली. त्या राक्षसाचें सारें शरीर राकट व खडबडीत होतें. पण पाय मात्र मऊ आणि तुळतुळीत होते—अगदीं कमळासारखे. त्याला आश्चर्य वाटलें.

ब्राह्मणानें धीर करून त्या राक्षसाला विचारलें—"काय हो दादा? तुमचें शरीर इतकें राकट आणि खडबडीत दिसतें आहे. पण पाय मात्र किती मऊ आणि तुळतुळीत आहेत. कां हो असें? राक्षसाला आनंद वाटला कीं, कोणी का असेना, त्याच्या पायाची स्तुति करीत आहे. म्हणून तो म्हणाला—"त्याचें असें आहे कीं, मी कधीं ओल्या पायानें जमिनीवर चालत नाहीं. ओला पाय जमिनीला लागूंच देत नाहीं, समज. हें माझें व्रत आहे. म्हणून माझे पाय तुळतळीत आहेत."

राक्षसाचें गुपित अशा प्रकारें ब्राह्मणाला सहज बोलतां बोलतां कळलें.

दोघे तलावाजवळ पोंचले. राक्षस आंघोळी-साठीं खालीं उतरला. पाण्यांत शिरतांना ब्राह्मणाला—"मी येईं पर्यंत काठावर बैस. स्नान संध्या आटोपून हा पहा आलोंच."

राक्षस असें सांगून पाण्यांत शिरला. त्यानें बुडी मारल्याबरोबर ब्राह्मणानें तेथून पाय काढला. कारण राक्षस आपल्याला मारून खाईल हें त्याला माहीत होतें. राक्षस ओले पाय घेऊन जमिनीवर कसा येणार? म्हणून तलावांतच उभा राहिला.





# नरक स्वर्ग होईल

इंग्लंडमध्यें एक पादरी रहात असे. एक विज्ञानशास्त्रज्ञ मित्र मेल्यावर त्याच्या मनांत एक शंका आली. हे विज्ञानशास्त्रज्ञ कधीं देवाधर्मावर विश्वास ठेवीत नाहींत. मग मेल्यावर यांना स्वर्ग मिळतो कीं नरक. देवाधर्मावर विश्वास नाहीं म्हणून यांना स्वर्ग मिळणें शक्य नाहीं. पण पुन्हां त्याच्या मनांत विचार येई कीं, यांनीं शोध लावून जगावर कित्येक उपकार देखील केलेले आहेत. मग यांना नरक तरी कसा मिळेल? तो अन्याय होईल." विचार करतां करतां त्याला झोंप लागली. स्वप्नांत त्याला सात स्वर्ग दिसले. त्यांतल्या सर्वांत उंच स्वर्गांत कांहीं ओळखीचे भक्त दिसले.

त्यानें आपल्या मृत विज्ञानशास्त्रज्ञाविषयीं चवकशी केली. तेव्हां त्याला कळलें कीं, सर्व विज्ञानशास्त्रज्ञ पाताळ लोकांत आहेत. त्यानें विचारलें—"पाताळांत जायला कोणता मार्ग आहे? कसें जायचें?" तेव्हां त्याला उत्तर मिळालें कीं, पाताळ लोकांत जायला आगगाडी मिळते—स्वर्गापासून ते थेट पाताळापर्यंत. पादऱ्यानें पहिल्या वर्गाचें तिकिट काढलें आणि गाडींत बसून निघाला. गाडी एक एक करून सातहि स्वर्ग उतरल्यावर नरकमार्गें निघाली. एकेका नरकांतून गाडी पुढें जाऊं लागल्यावर पादऱ्याला पुढें जाणें कठीण वाटूं लागलें. गाडींतून त्याला बीभत्स दृश्यें दिसूं लागलीं, कर्कश आक्रोश ऐकूं आले व असह्य दुर्गंध सहन करावा लागला.

पुढलें स्टेशन अधःपाताल आहे हें जेव्हां त्याला कळलें तेव्हां कल्पनेनेंच तेथील आक्रोश व दुर्गंध त्याला असह्य वाटला. आपण हा प्रवास करण्याचा विचार मनांत आणला ही मोठी चूक केली.

Fullscreen 127 70 / 80

"अध: पाताल! अध: पाताल!" चा आवाज कानीं पडल्यामुळें त्याला पुन्हां शुद्ध आली. त्यानें डोळे उघडून पाहिलें आणि विचार केला–'तर मग हेंच का अध:पाताल! अशक्य! हें तर सर्वांत उंच अशा स्वर्गासारखें आहे. पण शेजारच्या इतर प्रवाश्यांनीं त्याला सांगितलें कीं, हेंच अध:पाताल आहे. त्यानें गार्डला विचारलें. गार्ड म्हणाला–"हो हेंच अध:पाताल स्टेशन! तुम्ही कोठवरचें तिकिट काढलें आहे?"

पाद्री म्हणाला–"अध:पातालाचें!"

"मग उतरा!" गार्ड म्हणाला.

पाद्री गाडींतून खालीं उतरला व चालूं लागला. जिकडे पहावें तिकडे उद्यानें व उपवनें शीतल मंदमारुताबरोबर सुगंध दरवळत होता. स्वर्गापेक्षां येथेंच जास्त सुख दिसतें आहे.

तो विचार करीत चालत असतां त्याला त्याचा परिचित विज्ञानशास्त्रज्ञ भेटला. त्याला त्यानें विचारलें–"काय रे! येथें तूं मजेंत दिसतो आहेस? नरकाचे कष्ट तुला असह्य वाटत असतील म्हणून उपदेश करून स्वर्गाला पाठवावें या हेतूनें मी येथें आलों होतों. हा नरकच स्वर्गापेक्षां जास्त बरा दिसतो आहे!"

"होय! मी व माझे इतर स्नेही विज्ञान शास्त्रज्ञ आलों तेव्हां तूं कल्पना केली होतीस तशीच नरकाची स्थिति होती. आम्हांला चिखलांत आणून टाकलें होतें. आम्ही त्यांतून लोखंड काढून घेतलें व त्याचीं यंत्रें केलीं. जमिनींत शेती केली आणि पुष्कळ वर्षांच्या मेहनतीनें या नरकाला स्वर्ग करून टाकलें आहे. कोणतीहि वस्तु या जगांत त्याज्य किंवा टाकाऊ नाहीं त्याचा उपयोग कळला पाहिजे. मनुष्यानें डोकें चालविलें तर नरक देखील स्वर्ग होऊं शकेल." विज्ञान शास्त्रज्ञ म्हणाला.





# रामेश्वर

आपल्या देशांतील चार मोठ्या तीर्थक्षेत्रांतलें रामेश्वर हें एक क्षेत्र आहे. रामेश्वरचें देवालय आपल्या देशांतील आश्चर्यांपैकीं एक आहे. द्राविड शिल्पकलेचें इतकें सुंदर उदाहरण इतरत्र मिळणें कठीण आहे. असें सांगतात कीं, दक्षिण भारताच्या टोंकाला एका बेटावर लंकेंतील एका राजानें हें देवूळ बांधलें आणि हें देऊळ बांधायला एकंदर ३५० वर्षें लागलीं.

या देवळांतलें विशेष म्हणजे शिल्पकलेचें उत्कृष्ट कोरीव काम केलेले स्तंभ व त्या स्तंभांनीं बनविलेली प्रदक्षिणा. याची चौफेर लांबी चार हजार फूट आहे. शंकराचा भक्त रावण याच्या वधानंतर रामानें येथें येऊन शंकराची पूजा केली होती. येथील देवाचें नांव रामनाथ असें आहे. आंतील प्रांगण १०० फूट लांब व ३५० फूट रुंद आहे. सिंहद्वाराची उंची १०० फूट आहे.












Fullscreen 127 12 / 84



# वडाची साक्ष

एका गांवीं दगडू शेट नांवाचा एक वाणी रहात असे. तो मनानें फार उदार होता. कोणाला कधीं पैसे दिले तर कागद देखील लिहून घेत नसे.

एकदां दगडू शेट परगांवीं व्यापारधंद्यासाठीं जात होता. वाटेंत त्याला खंडू मोहिते भेटला व हात जोडून म्हणाला—"शेटजी, कहर केला आहे देवानें. परवां जोराचा पाऊस पडला आणि सर्व धाब्यें खालीं आलें. उभें राहायला देखील जागा नाहीं. दया करा गरिबावर आणि पन्नास रुपये द्या. कापणी झाल्याबरोबर परत देतों."

दगडूशेटजवळ पैसे होते. परंतु तो व्यापारासाठीं चालला होता. तरी खंडूची नड पाहून त्यानें रुपये द्यायचें ठरविलें. म्हणाला—"हे घे पैसे? सावकाश दे, कापणी झाल्यावर!"

खंडूनें पैसे घेतले. पण कबूल केल्याप्रमाणें कापणी झाल्यावर दिले नाहींत. पहिली कापणी झाली, दुसरी झाली व तिसरी पण झाली. परंतु खंडूनें कर्ज फेडलें नाहीं. म्हणून दगडूशेट त्याच्याकडे गेला आणि पैसे मागूं लागला.

खंडूनें रागानें विचारलें—"कसले पैसे?"

"दोन वर्षांपूर्वी तूं घराचें धाब्यें ठीक करण्यासाठीं पन्नास रुपये कर्ज घेतले नव्हतेस का?" दगडू शेटनें विचारलें.

"मी कर्ज कढलें होतें? तुझ्याकडून? मला नाहीं आठवत बुवा! बरें तें सोड. मी विसरभोळा झालों आहें. तुला मी कागद लिहून दिला असेलच कीं नाहीं. पहा तो. असला तर देईन."

"दोनतीन महिन्यासाठीं कागद कशाला, म्हणून मी नाहीं कांहीं लिहून घेतलें."

"शेटजी, अरे तुम्ही कागद लिहून घेतल्याशिवाय का कर्ज देणार?" खंडूनें विचारलें. दोघांचें भांडण ऐकून गांवकरी जमा झाले. म्हणाले—"भांडतां कशाला? चला पाटलाकडे. ते बरोबर न्याय निवाडा करतील."

"चला पाटलाकडे! मला काय?" खंडू म्हणाला.

पाटील हुशार होता. त्यानें दोघांचें म्हणणें शांतपणें ऐकून घेतलें.

खंडू म्हणाला—"पाटील, तुम्हीच सांगा! मला या शेटजींकडे कर्ज मागायला जायची गरज काय? देवाच्या दयेनें पीक चांगलें येत आहे. आणि यानें दिले तरी कागद लिहून घेतल्याशिवाय का हा देणार? तुम्हीच विचार करा."

पाटलानें दगडू शेटला विचारलें—"शेटजी! तुम्ही पैसे दिलेत तेव्हां तेथें कोणी दुसरा होता का? कोणी पाहिलें का?"

"तेथें कोण असणार? मी गांवाला जात होतों आणि खंडूनें वाटेंतच भेटून पैसे मागितले. मी पन्नास रुपये काढून दिले." दगडू शेट म्हणाला.

"वाटेंत कोठें भेट झाली तुमची त्याच्याशीं?" पाटलानें विचारलें.

श्री. वा. रा. पाटणकर











Fullscreen 127 14 / 84

"एका वडाच्या झाडाखालीं !" दगडू शेट म्हणाला.

"होय ना ? मग त्या झाडाला जाऊन बोलवून आणा साक्ष द्यायला." असें सांगून पाटलानें एक चिठ्ठी लिहून दिली. म्हणाला–"जाऊन द्या ही चिठ्ठी त्या झाडाला. येईल तो."

दगडू शेटला कांहीं कळलें नाहीं. पाटलांची आज्ञा म्हणून चिठ्ठी घेऊन निघाला.

थोड्या वेळानें पाटलानें खंडूला विचारलें–"फार वेळ झाला शेटजींना जाऊन. पोंचले असतील का रे ते त्या झाडाजवळ ?"

खंडू हंसत म्हणाला–"इतक्यांत काय पोंचतो तो ! अहो एक मैल तरी दूर असेल तें !"

तासाभरानें दगडू शेट परत आले व म्हणाले–"पाटील तें झाड कांहीं येत नाहीं ! मी त्याला किती सांगितलें. शेवटीं तुमची चिठ्ठी त्याच्या एका मुळांत खुपसून निघून आलों."

पाटील हंसत म्हणाला–"शेटजी, अहो तुम्ही यायच्या आधींच तें झाड साक्ष देऊन गेलें !"

खंडू ओरडला–"कोठें ? मी नाहीं पाहिलें."

पाटील म्हणाला–"अरे, तूंच नाहीं का सांगितलेंस कीं अजून शेटजी त्या झाडापर्यंत पोंचले देखील नसतील म्हणून. तें झाड एक मैल तरी दूर असेल, हें तूंच तर म्हणालास ! तूं शेटजींना भेटलास नाहींस व त्यांच्याकडून कर्ज देखील घेतलें नाहींस म्हणतोस आणि तें झाड कोणतें व किती दूर आहे हें कसें रे कळलें तुला ?"

खंडूची मान खालीं झाली व त्यानें शेटजींचें कर्ज मुकाट्यानें फेडलें.





# स्यमंतकमणि

## पंचम अध्याय

सत्राजितला कृष्ण म्हणाला,–
"समक्ष सर्वांच्या तुम्ही,
पाणउतारा केला माझा
मित्र खरा पण शत्रु न मी ॥

"कोणि मारलें प्रसेनला अन्
कोणि चोरला कसा मणी,
केलि चवकशी होति तुम्ही का ?
माझी निंदा मात्र जनीं !

"लोभ मण्याचा नाहीं मजला
लखलाभो तो सदा तुम्हां !
व्यर्थकुणावर अशा तऱ्हेनें
लावुं नका पण दोष पुन्हां !"

कृष्णानें हें सांगुन दिधला
समोर फेकुन मणि त्याच्या ।
करूं लागले सर्व प्रशंसा
शौर्याची श्रीकृष्णाच्या ॥

लज्जित सत्राजित कृष्णाला
वदला–"झाली चूक खरी,
क्षमा करावी सर्व विसरुनी
करुणासागर कृष्ण हरी ।

"मूर्खपणानें माझ्या झाला
तुला ताप हा आज वृथा ।
क्षोभ मनाला माझ्या, निंदिल
मज जग सांगुन हीच कथा ॥

"कोठें गेली होती माझी
बुद्धि तदां, मज हें नकळे ।
लागतात भोगावीं मनुजा
केल्या कर्मांचींच फळें !

"वरुन सत्यभामेला माझ्या
कर कृतार्थ मज कृष्णा आज !
कन्या माझी एकुलती ती
जगांत माझी राहिल लाज !"

Fullscreen 127 18 / 84










केलि प्रतिज्ञा श्रीकृष्णानें-
"पाठवीन त्या यमसदना !"
बावरला शतधन्वा ऐकुनि
नव्हती त्याच्या शांति मना ॥

कृतवर्म्याला जाउनि वदला-
"पाठ फिरविली दैवानें !"
वदला कृतवर्मा-"कृष्णासी
वैर करावें मूर्खानें !"

कृतवर्मा का बोलत आहे !
थक्क जाहला शतधन्वा;
तोंडघशी मी पडलों, त्याचें
डोकें फिरलें कीं अथवा !!

शतधन्वा मग अक्रुराकडे
गेला आणि म्हणाला त्या-
"वांचव मजला !" हंसत म्हणे तो-
"जाउँ कसा वाटेला त्या ?

"कंसा ज्यानें लोळविलें तो
पुरुष वाटला का सामान्य ?
त्याच्याशीं का वैर करूं मी ?
होइल कोणाला का मान्य ?

"सोडुनि आशा माझी आतां
तुला पाहिजे तिकडे जा !
माझें मत तूं वैर सोडुनी
शरण आज कृष्णाला जा !"

अंग चोरुनी अक्रुर गेला ;
शतधन्व्याला आला राग।
टाकुनिया मणि पुढती वदला-
"विझव तूंच ही आतां आग !"

असें सांगुनी घोड्यावरती
बसुन पळाला तो तेथून।
मण्या हलविण्या अशा प्रसंगीं
येइल कोण कसा कोठून ?





# अग्निद्वीप

[ ९ ]

[ राजकुमारी कांतिमतीनें चित्रसेनाला सांगितलें कीं नागवर्मानें तिच्या वडिलांना कपिलपुराच्या किल्ल्यांत कैद करून ठेवलें आहे. चित्रसेन आपलें सैन्य घेऊन तेथें पोंचला तेव्हां किल्ल्याच्या बुरजावर शत्रु सैनिक सशस्त्र उभे असलेले व ते भयंकर पक्षी आकाशांत घिरट्या घालीत असलेले दिसले. मशालींच्या सहाय्यानें त्या पक्ष्यांना पळवून लावण्याची जबाबदारी अमरपालनें स्वतःवर घेतली. पुढें वाचा. ]

अमरपालाच्या चातुर्यावर चित्रसेनाचा पूर्ण विश्वास होता. त्या दिवशीं त्यानें त्या भयंकर पक्ष्यांचा किती चातुर्यानें संहार केला होता हें त्यानें व सर्वांनीं पाहिलें होतें. पण उग्राक्षाच्या मनांतून त्या पक्ष्यांची धास्ती अद्याप कमी झालेली नव्हती. म्हणून त्यानें विचारलें-"आपण मशाली पेटवून पक्ष्यांना दाखविल्या तर ते हल्ला करायचें सोडून भिऊन पळून जातील असें वाटतें का तुला ! या गोष्टीची खात्री आहे का तुला !"

"मशाली !" असें अमरपालनें म्हटल्या बरोबर शेंकडो सैनिक मशाली तेलांत बुडवून पुढें घेऊन आले.

अमरपाल त्यांच्याकडे बोट दाखवून म्हणाला-"महाराज ! आपली आज्ञा होतांच या मशाली घेऊन हे सैनिक किल्ल्याला

Fullscreen 127 20 / 84



चारी बाजूंनीं वेढा देतील. त्यांच्या पाठोपाठ किंवा बरोबरच इतर सैनिकांनीं पण किल्ल्यावर हल्ला चढवावा.

"होय होय रे!" अशी उग्राक्षानें आरोळी मारल्याबरोबर राक्षस "आलों सरदार" असें ओरडत उग्राक्षासमोर येऊन उभे राहिले.

त्यांना उग्राक्ष म्हणाला—"कांहींजण जाऊन मोठमोठीं झाडें उपटून आणा आणि त्यांच्या खोडांनीं किल्ल्याचें फाटक तोडा. इतर सर्व पहार, कुदळ व फावडें जें मिळेल तें घेऊन किल्ल्याच्या भिंती पाडा!"

नंतर चित्रसेनाला तो म्हणाला—"महाराज, मला वाटतें कीं, आपण सर्वांनीं मिळून किल्ल्याला चारी बाजूंनीं वेढा द्यावा व किल्ल्यावर चालून जावें. फक्त फाटक तोडून आंत शिरण्याचा विचार तितकासा बरोबर वाटत नाहीं मला. कारण किल्ल्यांत लोक फार कमी आहेत व सर्व बाजूंनीं आपला हल्ला थोपवून धरणें त्यांना शक्य होणार नाहीं. हो, त्या भयंकर पक्ष्यांच्या हातून आपणांस वांचविण्याची जबाबदारी अमरपालावर आहे."

"भिऊं नकोस उग्राक्ष! तुझ्या रक्षणाचा भार माझ्यावर आहे!" अमरपालानें आपल्या मशालधारी अनुयायाकडे बोट दाखवून म्हटलें.

"मानवाधमा! तूं माझ्या सारख्या राक्षसांच्या राजाचें रक्षण करणार?" उग्राक्षानें दांत ओठ चावून आपली दगडाची गदा हातांत घेतली व अमरपालाला मारण्यासाठीं उगारली.

"थांब उग्राक्ष!" राजकन्या कांतिमति अधिकाराच्या स्वरांत जणुंकांहीं आज्ञा देत म्हणाली. थोडावेळ थांबून ती पुढें म्हणाली—"जर आपण सर्व परस्परांच्या बलाबलाची परीक्षा अशा तऱ्हेनें करूं लागलों तर शत्रूच्या हातांतून माझ्या वडिलांचें रक्षण कसें काय होणार याची मला शंकाच वाटूं लागली आहे." नंतर चित्रसेनाकडे वळून म्हणाली—"महाराज! आपण माझ्या वडिलांना बंदीवासांतून सोडविण्याचें वचन दिलें आहे." "होय!" म्हणून चित्रसेनानें होकारार्थी आपली मान हलविली व उग्राक्षाकडे वळून म्हणाला—"उग्राक्षा! तूं राक्षसोत्तम आहेस हें मला कबूल आहे. मग तुला आपल्या शक्तीचें प्रदर्शन करण्याची, तूंच सांग, गरज आहे का? किल्ल्यांतल्या शत्रूवर व त्या भयंकर पक्ष्यांवर तूं आपला राग पाहिजे तितका काढ."

उग्राक्षानें चित्रसेनाला कांहींच उत्तर दिलें नाहीं. आपल्या अनुयायांना संबोधून म्हणाला—"अरे, असे उभे काय? उपटा झाडें आणि जा चालून किल्ल्यावर!" त्याच्या त्या गर्जनेनें सर्व वनप्रदेश दुमदुमला.

सर्व राक्षस रानांत शिरले व मोठमोठीं झाडें उपटून त्यांचीं खोडें खांद्यावर घेऊन फाटकाकडे जाऊं लागले. त्याचवेळीं त्यांच्या पाठीमागून चित्रसेनाचें सैन्य व अमरपालाचे मशाली घेऊन येणारे अनुयायी चालू लागले.



चित्रसेन व कांतिमती आपापल्या घोड्यावर बसून सैन्याला उत्साह देत सैन्याच्या आजूबाजूनें चालत होती. उग्राक्ष आपली दगडाची गदा हातांत घेऊन गर्जना करीत होता.

चित्रसेन व उग्राक्षाचें सैन्य किल्ल्यापासून शंभर पावलांवर येऊन पोंचतांच किल्ल्यांतून बाणवृष्टि होऊं लागली. चित्रसेनाचें सैन्य स्वतःचा बचाव करीत व युद्धावर उभें राहून एका बाणाचें उत्तर दोन बाणांनीं देऊं लागलें. थोड्याच वेळांत राक्षस किल्ल्याच्या फाटकाजवळ येऊन पोंचले.


Fullscreen

127




22 / 84






त्यांनीं झाडाच्या खोडानें किल्ल्याचें फाटक तोडण्याचा उपक्रम सुरू केला. कांहीं राक्षस पहारींनीं किल्ल्याचा तट तोडूं लागले.

एकाएकीं संध्याकाळ झाल्यासारखें वाटलें. आकाशांत कित्येक भयंकर पक्षी घिरट्या घालूं लागले. त्यांना पाहतांच राक्षस घाबरले. पण अमरपाल आपल्या सैन्यानिशीं तयार होताच. त्याचा हुकूम होतांच शेंकडों मशाली जळूं लागल्या. आकाशांतून पक्ष्यांनीं त्या पाहल्या व पाठ फिरवून मोठ्यानें ओरडत उडूं लागले. त्यांच्यावर बसलेल्या व्याघ्रचर्मवाल्यांनीं त्यांना अंकुश मारून परत फिरवण्याचा प्रयत्न केला. पण त्यांचे सर्व प्रयत्न फुकट गेले. एका स्वारानें आपल्या पक्ष्याला जोरानें भाला मारला. त्यामुळें तो पक्षी आकाशांतच उलटा झाला व त्याच्यावरचा स्वार आकाशांतून जमिनीवर आदळला.

पक्षी पळून गेलेले पाहून उमाक्षाचें सैन्य व चित्रसेनाचें सैन्य जय जय कार करूं लागलें. नागवर्माचे सैनिक भयंकर पक्ष्यांचा आधार सुटल्यानें धीर सोडून पळूं लागले. चित्रसेनाच्या सैन्याला कोणत्याहि प्रकारचा अटकाव राहिला नाहीं. किल्ल्याचें फाटक पण तोंपर्यंत तुटलें होतें व उमाक्षाच्या राक्षस सैन्यानें जागोजागीं किल्ल्याला खिंडारें पाडली होतीं. हां हां म्हणतां चित्रसेनाचें व राक्षसांचें सैन्य किल्ल्यांत शिरलें. शत्रूचे जे सैनिक शरण मागायला आले त्यांना चित्रसेनानें निःशस्त्र करून सोडून दिलें व जे शेवटपर्यंत युद्ध करीत राहाले त्यांचा समाचार राक्षसांच्या सैन्यानें घेतला.

एकूण युद्ध संपलें व किल्ल्यावर चित्रसेनाचा झेंडा फडकूं लागला. तो कांतिमती बरोबर सरळ राजवाड्याकडे आला. त्याच्या हुकमानें सैनिक वाड्यांत शिरले व वीरसिंह





Fullscreen 127 24 / 84




महाराजांना शोधूं लागले. त्यांनीं सर्व महाल पालथा घातला. पण महाराजांचा पत्ता लागला नाहीं.

चित्रसेनाला संशय आला कीं वीरसिंह महाराजांना शत्रु सैनिक किल्ल्याबाहेर तर घेऊन गेले नसतील. पण कांतिमती म्हणाली— "माझे बाबा किल्ल्यांतच आहेत. खालीं तळघरांत कोठेंतरी असण्याचा संभव आहे. तीन तीन चार चार सैनिक खालीं तळघरांत जाऊन पाहतील तर खात्रीनें शोध लागेल."

तिनें सांगितल्याप्रमाणें चित्रसेनाचे सैनिक मशाली पेटवून तळघरांत शिरले. तळघरांत इतका काळोख होता कीं, हाताला हात दिसणें शक्य नव्हतें. एका जागीं दोघां सैनिकांना एक अंधार कोठडी दिसली. कोठडीला एक जंगी कुलुप लागलेलें होतें. आंत जाणें शक्य नव्हतें. गजांतून आंत भिंतीला टेकून कोणी बसला असल्याचें मशालीच्या उजेडांत त्यांना दिसलें. त्याचा कण्हण्याचा आवाज देखील ऐकूं आला. तें पाहून दोघे सैनिक मोठ्यानें ओरडले— "वीरसिंह महाराज येथें या कोठडींत आहेत."

तो आवाज ऐकून चित्रसेन व कांतिमति त्या बाजूला आले. त्यांना देखील कोठडींत कोणीतरी कण्हण्याचा आवाज ऐकूं आला. जरा जास्त न्याहाळून पाहिल्यावर कांतिमतीनें आपल्या वडिलांना ओळखलें.

चित्रसेनानें कुलुप फोडायला सांगितल्या-वर सैनिक हतोड्यानें कुलुप फोडूं लागले. पण कुलुप फुटलें नाहीं. एक सैनिक म्हणाला— "नागवर्म्याच्या सैन्यांतील लोकांकडे कुलुप असेल !"

"किल्ली येईपर्यंत आपण सर्वांनीं येथें माशा मारीत बसावयाचें म्हणतोस !" चित्रसेनानें रागाच्या स्वरांत विचारलें.



कांतिमति म्हणाली— "उमाक्ष ! हें दार उघडणें किंवा कुलुप फोडणें तुम्हां राक्षसांना तेवढें कठीण नाहीं !"

एवढेंच ना !" असें ऐटींत म्हणत उमाक्ष आपलें सर्व बळ एकवटून कुलुप ओढून तोडूं लागला. परंतु तें जंगी कुलुप कांहीं फुटलें नाहीं. त्यानें दोन्ही हातांनीं ओढून पाहिलें, पण फुकट.

उमाक्षाला देखील उघडतां न आलेलें पाहून चित्रसेन जास्तच चकित झाला. कुलुप उघडल्याशिवाय वीरसिंह महाराजांना सुटका कशी मिळणार ! उमाक्षाची खटपट चालू होती. तो म्हणाला— "हा नागवर्मा व त्याचे अनुयायी तरी विचित्रच दिसतात ! वीरसिंह महाराजांसारख्या म्हाताऱ्या माणसाला ह्या जागीं बंद करण्याची काय गरज होती. लोखंडी गजांचें दार आणि हें जंगी कुलुप ह्यांची आवश्यकताच नव्हती. ह्या दरवाज्या-पेक्षां कुलुपच जास्त मजबूत आहे कीं काय असें मला वाटूं लागलें आहे." असें सांगून त्यानें कुलुप तोडण्याचा नाद सोडून दरवा-ज्याचे गजच वांकविले. आंत जायला छान रुंद वाट झाली. मशालींच्या उजेडांत भिंतींत मोठमोठे कडी कोयंडे व साखळ दंड होते.




त्या साखळदंडांनीं वीरसिंह महाराजांना आंत बांधून ठेवलें होतें. त्यांना बोलतां येऊं नये म्हणून त्यांचें तोंड एका कपड्यानें घट्ट बांधून ठेवलें होतें.

सर्व आंत कोठडींत गेले. आपल्या वडिलांना त्या स्थितींत पाहून कांतिमतीनें किंकाळीच फोडली व जमिनीवर बेशुद्ध होऊन पडली. चित्रसेनानें तिला आधार दिल्यावर ती पुन्हां उठून उभी राहिली व "बाबा !" म्हणून वडिलांकडे धांवली. चित्रसेनानें पुढें होऊन तोंडाला बांधलेलें फडकें सोडलें. उमाक्षानें चातुर्यानें साखळ





Fullscreen

127





26 / 84



दंड तोडून टाकले आणि वीरसिंह महाराजांना मुक्त केलें.

वीरसिंह महाराजांचा आपल्या डोळ्यावर विश्वासच बसेना. या जन्मीं त्या तुरुंगवासांतून सुटका मिळेल असें त्यांना वाटत नव्हतें. ते म्हणाले—"बाळ! मला स्वप्नांत देखील कल्पना नव्हती कीं, तुझी व माझी पुन्हां भेट होईल." असें म्हणत महाराज भिंतीच्या आधारें टेंकून पुन्हां बसले. त्यांना भोंवळ आल्यासारखें वाटलें. कित्येक दिवसांत पोटभर खायला मिळालें नव्हतें व कित्येक तास उलटून गेले तरी घोटभर पाणी देखील प्यायला मिळालें नव्हतें.

चित्रसेनानें आपल्या एका सैनिकाकडून पाणी मागवलें. एका उच्च आसनावर महाराजांना बसविण्यांत आलें. थोडें पाणी प्याल्यावर महाराजांना थोडी हुशारी वाटली व त्यांनीं विचारलें—"बाळ! ही मंडळी कोण! आणि तो बंडखोर नागवर्मा कोठे आहे! अजून जिवंत आहे कीं मारला गेला!"

कांतिमती काय उत्तर देणार. तिनें चित्रसेनाकडे पाहिलें. तेव्हां चित्रसेन म्हणाला—"महाराज, मी चित्रसेन! माझें नांव व राज्य या विषयीं आपण ऐकलेंच असेल. या राक्षसाचें नांव उग्राक्ष आहे. अंगापिंडानें जरी हा राक्षस असला तरी याचें हृदय देवासारखें दयाळु आहे. हा माझा सेवक आहे." उग्राक्षानें कृतज्ञतापूर्वक प्रथम चित्रसेनाला व नंतर वीरसिंह महाराजांना नमस्कार केला. चित्रसेन पुढें म्हणाला—"नागवर्मा माझ्या वडिलांचें धवलगिरीचें राज्य बळकावण्यासाठीं गेलेला आहे. त्याला शक्य तर वाटेंतच गांठून ठार करण्याचा हुकुम देऊन मी आपल्या विश्वस्त सेनापतीला पाठविलें आहे."

(पुढील गोष्ट पुढील अंकीं)





# देवांचा पक्षपात

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत काढून खांद्यावर घेतलें आणि स्मशानाच्या दिशेनें चालू लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तूं कोणत्या देवाला प्रसन्न करण्यासाठीं एवढा श्रम करीत आहेस हें मला माहीत नाहीं. अरे देव सुद्धां पक्षपात करतात. मनोभावें जे त्यांची उपासना करतात त्यांना देखील ते वर देत नाहींत आणि जे त्यांची पर्वा करीत नाहींत त्यांना दर्शन देऊन वर देखील देतात. तुला विक्रमतुंगाची गोष्ट माहीतच असेल. ऐक सांगतों." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

कधीं काळीं पाटलीपुत्र येथें विक्रमतुंग नांवाचा राजा राज्य करीत असे. तो जसा शूर व पराक्रमी होता तसाच दानी पण होता. एकदां राजा आपल्या नोकरां

वेतालाच्या गोष्टी

Fullscreen 127 28 / 84



चाकरांसह रानांत शिकारीला गेला असतां वाटेंत एका जागीं एक ब्राह्मण बिल्व होम करीत असलेला त्याला दिसला. "ब्राह्मण-श्रेष्ठ! आपण हा यज्ञ कां करीत आहां?" असें विचारावेंसें राजाला वाटलें. पण तो शिकारीच्या नादांत पुढें निघून गेला.

सायंकाळीं शिकार करून राजा राज-धानीकडे परतला. वाटेंत पुन्हां त्याला तो ब्राह्मण यज्ञ करीत असलेला दिसला. या खेपेस राजानें जवळ जाऊन ब्राह्मणाला आदर-पूर्वक नमस्कार करून विचारलें—"ब्राह्मण-प्रवर! हा यज्ञ करण्याचें कारण काय?"

ब्राह्मण म्हणाला—"महाराज! माझें नांव नागशर्मा आहे. मी अग्नीला बिल्वफळाची आहुती देऊन देवाची प्रार्थना करीत आहे कीं, देवा! मला सोन्याचें बिल्वफळ दे! कित्येक दिवसापासून मी मनोभावें अग्नि-नारायणाची आराधना करीत आहें. परंतु आज पावेतों देवाची कृपा माझ्यावर झाली नाहीं."

तें ऐकून राजा म्हणाला—"मला एक फळ देतां का? मी देखील प्रयत्न करून पाहतों."

ब्राह्मणाला आश्चर्य वाटलें. म्हणाला—"महाराज! देवाची आराधना म्हणजे कांहीं थट्टा वाटली का? अहो, मी भूक तहान विसरून सर्वसंग परित्याग करून कित्येक दिवसापासून आराधना करीत आहें. मला यश मिळालें नाहीं आणि आपण अजून पापकर्मांत गुरफटलेले आहां. शिकारीचा नाद सुटलेला नाहीं. नुसतें बेलफळ अर्पण केल्यानें का देव प्रसन्न होणार आपल्यावर?"

"मला तें सर्व कांहीं कळत नाहीं. मला एक फळ द्या. मी देखील नशिबाची परीक्षा करून पाहणार आहें." राजा म्हणाला.

ब्राह्मणानें राजाला वेड्यांत काढलें आणि स्मित करून एक बेलाचें फळ त्याला दिलें. राजानें तें फळ हातांत घेऊन श्रद्धा व भक्तिपूर्वक अग्निनारायणाला नमस्कार केला आणि म्हणाला—"देवा! एवढ्या फळावर तुला तृप्ति वाटत नसेल तर मी आपलें डोकें कापून त्याची आहुती देईन." असें म्हणत त्यानें बिल्व फळाची आहुती दिली आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे; लगेच होमकुंडातून अग्निनारायण बाहेर आले व त्यांनीं एक सोन्याचें बेलफळ राजाच्या हातांत दिलें. राजानें तें त्या ब्राह्मणाला दिलें व स्वतः पाटलीपुत्रास निघून गेला. ब्राह्मण चकित होऊन पहात उभा राहिला.

यानंतर कांहीं दिवसांनीं दत्तशर्मा नांवाच्या एका ब्राह्मण ब्रह्मचाऱ्यानें येऊन राजाला सांगितलें कीं, मी एका सिद्ध गुरूच्या प्रसादानें एक भस्म तयार केलें आहे. त्याच्या सहाय्यानें तांबें वितळवून त्याचें सोनें तयार करतां येतें. मी स्वतः हें डोळ्यांनीं गुरुजींना करीत असतां पाहिलें आहे. परंतु कां कोणास ठाऊक मला मात्र कितीदां प्रयत्न करूनहि यश मिळत नाहीं.



राजा म्हणाला—"बरें तर असें कर, तूं माझ्यासमोर एकदां प्रयोग करून पहा."

राजाच्या आज्ञेनें सैनिक थोडेंसें तांबें घेऊन आले. ब्रह्मचाऱ्यानें राजासमोर तें वितळवून त्यांत भस्म टाकलें. परंतु त्याचें सोनें झालें नाहीं.

सोनें न होण्याचें कारण ब्रह्मचाऱ्याला कळलें नाहीं. पण राजावर अग्निनारायणाची कृपा असल्या कारणानें त्याला मात्र सर्व कांहीं कळलें. ब्रह्मचाऱ्यानें जेव्हां भस्म वितळलेल्या तांब्यावर टाकलें तेव्हां एका यक्षानें येऊन अदृश्यपणें तें पळवून नेलें. भस्म तांब्यावर


Fullscreen

127





/ 84




पडलें देखील नाहीं. तें ओळखून राजानें ब्रह्मचाऱ्याकडून थोडें भस्म मागून घेतलें आणि तांबें वितळवून त्यावर तें टाकलें. या खेपेस यक्ष तेथें आला नाहीं. तांब्याचें सोनें झालें.

ब्रह्मचाऱ्यानें भस्म तयार करण्याची रीत राजाला समजावून सांगितली.

प्रत्युपकार म्हणून राजानें त्या ब्रह्मचाऱ्याचें लग्न करून दिलें व त्याच्या संसाराला लागणारें सर्व सामान पण दिलें. त्यानंतर राजानें सोन्याचा कारखानाच काढला. राज्यांतलें दारिद्र्य पार नाहींसें झालें.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें राजाला विचारलें—"राजा! अग्नि हा एक देव आहे. त्यानें असा पक्षपात कां करावा. आयुष्यभर मनोभावें ज्यानें उपासना केली त्याला सोन्याचें बेलफळ न देतां पापकर्मांत गुरफटलेल्या राजाला त्यानें तें फळ कां द्यावें? नंतर भस्म करण्याचा मंत्र राजालाच कां उपयोगी पडावा? या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिलीं नाहींस तर परिणाम माहीत आहे ना?"

त्यावर राजा म्हणाला—"देवाची पूजा अर्चा जे करतात त्यांच्या मनांत फक्त श्रद्धा व भक्ति भावना असून भागत नाहीं. मनाचा दृढनिश्चय देखील असावा लागतो. ब्राह्मण या विचारानें होम करीत होता कीं अग्निनारायण प्रसन्न होईल व मागीन तो वर देईल. या उलट राजानें प्राणपणानें देवाला भीड घातली. तो स्वतःचें डोकें अर्पण करावयास तयार झाला होता. म्हणून अग्निनारायणानें प्रत्यक्ष होऊन त्याला सोन्याचें फळ दिलें.

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ नाहींसा झाला व झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला. (कल्पित)





# चुकून देवाचें नांव

एका गांवीं चांदीमल नांवाचा एक वाणी रहात असे. तो अगदीं चिक्कू मारवाडी होता. धर्मकार्यासाठीं देखील तो एक दमडी खर्च करीत नसे. त्याच्या बायकोनें त्याला कितीदां समजावून सांगितलें कीं, व्यापार धंद्यांत पुष्कळदां खऱ्याचें खोटें करावें लागतें. देवाचें नांव घ्या. देवाचें नांव चुकून जरी तोंडांतून निघालें तरी देवाची कृपा झाल्या शिवाय राहणार नाहीं. पण चांदीमलनें कधीं तिच्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं.

एकदां गांवांतल्या लोकांनीं फंड गोळा करून एका कथेकऱ्याला बोलाविलें आणि त्याचें कीर्तन ठरविलें. गांवकरी चांदीमलकडे फंड मागायला गेले. तेव्हां तो म्हणाला—"मला या निरर्थक गोष्टींवर पैसे उधळणें पसंत नाहीं." गांवकरी निघून गेले.

त्या दिवशीं बायकोनें नवऱ्याच्या पाठीस लागून त्याला कीर्तनाला पाठविलें. म्हणाली—"तुम्हांला खिशांतली एक दिडकी देखील द्यायला मी सांगत नाहीं. पण या निमित्तें कानावर चार शब्द पडतील. चुकून जरी देवाचें नांव कानीं पडलें तरी त्याचें पुण्य लागतें. पदरचा खर्च नाहीं, आणि लाभ केवढा!"

त्या दिवशीं चांदीमल बायकोच्या आग्रहामुळें कीर्तनाला गेला. वडाच्या झाडाखालीं लोक जमा झाले होते. बसायला जागा देखील नव्हती. चांदीमल एका टोंकाला कोपऱ्यांत बसला होता. कथेकरी बुवा आपली वेशभूषा ठीकठाक करीत होते. चाळ बांधून तयार होत होते. गांवाच्या मुख्य अधिकाऱ्यानें श्रोत्यांच्याकडे पाहून विचारलें—"सर्व वडील मंडळी आली नाहीं का?"


Fullscreen
127



32 / 84


चांदीमलनें विचार केला, बायकोनें म्हटल्याप्रमाणें हा पहला शब्द आहे वाटतें.

इतक्यांत आणखी कांहीं लोक आले. ग्रामाधिकाऱ्यानें त्यांना "बसा बसा!" म्हटलें.

चांदीमलनें तोच दुसरा शब्द मानला.

गर्दी वाढूं लागली तेव्हां लोक उठून उभे राहूं लागले. तेव्हां ग्रामाधिकारी म्हणाले–"जाऊं नका! बुवा आले!"

चांदीमलला वाटलें, हाच तिसरा शब्द असावा.

इतक्यांत बुवापण आले व म्हणाले–"असली पळापळ बरी नाहीं देवाच्या दारीं!"

चांदीमलनें हा चवथा शब्द मानून तेथून पाय काढला आणि घरीं जाऊन झोंपला.

नवरा परत आल्याचें चांदीमलच्या बायकोला कळलें नाहीं. ती घरांतलें सर्व काम उरकून कथेला निघून गेली व घाईंत घराचें दार लावायला विसरून गेली. दोघां चोरांनीं तें पाहिलें व ती निघून गेल्यावर ते घरांत शिरले. चांदीमल झोंपेंतच बडबडला–"सर्व वडील मंडळी आली नाहींका?"

तें ऐकून चोर चपापले. घराचा मालक घरांतच आहे तर! ते एका बाजूला लपून बसले. तेवढ्यांत चांदीमल बडबडला–"बसा बसा!"

चोर घाबरून गेले, याची नजर सारखी आमच्यावरच आहे तर! त्यांनीं तेथून पाय काढण्याचें ठरविलें आणि एकेक करून उठूं लागले. त्याच वेळीं चांदीमल बडबडला–"जाऊं नका, जाऊं नका!" आतां मात्र चोरांनीं पळायलाच सुरवात केली. चांदीमल बडबडला—"असली पळापळ बरी नाहीं....!" चोरांच्या कानावर तेवढेच शब्द पडले.





# मुद्राराक्षस

पाटलीपुत्र ही मगध देशाची राजधानी होती. मगध साम्राज्याचा धचक भारतांतच नव्हें तर परदेशांतल्या बलाढ्य राष्ट्रांना वाटत असे. त्यावेळीं मगधच्या गादीवर नंद होता. त्याचा मंत्री राक्षस हा फार चाणाक्ष व स्वामिभक्त म्हणून प्रसिद्ध होता.

नंदाच्या पट्टराणीचें नांव सुनंदा असें होतें. त्याच्या शूद्र बायकोचें नांव मुरा होतें. दोघींपैकीं मुरालाच प्रथम मुलगा झाला. आईच्या नांवावरून त्याला मौर्य म्हणत. त्याला शंभर मुलें होतीं सुनंदाला नऊ मुलें झालीं. त्यांना नवनंद म्हणत.

वृद्ध झाल्यावर राजानें आपलें राज्य आपल्या मुलांना वांटून टाकायचें ठरविलें. त्यानें मुरेचा मुलगा मोठा असूनहि त्याला फक्त सेनापति केलें आणि नवनंदांपैकीं मोठ्याला राज्य द्यायचें ठरविलें.

मौर्याला वाटलें कीं, हा अन्याय आहे. एक तर तो मोठा होता. या शिवाय शूर व कर्तबगार होता. या उलट नवनंद मूर्ख व दुराचारी होता. प्रजेचें प्रेम मौर्यावरच जास्त होतें. मौर्यानें नवनंदांचें आपसांत भांडण लावून दिलें. मौर्य व त्याचीं मुलें मगध राज्याचे तुकडे करून टाकणार असें वाटूं लागलें. म्हणून नवनंद व त्याचा मंत्री राक्षस यांनीं मौर्य वंश निर्मूल करून टाकण्याचें ठरवून एक कट केला आणि मौर्य व त्याच्या सर्व कुटुंबियांस एका भुयारांत कोंडून ठेवलें.

या भुयारांत शंभर ताटें वाढून व शंभर दिवे लावून ठेवले होते. जर सर्व जेवले तर तें अन्न एक दिवस पुरेल इतकें होतें. ते दिवे देखील कांहीं तासच जळतील एवढेंच तेल त्यांत होतें. म्हणून मौर्यानें खूप विचार करून आपल्या सर्व मुलांना

Fullscreen 127 34 / 84



एकत्र केलें व त्यांना समजावून सांगितलें कीं त्यांनीं आपापल्या अन्नाचा परित्याग करावा व सर्वांत धाकटा जो चंद्रगुप्त त्याला सर्व अन्न देऊन टाकावयास सांगितलें. त्यानें चंद्रगुप्ताला समजावून सांगितलें कीं बाळ, तूं या अन्नावर तुला जितके दिवस जगतां येईल तितके दिवस जगण्याचा यत्न कर. नंतर त्यानें त्याच्या कडून भुयारांतून सुटका मिळाल्यावर नंदवंशाचा नाश करण्याची प्रतिज्ञा करवून घेतली.

कांहीं दिवस लोटले. वंग देशांतून कांहीं लोक एका पिंजऱ्यांत सिंहाची एक मूर्त ठेवून तो पिंजरा घेऊन आले. त्यांनीं राजाच्या दरबारांत येऊन आह्वान केलें कीं या सिंहाला कोणी पिंजऱ्याबाहेर काढून दाखवावें. पिंजऱ्याला एकहि दार नहतें. सिंहाला बाहेर कसें काढावयाचें कोणाला सुचलें नाहीं.

एक दरबारी म्हणाला—“मौर्यांचा मुलगा चंद्रगुप्त जिवंत असता तर त्यानें युक्ति करून त्याला बाहेर काढलें असतें. राजानें हुकूम केला कीं, जाऊन पाहून या, चंद्रगुप्त अजून जिवंत आहे कीं मेला. भुयाराचें दार उघडण्यांत आलें. आंत एकट्या चंद्रगुप्त-खेरीज सर्व मरून पडलेले राजाच्या शिपायांना दिसले. शिपायांनीं चंद्रगुप्ताला राजाच्या समोर हजर केलें. राजानें बोलावण्याचें कारण सांगितलें. चंद्रगुप्तानें सिंह लाखेचा केलेला आहे हें ओळखलें आणि एक लोखंडी गज तापवून सिंहाच्या अंगाला लावला. हळू हळू सर्व लाख वितळून बाहेर आली. सर्वांनीं चंद्रगुप्ताच्या चातुर्याची प्रशंसा केली.”

या होतकरू मुलाकडून कांहीं तरी उपयोगी काम पुढें मागें करवून घेतां येईल असा विचार करून नवनंदांनीं चंद्रगुप्ताला भोजनशाळेचा व्यवस्थापक म्हणून नेमलें.

अशा तऱ्हेनें चंद्रगुप्त जिवंत बाहेर आला. त्यानें आपल्या मृत पित्याचें व भावांचें श्राद्ध देखील केलें. त्यानें आपल्या मनांतील हेतू कधीं कोणाजवळ जाहीर बोलून दाखविला नाहीं.

एके दिवशीं चंद्रगुप्त नगराबाहेर गेला असतां त्याला एक ब्राह्मण तरुण भेटला. त्या तरुणाची वागणूक त्याला विचित्र वाटली. कारण तो पायांत बोचणारे कुशांकुर काढून ते जाळून त्याची राख पाण्यांत कालवून पीत होता.

चंद्रगुप्तानें जवळ जाऊन त्याला त्याचें कारण विचारलें.

“ते माझ्या पायांत बोंचत होते म्हणून मी त्यांना जाळून टाकीत आहें.” तरुण म्हणाला.

“पण त्यांची राख पाण्यांत कालवून पिण्याचें कारण समजलें नाहीं.” चंद्रगुप्तानें पुन्हां प्रश्न केला.

“मी तसें केलें नाहीं तर माझ्या क्रोधाग्नींत मीच भस्म होऊन जाईन.” तरुण म्हणाला.

चंद्रगुप्तानें विचार केला, अभिमानी दिसतो आहे हा तरुण. त्यानें त्याला त्याचें नांव विचारलें.



“माझें नांव विष्णुगुप्त. मला सर्व चाणक्य देखील म्हणतात. राजेमहाराजांच्या बरोबर जेवायला बसणाऱ्या ब्राह्मणांच्या पंक्तीला अग्रस्थानीं बसून जेवण्याच्या हेतूनें जात आहें. भोजनशाळेची व्यवस्था एका शूद्राकडे आहे असें मी ऐकतों. मी त्याला भेटायला जात आहें.” ब्राह्मण तरुण म्हणाला.

“मीच तो शूद्र आहें. ब्राह्मणवर!” चंद्रगुप्त म्हणाला.

नंदाच्या नातवाला शूद्रांत काढलेलें त्याला नाहीं आवडलें. थोडा वेळ विचार

Fullscreen 127








36 / 84

करून म्हणाला—"हूं!! माझ्या हातून होण्यासारखें कांहीं काम असेल तर सांग, मी करायला तयार आहें."

"आपण एकदां आमच्या घरीं येण्याची कृपा करावी, एवढीच विनंति आहे!" चंद्रगुप्त म्हणाला.

चाणक्य त्या प्रमाणें चंद्रगुप्ताच्या घरी गेला. नवनंदांनीं मौर्यवंश निर्मूल करण्यासाठीं केलेल्या कटाचें वर्णन करून चंद्रगुप्तानें हें देखील सांगितलें कीं, नंदवंशाचा नाश करण्यासाठीं मी आपल्या पित्याच्या व बंधूंच्या मृत देहांसमोर प्रतिज्ञा केली आहे.



चाणक्य भोजनशाळेंत जेवायला गेला. पूर्वेकडे नऊ पानें मांडलेलीं होतीं. त्यांच्या शेजारीं चांदीचीं भांडीं ठेवलेलीं होतीं. नवनंद तेथें जेवायला बसणार होते. त्याच्यासमोर आणखी एक पान मांडलेलें होतें व त्याच्या जवळ चांदीचें तांब्या भांडें ठेवलेलें होतें. ती जागा सर्वांत श्रेष्ठ अशा ब्राह्मणासाठीं ठरलेली होती. तें कळल्यावर चाणक्य त्याच पानावर जाऊन बसला. थोड्या वेळानें नवनंद आले व ब्राह्मण तरुणाला अग्रस्थानीं बसलेला पाहून त्यांनीं विचारलें—"हा कोण येथें बसला आहे? काढा बाहेर याला."

स्वाभिमानी चाणक्य म्हणाला—"कां? माझी परीक्षा घेऊन पहा पाहिजे तर! माझ्याहून अधिक योग्य कोणी दुसरा ठरला तर त्याला ही जागा द्यावी. माझी हरकत नाहीं."

नवनंदाला राग आला. त्यानें त्याची शेंडी धरली आणि "उठ! हो बाहेर!" असें म्हणत त्याला बाहेर ढकललें.

"तुझ्या रक्तानें माखली जाईपर्यंत मी आपली ही शेंडी बांधणार नाहीं." अशी प्रतिज्ञा करून चाणक्य निघून गेला.

गांवांत चाणक्याचा इंद्रशर्मा नांवाचा एक मित्र होता. त्याला अनेक गुप्त विद्या व सिद्धी


Fullscreen
127




38 / 84




प्राप्त होत्या. चाणक्य त्याच्याकडे गेला आणि म्हणाला—"मित्रा! तुला नंदाचा व त्याचा मंत्री राक्षस याचा मित्र म्हणून वागावें लागेल. एवढी मदत करशील का?" चाणक्यानें त्याला विचारलें. इंद्रशर्मानें तें कबूल केलें.

इंद्रशर्मानें वेष पालटून एक बौद्ध मांत्रिक म्हणून स्वत:चें नांव जीवसिद्धि म्हणून ठेवून घेतलें. त्यानें असें सांगायला सुरवात केली कीं, चाणक्य मंत्रशक्तिनें जे रोग उत्पन्न करतो ते मी मंत्रबळानें बरे करतो.

निश्चयी चाणक्याची प्रतिज्ञा ऐकून मंत्री राक्षसानें जास्त सावधगणा राखण्याचें ठर-विलें. जीवसिद्धीचें व चाणक्याचें पूर्वींच बोलणें झालेलें आहे हें न कळल्यामुळें त्यानें जीवसिद्धीला बोलावून चाणक्याची प्रतिज्ञा कशी हाणून पाडावयाची या साठीं मदत मागितली.

एक दिवशीं जीवसिद्धी नवनंदांना म्हणाला—"चंद्रगुप्ताला जवळ ठेवणें हें तुमच्या हिताचें नाहीं. म्हणून त्याला वर्ध-मान नगराच्या किरात राजाकडे पाठवून द्यावें." नवनंदांनीं त्याप्रमाणें चंद्रगुप्ताला पाठवून दिलें.

चंद्रगुप्तानें किरात राजाला आपलें सर्वस्व देऊन त्याला आपल्याकडे वळवून घेतलें.

पाटलीपुत्रापासून दूर पर्वत राज्यावर पर्वत नांवाच्या एका राजाचें राज्य होतें. चाणक्यानें त्याला आपल्या बाजूला वळवून घेतलें. पर्वत राजानें विचार केला, नवनंदांचा नाश करून प्रथम अर्धें राज्य पचनी पाडून घ्यावें व नंतर चंद्रगुप्ताचें सुद्धां राज्य बळकावून आपलें राज्य वाढवावें. ह्या हेतूनें त्यानें चाणक्याचा पक्ष घेण्याचें कबूल केलें होतें.

एका बाजूनें पर्वत राजा व चाणक्य यांच्या सैन्यानें व दुसऱ्या बाजूनें किरातराज व चंद्रगुप्त यांच्या सैन्यानें पाटलीपुत्रावर स्वारी केली. नवनंद त्या युद्धांत मारले गेले. मंत्री राक्षस चंद्रगुप्ताशीं युद्ध करण्यास गेला होता. चंद्रगुप्तानें त्याला सांगितलें कीं माझें अर्धें राज्य मला द्या. मी आपलें सैन्य घेऊन परत जातों. राक्षसानें चंद्र-गुप्ताचीच भ्रातृद्रोही म्हणून निंदा केली. त्याच वेळीं नवनंद रणभूमीवर मरण पावल्याची वार्ता पण त्याला कळाली. तें ऐकून तो नगरांत परतला.

नगरांत अराजकता पसरली होती. नागरिकांनीं नगराचें रक्षण करण्यास चाणक्या-जवळ विनंति केली. चाणक्य म्हणाला—"वृद्ध राजा नंद राजधानी सोडून रानांत निघून गेला तर मी नगराचें रक्षण करूं शकेन." राक्षसानें वृद्ध राजाला तसें करण्यास सल्ला दिला.

त्यानंतर राक्षस चंद्रगुप्ताकडे आला व म्हणाला—"आतां अर्धें राज्य तुझें व अर्धें पर्वत राजाचें मला पर्वतराजाकडे मंत्री म्हणून नोकरी करण्याची इच्छा नाहीं. मी तुझ्या पदरीं नोकरी करण्यास तयार आहें." चाणक्याच्या सल्ल्याप्रमाणें चंद्रगुप्तानें राक्ष-साला आपला मंत्री नेमलें.



परंतु चंद्रगुप्ताचा वध करून नंदवंशाचें राज्य पुन्हां स्थापन करण्याच्या हेतूनेंच राक्षसानें ही नोकरी पत्करली होती. वृद्ध नंदराजानें चंद्रगुप्ताकडे कांहीं विषारी फळें पाठविलीं. गुप्तचरांकडून ही गोष्ट चाण-क्याला कळली होती. म्हणून त्यानें तीं फळें वृद्ध राजाकडेच पाठविलीं. तीं खाऊन वृद्ध राजा मरण पावला.

राक्षसाच्या मनाला आपला डाव उलट-ल्याचें अर्थातच फार वाईट वाटलें. त्यानें पर्वतराजाशीं गुप्त संधी करून चंद्रगुप्ताचा वध करण्यासाठीं कारस्थान रचलें.

Fullscreen 127 40 / 84



बौद्ध मांत्रिकाच्या वेषांत चाणक्याचा मित्र जीवसिद्धी यानें राक्षसाशीं मैत्री पण केली होतीच. त्यानें आपल्या मंत्रबळानें एक विषकन्या निर्माण केली व तिला राक्षसास दाखवून म्हणाला—"हिचें आलिंगन जो करील तत्काळ त्याचा मृत्यु होईल व विषकन्या अदृश्य होऊन जाईल." त्यानें ही गोष्ट चाणक्याला प्रथमच येऊन सांगितली.

कांहीं दिवसांनंतर राक्षस चाणक्याकडे आला व म्हणाला—"एक सुंदर कन्या महाराज चंद्रगुप्तांना भेट म्हणून घेऊन आलों आहें."

चाणक्य त्या विषकन्येला बरोबर घेऊन दरबारांत गेला व त्यानें पर्वतराजानें केलेल्या मदतीबद्दल आपली कृतज्ञता म्हणून ती विषकन्या त्याला अर्पण केली. राक्षस हें सर्व डोळ्यासमोर पहात होता. पण त्याला तोंड उघडायला सुद्धां जागा नव्हती. दुसऱ्या दिवशीं पर्वतराजा मरण पावला व विषकन्या नाहींशी झाली.

आतां आपली पाळी आहे हें ओळखून राक्षसानें आपला मित्र चंदनदास याच्या घरीं आपल्या बायकामुलांना ठेवून राजधानींतून पाय काढला.

पर्वतराजाच्या मृत्यूस राक्षसच कारण झाला ही घोषणा राज्यभर करण्यांत आली. पण राजद्रोहाची शिक्षा भोगायला राक्षस राजधानींत नव्हता.

चाणक्यानें पर्वत राजाच्या मुलाला एका हेराकडून कळविलें कीं, चाणक्यानें तुझ्या बापाचा वध करविला आहे व तूं जर राजधानींत राहलास तर तुझ्या जिवाला देखील धोका आहे. तें ऐकून तो घाबरून स्वदेशीं पळून गेला.

राक्षसाला ही गोष्ट कळली. तो पर्वत राजाच्या मुलाकडे गेला व म्हणाला—



"चाणक्य व चंद्रगुप्त दोघांनीं मिळून कारस्थान करून प्रथम नवनंदाचा, नंतर वृद्ध नंद राजाचा व शेवटीं पर्वतराजाचा वध करून सर्व मगध साम्राज्य बळकावलें आहे. तूं पाटलीपुत्रावर स्वारी कर. मी तुझा मंत्री म्हणून तुझ्या मदतीस तयार आहें. पर्वतराजाचा अबोध मुलगा या गोष्टीस कबूल झाला."

राक्षस पळून गेला असला तरी त्याचे अनुयायी चंद्रगुप्ताचा वध करण्याच्या प्रयत्नांत होतेच. चंद्रगुप्त विजयी राजा म्हणून पाटलीपुत्र राजधानींत प्रवेश करण्यासाठीं येत असतां त्याच्या स्वागतासाठीं तोरणें वगैरे उभारण्यांत आलीं. दासवर्मा नांवाचा राक्षसाचा एक अनुयायी उत्तरेकडील द्वाराची सजावट करण्यांत विशेष मग्न पाहून चाणक्याला संशय आला. त्यानें चंद्रगुप्ताच्या हत्तीवर पर्वतराजाच्या भावाला बसवून त्याला पुढें पाठविलें. हत्ती त्या द्वाराखालीं आल्याबरोबर वरून एक शस्त्र माहुताच्या डोक्यावर पडलें व तो जागच्या जागीं गतप्राण झाला. रात्रीच्या गर्दींत अंधारींत कोण आहे हें न ओळखून दासवर्मानें चंद्रगुप्त समजून पर्वत राजाच्या भावाचा वध केला.



एका वैद्यानें चंद्रगुप्ताच्या औषधांत विष कालवून दिलें. चाणक्यानें तें औषध त्या वैद्यालाच प्यायला सांगितलें. वैद्य तत्काळ मरण पावला.

अशा प्रकारें चाणक्यानें राक्षसाचे सर्व बेत उलटून पाडले व चंद्रगुप्ताचें रक्षण केलें. चाणक्याचे हेर रात्रंदिवस कोठें काय घडत आहे याची माहिती काढून चाणक्याला कळवीत. एका हेरानें चंदनदासाच्या घरीं यमपुरीचा खेळ चालू असतां एका मुलाला पाहिलें. त्या मुलाला एक स्त्री उचलून घेऊन गेली. त्या वेळीं एक अंगठी खालीं

 Fullscreen     42 / 84 

पडली. ती उचलून त्या हेरानें ती चाणक्याला नेऊन दिली. ती अंगठी राक्षसाची मुद्रा होती. हें ओळखायला चाणक्याला वेळ लागला नाहीं. चाणक्यानें चंद्रगुप्ताचे शत्रु आणि राक्षस यांच्यांत फूट पाडून राक्षसाला चंद्रगुप्ताच्या बाजूला वळवून घेण्यासाठीं त्या मुद्रेचा उपयोग करून घेण्याचें ठरविलें.

त्यानें एक खोटें पत्र चंद्रगुप्ताच्या नांवीं लिहविलें व त्यावर राक्षसाची मुद्रा लावली. त्या पत्रांत चाणक्यानें राक्षसाच्या तोंडचे म्हणून असें लिहविलें होतें कीं, आपलें चाणक्याशीं वैर वाढत चाललें आहे. जर मला मंत्री म्हणून नेमलेंत तर मी चाणक्याचा कांटा बाजूला सारून आपली मनोभावें सेवा करीन.

हें पत्र चाणक्यानें चंद्रगुप्ताच्या कांहीं अनुयायांच्या हातीं पर्वत राजाच्या मुलाकडे पाठविलें. पत्र घेऊन जाणारे लोक पर्वत राजाच्या मुलाला म्हणाले—"आतां आम्ही चंद्रगुप्ताचे शत्रु आहों. आमच्या इतर सारथ्यांची चंद्रगुप्तानें कत्तल करविली. आम्ही मात्र जिवानिशी सुटलों आहों."

पर्वत राजानें तें पत्र वाचलें तेव्हां त्याला वाटलें कीं, राक्षस खरोखरीं चंद्रगुप्ताच्या पक्षांतलाच आहे. आपल्या वडिलांकडे विषकन्या पाठवून त्यानेंच त्यांचा वध करविला. आतां तो आपला मंत्री म्हणून आपला वध देखील करावयास मागें पुढें पाहणार नाहीं.

चाणक्याच्या या युक्तीमुळें राक्षसाचे सर्व बेत ढांसळले व त्याला स्वदेशीं परत यावें लागलें. चाणक्याच्या सांगण्यावरून चंद्रगुप्तानें त्याला आपल्या मंत्रीपदावर नेमलें. राक्षसाचें मन पालटलें. अशा तऱ्हेनें चाणक्याला शेवटीं यश मिळालें.





# डोळे उघडले

प्राचीन काळीं भाग्यवती नांवाची एक सुंदर नगरी होती. तेथें सौभाग्यवर्मा नांवाचा राजा राज्य असे. तो एक प्रजावत्सल राजा होता. प्रजा राजाला एक ईश्वरी अवतार मानीत असे.

अगदीं उतारवयीं त्याला एक मुलगा झाला. त्याचें नांव त्यानें सुंदर ठेवलें. तसा तो होताच सुंदर. उतारवयीं झालेला मुलगा, अर्थातच फार लाडका होता. बाप सर्व प्रकारें त्याचे लाड पुरवी. पण राजाला काळजी वाटूं लागली कीं, आपल्या मागें या मुलाचें शिक्षण कोण करणार व याला गादीवर कोण बसवणार? मी जिवंत असेपर्यंत याचा सर्व विद्याभ्यास झाला तर मी स्वतःच त्याचा राज्याभिषेक करून सुखानें डोळे मिटेन. पण जर का वर्षासहा महिन्यांतच देवाचें बोलावणें आलें तर या मुलाला राज्य मिळणें तर दूरच, त्याच्या जिवाला देखील धोका असण्याचा संभव आहे. युवराज लहान म्हणून मंत्र्याला राजाचा प्रतिनिधि म्हणून नेमावें लागेल. पण सौभाग्यवर्माचा मंत्र्यावर थोडा देखील विश्वास नव्हता.

त्याला भय वाटत होतें तसेंच झालें. सुंदर दहा वर्षांचाच होता आणि राजानें अंथरूण धरलें. औषधपाणी चालू होतें पण आराम पडण्याचीं चिन्हें दिसत नव्हतीं. आतां जगांत आपण चार आठ दिवसांचेच पाहुणे आहोंत हें ओळखून राजानें आपला स्वामीभक्त नोकर "बाबा!" याला जवळ बोलावून सुंदरचा हात त्याच्या हातांत दिला आणि म्हणाला—"बाबा! सुंदरचा बाबा या पुढें तूंच! याला राज्य मिळो वा न मिळो, याच्या जिवावर कांहीं संकट येऊं नये ह्याची काळजी वाळग. माझा मंत्र्यावर थोडा











देखील विश्वास नाहीं. नाइलाजानें मी मंत्र्यालाच राजाचा प्रतिनिधि म्हणून नेमणार आहे. पण तो सुंदर वयांत आल्यावर त्याला राज्य देईल कीं नाहीं कोण जाणें? त्याचा कांटा दूर करून टाकण्याचा प्रयत्न तो केल्याशिवाय राहणार नाहीं. तुझ्याहून जास्त जवळचा असा कोणी नाहीं. म्हणून सुंदरची सर्व जबाबदारी आतां तुझ्या-वरच. तूं त्याला अंतःपुराच्या बाहेर जाऊं देऊं नकोस म्हणजे झालें. मंत्री तुझ्या अधिकारांत हस्तक्षेप करणार नाहीं याची व्यवस्था मी करून जातों. राजकीय कामाशीं तुझा कांहीं संबंध नाहीं. सुंदर वयांत आल्यावर मंत्र्यानें स्वतः त्याचा राज्याभिषेक केला तर ठीकच, नाहींतर सुंदर स्वतःच्या हिंमतीवर आपलें राज्य मिळवील. नाहींतर राज्य घालवून बसेल. पण त्याची जबाबदारी तुझ्यावर नाहीं."

नंतर सौभाग्यवर्मानें आपल्या पंतप्रधानाला बोलावलें व म्हणाला—"प्रधान, मला देवाचें बोलावणें आलें आहे. माझा असा हा एकटा मुलगा आहे. पण तो अजून लहान आहे. तो वयांत येईपर्यंत राज्य कारभाराची सर्व जबाबदारी तुमच्यावरच. तो मोठा झाल्यावर त्याचा राज्याभिषेक करा व त्याचे पंतप्रधान म्हणून त्याला मदत करा. सुंदरच्या विद्याभ्यासाची जबाबदारी मी बाबावर टाकीत आहें. त्याला मी अंतःपुराचा अधिकारी नेमला आहे. सुंदरच्या विद्याभ्यासाची काळजी तुम्हांला करण्याचें कारण नाहीं."

पुढें कांहीं देवसांनीं सौभाग्यवर्माला देवाज्ञा झाली. सर्व प्रजा शोकसागरांत बुडून गेली. त्यांत पंतप्रधान फार अत्याचारी म्हणून प्रसिद्ध होता. म्हणून प्रजेला राजाचा विरह जास्तच भासला. पंतप्रधानानें राज्य सूत्रें हातीं घेतल्याबरोबर पुष्कळ फेरबदल केले. आपले लोक मोठ्या हुद्यांवर नेमले व जुने अधिकारी काढून टाकले. अत्याचारी प्रधानासमोर "ब्र" काढण्याची कोणाची छाती नव्हती.

अंतःपुरांत सुंदर बाबाच्या देखरेखी खालीं विद्याभ्यास व शस्त्रास्त्राचा अभ्यास करीत होता. बाबा त्याला एक क्षणभर देखील अंतःपुराच्या बाहेर जाऊं देत नसे. त्यानें कडक पाहारा ठेवला. सुंदरला जें ताट वाढून येत असे त्यांतला प्रत्येक पदार्थ प्रथम बाबा चाखून त्यांत विषबीष तर पडलेलें नाहीं या गोष्टीची खात्री करून घेऊन मग सुंदरकडे पाठवीत असे. बाबानें सुंदरला शिक्षण देण्यासाठीं चांगले शिक्षक नेमले. त्याच प्रमाणें सुंदरला चांगली संगत मिळावी या हेतूनें त्याच्याबरोबर विद्याभ्यास करणारीं मुलें पण निवडून आणून ठेवलीं. हीं मुलें रोज अंतःपुरांत येऊन सुंदर बरोबर विद्याभ्यास करीत. तीच काय ती त्याची मित्र मंडळी.

सात आठ वर्षें लोटलीं. सुंदर वयांत आला. पंतप्रधान राज्य प्रतिनिधि म्हणून कार्य करीत होते. त्यांनीं सुंदरला गादीवर बसविण्यासाठीं कांहीं प्रयत्न केला नाहीं. उलट त्याचा कांटा दूर करण्यासाठीं त्यांनी



गुप्तपणें मारेकरी नेमले. आपल्या जवळच्या अनुयायांना त्यांनीं असेंहि सांगितलें कीं, जो कोणी सुंदरचें डोकें कापून मला आणून देईल त्याला मी तो मागेल तें बक्षीस देईन.

पण त्याच्या प्रयत्नास यश आलें नाहीं. कारण बाबानें सुंदरच्या रक्षणाची फार काळजी बाळगली होती.

आणखी दोन वर्षें लोटलीं. पंतप्रधानानें बाबाच्या इच्छेविरुद्ध एका राजकन्येशीं युवराजांचें लग्न करून दिलें. बाबाला ह्यांत देखील पंतप्रधानांचा कांहीं तरी गुप्त हेतु








Fullscreen 127 46 / 84

दिसला. म्हणून त्यानें नवविवाहित दंपतीला कधीं एकांतांत राहूं दिलें नाहीं. नवरा बायको बाबासमोरच बसत उठत व बोलत. बायकोनें दिलेलें पान खायला देखील बाबाची परवानगी नव्हती. विवाहित सुंदरला ब्रह्मचारी म्हणून रहावें लागत होतें. अर्थातच सुंदरला व त्याच्या बायकोला बाबाची ही कडक नजर आवडली नाहीं. पण बाबानें त्याला लहानाचा मोठा केला व स्वत:चा जीव धोक्यांत घालून त्याचें रक्षण केलें होतें. म्हणून सुंदर बाबाच्या मनाविरुद्ध कांहीं बोलत अगर वागत नसे.

असाच आणखी कांहीं काळ लोटला. दिवसे दिवस सुंदरच्या राज्याभिषेकाची गोष्ट लांबणीवर पडत चालली होती. एवढेंच नव्हे तर राज्याभिषेक न होण्याची गोष्टच जणूं ठरली होती. यामुळें प्रजेंत असंतोष वाढत होता. बाबावर सुंदरच्या रक्षणाचा भार होता. त्याला राज्य मिळवून देण्याचा नव्हता. सुंदरच्या मनांत राज्य मिळविण्याची महत्वाकांक्षा पण अजून उत्पन्न झालेली नव्हती. कारण त्याला बाहेरच्या जगाची माहितीच नव्हती. आपल्या मित्र मंडळीं-बरोबर गप्पा मारीत बसण्यांत त्याला गंमत वाटे व त्यांतच त्याचा जास्त वेळ जात असे. एकदां सुंदर आपल्या मित्रमंडळींबरोबर अंत:पुराच्या गच्चींत गेला. तेथून सर्व राजधानी दिसत होती. त्याला पूर्वेकडे एक सुंदर राजवाडा दिसला. सुंदरनें सहज विचारलें—“ तें कोणाचें घर ? ”

एक मित्र म्हणाला—“ तें घर तुझें आहे. पण पंतप्रधान तें बळकावून बसले आहेत. तुझा राज्याभिषेक झाला व तूं राजा झालास म्हणजे राजवाडा रिकामा करून तुला द्यावा लागेल. म्हणून ते तुझ्या राज्याभिषेकाची गोष्टच काढीत नाहींत. ज्या सिंहासनावर तूं बसलें पाहिजेस त्यावर बसून ते राज्य करीत आहेत. आतां तुला कधीं तें सिंहासन मिळेल कीं नाहीं शंकाच. तुझा कांटा कसा तरी दूर करण्याच्या खटपटींत ते आहेत.”

इतर मित्रमंडळींनीं पण तेंच सांगितलें. सुंदरला आपल्या आयुष्याची चीड आली. आपलें राज्य तरी मिळवीन नाहीतर पंतप्रधानाशीं युद्ध करून स्वर्गलोकीं जाईन. पण आतां अंत:पुरांत राहणें अशक्य.

त्यानें आपल्या मित्र मंडळींना निरोप दिला व दुसऱ्या दिवशीं उजाडतांच यायला






Fullscreen
127




48 / 84




सांगितलें. म्हणाला—" आपण उद्यां राजधानी पहायला जाऊं."

सुंदरनें सकाळीं उठल्यावर बाबाला घोडे तयार करायला सांगितलें. म्हणाला—" आज मी आपल्या मित्र मंडळींबरोबर राजधानी पहायला जाणार आहें."

बाबाला युवराजाच्या वागणुकींत होत आलेला बदल कळल्याशिवाय राहाला नाहीं. आतां युवराज आपल्या मित्र मंडळींबरोबर स्वतःचें रक्षण करूं शकेल. युवराजाला पाहून प्रजा देखील खूष होईल. दरबारी लोकांस कळलें तर ते देखील युवराजांचा पक्ष घेतील असा विचार करून त्यानें आनंदानें घोडे तयार करविले.

युवराजाला आज जितका उत्साह व आनंद वाटला तितका संबंध आयुष्यांत वाटला नव्हता. कारण आज तो सर्व प्रथम उघड्या वातावरणांत आपल्या मित्रमंडळीं बरोबर मोकळेपणें फिरणार होता. बाबानें खुश्या दिलानें त्याला परवानगी दिली होती.

सुंदर राजधानींतल्या सर्व मोठमोठ्या रस्त्यांवरून हिंडत चालला होता. प्रत्येक नागरिक त्याला पाहून मुजरा करीत होते व युवराजांचा जयजयकार करीत होते.

सुंदरचा उत्साह वाढला.

सुंदर सरळ राजवाड्यांत गेला. तेथें पंतप्रधानांचा दरबार लागला होता. सिंहासनावर पंतप्रधान बसले होते. युवराजाला येत असलेला पाहून सर्व दरबारी उठून उभे राहाले व त्यांनीं युवराजांना लवून मुजरा केला. पंतप्रधान मात्र जागचे हलले देखील नाहींत. तें पाहून युवराजाला राग आला. माझ्या हक्काच्या सिंहासनावर बसून माझा असा अपमान! तो तसाच घरीं परतला!

मित्रमंडळी निघून गेल्यावर त्यानें विचार केला, प्रजा मला मान देत आहे, दरबारी पण मान देत आहेत. पण पंतप्रधानांविषयीं प्रजेच्या व दरबारी लोकांच्या मनांत किती आदर आहे हें कळायला कांहीं मार्ग नाहीं. तो कळला तर आपला पक्ष कीं प्रधानाचा कोणाचा जास्त बलिष्ठ आहे हें कळेल. म्हणून त्यानें वेष पालटून राजधानींत हिंडण्याचें ठरविलें. बाबा या गोष्टीस परवानगी देणार नाहीं हें त्याला माहीत होतें. म्हणून त्याला सांगितल्याशिवायच पाय काढावयाचा असें त्यानें ठरविलें.



त्या दिवशीं रात्रीं बाबा झोंपल्यावर सुंदरनें खिडकीवाटे बाहेर निघून जायचें ठरविलें. बायकोच्या खोलींत जाऊन पाहिलें तर खिडकी उघडी व खिडकीला दोरीची शिडी लागलेली. त्याच्या मनांत संशय आला कीं कांहीं तरी भानगड दिसते आहे. पण जास्त वेळ न घालवितां त्यानें त्याच खिडकी वाटे अंतःपुराच्या बाहेर पळ काढला.

गांवांत चहूकडे शांततेचें राज्य पसरलें होतें. रस्त्यावर चिटपाखरूं देखील नव्हतें. थोडें अंतर चालून गेल्यावर त्याला एका घरांत कोणीतरी बोलत असल्याचा भास झाला. त्यानें पडवींत बसून कानोसा घेतला. हे शब्द त्याच्या कानावर पडले—" काय करावें? महाराज होते तोंपर्यंत आपल्याला कसली काळजी नव्हती. त्यांना माणसाची पारख होती म्हणून आपल्याला कधीं गरीबी भासली नाहीं. पण गेलीं सात आठ वर्षें या प्रधानानें कसें सतावून सोडलें आहे प्रजेला. पुन्हां विचार केला कीं, युवराजांचा राज्याभिषेक झाला कीं, ही साडेसाती जाईल. पण त्याची उमेद पण आतां उरलेली नाहीं. युवराजाला हक्काचें राज्य मागण्याची पर्वा नाहीं व तो दुष्ट प्रधान स्वतः होऊन त्याला राज्य देईल असें वाटत नाहीं. आज दरबारांत त्यानें युवराजांचा


Fullscreen
127




50 / 84


अपमान केला. ते आले तरी उभा देखील राहूं नाहीं. आतां फार दिवस या राज्यांत आपला निभाव लागेल असें वाटत नाहीं. जावें निघून कोठेंतरी, झालें." तें एक ब्राह्मण कुटुंब होतें.

तें ऐकून युवराजाला असें वाटलें कीं, कोणीतरी शिसें वितळवून कानांत ओतीत आहे. "छे, आतां स्वस्थ बसून भागणार नाहीं. हात पाय हलविलेच पाहिजेत. या ब्राह्मण कुटुंबाची जी स्थिति तीच इतरांची, असा विचार करीत सुंदर तेथून निघून गेला. तो पूर्वेकडील द्वाराकडे जात असतां वाटेंत पाऊस पडूं लागला. म्हणून सुंदर शेजारच्या देवालयांत शिरला. तें गणपतीचें देऊळ होतें. सुरवातीला रिमझिम पाऊस सुरू झाला व थोड्या वेळानें मुसळधार पाऊस पडूं लागला. कोणीतरी दोघे देवळांत येत असलेले सुंदरला दिसले. तो चटदिशी गणपतीच्या मूर्तीमागें लपून बसला व तेथून ते काय बोलतात हें ऐकूं लागला.

ते दोघे धनगर होते. एक जण म्हणाला—"ऐकलेंस ना? युवराज आज पर्यंत कधीं अंतःपुराबाहेर पडले नाहींत आणि काल पडले तर सरळ त्या राक्षसाच्या दरबारांत जाऊन पोंचले. नशीब बलवत्तर म्हणून वांचले नाहीं तर प्रधानाच्या कोणी पित्त्यानें त्यांचें डोकें उडवून प्रधानाला अर्पण केलें असतें आणि इनाम मिळविलें असतें."

"अरे त्या दुष्टाचीं कारस्थानें दिवसे दिवस वाढतच चालली आहेत. स्वामीभक्त दरबारी व नोकर राज्य सोडून पळून जाऊं लागले आहेत. प्रजेचा वाली कोणी उरलेला नाहीं." दुसरा म्हणाला.

इतक्यांत दुरून एक गाडी येत असल्याचा आवाज ऐकूं आला. "तोच येत असावासा वाटतें. रोज स्वारी निघते हिंडायला. चल जाऊं या. पाऊस थांबला पहा!" दोघे धनगर निघून गेले.

सुंदर मूर्तीच्या मागून बाहेर आला. त्याला देखील गाडीची घरघर ऐकूं आली. तो रस्त्यावर येऊन बाजूला उभा राहिला. गाडी जवळून गेल्याबरोबर तो मागून धांवत जाऊन गाडीच्या मागें शिपाई उभे राहतात त्या जागीं जाऊन बसला आणि गाडींत बसून कोण काय बोलत आहे, हें ऐकूं लागला.

गाडींत पंतप्रधान व त्यांचे एक अमात्य बसले होते.





Fullscreen 127 52 / 84







"आपले सर्व लोक कोठें मरायला गेले होते, त्या वेळीं? राजधानी भर तो पोर हिंडत होता. कोणाला खंजीर काढून एक वार करण्याचें देखील सुचलें नाहीं. एका क्षणार्धांत कार्य सिद्ध झालें असतें." पंतप्रधानाचा तो आवाज असावा सुंदरनें विचार केला.

"महाराज! युवराज असे अचानक बाहेर येतील असें ध्यानीं मनीं सुद्धां आलें नाहीं कोणाच्या. याशिवाय त्यांची मित्र-मंडळी होतीं मागें पुढें व बावा तर अगदीं जवळून चालला होता." अमात्य म्हणाला.

पंतप्रधान कांहींच बोलला नाहीं. फक्त "हूं!" म्हणून स्वस्थ बसला.

अमात्य पुढें म्हणाला—"पण महाराज! त्या मुलाची तुम्हांला इतकी भीति बाळगण्याचें कारणच काय? ज्यानें दोन वर्षांत कधीं राज्य देखील मागितलें नाहीं त्याला तुमच्या राज्याची काय पर्वा असणार? त्याचा वध केल्यानें प्रजेंत असंतोष मात्र विनाकारण वाढेल. त्याला जागा देऊं नये."

"तुमचा हा अक्कलशून्यपणाच मला कळत नाहीं. तो जिवंत असे पर्यंत त्याची बाजू घेणारे लोक त्याला गादीवर बसविण्याची खटपट करतील. पण त्यांची आशेची दोरीच तुटली तर कोणाच्या आधारें ते बंड करतील?" त्याचें डोकें उडविणें हें आपलें पहिलें काम आहे असें समजा व ती जबाबदारी मी तुमच्यावरच टाकीत आहें. जर तुम्ही ही कामगिरी बजावली नाहींत तर त्याच्या ऐवजीं तुमचें डोकें उडालेंच समजा."

"मला एका आठवड्याचा अवधी द्यावा!" अमात्यानें विनंति केली.

त्या दोघांचें बोलणें ऐकून बावानें इतकी कडक नजर कां ठेवली होती हें सुंदरला कळलें.

[पुढल्या अंकीं संपूर्ण]





# विषारी फळ

एका देशांत रसार्णव नामक एक प्रख्यात वैद्य होता. त्याच्या हाताला चांगला गुण होता. रोग किती भयंकर असला तरी वैद्याचें औषध घेतल्याबरोबर तो बरा होत असे.

एकदां रसार्णव वैद्याच्या मनांत एक गोष्ट आली. आजपर्यंत या धंधांत जें यश मिळालें तें फक्त नशिबामुळें मिळत आलें आहे. सुदैवानें मुलाच्या हाताला पण चांगला गुण आहे. तो उपाशी मरणार नाहीं. पण नाडी परीक्षा त्याला तरी कोठें आहे? जर एखादा भयंकर रोग आला आणि औषधाला गुण पडला नाहीं तर आज पावेतों मिळविलेली कीर्ति नष्ट होईल. तेव्हां तपश्चर्या करून कांहीं तरी संजीवनी बूटी मिळविली पाहिजे." असा विचार करून रसार्णव मुलाला धंदा बघायला सांगून स्वतः रानांत तपश्चर्या करण्यासाठीं निघून गेला.

तीन वर्षें तपश्चर्या केल्यानंतर अश्विनी कुमार प्रसन्न झाले व त्यांनीं वर मागायला सांगितलें. रसार्णव म्हणाला—"देवा! तुझ्या कृपेनें मला आजपावेतों आपल्या धंधांत यश मिळत आलें आहे. पण मनांत सारखी-धास्ती राहून जाते कीं, जर एकदां जरी अपयश आलें तर आपल्या कीर्तीला कायमचा कलंक लागेल. म्हणून असें कांहीं तरी औषध द्यावें कीं कितीहि असाध्य रोग असला तरी हटकून गुण पडेल."

अश्विनी कुमारांनीं त्याला एक बीं दिलें आणि म्हणाले—"हें आपल्या दारासमोर लाव. याच्या झाडाच्या पानांचा रस कोणताहि रोग खात्रीनें बरा करील, याला एकच एक फळ लागेल. तें खाल्यानें मनुष्यास स्वर्गसुख मिळेल. पण निस्वार्थ भावनेनें फक्त परोपकारासाठींच या झाडाचा उपयोग

Fullscreen 127 54 / 84



कर. पैसे मिळविण्यासाठीं केलास तर या औषधाचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं." असें सांगून अश्विनीकुमार अदृश्य झाले.

रसार्णवाला अत्यंत आनंद झाला. त्यानें घरीं आल्यावर घरासमोरच्या अंगणांत तें बीं लावलें. हळूहळू मोड येऊन त्याचा एक मोठा वृक्ष झाला. त्या झाडाच्या टोंकाला एक सुंदर फळ लागलें.

त्या झाडाच्या पानांचा रस काढून रसार्णव चिकित्सा करूं लागला व त्याला द्विगुणित यश मिळत गेलें. त्याची ख्याती देशभर पसरली. त्याचा मुलगा सोमदत्त बापाच्या सांगण्याप्रमाणें त्या झाडाच्या पानांचा रस काढून प्रत्येक रोगाला औषध म्हणून देऊं लागला व त्याला सुद्धां ती विद्या अवगत झाली.

झाडाला जें लाल फळ होतें त्याच्या विषयीं कोणी विचारलें तर रसार्णव म्हणे तें फळ विषारी आहे. सोमदत्ताला देखील तेंच माहीत होतें.

रसार्णव वयोमानानें वृद्ध झाला व त्याला आतां हिंडणें फिरणें देखील अशक्यप्राय झालें. त्यानें एक दिवशीं आपल्या मुलाला जवळ बोलाविलें आणि म्हणाला—"बाळ, आतां मी लवकरच या जगाचा निरोप घेणार आहे. तुला आपल्या धंद्यांत चांगलें यश मिळालें आहे. आपल्या कुळाचें नांव आपल्या निस्वार्थ व निर्लोभ वृत्तीनें तूं कायम ठेव."

सोमदत्तानें विचारलें—"बाबा! या झाडाचा पालाच इतका गुणकारी आहे. पण त्याचें फळ मात्र विषारी कां? हें नाहीं मला कळलें."

रसार्णव म्हणाला—"तें सांगण्यासाठींच तर मी तुला बोलाविलें होतें. हें पहा, वैद्यक शास्त्राचा भेद सर्वांना कळतां कामा नये. आतां माझ्या मागें तूंच माझ्या ज्ञानाचा वारस आहेस. म्हणून तुला सांगतों. हें एक विषारी फळ आहे, हें मी सर्वांना सांगत आलों. पण तें खरोखरीं एक अमृत फळ आहे. जो खाईल त्याला अमरत्व लाभेल व दैवी शक्तींचा लाभ होईल. पण ही गोष्ट कोणाला—तुझ्या बायकोला देखील कळतां कामा नये."

सोमदत्त म्हणाला—"बाबा! तर मग तुम्हींच तें फळ कां नाहीं खाऊन अमरत्व मिळवीत! तुम्ही एवढ्या कष्टानें तपश्चर्या करून जें मिळविलेंत त्याचा उपभोग तुम्ही घेणार नाहीं तर दुसरा कोण घेणार?"

त्यावर रसार्णव म्हणाला—"बाळ! देवानें दिलेल्या आयुष्याची दोरी जेव्हां खुंटण्याची वेळ येते तेव्हां मनुष्यानें आनंदपूर्वक देवाघरीं जायला तयार झालें पाहिजे. अमरत्व मिळविण्याचा प्रयत्न मानवानें करणें म्हणजे त्या परमेश्वराचा अपमान करण्यासारखेंच नव्हे का? आणखी एक गोष्ट सांगून ठेवतों. या झाडाच्या पानांचा व फळाचा उपयोग जो स्वार्थासाठीं करील त्याला त्याचा लाभ मिळणार नाहीं. दुसरें म्हणजे फळ तोडल्यावर पानांच्या रसांतला




संजीवनी गुण नाहींसा होईल. ही गोष्ट तूं नेहमीं लक्षांत ठेव."

असें सांगून रसार्णवनें डोळे मिटले ते पुन्हां उघडले नाहींत. वडिलांच्या आज्ञाप्रमाणें सोमदत्तानें संजीवनी वृक्षाचें व त्याच्या अमृत फळाचें महत्व कोणाला सांगितलें नाहीं. वैद्यकशास्त्राचा अभ्यास करीत तोच धंदा करीत राहिला व प्रसिद्धी मिळविली. त्यानें देखील झाडाच्या टोंकाला असलेलें सुंदर फळ विषारी आहे हेंच सर्वांना सांगितलें.

* * *

Fullscreen 127     56 / 84 



सोमदत्ताची ख्याति देशोदेशीं पसरली. त्याची कीर्ति काशेय राजा गुणवर्मा याच्या कानापर्यंत पोंचली. गुणवर्मा पोटशूलानें कित्येक वर्षें अंथरुणाला खिळून होता. पुष्कळ औषध पाणी झालें पण गुण पडला नाहीं. म्हणून सोमदत्ताचें नांव ऐकून गुणवर्मा मंत्री व अमात्यांना बरोबर घेऊन सोमदत्ताकडे आला. गुणवर्माची एकुलती एक मुलगी पण बापाबरोबर आली होती.

गांवाबाहेर, एका उद्यानांत गुणवर्मा उतरला व त्यानें सोमदत्त वैद्याकडे निरोप पाठविला. गुणवर्मा राजाच्या विषयीं सोमदत्ताला प्रथमपासून सर्व माहिती होती. राजकन्येच्या रूपलावण्याविषयीं पण त्यानें ऐकलें होतें. म्हणून निरोप आल्याबर सोमदत्त आनंदानें निघाला. नेहमीच्या संवयीप्रमाणें तो झाडाचा पाला तोडून घेऊन जायला देखील विसरला. कारण त्यावेळीं राजकन्येचें काल्पनिक सुंदर रूप त्याच्या डोळ्यासमोर होतें.

राजानें वैद्याला आदरपूर्वक बसायला सांगून रोगाचें आद्योपान्त वर्णन सांगितलें व म्हणाला—“ तुम्ही मला बरा केलात तर तुम्ही मागाल ती दक्षिणा देईन.” सोमदत्त जणुं कांहीं त्याचीच वाट पहात होता. म्हणाला—“ आपला रोग बरा करणें तितकेंसें कठीण नाहीं. पण रोग बरा झाल्यावर आपण आपलें वचन पाळाल ?”

“ क्षत्रिय एकदां वचन देऊन मोडत नाहीं. तुम्ही मागाल तें तुम्हांला मिळेल.” गुणवर्मा म्हणाला.

तें शब्द ऐकतांच सोमदत्त म्हणाला—“ तर मग गुण पडल्यावर राजकन्येशीं माझा विवाह करून द्यावा.”

तें ऐकून राजा मंत्री व दरबारी थक झाले. वैद्य असें कांहीं विचित्र मागील स्वप्नीं देखील कोणाच्या मनांत आलें नाहीं. सोमदत्त एक तर काळाकुट्ट व कुरूप होता. त्याचें लग्न पण झालेलें होतें. तें ऐकून गुणवर्मा म्हणाला—“ वैद्य बुवा आपली इच्छा आम्ही पूर्ण करूं शकणार नाहीं. आपल्या औषधाची आम्हांला गरज नाहीं. मरण आलें तरी पत्करलें पण मुलीला विहिरींत ढकलायला मी तयार नाहीं.

सोमदत्त म्हणाला—“ महाराज ! कित्येक वर्षें आपण आजारानें पीडित आहां. एका क्षणार्धांत आपल्याला गुण पडेल, माझ्या औषधानें. आपण विचार करून निरोप पाठवावा. मी येतों.”

वैद्यबुवा निघून गेल्यावर राजकन्येनें आपल्या वडिलांना येऊन सांगितलें कीं, बाबा, तुमचे हे कष्ट माझ्यानें बघवत नाहींत. तुम्ही निरोप पाठवा वैद्याकडे. मी त्याच्याशीं लग्न करावयास तयार आहें. पण एक अट आहे माझी. ती पण त्या वैद्याला कळवा. त्यानें एका तासांत तुमचा रोग बरा केला नाहीं तर त्याला उद्यानाच्या फाटकासमोर आपला बळी द्यावा लागेल.”



त्या दिवशीं रात्रीं राजाज्ञेप्रमाणें मंत्री सोमदत्ताच्या घरीं गेला व त्यानें राजकुमारीनें जें कांहीं सांगितलें होतें तें जसेंच्या तसें सांगून टाकलें. तें ऐकून सोमदत्त म्हणाला—“ एका तासाचा अवधी देखील नको. राजाची आज्ञा असेल तर मी दोन मिनिटांत रोग बरा करून दाखवीन. तसें करूं शकलो नाहीं तर राजकन्येच्या इच्छेप्रमाणें स्वतःचा बळी द्यायला मी तयार आहें.”

सोमदत्ताची बायको आड उभी राहून सर्व ऐकत होती. तिला वाईट वाटलें. तिला नवऱ्यावर भयंकर राग आला. दांत ओठ चावून तिनें ह्यांत कांहीं तरी विघ्न आणतां आलें तर आणण्याचा विचार केला.


Fullscreen

127


58 / 84



दुसऱ्या दिवशीं सकाळीं सोमदत्त झाडाचा पाला घेऊन राजाकडे गेला. त्यानें त्याचा रस काढून राजाला दिला. पण गुण पडण्या-ऐवजीं पोटशूळ वाढला. तें पाहून मंत्री म्हणाला—"वैद्यबुवा! ठरल्याप्रमाणें आतां पुढल्या तयारीस लागा!"

सोमदत्त म्हणाला—"मी चुकून दुसऱ्याच झाडाचा पाला आणलेला दिसतो आहे. घरीं जाऊन संजीवनी वृक्षाचा पाला घेऊन येतों."

राजानें होकार दिल्यावर मंत्र्यानें वैद्याला जाऊं दिलें. पण बरोबर हत्यार बंद शिपाई पण पाठविले.

घरीं आल्याबरोबर सोमदत्तानें झाडाकडे पाहिलें. टोंकाला तें लाल अमृत फळ नव्हतें. कपाळावर हात मारून तो घरांत पाऊल टाकणार तेवढ्यांत त्याला एका ताडपत्रावर बायकोनें लिहिलेलें पत्र मिळालें—"मी तुमच्या मार्गांत कांटा होऊन राहण्या-पेक्षां तें झाडावरचें विषारी फळ खाऊन बाजूला झालें आहे."

सोमदत्त डोकें धरून बसला. शिपायांनीं त्याला धरून उद्यानाच्या फाटकासमोर नेऊन उभें केलें.

त्याच वेळीं आकाशवाणी झाली—"माझ्या पतीची ही चूक नाहीं. माझी आहे. त्यांना माफ करा." असें सांगून एक देवी प्रकट झाली व तिनें घडलेलें सर्व वृत्त वर्णन करून सांगितलें. नंतर तिनें एक मुळी शिपायां-समोर फेंकली व म्हणाली—"ही उगाळून राजाला द्या. राजाचा आजार बरा होईल." असें सांगून ती अदृश्य झाली.

त्या औषधाच्या सेवनानें राजाचा आजार बरा झाला. वैद्य लज्जित होऊन खिन्न मनानें घरीं निघून गेला.






एकदां नारद मुनि वाल्मीकि ऋषींच्या आश्रमांत आले. तो आश्रम तमसा नदीच्या काठीं होता. वाल्मीकि ऋषींनीं शास्त्रोक्त पादपूजा करून नारद मुनींना विचारलें—"महात्मन्! आपल्या या युगांत भूलोकीं सकल सद्गुण संपन्न व महा पराक्रमी असा कोणी महापुरुष आहे का!"

त्यावर नारद मुनींनीं रामकथा सविस्तर सांगितली. नारद मुनि निघून गेल्यावर मध्याह्न संध्येची वेळ झाली. म्हणून वाल्मीकि ऋषि आपला शिष्य भारद्वाज याला बरोबर घेऊन तमसा नदीवर स्नानाला निघून गेले.

तेथें एका झाडावर त्यांना क्रौंच पक्ष्याचें एक जोडपें आनंदानें विहार करीत असलेलें दिसलें. त्या जोडप्याचा प्रेमालाप चालू होता. तो पाहून व ऐकून वाल्मीकींना फार आनंद झाला.

आपलीं वल्कल वस्त्रें काठावर ठेवून मुनि स्नानासाठीं नदींत उतरले असतील इतक्यांत एका पक्ष्याची किंकाळी मुनींच्या कानावर पडली. वळून पाहतात तर त्या क्रौंच पक्ष्यांच्या जोडप्यापैकीं नर रक्तबंबाळ होऊन जमिनीवर तडफडत पडला होता व मादी झाडावर बसून केविलवाण्या स्वरांत ओरडत होती. तें करुण दृश्य पाहून वाल्मीकि मुनींचें कोमल हृदय कळवळून आलें. समोर व्याध आपला नेम अचूक लागला याबद्दल स्वतःचें कौतुक करीत उभा होता. वाल्मीकि


Fullscreen

127



60 / 84




मुनींना त्याचा फार राग आला. एकीकडे पक्ष्यावरची दया व दुसरीकडे व्याधावरचा क्रोध या दोन्ही भावनांच्या भरांत मुनींच्या तोंडून हा श्लोक निघाला :—

"मा निषाद प्रतिष्ठान्त्वम्,  
अगम शश्वती स्समाः ।  
यत्क्रौंच मिथुनादेकं  
अवधीः काममोहितम् ॥"

अर्थात् " निर्दयी ! दुष्टा ! प्रेममग्न क्रौंच पक्ष्यांच्या जोडप्यापैकीं एकाला ठार करून तूं फार दिवस सुखानें जीवनयापन करूं शकणार नाहींस."

वाल्मीकि मुनींच्या तोंडून हा श्लोक नकळत निघाला. त्यांना स्वतःलाच आश्चर्य वाटलें. त्या श्लोकांत दोन चरण व आठ आठ मात्रांवर यति होती. देवाच्या कृपे-शिवाय हा वाणीचा प्रसाद कोठून लाभणार ! शिष्य भारद्वाजाला तो श्लोक एकदां ऐकूनच कंठस्थ झाला.

वाल्मीकि मुनि स्नानादि आटोपून आपल्या आश्रमांत परतले. आश्रमांत आल्या-वर देखील त्यांच्या मनांत तोच श्लोक घोळत होता.

इतक्यांत ब्रह्मदेव प्रगट झाला. वाल्मीकि ऋषी साष्टांग नमस्कार करून म्हणाले— "ब्रह्मदेवा ! दर्शन देऊन या भक्तावर फार मोठी कृपा केलीस !"

ब्रह्मदेव म्हणाला—" वाल्मीकि ! माझ्या कृपेनेंच तुला कवित्वशक्ति लाभली आहे. तुला नारदाकडून रामकथा कळलीच आहे. मग आतां रामकथेवर एक महाकाव्य लिही. तें काव्य आचंद्रदिवाकरौ जगांत प्रसिद्धी प्राप्त करील." असें सांगून ब्रह्मदेव अदृश्य झाला.

अशा प्रकारें ब्रह्मदेवाच्या प्रोत्साहनामुळें वाल्मीकि मुनींनीं रामायणाची रचना केली.

* * *

वैवस्वत मनु हा सातवा मनु म्हणून प्रसिद्ध आहे. हा सूर्याचा मुलगा. याचा मुलगा ईक्ष्वाकु हा महाप्रतापी राजा होऊन गेला. म्हणून या कुळाचें नांव ईक्ष्वाकु सूर्यवंशी झालें. याच वंशांत सगर नांवाचा एक चक्रवर्ती राजा झाला. हा सहा प्रसिद्ध चक्रवर्तींपैकीं एक होता. ह्याचा नातु भगीरथ ह्यानेंच भूलोकावर गंगानदी आणली.

सूर्यवंशी क्षत्रिय कुळाचें राज्य कोशल देशांत होतें. अयोध्येला त्यांची राजधानी होती. वैवस्वत मनूनें स्वतः अयोध्या नगरी निर्माण केली. ही नगरी बारा योजन लांब व तीन योजन रुंद होती. राजधानीच्या चारी बाजूला किल्ला व खंदक होता. या वैभवशाली नगरींत सदा लक्ष्मीचा वास असे. शिल्पकार कलाकार वेद व वेदांग यांत पारंगत असे विद्वान पंडित राजधानींत रहात असत. प्रजा फार सुखी होती.

या दुर्भेद्य अशा नगरींत सूर्यवंशी राजा दशरथ याचें राज्य होतें. त्याचें ऐश्वर्य व वैभव इंद्र व कुबेर दोघांना लाजवील असें होतें. तो इतका पराक्रमी होता कीं, इंद्र देखील त्याला मदतीसाठीं युद्धाच्या वेळीं बोलावीत असे. न्याय, नीति



व शांति यांचें अयोध्या नगर हें जणूं आगरच होतें.

दृष्टि, जयन्त, विजय, सिद्धार्थ, अर्थसाधक अशोक, मंत्रपाल व सुमंत्र असे आठ अमात्य मंत्री राजा दशरथाच्या दरबारीं होते. वशिष्ठ मुनि हे कुलगुरु व राजगुरु पण होते. गुप्तचर राज्यभर हिंडून राज्यांत शांतता राखण्यासाठीं सतत प्रयत्न करीत असत.

दशरथ राजाला कोणत्याहि वस्तूची कमतरता म्हणून नव्हती. पण पुत्र अपत्य नसल्या कारणानें राजाचें मन दुःखी असे. त्यानें अश्वमेध (पुत्रकामेष्टी) यज्ञ करून

Fullscreen  127    62 / 84 

पाहण्याचें ठरविलें. आपला पंत अमात्य सुमंत्र यास पाठवून वशिष्ठ, वामदेव, जाबाली आदि ऋषी व मुनींना आदरपूर्वक बोलाविलें व त्यांचा सल्ला घेतला. सर्वांनीं पुत्रकामेष्टी यज्ञ करावा असा सल्ला दिला.

सर्व ऋषी व मुनि निघून गेल्यावर सुमंत्रानें राजाला सुचविलें कीं, महाराज ! हा पुत्रकामेष्टी यज्ञ करण्यास योग्य पुरोहित फक्त ऋष्यश्रृंग मुनि आहेत. त्यांची कीर्ति मी ऐकली आहे.

अंग देशाचा राजा रोमपाद दशरथाच्या मित्रवर्गांतील एक होता. रोमपाद एक अन्यायी व अत्याचारी राजा होता. त्याच्या राज्यांत एकदां दुष्काळ पडला. रोमपाद काळजींत पडला. त्यानें ब्राह्मणांना बोलावून दुष्काळ दूर करण्यासाठीं उपाय सुचविण्यास विनंति केली. त्यांनीं सल्ला दिला कीं, महाराज, विभंडक मुनींचा मुलगा ऋष्यश्रृंग हा ज्या देशांत राहतो त्या देशांत कधीं दुष्काळ पडत नाहीं. म्हणून आपण कांहींतरी उपाय करून त्याला आपल्या राज्यांत बोलावून आणावें त्याचा सर्व प्रकारें सत्कार करावा व आपली मुलगी शांता हिच्याशीं त्यांचा विवाह करून द्यावा.



ऋष्यश्रृंग ऋषि अंग देशांतच राहिले तर या देशांत चुकून सुद्धां दुष्काळ पडणार नाहीं."

तेव्हां रोमपाद राजा राजपुरोहित व आपल्या मंत्र्यांना बोलावून म्हणाला— "आपण सर्वांनीं जाऊन ऋष्यश्रृंग मुनींना आदरपूर्वक घेऊन यावें. त्यांना जें जें वचन देणें इष्ट वाटेल तें आमच्या वतीनें द्यावें."

तें ऐकून मंत्री व पुरोहित घाबरले. कारण ऋष्यश्रृंग मुनि कोणाच्या सांगण्यावरून तपोवनांतून राजधानींत येणें शक्य नव्हतें. रागाच्या भरांत त्यांनीं शाप दिला तर काय करावें ! म्हणून कांहींतरी युक्ति करूनच त्यांना समजूत घालणें शक्य होतें. पुरोहितांनीं रोमपादाला हा उपाय सुचविला—

"महाराज ! ऋष्यश्रृंग लहानपणापासूनच तपोवनांत राहून तप करीत आले आहेत. त्यांनीं कधींहि तरुण स्त्रीला पाहिलेलें नाहीं. म्हणून कांहीं अप्सरा किंवा वारांगनांना पाठवून त्यांच्या द्वारें ऋष्यश्रृंग मुनींचें मन वळतें का नाहीं तें पहावें. मुनींना राजधानींत लालूच दाखवून घेऊन येण्याची जबाबदारी त्याच पार पाडतील."




Fullscreen
127



64 / 84


रोमपादनें होकार दिल्यावर राजधानीं-तल्या सुंदरांत सुंदर अशा वेश्यांना सुंदर वस्त्रालंकार देऊन ऋष्यशृंग मुनींच्या आश्र-मांत पाठविण्यांत आलें. वेश्या आश्रमाबाहेर ऋष्यशृंग केव्हां येतो, वाट पहात उभ्या राहिल्या.

ऋष्यशृंग मुनि रात्रंदिवस आपल्या आश्रमांत आपल्या वृद्ध पित्याची मनोभावें सेवा करीत असत. कधीं आश्रमाबाहेर जात नसत.

पण कां कोणास ठाऊक, एकदां ते बाहेर आले. वेश्यांनीं त्यांना पाहिलें व नाचत गात ऋषींच्या जवळ गेल्या. त्यांचें सौंदर्य, वस्त्रालंकार, मधुर कंठ ऐकून ऋष्यशृंग चकित झाले व कुतूहलतेनें त्यांच्याकडे पाहूं लागले. नकळत त्यांचीं पावलें त्यांच्याकडे वळलीं. त्या स्त्रिया आहेत हें देखील मुनींना कळलें नाहीं.

वेश्यांनीं जवळ येऊन विचारलें—"ब्रह्मर्षि! आपण कोण? व एकटे या रानांत कां राहतां?"

ऋष्यशृंग मुनि म्हणाले—"मी विभंडक मुनींचा मुलगा आहें. तुम्ही आश्रमांत आलांत तर तुमचा यथायोग्य सत्कार होईल." तें ऐकून वेश्या खूष झाल्या व आश्रमांत गेल्या. ऋष्यशृंग मुनींनीं कंदमूळ फळें देऊन यथाप्रकारें आतिथ्य सत्कार केला.

जास्त वेळ राहल्यास विभंडक मुनींचा कोप होईल असा विचार करून वेश्यांनीं आश्रमांतून लवकरच पाय काढला. निरोप घेतांना त्यांनीं बरोबर आणलेले खाद्य पदार्थ ऋष्यशृंग मुनींना देत म्हटलें—"हा आमचा प्रेमोपहार घ्यावा. आतां आम्हांला देखील तपश्चर्या करावयास जावयाचें आहे."

त्या वेश्यांच्या सहवासांत थोडा वेळ का होईना ऋष्यशृंगाला बरें वाटलें. त्याला


Fullscreen
127



66 / 84

वाटलें ह्या सुद्धां तपश्चर्या करणाऱ्या ऋषि-मुनीच असतील. पण त्यानें पाहलेल्या ऋषि-मुनींच्या मानानें त्या त्याला जास्त आकर्षक भासल्या. त्यांना पुन्हां पुन्हां भेटावें, त्यांच्याशीं बोलावें असें त्याला वाटूं लागलें.

दुसऱ्या दिवशीं तो पुन्हां त्याच मार्गी त्या भेटतील असें समजून गेला. वेश्या वाट पहात आश्रमाबाहेर बसलेल्याच होत्या. ऋष्यशृंगाला येत असलेला पाहून आपला प्रयत्न यशस्वी झाला असें त्यांना वाटलें. त्या म्हणाल्या—"तुम्ही आमच्या आश्रांत कां नाहीं येत ! तुम्ही आल्यानें आमचा आश्रम पवित्र होईल व तुमच्या आतिथ्य सत्काराचा आम्हांला लाभ मिळेल." ऋष्यशृंग आनंदमग्न होऊन त्यांच्याबरोबर अंगदेशाच्या राजधानींत आला.

रोमपाद ऋष्यशृंग मुनीच्या दर्शनासाठीं आला. त्यानें त्यांना साष्टांग प्रणिपात केला. व अशा तऱ्हेनें राजधानींत बोलावून आणावें लागलें या बद्दल क्षमा मागितली. नंतर राजकन्या शांताशीं विधिपूर्वक विवाह करून दिला. त्या दिवसापासून ऋष्यशृंग मुनि शांताच्या सहवासांत सर्व सुखांचा उपभोग करीत अंगदेशांतच राहू लागले.

सुमंत्राच्या तोंडी येथवर गोष्ट ऐकून राजा दशरथाला आनंद झाला. वशिष्ठ ऋषींच्या आज्ञेनें तो आपल्या तिघां राण्यांसह अंगदेशांत आला. रोमपाद राजानें दशरथाचें सर्व प्रकारें स्वागत केलें. राजा दशरथ एक आठवडाभर रोमपाद राजाचा अतिथि म्हणून अंगदेशांत राहिला. नंतर रोमपाद राजानें आपले जांवई ऋष्यशृंग व कन्या शांता हिला अयोध्येला राजा दशरथा बरोबर पाठवून दिलें. राजा दशरथाचे दूत ऋष्यशृंग ऋषींच्या स्वागतासाठीं पुढें अयोध्येला निघून गेले.

[पुढें चालू]






पौर्णिमेचें दुधासारखें स्वच्छ चांदणें पडलें होतें. आजोबांनीं आराम खुर्चीत अंग टाकीत नाकांत तपकीर कोंबली व चारी बाजूला घोळका करून बसलेल्या मुलांकडे पहात हा श्लोक म्हटला :—

अज्ञा एव जनाः प्रायो
वंच्यन्ते वंचकै रभिः ।
प्राज्ञा नजातु वंच्यन्ते
सुमति श्चोल राजिव ॥

"याचा काय अर्थ आजोबा ? ह्याची कांहींतरी गोष्ट असणार सांगा ना आजोबा !" मुलांनीं ओरडा सुरू केला.

"अरे ! गोष्ट सांगण्यासाठींच तर मी श्लोक म्हटला. पण श्लोकाचा अर्थ सांगायला पहिल्यानें कां नाहीं सांगत ? जगांत सामान्यपणें फसवेगिरी करणारे किती ठक आहेत. पण हे ठक अज्ञान व अबोध लोकांनाच फसवतात. पण ह्या ठकांची डाळ हुशार व चतुर माणसाजवळ शिजत नाहीं. सुमति नांवाच्या चोळ राजानें अशीच एका ठकाची छान कान उघाडणी केली होती."

"सुमतीनें कोणत्या ठकाला व कसें फसविलें ? सांगा आजोबा." मुलें म्हणालीं.

आजोबांनीं गोष्ट सांगायला सुरवात केली.

चोळ राज्यांत सुमति नांवाचा राजा राज्य करीत असे. सुमति शब्दाचा अर्थच मुळीं बुद्धिमान, चतुर असा आहे. तो विद्वान व शूर होता. त्याच्या दरबारीं विद्वानांचा आदर होई. राजा गुणवान लोकांना इनाम देई. म्हणून थोर विद्वान, चित्रकार व शिल्पकार राजाकडे येत व आपल्या विद्येचें प्रदर्शन करून मोठमोठें इनाम मिळवीत.

"एकदां एका कारागिरानें येऊन राजाला सांगितलें कीं, मी एक रसायन शास्त्रज्ञ


Fullscreen 127



68 / 84


विद्वान आहें. मी वाटेल त्या धातूचें सोनें करून दाखवितो. ही आमची वंशपरंपरागत विद्या आहे. कांहीं तरी इनाम द्यावें."

राजानें त्याच्या बोलण्यावरूनच त्याला ओळखलें कीं, हा पहिल्या नंबरचा एक ठक असला पाहिजे. त्याचा या दरबारांत चांगला अपमान करूनच याला बाहेर काढलें पाहिजे. नाहींतर हा प्रजेला फंसवीत राज्यभर फिरेल.

राजानें आपल्या एका नोकराला जवळ बोलावून त्याच्या कानांत कांहीं तरी सांगितलें. नोकरानें एक मोठी लोखंडी पेटी आणून दरबारांत ठेवली. राजानें तिच्याकडे बोट दाखवीत म्हणाला—"ही पेटी तुला इनाम!" ठकाला ती घ्यायला सांगितली.

ठकाला वाटलें कीं या पेटींत राजानें सोनें, चांदी व हिरे माणकें ठेवलीं असतील. आनंदानें हंसत तो पुढें गेला व त्यानें ती पेटी उघडून पाहिली. पेटी रिकामी होती. ती पाहून तो राजाला म्हणाला—

"राजन! आपण विद्येचा आदर करतां असें समजून मी मोठ्या आशेनें आपल्या दरबारीं आलों. पण आपण ही रिकामी पेटी देऊन माझा अपमान केला आहे."

राजा म्हणाला—"तुझा मी अपमान केला? मला वाटलें कीं, तूं रोज इतकें सोनें करतोस. तें ठेवायला तुझ्याकडे पेटी नसेल म्हणून मी ही पेटी तुला इनाम द्यायला सांगितलें. वाटेल तो धातु सोनें करून दाखविणारास मी काय इनाम देऊं? तुझी बरोबरी करण्याची शक्ति माझ्यांत कोठून येणार?"

सर्व खदखदून जोरानें हंसले. तो ठक निरुत्तर होऊन मान खालीं करून दरबारांतून निघून गेला.





# ※ काळोखाचें भूत ※

फार प्राचीन काळीं हिमालय पर्वतांत एक आदिवासी लोकांची वस्ती होती. त्या जातीच्या लोकांना विस्तवाची अगर त्याचा उपयोग करण्याची देखील माहिती नव्हती. इतके असभ्य होते त्या जातीचे लोक. सूर्योदय झाला कीं, ते झोंपत व सूर्योदय झाल्यावर उठत. त्यामुळें काळोखांत कसें वावरावयाचें किंवा काळोख पडल्यावर दिवे लावून कसें काम करावयाचें याची देखील त्यांना माहिती किंवा कल्पना नव्हती.

या असभ्य लोकांच्या वस्ती जवळच एक गुहा होती. तींत त्या जातीचे लोक कधीं काळीं रहात असत, म्हणें. म्हणून ती गुहा त्यांना पवित्र वाटे. पण गुहेंत इतका काळोख होता कीं त्यांना त्या गुहेची भीति वाटे. काळोखाला ते भूत समजत असत. तें भूत पळवून लावण्याचा त्यांनीं अनेक प्रकारें प्रयत्न करून पाहिला. पण काळोखाचें भूत जागचें हललें देखील नाहीं.

एकदां एक जण म्हणाला—"आपण या भुताला साष्टांग नमस्कार घालून त्याच्याजवळ प्रार्थना करूं या कीं बाबा, तूं ही गुहा सोडून निघून जा! तो खात्रीनें जाईल." त्याप्रमाणें सर्वांनीं पाळी पाळीनें त्या भुताला साष्टांग प्रणिपात करून विनंति केली. पण गुहेंतला काळोख थोडा देखील कमी झाला नाहीं.

नंतर एक जण म्हणाला—"असल्या विनवण्या करून का हें भूत जाणार आहे? आपण सर्वांनीं मिळून याच्यावर शस्त्र प्रहार केला कीं हें पळून जाईल." त्याप्रमाणें त्यांनीं गुहेंत दगड धोंडे, बाण, भाला बरछी जें हातीं आलें तें सर्व मारून पाहिलें. पण काळोखानें पळण्याचें नांव देखील काढलें नाहीं. सर्व निराश झाले.


Fullscreen
127




70 / 84



तेव्हां आणखी एक जणानें सुचविलें आपण उपवास करून याला आळवलें तर कदाचित हा जाईल. त्याप्रमाणें सर्वांनीं उपास केला. पण काळोखानें आपलें ठाणें हलविलें नाहीं.

नंतर एकानें दानधर्म करून पहा म्हणून सुचविलें. त्या असभ्य जंगली लोकांनीं त्यांच्याकडे जी चीज वस्तु होती सर्व गुहेंत टाकली व काळोखाच्या भुताला जावयास सांगितलें. पण प्रार्थना, पराक्रम, उपास, दान तप सर्व उपाय व्यर्थ ठरले.

कांहीं दिवसांनीं तेथें एक सभ्य प्रदेशांतला एक मनुष्य आला. आदिम निवासी लोकांनीं त्याला त्या भुताला पळवून लावण्यास कांहीं तरी उपाय सुचविण्यास सांगितलें. त्यांनीं जे जे प्रयत्न केले होते त्याचें वर्णन देखील त्यांनीं केलें. सर्व कांहीं ऐकून तो म्हणाला—" हें भूत असें जाणार नाहीं. मी सांगतों तो उपाय करा. एक लांब बांबू तोडून आणा त्याच्या एका टोंकाला वाळकें गवत बांधा व त्यावर चरबी ओतून घेऊन या."

त्यांनीं त्याप्रमाणें केलें. सभ्य देशांतील त्या माणसानें दोन गारगोट्या एकीवर एक आपटून त्यांच्या ठिणग्यांनीं ती मशाल पेटविली व म्हणाला—" आतां ही मशाल घेऊन जा आंत. पहा भूत पळून जातें कीं नाहीं तें."

प्रथम कोणी त्याच्या बोलण्यावर विश्वास केला नव्हता. पण मशालीच्या लख-लखाटांत गुहेंतला सर्व भाग स्वच्छ दिसूं लागल्यावर त्यांना वाटलें कीं भूत खरोखरच पळून गेलें असावें.

आज्ञानाचें भूत पण मनुष्यास असेंच सतावून सोडतें. ज्ञानाची ज्योत लावूनच त्याला ज्ञानी लोक पळवून लावतात.





# बृहदीश्वराचें देवालय

एकाकाळीं तंजोर हें दक्षिणात्य संस्कृतिचें माहेरघर असें मानलें जात असे. १०-१४ व्या शतकांत येथें चोळ वंशी राजघराण्याची राजधानी होती. सुप्रसिद्ध राज राज चोळ यानें तजोर येथें बृहदीश्वराचें एक भव्य देवालय बांधलें.

अकराव्या शतकांत त्यानें हें देवालय बांधलें असावें. भारतातील मोठ्या व भव्य देवालयांपैकीं हें एक आहे. या देवालयांतील शिवलिंग फार मोठें आहे. त्याच्यासमोर एक दगडी विशालकाय नंदी आहे. आकृतीनें ह्याच्या बरोबरीचा दुसरा नंदी फक्त लेपाक्षी (अनंतपूर जिल्हा, आन्ध्र प्रदेश) येथें आहे, असें सांगतात. देवालयाचें मुख्य द्वार म्हणजे गोपूर २१६ फूट उंच आहे. हें कित्येक मैल दूर दिसतें. असें सांगतात कीं, मुख्य द्वारावर ८० टन वजनाचा एक दगड ठेवलेला आहे. इतका मोठा दगड उचलून ठेवणें सोपें नाहीं. म्हणून दगड वर नेण्यासाठीं चार मैल लांब असा रस्ता तयार करण्यात आला होता म्हणे.

या देवालयांत फक्त शैव संप्रदायाच्या मूर्तीच नसून वैष्णव व बौद्ध संप्रदायाच्या मूर्ती व शिल्प देखील पहावयास मिळतें. देवळाच्या विशाल प्रांगणांत व भिंतींवर सुंदर रंगीत चित्रें काढलेलीं आहेत. हीं चित्रें देखील चोळ राजांच्या कालांतीलच होत. हीं चित्रें भारतीय चित्रकारांनीच काढलेलीं असलीं तरी अजिंठ्याच्या चित्रकलेशीं बरोबरी




Fullscreen

127





12 / 82





# कावडीचा महिमा

हिमालय पर्वतांत मानसरोवराजवळच्या कुरणांत जवळपासच्या खेडेगांवांतील गाईगुरें चरायला जात असत. गुराखी सकाळीं व संध्याकाळीं गाई मोजीत तेव्हां गाईंची संख्या बरोबर असे. परंतु दुपारीं मोजून पाहिल्या तर एक गाय वाढलेली आढळून येई.

त्याचें कारण गुराख्यांना किंवा त्या गांवच्या लोकांना माहीत नव्हतें. रोज दुपारीं कामधेनु त्या कुरणांत चरायला येई व ती इतर गाई सारखीच दिसत असल्या कारणानें कळत नसे. परंतु कामधेनु केव्हां येते किंवा जाते हें मात्र कोणाच्या नजरेस आलें नव्हतें. मग दुपारच्या वेळीं एक गाय वाढते ती कामधेनूच आहे हें तरी कसें कोणाला कळणार ! सर्व म्हणत मोजतांना आपलीच चूक होत असेल.

त्याच गांवांत एक म्हातारा लाकूडफोड्या रहात असे. तो त्याच रानांत लाकडें तोडून ती एका कावडींत घालून घेऊन येत असे. तो तीं बाजारांत घेऊन जाई व विकून पैसे मिळवी. त्यावरच त्याचा उदरनिर्वाह फार कष्टानें चाले. तो व बायकामुलें मिळून सात-आठ पोटें या मिळकती वर किती दिवस चालणार !

एकदां म्हातारा आपली कावड घेऊन रानांत जात होता. वाटेंत गाई उभ्या होत्या. पुढें जायला वाट नव्हती. म्हणून आपल्या कावडीनें गाईंना बाजूला सारीत वाट काढीत तो पुढें जाऊं लागला. जात असतां नकळत कामधेनूच्या अंगाला त्याची कावड लागली व तिचे केस त्याच्या कावडींत अडकून राहून गेले. कारण कावड जुनी व जागोजागीं पिंजलेली होती. पण कामधेनूचे केस त्याच्या कावडींत राहून गेल्याची गोष्ट मात्र म्हाताऱ्याला कळली नाहीं.

त्या दिवशीं त्यानें नेहमीं प्रमाणें दोन्ही बाजूला लाकडें रचून कावड उचलली तेव्हां त्याला हें पाहून आश्चर्य वाटलें कीं कावड अगदीं हलकी आहे. म्हणून त्यानें आणखी लाकडें रचलीं. उचलून पाहिली तर वजन नाहीं. म्हाताऱ्याला जास्तच आश्चर्य वाटलें. त्याबरोबर त्याला आनंदपण वाटला कीं, आतां खूप लाकडें भरून न्यायला हरकत नाहीं. मिळकत वाढेल व मुलाबाळांचीं पोटें छान भरतील. त्यानें देवाला नमस्कार केला व डोक्यापर्यंत येतील इतकीं लाकडें रचून कावड उचलली व गांवाकडे निघाला.

त्या दिवशीं म्हाताऱ्याला इतकी मिळकत मिळाली कीं त्याच्या घरच्या सर्व लोकांचीं पोटें छान भरलीं व थोडे पैसे शिल्लकेंत देखील पडले.

त्या दिवसापासून म्हाताऱ्याचें आयुष्य सुखानें जाऊं लागलें. एक दिवशीं म्हातारा नित्याप्रमाणें लाकडें घेऊन जात होता. त्याला गांवच्या एका श्रीमंत गृहस्थानें दुरून पाहिलें व बोलावून विचारलें—" कायरे ! दिसायला तर तूं अगदीं अशक्त दिसतो




Fullscreen

127





14 / 82


आहेस. म्हातारा पण आहेस. मग इतकी लाकडें कशी का बरें उचलतोस ?"

लाकूडफोड्या हात जोडून म्हणाला– "मालक, त्यांत माझें काय मोठेंपण ? हा सर्व त्या कावडीचा महिमा आहे. वाटेल तेवढीं लाकडें रचलीं तरी फुलांच्या परडी सारखी हलकी वाटतात.

त्या श्रीमंत गृहस्थानें स्वत: कावड उचलून पाहिली. नुसत्या एका बोटानें लाकडें भरलेली कावड उचलली तरी ती उचलतां आली. तेव्हां कावडींत कांहीं महिमा आहे असें त्याला वाटलें.

थोडा वेळ विचार करून तो लाकूड-फोड्याला म्हणाला–"कायरे, ही कावड मला देतोस का ? तूं मागशील ती किंमत मी देईन." त्यानें विचार केला, प्यायचें पाणी भरणारे नोकर दहावीस खेपा घालतात. ही कावड घेतली तर एक नोकर दोघां तिघांचें काम करूं शकेल.

म्हातारा लाकूडफोड्या म्हणाला– "मालक ! बायका पोरांचें पोट भरतें आहे. म्हणून जरा विचार करतों."

"अरे त्यांत विचार कसला ? मी तुला तीनशें मोहरा देतों" तो श्रीमंत म्हणाला.

लाकूडफोड्या कबूल झाला. तीनशें मोहरा घेऊन त्यानें कावड दिली व घरीं निघून गेला.

कावड मळकट व जुनाट दिसली म्हणून त्या श्रीमंतानें ती धुवून साफ स्वच्छ केली. त्याबरोबर तिचा महिमा पण पार नाहींसा झाला. कामधेनूचे केस निघून गेले होते.

श्रीमंतानें म्हाताऱ्याला बोलावून विचारलें. तो म्हणाला–"मी कावड दिली तेव्हां तिच्यांत महिमा होता. आतां ही कावड घेऊन मी काय करूं ?" असें सांगून म्हातारा निघून गेला.





# स्यमंतकमणि

## सहावा अध्याय

पळत पाहुनी शतधन्व्याला
नाहिं सोडिलें कृष्णानें।
पाठलाग करण्याचें ठरवुनि
बोलविले बलरामानें ॥

दोघे भाऊ पाठी मागें
दिसले शतधन्व्या जेव्हां,
एकवटुनि बळ पळूं लागला
मूर्ख बिचारा तो तेव्हां ॥

नव्हति जिवाची आशा उरली
परंतु नव्हता अन्य उपाय।
धांपा टाकित होता घोडा
दमला होता करील काय।

हद्द द्वारकेची पण कशि तरि
ओलांडुनि तो गेला पार।
अंग टाकलें करुनि धन्याची
सेवा त्यानें घटका चार।

घोडा मेल्यावर तो पायीं
पळूं लागला घेउनि प्राण।
सहज गांठलें कृष्णानें त्या
नव्हता उरला शरिरीं त्राण ॥

पाहुनि जवळीं श्रीकृष्णाला
दगड लागला तो फेंकूं।
"शरण हरीला जा !" मन वदलें
आलें नाहीं पण ऐकूं ॥

कृष्णानें मग चक्र सुदर्शन
सोडुनि केला वध त्याचा।
डोकें उडलें धडचें वरतीं
दुःखद शेवट तो साचा ॥

मेला शतधन्वा पण मणि तो
दिसला नाहीं कृष्णाला।
सर्व तपासुन पाहलें तरी
मणि न मिळाला तो त्याला ॥


Fullscreen
127




18 / 82



निरोप ऐकुन अक्रुर आला
मुसळधार पाउस पडला।
कृष्ण जाउनी अक्रुराकडे
प्रेमें त्याला हें वदला–

"दादा संशय करून मजवर
निघून गेला रागानें।
मण्यासाठिं का असें करावें
क्रूर कर्म शतधन्व्यानें?

"वध करतांना हात कचरला
पण कर्तव्या सोडें कसें?
वळण लावण्या प्रजेस कधिं कधिं
करावेंच लागतें असें॥"

"सोडुन दिधला गुन्हेगार जर,
गुन्हे वाढतिल तिपटीनें।
मरतेवेळीं मजला सारें
सांगितलें शतधन्व्यानें॥"

लपवा लपवी करूं न शकला
अक्रुर कृष्णाच्या जवळीं
वदला–"चुकलों! घे हा मणि तो!"
ठेवुनिया पायांजवळीं॥

"सहाय्य केलें नाहीं म्हणुनी
केलें हें सारें त्यानें।
टाकुनि गेला पळतांना तो
घरांत माझ्या रागानें॥"

चकित जाहले सर्व ऐकुनी
आला कळतां तें बलराम।
कृष्णावरचा संशय गेला
झालें पुरतें सगळें काम॥

कथा स्यमंतक मण्याचि ऐकिल
भक्ती पूर्वक जो कोणी?
कधीं आळ त्यावरती खोटा
टाकेल आणूं का कोणी?

[ संपूर्ण ]






[ १० ]

[ चित्रसेन व उग्राक्ष दोघांनी आपापल्या सैन्यासह कपिलपूरचा किल्ला सर केला. कपिलपूरचा राजा वीरसिंह यास बंदीगृहांतून मुक्त केलें. वीरसिंहानें विचारलें, राजद्रोही नागवर्मा कोठें आहे? चित्रसेन म्हणाला, त्याच्या समाचारास सेनापतीला पाठविलें आहे. पुढें वाचा. ]

चित्रसेनाकडून सर्व वृत्त ऐकून वीरसिंहाला आश्चर्य वाटलें. त्यानें एकदां उग्राक्षाकडे व नंतर चित्रसेनाकडे पाहून विचारलें–"म्हणजे तुमचा दोघांचा परस्पर संबंध मालक आणि सेवक असा आहे तर! मी सुद्धां तें ऐकलें होतें. पण नागवर्मा माझ्या विरुद्ध कारस्थानें करूं लागला हें कळल्यावर देखील मी शेजारच्या मित्र राजवंशाची मदत घेतली नाहीं. कारण....आतां मी काय सांगूं!"

"होय महाराज! उग्राक्षाचा व्यवहार व बोलणें सुरवातीला असें कांहीं विचित्र होतें कीं, संशय वाटणें साहजिक होतें. राज-कन्येला देखील प्रथम तसाच संशय आला." चित्रसेन म्हणाला.

तें ऐकून कांतिमतीनें स्मित केलें. उग्राक्ष मात्र स्तब्ध उभा होता. तो टक लावून वीरसिंह महाराजांकडे पहात होता. वीरसिंह कांहीं तरी विचारांत गढलेला दिसला. थोड्या वेळानें त्यानें विचारलें–"मग काय

Fullscreen
127
20 / 82



उग्राक्ष! चित्रसेन महाराज जे म्हणाले तें सर्व खरें आहे तर!”

“चित्रसेन महाराजांनीं जें कांहीं सांगितलें तें सर्व खरें आहे. फक्त त्यांचें लग्न वेळेवर करून दिलें व त्यांची महाराणी आली कीं झालें काम!” उग्राक्ष म्हणाला.

तें ऐकून कांतिमती थोडी लाजली. वीरसिंह स्मित करून कांहींतरी बोलणार होता, इतक्यांत दोन सैनिक धांवत आले व धांपा टाकीत घाई घाईनें म्हणाले— “नागवर्मा सैन्य घेऊन किल्ल्यापासून फार जवळ येऊन पोंचला आहे.”

नागवर्माचें नांव ऐकून वीरसिंह व चित्रसेन दोघांना आश्चर्य वाटलें. म्हणजे नागवर्मा धवलगिरी काबीज करून परत येत आहे कीं, पराभव झाल्यामुळें पळून येत आहे! तो पळून परत आला असल्यास त्याचा सेनापति कोठें आहे! त्यानें त्याला वाटेंत कां नाहीं गांठलें! कांहीं असो किल्ल्याच्या रक्षणासाठीं कांहींतरी उपाय-योजना केलीच पाहिजे, चित्रसेनानें ठरविलें.

“उग्राक्ष! तूं आपलें सैन्य घेऊन किल्ल्याचें रक्षण कर. बुरुजावर तीर कमान घेऊन कांहीं सैनिकांना उभे करूं या. हो पण अमरपाल कोठें आहे!” चित्रसेननें विचारलें.

एका सैनिकानें पुढें येऊन उत्तर दिलें कीं, तो स्वतः पुढें जाऊन झाडींत लपून पाहून येणार आहे कीं, शत्रूचें सैन्य किती मोठें आहे.

“उग्राक्ष! तूं व तुझे सैनिक किल्ल्याच्या मुख्यद्वारांवर उभे....” चित्रसेन बोलतच होता, उग्राक्ष जोरानें हंसला. म्हणाला— “आतां किल्ल्याला द्वारच कोठें आहे! आणि तसें पाहिलें तर पहावें तिकडे तटाला द्वारेंच झालीं आहेत. आणि बुरूज म्हणशील तर दगडामातीचे मोठे ढीग होऊन पडले आहेत. किल्ला सर करण्यासाठीं आपण जो पराक्रम केला तो सर्व विसरलास वाटतें!” उग्राक्ष म्हणाला.

“खरेंच! मी तें सर्व विसरूनच गेलों! आतां शत्रूला आंत प्रवेश करणें अगदीं सोपें झालें आहे. नागवर्मा इतका लवकर येईल या गोष्टीची मला कल्पना देखील नव्हती.” चित्रसेन म्हणाला. सर्व मेहनत फुकट जाणार कीं काय असें वाटलें त्याला.

इतक्यांत अमरपाल धांवत धांवत आला व म्हणाला—“तो बंडखोर धवलगिरीच्या सैन्यासमोर टिकाव न लागल्यामुळें पळून येत आहे. त्याच्या बरोबर तसें मोठें सैन्य पण नाहीं. त्याचा पाठलाग करीत आणखी एक सैन्य येत आहे. तें बहुतेक आपले वडील तारकेश्वर महाराजांचें असावें. किंवा आपण सेनापतीबरोबर पाठविलेलें सैन्य असावें.”

अमरपाल बोलत असतां मध्येंच उग्राक्ष आनंदातिरेकानें इतका मोठ्यानें हंसला कीं सारा वाडा हादरला. चित्रसेनाला पण आनंद झाला. तो अमरपालला म्हणाला—“तूं सैन्य एकत्र कर आणि मी येई पर्यंत वाट पहा.



त्या बंडखोर नागवर्माला कळलें पाहिजे कीं, विश्वासघाताचें फळ काय मिळतें. त्याला आज यमसदनास पाठविल्याशिवाय मला चैन पडणार नाहीं.”

“मी एक सूचना करणार आहें!” उग्राक्ष म्हणाला.

“काय, बोल ना!” चित्रसेनानें विचारलें.

“नागवर्माला किल्ल्यांत शिरूं द्यावें. येऊं दे त्या चोराला आंत. नंतर चारी बाजूंनीं त्याच्यावर एकदम हल्ला करून सर्वांचा एकदम संहार करतां येईल.” उग्राक्षानें सूचना केली.

Fullscreen 127 22 / 82



“महाराज! उग्राक्षाची ही सूचना मला बरोबर दिसते आहे. स्वारी असें समजत असेल कीं किल्ला स्वसंरक्षणास उपयोगी पडेल म्हणून इकडेच येत असेल. पण किल्ला आपण सर केला आहे हें जर त्याला कळलें तर तो रानावनांत पळून जाईल व हातांत सांपडलेलें सावज निसटून जाईल.” अमरपाल म्हणाला.

चित्रसेननें विचार केला, उग्राक्षाची सूचना बरोबर दिसते आहे. अमरपालनें देखील दुजोरा दिल्यावर पुन्हां दुसरा विचार करण्याचें कारणच नाहीं. उग्राक्षाकडे वळून म्हणाला—“तुझी सूचना मान्य आहे. पण समज कांहीं लोक सरळ राजवाड्यांत शिरले तर! कारण तेथून त्यांना बाहेर काढणें अशक्य आहे.”

“तें माझ्यावर सोडून द्या महाराज! माझ्या राक्षस अनुयायांच्या शक्तीचा अंदाज अद्याप आपणांला लागलेला दिसत नाहीं. नागवर्माला नाहींसा केल्या शिवाय या प्रदेशांत शांतता नांदणें अशक्यच समजा. जर तो आज वांचला तर त्याच्याजवळ सैन्य असूं द्या अगर नसूं द्या त्याची डोकेदुखी सदा आपल्याला सहन करावी लागेल.” उग्राक्ष म्हणाला.

वीरसिंहानें सैनिकांकडे वळून म्हटलें—“जो कोणी नागवर्माला जिवंत पकडून माझ्या समोर हजर करील त्याला मी आपलें अर्धें राज्य देईन. जो त्याचें डोकें छाटून आणून दाखवील त्याला एक हजार मोहरा इनाम!”

“अर्धें राज्य!” म्हणत कांतिमतीनें एकदां आपल्या वडिलांकडे पाहिलें.

“होय अर्धें राज्य! त्या दुष्टानें बंड करून मला कैदेंत टाकलें व माझ्या प्रजेला सतावून सोडलें. माझें नशीब बलवत्तर व चित्रसेनचे उपकार म्हणून मी आज जिवंत बाहेर येऊं शकलों.” वीरसिंह म्हणाला.

“परंतु नागवर्माला हें कळतां कामा नये कीं किल्ल्यांत कोणी आहे. सर्व सैनिकांनीं जागोजागीं लपून बसावें आणि नागवर्मा किल्ल्यांत शिरल्यावर खूण होतांच चारी बाजूंनीं सर्वांनीं एकदम हल्ला करावा.” चित्रसेननें सुचविलें.

“महाराज ह्या कामाची जबाबदारी माझ्यावर व अमरपालवर! आपण निश्चिंत रहावें. आपण, वीरसिंह महाराज व राजकन्या तिघांनीं वाड्यांत बसून आमचा पराक्रम पहावा.” असें सांगून उग्राक्ष आपल्या अनुयायांकडे वळून म्हणाला—“चला रे माझ्या मागें!”

चित्रसेन व उग्राक्ष दोघांचे सैनिक वाड्यांत पडक्या तटामागें किंवा झाडाझाड जेथें ज्याला सोइस्कर वाटलें तेथें जाऊन लपून बसले.

तिकडे नागवर्मा किल्ल्याच्या तटाबाहेर येऊन पोंचला. घोड्यावर बसून त्यानें एकदां तटाकडे पाहिलें आणि बरोबर येणाऱ्या आपल्या एका साथी मित्राला म्हणाला—“करवीर! आपल्याला वाटलें होतें



तसेंच झालेलें दिसतें आहे. शत्रुसैन्य किल्ल्यांत शिरून तेथें जी लूटमार करतां आली ती करून निघून गेलेलें दिसतें आहे. किल्ला इतका मजबूत होता पण त्याची दशा पहा काय झाली आहे ती.”

हा करवीर अग्निद्वीपांतून स्वाश्रयार्थ पळून आलेल्या लोकांचा सरदार होता. तो आपल्या अनुयायांसह चित्रसेनचे वडील तारकेश्वर महाराज यांचे राज्य जिंकण्यासाठीं गेला होता. पण त्यांना यश आलें नाहीं आणि स्वतःचा बचाव करण्यासाठीं पळून जावें लागलें.












"महाराज! मला देखील तसेंच वाटतें. पण आपलें सैन्य कोठें गेलें? तें सर्व कापलें गेलें की काय? माझे अनुयायी व माझें भयंकर पक्ष्यांचें सैन्य ह्यां पैकीं कांहीं एक दिसत नाहीं. काय भानगड आहे समजत नाहीं." करवीर जास्त काळजींत पडला. कारण त्याचें बळ म्हणजे ते भयंकर पक्षी होते. त्यांच्या भरंवशावर तो तारकेश्वर वीरसिंह, चित्रसेन व उग्राक्ष सर्वांचें राज्य-गिळंकृत करणार होता.

"मला असें वाटतें आहे कीं, वीरसिंह व त्याची मुलगी कांतिमती ही शत्रुपक्षांत सामील झाली असावी. चित्रसेननें किल्ला सर करून कांतिमतीला सोडविलें असेल व तिचा बाप चित्रसेनाचे उपकार मानून तो सांगेल तें करायला तयार झाला असेल." नागवर्मा म्हणाला. थोड्या वेळानें तो पुढें म्हणाला—"आतां त्या सर्व गोष्टींचा विचार करावयास आपणांजवळ सवड नाहीं. प्रथम आत्मरक्षणासाठीं या किल्ल्यांत गेलेंच पाहिजे. तारकेश्वराचें सैन्य मागें येत आहे. समोरा-समोर त्याच्याशीं युद्ध करणें आपल्याला आतां तरी शक्य नाहीं."

नंतर नागवर्मा व करवीर दोघांनीं आपा-पल्या अनुयायांना किल्ल्यांत शिरायला सांगितलें आणि सर्व किल्ल्याच्या एका फाटकाजवळ येऊन दाखल झाले.

दोघांनीं आंत डोकावून पाहिलें. आंत चिटपाखरूं देखील नव्हतें. किल्ल्याच्या तटाला खिंडारें पडलेलीं होतीं. पण राजवाडा मात्र शाबूत होता. आंत कोणी असेलसें वाटलें नाहीं. पण नागवर्माला शंका आली. आपल्याला धोका तर होत नाहीं!

"धोका काय असणार! किल्ल्यांत जी चीज वस्तु, सोनें चांदी वगैरे मिळणें शक्य होतें तें घेऊन शत्रु पळून गेला असणार.

 Fullscreen  127     26 / 82  


बरोबर कांतिमती व वीरसिंह देखील गेलेले असणार. कारण त्यांना आपल्या हातून सुटका मिळवून घेणें अशक्य होतें. म्हणून आपण येण्यापूर्वीच चित्रसेनाबरोबर सर्व पळून गेलेले असणार." करवीर म्हणाला.

"हें सर्व कबूल! पण आपल्या सैन्यांतील एक सैनिक देखील दिसत नाहीं. एकाचें प्रेत तरी! तेंहि नाहीं. प्रेतें नाहींशी कशी होतील? उग्राक्ष व त्याचें राक्षसांचें सैन्य तर आलें नव्हतें मदतीला? तसें असेल तर मात्र सर्व शक्य आहे." नागवर्मा म्हणाला.

उग्राक्षाचें व त्याच्या राक्षस सैन्याचें नांव ऐकतांच करवीरचा धीर सुटला. कारण त्याचें खरें वैर उग्राक्षाशींच होतें. तो सूड उगवायला मागें पुढें पाहणार नाहीं हें तो ओळखून होता. करवीरनें नागवर्माच्या घोड्या शेजारीं आपला घोडा नेला व दडून त्याच्या कानांत सांगितलें—"महाराज! मला वाटतें आपण स्वतः किल्ल्यांत जाऊं नये. एक उपाय करावा."

"काय करावेंसें वाटतें तुला!" नागवर्मानें उत्सुकतेनें विचारलें.

"किल्ला इतका निर्जन व शांत पाहून मला जास्तच संशय येऊं लागला आहे. राक्षस आणि त्यांचा नायक उग्राक्ष आपली वाट पहात टपून बसले नसतील कशा-वरून! ते टपून बसले आहेत हें कळल्यावर तरी किल्ल्यांत शिरण्याव्यतिरिक्त दुसरा उपायच काय आहे? कारण बाहेरचें संकट त्याहून मोठें आहे. तारकेश्वरचें सैन्य अगदीं पाठीवर आहे. तरी प्रथम आपण आंत न जातां आपलें सैन्य पाठवूं या. आंत कांहीं हालचाल दिसली तर पुढील विचार पुढें करूं. हालचाल दिसली नाहीं तर किल्ल्यांत शिरायला कांहींच हरकत नाहीं.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]





#  मानभंग 

फार पूर्वी हिमालय पर्वतांतील एका प्रदेशांत एक राजा राज्य करीत असे. तो एक महा पराक्रमी राजा होता. त्या डोंगरी प्रदेशांत गरीब लोकच जास्त रहात असत. एक गरीब जादुगार त्याच प्रदेशांत रहात असे. तो जादूचे प्रयोग करून लोकांचें मनोरंजन करी. तो मांत्रिक साधासुधा नव्हता. खरोखरींच त्याच्या जवळ जादूचें दुर्मीळ असें कसब होतें. त्याच्या जादूच्या प्रभावानें गरिबांना वाटे कीं, ते राजवाड्यांत राहून राजभोग भोगीत आहेत. केव्हां केव्हां त्यांना वाटे कीं, ते नंदनवनांत विहार करीत आहेत. परंतु हा आनंद कांहीं वेळापुरताच अनुभवावयास मिळे.

जादुगाराची कीर्ति गांवोगांव पसरली व शेवटीं राजाच्या कानावर देखील जाऊन पोचली. म्हणून राजानें एके दिवशीं त्या जादुगाराकडे निरोप पाठवून त्याला आपल्या दरबारीं बोलाविलें व म्हणाला—"तूं आपले जादूचे प्रयोग दाखवून लोकांना चकित करून टाकतोस, म्हणें. एकदां मी स्वतः तुझे प्रयोग पाहणार आहें."

तें ऐकून जादूगार म्हणाला—"महाराज! माझी जादू व मंत्र सामान्य लोकांसाठीं आहेत. आपल्या सारख्या थोरां मोठ्यांच्या डोळ्यांत धूळ फेंकणें मला शक्य होईल का?"

"त्यांत काय? मला देखील तुझी ती जादू पाहायची आहे. मी सांगतों आहें, मग तुला संकोच करण्याचें कारण काय?" राजा म्हणाला.

"महाराज! आपली आज्ञा समजून मी आपली जादू दाखवायला तयार आहें. पण माझी एक अट आहे. माझ्या हातून चुकून महाराजांचा उपमर्द झाला तर महाराज मला









Fullscreen 127 28 / 82



शिक्षा करणार नाहींत असें अभयदान महाराजांनीं लिहून दिल्यास मी आपलें कसब दाखवावयास तयार आहें." जादुगारानें विनम्रपूर्वक विनंति केली.

राजानें, त्या प्रमाणें अभयदान दिल्याबरोबर राजाला राजवाड्याबाहेर लोकांची गर्दी जमल्यासारखा आवाज ऐकूं आला. घोड्यांचें खेंकाळणें ऐकूं आलें. राजानें खिडकींतून डोकावून पाहिलें तर पलीकडच्या उद्यानांत लोक गवत कापीत असलेले दिसले.

" माझ्या परवानगी शिवाय राजोद्यानांतून गवत कापायला हे कोण लोक आले आहेत. धरून आणा त्यांना. त्यांचे घोडे धरून माझ्या तबेल्यांत बांधून ठेवा." राजानें हुकूम सोडला.

शिपाई राजाच्या हुकमाप्रमाणें त्यांना धरायला धांवले तर तेथें त्यांना एक मोठें सैन्य तळ देऊन बसलेलें दिसलें. त्यांनीं तंबू ठोकले होते. एका मोठ्या शामियान्यांत एक सोन्याचें व एक चांदीचें सिंहासन होतें. राजाचे शिपाई तें सर्व दृश्य पाहून घाबरले. त्यांनीं पाणी भरणाऱ्या कांहीं भय्यांना जवळ जाऊन विचारलें–" हें कोणाचें सैन्य आहे आणि इकडे येण्याचें कारण काय ?"

"आम्ही पाताळ लोकांतले राहणारे ! हें आमचा राजा नागराज याचें सैन्य आहे. तें सोन्याचें सिंहासन आमच्या राजाचें आहे व चांदीचें आमच्या युवराजांचें." एक पाणी भरणारा भय्या म्हणाला.

शिपायांनीं राजवाड्यांत परत जाऊन त्यांनीं जें कांहीं पाहिलें व ऐकलें होतें राजाला जाऊन सांगितलें. राजानें चकित होऊन विचारलें–" कोण ! नागराजा आले आहेत ? तर मग चला त्यांच्या दर्शनास गेलें पाहिजे. माझें तें कुल दैवत आहे व माझी प्रजा तर त्याची नियमपूर्वक पूजा करते." असें सांगून राजा निरनिराळ्या प्रकारचे उपहार घेऊन निघाला.

राजा शामियान्याजवळ पोंचला तेव्हां नागराजा कनकसिंहासनावर बसले होते व युवराज रजतसिंहासनावर. राजानें पुढें येऊन वांकून नमस्कार केला व म्हणाला–" हे पाताळपति ! आपण कोणत्या कारणास्तव आपली पायधूळ झाडून आमच्या या गरीब राज्यास पवित्र केलें ?"

त्यावर नागराज म्हणाला–" मी आपल्या राजोद्यानांत एक झाड लावलें. खूप मेहनत करून मी तें वाढविलें. वाढतां वाढतां तें इतकें वाढलें कीं, तुझ्या या मर्त्यलोकांतच नव्हें, तर स्वर्गलोकांतहि त्या झाडाच्या शाखा प्रशाखा पसरल्या आहेत. त्यामुळें त्या झाडाचीं फळें मला मिळत नसून देवांना मिळत आहेत. देव सर्व फळें खाऊन टाकीत आहेत. त्यांनीं मला आज पावेतों एक फळ देखील दिलें नाहीं. मी त्याचा जाब विचारायला जात आहें. वाटेंत तुझ्या राज्यांत पडाव टाकला आहे, एवढेंच !"

तें ऐकून राजा फार खूष झाला. आपलें केवढें नशीब कीं, नागराजानें आपल्या



 Fullscreen  127      30 / 82 



राण्यांतच पडाव टाकण्याचें ठरविलें. राजानें विचार केला, नागराजानें आपल्याला अशा प्रकारें जो मान दिला त्याचा थोडा फार फायदा कां करून घेऊं नये? उघड म्हणाला—"महाराज! आपण दोघे राजा! आपल्याला एकुलते एक युवराज आहेत व मला एकुलती एक राजकन्या. दोघांचें लग्न झालें तर दोघं सुखी होतील."

नागराजानें होकार दिला व म्हणाला—"तर मग मी स्वर्गलोकाच्या मोहिमेवर जातांना युवराजाला आपणांकडे ठेवून जाऊं शकेन. कारण देवांनीं माझें म्हणणें ऐकलें नाहीं तर कदाचित युद्ध करावें लागेल. म्हणून मी येईपर्यंत युवराजानें आपणांकडे राहणेंच श्रेयस्कर."

असें सांगून युवराजाला मर्त्यलोकांत सोडून नागराजा स्वर्गलोकाकडे सैन्य घेऊन निघाला. राजा आपल्या होणाऱ्या जांवयाला बरोबर घेऊन राजवाड्यांत गेला.

कांहीं दिवसांनीं आकाशांत एक मोठें वादळ आल्यासारखें झालें. विजांच्या कड-कडाटाबरोबर पाऊस पडूं लागला आणि त्याच्या पाठोपाठ मुंडकीं, हात व पाय धडाधड जमिनीवर पडूं लागलीं.

इतक्यांत एक मुंडकें खालीं पडलें. तें हुबेहूब नागराजाच्या डोक्यासारखेंच होतें. राजानें आपल्या जांवयाच्या तें दृष्टीस पडूं नये म्हणून रानांतच त्या मुंडक्याचा दहन-विधि देखील उरकून घेतला.

नागराजाच्या मुलानें खिडकींतून बाहेर चिता जळत असलेली पाहिली व विचा-रलें कीं, ही कोणाची चिता? राजानें युवराजांना कळविल्याशिवाय दहनविधि उरकून घेण्याचें ठरविलें होतें. ही गोष्ट दासीला माहीत नव्हती. तिनें खरें तेंच सांगितलें.

Fullscreen 127 32 / 82

तें ऐकून युवराजाच्या मनाला इतका धक्का बसला कीं, त्यानें धांवत जाऊन चितेंत उडी टाकली. कोणी त्याला अडवूं शकला नाहीं.

कांहीं दिवसांनीं नागराजा स्वर्गाची मोहीम संपवून परत आला. राजा घाबरला, आतां कोणतें तोंड घेऊन जाऊं भेटायला? पण जावेंच लागलें.

नागराजा म्हणाला—"प्रथम देवेंद्र माझा भाग द्यायला कबूल होईना. पण बळी तो कान पिळी. शेवटीं कबूल झाला. बरें, युवराज नाहीं आले बरोबर?" नागराजानें विचारलें.

राजानें कांपऱ्या आवाजांत घडलेला वृत्तांत सांगितला. तो ऐकून नागराजाचें सर्व अंग रागानें थरथर कांपूं लागलें. म्हणाला—"तुझ्या भरंवश्यावर युवराजाला मी सोडून गेलों होतों आणि तूं असा घात केलास. त्याच्या शोधार्थ तुला देखील पाठवितों." असें सांगून नागराजानें तलवार उपसली.

राजानें नागराजाचे पाय धरून माफी मागितली. म्हणाला—"हे पाताळपति! हा मर्त्यलोकाचा राजा तुझ्या चरणीं शरण मागत आहे. जें माझें आहे तें सर्व तुझेंच आहे असें समज व शरणागताचें रक्षण कर!"

"अरे अरे हें काय? उठा उठा!" नागराज म्हणाला.

राजानें वर डोकें करून पाहिलें तर तेथें नागराज नव्हता कीं त्याचें सैन्य नव्हतें. दुसरें कोणी नव्हतें. फक्त जादुगार एका खडकावर बसलेला होता.

राजाला कळलें कीं, त्यानें जें कांहीं पाहिलें ती सर्व त्या जादुगाराची माया होती. त्याला त्या मानभंगाबद्दल भयंकर राग आला. परंतु तो वचनबद्ध होता. म्हणून कांहीं करूं शकला नाहीं.





# डोळे उघडले

[ २ ]

पंतप्रधानांची गाडी रात्रीं क्रीडोद्यानांत आली. हें क्रीडोद्यान राजधानीच्या बाहेर होतें, व एका सरोवराच्या मध्यभागीं होतें. त्या उद्यानांत जायला एक पूल होता. त्या उद्यानांत मध्यभागीं एक सुंदर क्रीडाभवन होतें. त्या रात्रीं क्रीडाभवन खूप सजविण्यांत आलें होतें. दिव्यांचा झकझकाट पाहून डोळे दिपून जात होते. क्रीडाभवनाच्या चारी बाजूला लताकुंज व मांडव होते. त्यामुळें तें स्थान अत्यंत रम्य दिसत होतें.

पंतप्रधानांची गाडी पूल पार करून क्रीडाभवनाच्या दिंडी दरवाज्यासमोर जाऊन उभी राहिली. सुंदर कोणाला नकळत गाडी आंत पोंचतांच उतरला व झाडींत लपून बसला. कांहीं तरुण स्त्रिया पंतप्रधानांना सामोऱ्या आल्या. एकहि पुरुष नव्हता. सुंदरला हें सर्व पाहून आश्चर्य वाटलें. त्याला आश्चर्य वाटण्याचें आणखी एक कारण होतें. क्रीडाभवनांत पाहऱ्यासाठीं पुरुष नव्हते, स्त्रियांचीच एक पलटण होती.

पंतप्रधान उतरल्याबरोबर त्यांच्या बरोबर आलेल्या अमात्यांना घेऊन गाडी परत गेली. पंतप्रधानांनीं क्रीडाभवनांत प्रवेश केला. दासींनीं दिवाणखान्यांत त्यांना बसायला सांगून प्यायला पेय आणून दिलें. नंतर पंतप्रधानांनीं आज्ञा केली कीं, महाराणीला मी आल्याची वर्दी करा. त्याप्रमाणें कांहीं स्त्रिया धांवत गेल्या. त्यांनीं एक सजवलेला मेणा उचलला व चालूं लागल्या. सुंदर झाडीआड त्यांच्या पाठीमागें गेला. क्रीडो-












बागांतल्याच एक सुंदर महालासमोर मेणा थांबला. एका दासीनें आंत जाऊन वर्दी दिल्यावर एक तरुण स्त्री बाहेर आली व मेण्यांत बसली. सुंदरचा स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास बसेना. ती त्याचीच बायको होती. पंतप्रधानानें बाबाच्या इच्छे विरुद्ध ज्या तरुण स्त्रीशीं त्याचें लग्न लावून दिलें होतें तीच ती स्त्री होती. सुंदरचें सर्व अंग रागानें थरथर कांपूं लागलें. पण घाई न करतां पुढें काय होतें हें पहात तो चुप राहिला.

मेणा क्रीडा भवनासमोर आल्याबरोबर पंतप्रधानानें पुढें येऊन त्या स्त्रीला आंत बोलावून नेलें. त्यांचें संभाषण ऐकण्याची उत्सुकता सुंदरच्या मनांत अर्थातच उद्भवली. सर्व दासी निघून गेल्या. फक्त दोघी तिघीच एका बाजूला जाऊन उभ्या राहिल्या. सुंदर त्यांच्या नजरेस पडल्याशिवाय क्रीडाभवनाच्या खिडकीजवळ झुडपाआड उभा राहून दोघांचें संभाषण ऐकूं लागला.

"आमचे दरबारी गाढव आहेत. एकाला देखील सुचलें नाहीं कीं, एका क्षणार्धांत सर्व काम फत्ते झालें असतें." पंत प्रधान म्हणाला.

"तो बावा! त्याची नजर सारखी माझ्यावर! आम्हां दोघांना कधीं भेटूं देईल तर. नाहींतर जेवतांना किंवा पेयाबरोबर विष देऊन मी कार्यसिद्धी करून घेतली असती." सुंदरची बायको म्हणाली. ती आणखी पुढें म्हणाली—"मला तर आतां कंटाळा आला आहे व भीति पण वाटूं लागली आहे. आज त्या दोरीच्या शिडी-वरून कोणीतरी उतरला असावा असा माझा अंदाज आहे. कारण शिडी नेहमीसारखी जागेवर नव्हती.

"आणखी एक आठवडा सबूर कर! आपल्या वाटेंतील कांटा दूर झालाच म्हणून समज." असें सांगून पंतप्रधान तिच्या बरोबर शयनगृहांत गेले.

दुष्टा! तूं या घातकी स्त्रीबरोबर माझें लग्न लावून दिलेंस? बाबा होता म्हणूनच मी वांचलों. त्याच्यावर मी रागावलों होतों, केवढी माझी चूक! असा विचार करीत सुंदर बराच वेळ जागच्या जागीं स्तब्ध उभा राहिला. त्याच वेळीं क्रीडाभवनाची एक खिडकी वाऱ्यानें उघडली व सुंदरवर दिव्याचा उजेड पडला. दुरून कोणीतरी त्याला पाहिलें. त्याच्या कानावर हे बायकी शब्द पडले—"पकडा त्याला. जिवंत सोडूं नका!" तो आवाज कानावर पडतांच सुंदर तेथून पळाला. कांहीं दासींनीं त्याचा पाठलाग केला. पण त्या जवळ पोंचण्यापूर्वीं सुंदर पुलावरून पलीकडे गेला होता.

"त्याला असा सोडून भागावयाचें नाहीं. घोडे घेऊन या व त्याचा पाठलाग करा!" सुंदरला एक पुरुषी आवाज ऐकूं आला. सुंदरनें मागें वळून देखील पाहिलें नाहीं. तो सरळ गांवांत एका पडक्या धर्मशाळेंत शिरला. तेथें कांहीं लोक घोरत पडले होते. त्यांच्या मध्येंच सुंदर देखील जाऊन झोंपला.



 Fullscreen  127      36 / 82 



पण त्याला झोंप कोठून येणार ? तो लपण्या-साठीं तर तेथें आला होता.

थोड्या वेळानें रस्त्यावर बडबडत कांहीं लोक जाऊं लागले. सुंदरनें कानोसा घेतला. त्याच्या कानावर हे शब्द पडले—"तो युवराज होता! सिंहासनाऐवजीं झुडपा-आड बसावें लागलें त्याला." सुंदर विचार करूं लागला, हात पाय हलवल्या शिवाय भागायचें नाहीं. ती बायको नाहीं नागीण आहे नागीण! कितीतरी लोक माझें डोकें उडवून इनाम मिळविण्याची आशा धरून बसले असतील. निरनिराळ्या प्रकारचे विचार त्याच्या मनांत घोळत होते. मग झोंप कोठून येणार ? आणि तो झोंपण्यासाठीं तेथें आलाच नव्हता.

इतक्यांत कोणीतरी घाईघाईनें आंत येत असल्याची चाहूल लागली. सुंदर डोळे मिटून स्तब्ध पडून राहला. त्याला हें पाहून आश्चर्य वाटलें कीं पावलांचा आवाज त्याच्या जवळ आल्याबरोबर थांबला. म्हणजे आप-ल्याला कोणी ओळखलें कीं काय ? आतां सुटका मिळणें अशक्य! तरी त्यानें देवाचें नांव मनांतल्या मनांत घेऊन डोळे उघडले. समोर उभा असलेला मनुष्य राजाचा शिपाई नव्हता. त्याचें शरीर पिळदार होतें. त्याच्या रंगा रूपावरून तो चोर किंवा डाकू असावा हें ओळखायला सुंदरला वेळ लागला नाहीं. तो खरोखरच एक अट्टल चोर होता. त्यानें राज्यभर फिरून मोठमोठ्या श्रीमंतांच्या घरचें सोनें व चांदी लुटून आपल्या गुहेंत एकत्र केलें होतें. तो चोरी करून येई तेव्हां चोरीचा माल एकट्यानें उचलून नेण्यासारखा नसला म्हणजे कुली करून घेत असे. तो एका कुलीच्या शोधार्थच तेथें आला होता.

धर्मशाळेंत काळोखच होता. पण त्यानें एक तऱ्हेचें अंजन डोळ्यांत घातलें होतें.



म्हणून त्याला काळोखांत देखील सर्व छान दिसत होतें. सुंदरचें पिळदार शरीर पाहून त्यानें आपल्या काठीनें उठायला सांगितलें व बरोबर यायला सांगितलें. सुंदर उभा राहिला.

"कोण तूं ! काय करतोस ?" चोरानें विचारलें.

"मी गरीब भिकारी आहें !" सुंदर म्हणाला.

"चल माझ्याबरोबर मी सांगेन तें काम केलेंस तर तुला मी पैसे देईन." डाकू म्हणाला.

"मला काळोखांत कांहीं दिसत नाहीं. मग काम काय होणार ?" सुंदरनें टाळाटाळ करण्यासाठीं उत्तर दिलें.

डाकूनें त्याच्या डोळ्याला थोडेंसें अंजन चोळलें. सुंदरला त्या काळोखांत देखील दिवसासारखें स्वच्छ दिसूं लागलें. तो चोरा-बरोबर निघाला. डाकू सरळ सुंदरच्या महालांत गेला. सुंदर गंमत पहात होता. कांहीं बोलला नाहीं. डाकू सहज आंत शिरला व त्याला आंत जें सोनें, चांदी हिरे माणिक्य व दागदागिने मिळाले, उचलून घेऊन आला. सर्व एका पोत्यांत घालून त्यानें सुंदरला उचलून घ्यायला सांगितलें.



दोघे डोंगराळ प्रदेशांत चालत चालत एका गुहेजवळ पोंचले. डाकूनें एक मंत्र म्हटल्याबरोबर दगडाचा दरवाजा उघडला. दोघे आंत गेले. दरवाजा जशाचा तसा बंद झाला. गुहेंत एक सुंदर महाल होता. त्यांत डाकू त्याची बायको व एकुलती एक मुलगी अशी तिघें रहात होतीं.

सुंदरला बाहेर वऱ्हांड्यांत उभा करून डाकू पोतें घेऊन आंत गेला

"आज माझ्या बरोबर जो कुली आला आहे तो रंगारूपानें आपल्या मुलीजोगता आहे!" डाकू आपल्या बायकोला म्हणाला.


Fullscreen
127





38 / 82




"एका कुलीला आम्ही आपली मुलगी देणार! इतरांना ठार केलेंस तसें याला देखील करून मोकळा हो!" बायकोनें नवऱ्याला सुचविलें.

आईवडिलांचें बोलणें आड उभी राहून मुलगी ऐकत होती. ती धांवत बाहेर वऱ्हांड्यांत आली. सुंदर तेथें होता. त्याला तिनें पाहिलें. त्याला पाहतांच त्याच्या रूपावर ती भाळून गेली. ती निस्संकोचपणें सुंदर जवळ आली व त्याला हात धरून ओढत दरवाज्यापर्यंत गेली. मंत्र म्हटल्याबरोबर दरवाजा उघडला. ती म्हणाली—"लवकर पाय काढ. एक क्षणभर देखील थांबलास तर आपल्या घरीं पोंचण्याऐवजीं यमाच्या घरीं पोंचशील."

सुंदर जास्त विचार करीत थांबला नाहीं. बाहेर आला व राजधानीकडे धांवत निघाला. विचार चालू होते, त्या मुलीचें रूप व उपकार आयुष्यभर विसरूं शकणार नाहीं.

पुष्कळ अंतर चालत गेल्यावर सुंदरला एक गांव दिसलें. अजून उजाडलें नव्हतें. खूप काळोख होता. सुंदरनें विचार केला, या गांवांत थोडा वेळ विश्रांति घेऊन मग पुढें जावें. सुंदर गांवांत गेला. एका घराच्या



ओसरींत येऊन बसला. पहाटे ३-४ वाजायचा सुमार होता. तरी घरांत जागाजाग झाली होती. इतक्या लवकर उठण्याचें काय बरें कारण असेल?

सुंदर विचार करीतच होता, तेवढ्यांत कांहीं भिक्षुक ब्राह्मण भस्म लावून व समिधा घेऊन येत असलेले त्याला दिसले. त्यानें त्यांना विचारलें—"गुरुजी! आज या घरीं विशेष असें काय आहे हो? हें कोणाचें घर?"

"हें घर दीक्षितांचें! तुला माहीत नाहीं का? काल ज्योतिष शास्त्रावरून कळलें कीं, आमच्या युवराजांवर एका सापानें दंश धरला आहे व तो आज त्यांना चावणार आहे. म्हणून दीक्षितांनीं ती आपत्ति टळावी म्हणून सर्पयज्ञ आरंभिला आहे. दीक्षितांचें उतारवय झालें आहे म्हणून त्यांनीं आम्हांला हा यज्ञ पुरा करण्यासाठीं बोलाविलें आहे. आमच्या युवराजांसाठीं आपल्या आयुष्याचा होम करायला देखील या गांवचे लोक तयार आहेत. कारण परलोकवासी महाराजांच्या मागें आम्हां सर्वांना आमचे एक युवराजच आधार राहिले आहेत." भटजी म्हणाले.

त्या निस्वार्थ ब्राह्मणांविषयीं सुंदरच्या मनांत आदर जास्तच वाढला. त्यानें त्यांना



विनम्रपणें विचारलें—"मी आंत येऊन आपला यज्ञ पाहिला तर चालेल का?"

"ये बाळ खुशाल पहा! गांवच्या लोकांना बोलावून थाटामाटानें हा यज्ञ करायला हवा होता. पण तो बसला आहे ना विघ्नसंतोषी, पंतप्रधान!" भटजी म्हणाले.

तें सर्व ऐकून सुंदरला आनंद झाला. प्रजेच्या हृदयांत आपल्या विषयीं इतकी कळकळ असतां आपण कोणाला भिण्याचें कारण काय! आपण आपली जबाबदारी ओळखून आपलें राज्य परत मिळविलें पाहिजे. आजपर्यंत बेजबाबदारपणानें वागलों तें पुरें

 Fullscreen  127      40 / 82 




झालें. बाबा होता म्हणून आपलें रक्षण झालें त्याच्या उपकारांबद्दल उतराई होणें या आयुष्यांत तर शक्य नाहीं.

आंत यज्ञाची सर्व तयारी पुरी झाल्यावर यज्ञ सुरू झाला. तूप, समिधा व इतर पदार्थांची आहुती चालू होती. भिक्षुक सुरांत वेद मंत्राचा उच्चार करीत होते.

एकाएकीं छप्परांतून सुंदरच्या डोक्यावर कांहींतरी पडलें व तेथून होमकुंडांत जाऊन पडलें. तो एक नागसाप होता.

होम संपला. सर्व चकित होऊन सुंदरकडे पाहूं लागले. तर मग आपले युवराज हेच म्हणावयाचे. सर्व परस्परांचीं तोंडें पाहूं लागले. जोशीबुवा उठून बाहेर गेले व आकाशाकडे पाहून आंत आले व म्हणाले—"युवराजांवरील संकट टळलें आहे."

दीक्षितांनीं पुढें येऊन सुंदरच्या पाठीवर प्रेमानें हात फिरवीत विचारलें—"बाळ ! मग आमचा लाडका युवराज तूंच का ? कांहीं भिण्याचें कारण नाहीं."

सुंदरनें सर्वांना नमस्कार केला व म्हणाला—"मी आपला युवराज असूनहि आपणासाठीं कांहीं करूं शकलों नाहीं याबद्दल मी आपली दिलगिरी व्यक्त करतों. आपण सर्वांनीं मला पाहिलें देखील नाहीं. पण किती निस्वार्थबुद्धीनें माझ्या हितासाठीं व रक्षणासाठीं स्वतःचा जीव धोक्यांत घालून हा यज्ञ आरंभ केला. आपण सर्व मला वडिलांसारखे आहां. आपल्या आज्ञेप्रमाणें करायला मी तयार आहें."

"शीघ्रमेव राज्य प्राप्तिरस्तु !" असा सर्व ब्राह्मणांनीं एक मुखानें आशीर्वाद दिला.

ब्राह्मणांचा आशीर्वाद घेऊन सुंदर आपल्या महालांत पोंचला. तोंपर्यंत प्रातःकाल झाला होता. बाबा उठला होता व सुंदर आपल्या महालांत नाहीं हें पाहून फार काळजींत पडला होता. त्या शिवाय महालांत चोरी देखील झालेली पाहून बाबाला फारच आश्चर्य वाटलें. पंतप्रधानांशिवाय या सर्वाला कोण जबाबदार असणार ? बाबा याच विचारांत असतां सुंदर परत आलेला पाहून त्याच्या जिवांत जीव आला.

त्यानें विचारलें—"बाळ ! मला विचारल्याशिवाय तूं रात्रीं कोठें निघून गेला होतास ?"

"तें मी मागाहून सांगेन ! प्रथम जाऊन पंत अमात्यांना मी बोलाविलें आहे, असा माझा निरोप जाऊन सांग." सुंदर म्हणाला.

बाबाला आश्चर्यच वाटलें. त्यानें निरोप सांगितला व त्याहून आश्चर्य म्हणजे पंत अमात्य निरोप ऐकून तावडतोब आले. "युवराजांनीं निरोप पाठविला होता ?" अमात्यांनीं नम्रता दाखवीत विचारलें.

"काल रात्रीं पंतप्रधानांना आपण वचन दिलें होतें ना कीं, एका आठवड्याच्या आंत युवराजांचें डोकें कापून हजर करतों म्हणून ?" सुंदरनें विचारलें.

पंत अमात्यांनी सुंदरचे पाय धरले व म्हणाले—"युवराज ! पंतप्रधानांच्या भीतीनें



मी तसें वचन दिलें होतें. पण मी नोकरीचा राजिनामा देऊन पळून जायचें ठरविलें आहे. हें कृत्य माझ्या हातून घडणें शक्य आहे असें का वाटतें आपणांला ?"

"पळून जाण्याची गरज नाहीं ! माझ्या आज्ञेनें सैन्य पाठवून पंतप्रधान व त्यांची ती बाई दोघांना धरून आणून माझ्यासमोर हजर करा." सुंदरनें आज्ञा केली. पुढें तो असेंहि म्हणाला—"आज पासून राजा म्हणून मी सर्व राज्यसूत्रें हातीं घेतलीं आहेत. माझ्या आज्ञेचें उल्लंघन करणारास कडक शिक्षा केली जाईल."

Fullscreen
127
42 / 82








सुंदरच्या आज्ञेनें दरबार भरला. सर्व दरबारी व मानकरी हजर होते. सैनिक पंतप्रधान व त्या बाईला धरून घेऊन आले. सुंदर आपल्या वीस मित्र मंडळींबरोबर दरबारांत आला व सिंहासनावर बसला. त्यानें पंतप्रधान व त्या बाईला अनुक्रमें फांशी व जन्मठेप अशी शिक्षा दिली.

राजधानीभर बातमी पसरली. प्रजेनें प्रेमानें आपल्या नव्या महाराजांचा जयजयकार करून आपला आनंद व्यक्त केला.

त्याच दिवशीं सुंदर कांहीं सैनिकांना बरोबर घेऊन चोराच्या गुहेकडे निघाला. गुहेजवळ पोंचतांच त्यानें तो मंत्र म्हटला. त्या बरोबर गुहेचें दार उघडलें.

चोर आत्मरक्षणासाठीं तलवार घेऊन आला. पण ज्याला मजूर समजून त्यानें ओझें उचलून नेण्याचें काम दिलें होतें तो स्वतः राजा आहे, हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. तलवार त्याच्या हातांतून गळून खालीं पडली. चोराला वाटलें कीं, आतां फाशी होणार. पण सुंदर म्हणाला—"तूं चोरी करून मिळविलेलें धन गोरगरिबांना वांटून टाक."

नंतर घडलेलें वृत्त सांगून सुंदर म्हणाला—"तुझ्या मुलीचे उपकार मी कदापि विसरणार नाहीं. तिनेंच मला पुनर्जन्म दिला आहे. मी काल जगलों म्हणूनच मला हें राज्य मिळालें."

चोरानें मुलीला बोलवून सुंदरच्या हातांत तिचा हात दिला व म्हणाला—"माझ्या मुलीनें आपणांशिवाय दुसऱ्या कोणाशीं लग्न न करण्याची प्रतिज्ञा केली आहे."

सुंदरचा विवाह व राज्याभिषेक विधिपूर्वक मोठ्या थाटानें झाला. त्यानें पाऊणशे वर्षे राज्य करून प्रजेला सुखी केलें.

[ संपूर्ण ]



# अक्षयपात्र

विक्रमार्कनें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला व प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाचा दिशेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ बोलूं लागला—"राजा ! मी असें पाहिलें आहे कीं, कित्येकांना लहान सहान कामें देखील पुरीं करून घेण्यासाठीं किती मेहनत करावी लागते व शुभदत्तासारखे असेहि लोक पहावयास मिळतात कीं, अनायासहि त्यांचें भाग्य उदयास येतें. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी ती गोष्ट सांगूं का ? ऐक !" असें सांगून वेताळानें गोष्ट सांगावयास सुरवात केली—

"शुभदत्त एक गरीब लाकूडफोड्या होता. रोज सकाळीं रानांत जाऊन तो लाकडें फोडी व मोळी विकून रात्रीं घरीं परत येई. एके दिवशीं तो रानांत लाकडें फोडायला गेला असतां त्याला एका झाडा-

Fullscreen 127 44 / 82



खालीं चार जण बसलेले दिसले. त्यांच्या कपड्यांवरून ते मर्त्यलोकाचे दिसत नव्हते. शुभदत्ताला आश्चर्य वाटलें. ते यक्ष होते. पण त्या बिचाऱ्याला तें काय कळणार ? तो दूर उभा राहून त्यांच्याकडे पाहूं लागला.

त्या यक्षांना त्याचा भय व संकोच पाहून दया आली असावी. त्यांनीं त्याला जवळ बोलाविलें आणि विचारलें–" काय रे, आमच्याकडे कामाला राहायला तयार आहेस का ? तुला पोटभर खायला मिळेल व तुझ्या कुटुंबाला कोणत्याहि प्रकारची कमतरता भासणार नाहीं." शुभदत्तनें कबूल केलें.

त्यांनीं शुभदत्तला आंघोळीला पाणी आणून द्यायला सांगितलें. जेवणाची वेळ झाल्यावर जेवण वाढायला सांगितलें. शुभदत्त चकित होऊन त्यांच्याकडे पाहूं लागला. यक्ष स्मित करून म्हणाले–" वाढ ना ! हें मडकें घे आणि तुला जें वाढावयाचें असेल तें मडक्यांत हात घातल्यावर तुला मडक्यांत मिळेल." शुभदत्तला कौतुक वाटलें. त्यानें यक्षांनीं सांगितल्याप्रमाणें केलें आणि खरो-खरच मडक्यांतून पंच पक्वान्नें एका मागून एक निघूं लागलीं.

यक्षांचें जेवणखाण आटोपल्यावर शिवदत्त जेवायला बसला व त्याला जें हवें होतें तें सर्व त्या मडक्यांतून निघालें. आयुष्यांत सर्वांत प्रथम तो पोटभर जेवला.

तेव्हां पासून तो त्या रानांतच यक्षांच्या-कडे नोकरी करूं लागला. महिनाभर घरीं देखील गेला नाहीं. त्याच्या कुटुंबाला यक्षांनीं अन्नवस्त्र पुरवलें व शुभदत्ताची काळजी करूं नका, तो सुखी आहे असें त्याच्या बायका मुलांना स्वप्नांत येऊन सांगितलें. एक महिनाभर नोकरी केल्यावर यक्षांनीं शुभदत्तला बोलावून म्हटलें कीं, तूं मनोभावें आमची सेवा केली आहेस. तुला जें पाहिजे तें मागून घे.





शुभदत्त म्हणाला–" आपण विचारलेंतच म्हणून मागत आहे. एवढें अक्षयपात्र मला द्यावें."

यक्ष हंसून म्हणाले–" अरे, मागून मागितलेंस तर हें मडकेंच का ? खालीं पडलें तर फुटेल. तुझ्याकडे कायम आयुष्यभर राहूं शकेल असें कांहीं तरी मागून घे."

" मला दुसरें कांहीं नको. एवढें मडकेंच पुरें !" शुभदत्त म्हणाला. यक्षांनीं त्याच्या इच्छेप्रमाणें त्याला तें अक्षयपात्र दिलें आणि निरोप दिला.

एका महिन्यानंतर शुभदत्त सुखरूप घरीं परत आलेला पाहून त्याच्या बायका मुलांना आनंद झाला. शुभदत्तनें बरोबर आणलेलें अक्षयपात्र इतर मडक्यांबरोबर ठेवून दिलें. त्याचें रहस्य कोणाला सांगितलें नाहीं. पुढें त्याच्याकडे कोणी आला कीं, तो त्यांना नवनवीन पक्वान्नें वाढूं लागला. आणखी पुढें तर त्यानें आपल्या घरीं अन्नसत्र सुरू केलें. एकाएकीं शुभदत्त इतका श्रीमंत झालेला पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें.

एकदां शुभदत्त खूप ताडी पिऊन झिंगला असतां त्याच्या शेजाऱ्यांनीं त्याला विचारलें– " काय रे ! तूं लाकूडफोड्या ! इतके दिवस तुला स्वतःला पोटभर खायला देखील मिळत नव्हतें. आणि आतां येईल त्याला पंचपक्वान्नें वाढूं लागला आहेस ! कांहीं जादूमंत्र करतोस कीं काय ?"

शुभदत्त झिंगलेला होताच. त्यानें अक्षय-पात्राचें रहस्य सांगून टाकलें व अक्षयपात्र आणून दाखविलें. अक्षयपात्राचा महिमा गात तो नाचूं लागला. एकाएकीं अक्षयपात्र त्याच्या हातांतून खालीं पडलें व फुटून गेलें. हांहां म्हणतां सर्व खापरें अदृश्य देखील झालीं. शुभदत्त जसा अकस्मात श्रीमंत झाला तसाच अकस्मात गरीब पण झाला.

       
Fullscreen 127 46 / 82

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें– "राजा! मला आतां हें सांग कीं शुभदत्त एक महामूर्ख होता हें दिसतेंच आहे. पण त्याचा मूर्ख पणा तुला कशांत जास्त वाटतो? यक्षांनीं बजावून विचारलें असूनहि कीं, दुसरी एखादी वस्तु मागून घे त्यानें तें मडकेंच मागून घेतलें हा त्याचा पहिला मूर्ख पणा झाला. नंतर अक्षयपात्राचें गुपित सांगून टाकण्यांत दुसरा मूर्खपणा झाला. आणि शेवटचा मूर्खपणा तें हातांत घेऊन नाचण्यांत दिसून आला. या तिन्ही पैकीं जास्त मूर्खपणा कशांत वाटतो तुला? या प्रश्नाचें उत्तर माहीत असून हि तूं दिलें नाहींस तर त्याचा काय परिणाम होईल हें मी निराळें सांगण्याची गरज नाहीं. तुझें डोकें शंभर छकलें होऊन तुझ्याचपायावर लोळूं लागेल."

त्यावर बिक्रमार्क म्हणाला–"शुभदत्तचा मूर्खपणा मला कशांतच दिसत नाहीं. त्याचा मूर्खपणा त्याच्या दारिद्र्यांतून उद्भवला आहे. त्याला कधीं पोटभर खायला मिळालें नाहीं कीं अंगभर वस्त्र घालायला मिळालें नाहीं. पोटभर खाऊन इतरांना पोटभर खायला घालण्यांत त्याला म्हणूनच एक महत्कार्य वाटलें. म्हणूनच यक्षांचें त्यानें ऐकलें नाहीं व अक्षयपात्रच मागून घेतलें. तो ज्या स्थितींत होता त्या स्थितींत त्यानें जें केलें त्यांत मला कांहीं गैर वाटत नाहीं. गरिबाला अचानक आलेली श्रीमंती झांकून ठेवतां येत नाहीं. गरीबीमुळेंच त्याला दारू प्यायची वाईट संवय लागली व म्हणूनच तो झिंगून जाऊन अक्षयपात्र कायमचें घालवून बसला. हा सर्व त्याच्या गरीबीचाच दोष नाहीं-तर काय?"

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ त्या प्रेताबरोबर नाहींसा झाला व झाडाला जाऊन लोंबकळूं लागला.







# परिवर्तन

**पा**टलीपुत्र नगरीं शांडिल्य नांवाचा एक गरीब ब्राह्मण रहात असे. तसा तो शिकला सवरलेला देखील नव्हता. मग भिक्षुकी करून तरी उदरनिर्वाह कसा चालणार? त्यानें बौद्ध विहारांत प्रवेश मिळविण्यासाठीं बौद्ध भिक्षू होण्याचें ठरविलें व झाला देखील. पण बौद्ध भिक्षु फक्त एकच वेळ भोजन करीत. एक वेळ भोजन करून शांडिल्याच्या मनाचें समाधान होईना. म्हणून त्यानें बौद्ध भिक्षूचा वेष फेंकून दिला व एक बैरागी होऊन एका बैराग्याकडे येऊन राहूं लागला. त्यानें विचार केला, या बैराग्यांना खूप भिक्षा मिळते. पण ते स्वतः कांहीं खात नाहींत. आपलें पोट छान भरेल. शांडिल्य ज्या बैराग्याकडे रहात होता तो एक योगी होता व त्याला अष्टसिद्धी प्राप्त होत्या. त्यानें आपल्या नव्या शिष्याच्या मनांतला खरा हेतु ओळखला व त्याच्या मनांत कांहीं पालट झाला तर त्यासाठीं प्रयत्न करून पहावा असें मनाशीं ठरविलें.

एके दिवशीं गुरुशिष्य हिंडावयास निघाले. ते एका उपवनांत येऊन पोंचले. वाटेंत शांडिल्य भिक्षेचा जप करीत होता. आज भिक्षेला जायचें नाहीं का? मी काल जेवलों. तेव्हांपासून आतांपर्यंत उपाशी आहें. पोटांत कावळे कोकलूं लागले आहेत, वगैरे वगैरे. पण बैरागी कांहींच बोलला नाहीं. एका जागीं बैरागी थांबला व आपल्या शिष्याला म्हणाला–"तूं पुढें हो! मी येतों मागून!" त्यावर शांडिल्य म्हणाला– "गुरुदेव! मला एकट्यानें भीति वाटते. या उपवनांत पहा अशोकाचीं किती झाडें आहेत? अशोकाच्या झाडाआड सिंह असतात म्हणें."









Fullscreen 127 48 / 82



"तूं पुढें तर हो! कांहीं भिण्याचें कारण नाहीं!" बैरागी म्हणाला.

"पण, मग जेवायचें केव्हां?" शिष्यानें निर्लज्जपणानें विचारलें.

बैराग्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

पाटलीपुत्रांत वसंतसेना नांवाची एक वेश्या रहात असे. तिचें रामिलिक नांवाच्या एका माणसावर प्रेम होतें. त्याच वेळीं दोघांची भेट त्याच उद्यानांत व्हायची होती. म्हणून वसंतसेना आपल्या सखींबरोबर उद्यानांत आली. पण रामिलिक आला नव्हता. रामिलिकला बोलावून आणण्यासाठीं वसंतसेनेनें आपल्या एका सखीला पाठविलें. त्या सखीचें नांव मधुरिता होतें. फक्त परभृतिक नांवाची एक दासी वसंतसेनेबरोबर राहिली व बाकी सर्व निघून गेल्या.

वसंतऋतु होता. उद्यानाची शोभा काय वर्णावी! वसंतसेना आनंदाच्या भरांत गाणें म्हणूं लागली. तिचा गोड आवाज ऐकून शांडिल्याला राहवेना. तो गुरुजींना म्हणाला— "गुरुवर! किती गोड आवाज आहे! चला जाऊं या गाणें ऐकायला. पण गुरूनें उत्सुकता न दाखविलेली पाहून शांडिल्य वसंतसेना जेथें बसली होती तिकडे गेला व आड उभा राहून तिचें सौंदर्य पाहूं लागला व गाणें ऐकूं लागला.

थोड्या वेळानें वसंतसेनेचें गाणें संपलें. आपली दासी परभृतिक हिच्याशीं ती बोलूं लागली. त्यावरून शांडिल्याला कळलें कीं ती वेश्या आहे. शांडिल्यानें विचार केला, आपण किती गरिब! आपल्याकडे आज पैसे असते तर वसंतसेनेशीं लग्न केलें असतें.

इतक्यांत तेथें यमाचा एक दूत आला. यमानें कोण्या वसंतसेनेचें आयुष्य संपत आल्यामुळें तिचा प्राण घेऊन येण्यासाठीं त्याला पाठविलें होतें. तो देखील बाजूला उभा होता.





वसंतसेना हीच आहे अशी खातरी पटल्यावर त्यानें तिचा प्राण घेऊन जायचें ठरविलें. वसंतसेना उड्या मारून अशोक वृक्षाची कोंवळीं पानें तोडूं लागली. त्याच वेळीं यमदूत सांपाचें रूप घेऊन तिला चावला.

सांप चावल्याचें कळल्यावर वसंतसेना किंकाळी फोडून जमिनीवर बेशुद्ध होऊन पडली. परभृतिक घाबरून गेली. शांडिल्य धांवत जवळ आला. वसंतसेनेचें शरीर निळें पडून थंडगार होऊन गेलें होतें. त्यानें आपल्या गुरुजींना जाऊन सांगितलें. त्याचे गुरु म्हणाले—"आयुष्याची दोरी खुंटली असेल!" गुरूनें तें निर्विकार शब्दांत दिलेलें उत्तर ऐकून शांडिल्याला गुरूचा राग आला व तो वसंतसेना जेथें पडली होती तेथें शोक करीत बसून राहिला.

वसंतसेनेनें मरण येण्यापूर्वी एकदां आपली सखी परभृतिक हिच्याकडे डोळे उघडून पाहिलें व म्हणाली—"आईला माझा नमस्कार सांग आणि रामिलिकला जाऊन सांग कीं वसंतसेनेनें तुझी वाट पहातच डोळे मिटले."

परभृतिकनें शांडिल्याला वसंतसेनेजवळ आलेला पाहिला. तिला वाटलें, कोणी दयाळु बैरागी दिसतो आहे. मी परत येईपर्यंत वसंतसेनेवर लक्ष ठेवील. असा विचार करीत ती वसंतसेनेच्या आईकडे निघून गेली.

शांडिल्य वसंतसेनेची सेवा शुश्रूषा करूं लागला. त्याला वाटलें कीं, ती अजून जिवंतच असली पाहिजे. त्यानें विचार केला ती शुद्धीवर होती तेव्हां आपण खुळ्यासारखे दुरून पहात उभे राहलों.

तिकडे बैरागी आपल्या शिष्याला हांक मारीत होता. पण शांडिल्याच्या कानावर त्याचा आवाज पडला देखील नाहीं तो आपल्याच नादांत होता. गुरूनें विचार


Fullscreen

127





50 / 82


केला, या वसंतसेनेमुळें याची बुद्धि पालटली आहे. याला शुद्धीवर आणला पाहिजे.

वैराग्याला सर्व सिद्धी प्राप्त होत्याच. त्यानें योगबळानें आपलें शरीर सोडून वसंतसेनेच्या शरिरांत प्रवेश केला. वसंतसेनेचें शरीर हलूं डोलूं लागलेलें पाहून शांडिल्याला आनंद झाला. आतां तर ती उठून बसली. "शांडिल्य! शांडिल्य!" तिनें बोलाविलें.

"मी येथेंच आहें! काय वसंतसेने!" म्हणत शांडिल्य जवळ जाऊन विचारूं लागला.

"हातपाय धुवून ये प्रथम, मग ये जवळ!" वसंतसेना म्हणाली.

वा रे वा! आचार विचारानें ही किती शुद्ध व स्वच्छ दिसते आहे! शांडिल्यानें विचार केला. त्या वेळीं वसंतसेनेच्या शरिरांतून त्याच्या गुरुवर्यांचाच आवाज येत आहे, हें ध्यानीं मनीं सुद्धां त्याला वाटलें नाही.

"शांडिल्य! जा स्नान करून जप कर!" वसंतसेना म्हणाली. शांडिल्याला वाटलें, ही शुद्धीवर आलेली नाहीं. बरळत असावी. एकदां गुरूकडे जाऊन यावें असा विचार करून तो निघाला.

पण झाडाखालीं गुरूचा मृत देह पाहून त्याला आश्चर्यच वाटलें. "गुरुवर!" मोठ्यानें गळा काढून शांडिल्य रडूं लागला.

त्याच वेळीं वसंतसेनेची आई, मुलगी सांप चावून मेल्याचें ऐकून धांवत तेथें आली. पण वसंतसेनेला उठून बसलेली पाहून तिनें देवाचे आभार मानले. तिनें मुलीची दृष्ट काढून टाकली व जवळ जाऊन प्रेमानें म्हणाली—"बाळ!"

"ए म्हातारे! दूर हो! हात लावूं नकोस माझ्या अंगाला!" तो आवाज वैराग्याचा होता हें सांगण्याची गरज नाहीं.

वसंतसेनेचें तें बरळणें वाटलें तिच्या आईला. म्हणाली—"झालें काय पोरीला समजत नाही!"

तितक्यांत परमृतिक देखील तेथें येऊन पोंचली. तिला वाटलें. विषाचा प्रकोप असेल, डोक्यापर्यंत विष गेलें असेल. म्हणून ती धांवतच एका वैद्याकडे गेली.

त्याच वेळीं मधुरिता रामिलिकला बोलावून घेऊन आली. तो तर वेड्यासारखा "वसंतसेना! वसंतसेना!" असा जप करीतच तेथें आला आणि त्यानें सरळ वसंतसेनेचा हात जाऊन धरला.






Fullscreen

127





52 / 82





"हो बाजूला! दुष्ट, मूर्ख कुठला! पापी माझ्या अंगाला शिवलास तर किडे पडतील तुझ्या अंगाला!" वसंतसेनेनें इतक्या निर्दयपणें झिडकारल्यामुळें त्याला वाईट वाटलें. तो मधुरितेकडे पाहूं लागला. इतक्यांत परभृतिक वैद्याला घेऊन आली.

"सांप चावल्यावर बेशुद्ध होऊन पडली होती आणि उठली ती असें कांहीं वेड्या-सारखी बोलत आहे!" परभृतिक म्हणाली.

सर्व किंकर्तव्य विमूढ होऊन वसंतसेनेकडे पहात उभे राहाले. वैद्यानें नाडी तपासण्या-साठीं वसंतसेनेचा हात धरला. तिनें हात झिडकारल्यावर वैद्य म्हणाला—"औषधानें नाहीं हा रोग बरा होणार! मी करतों उपाय! सांप उतरवल्या शिवाय नाहीं चालणार!" असें सांगून वैद्य मंत्र पुटपुटूं लागला. त्यावर वसंतसेना म्हणाली—"अरे वैद्या! पुरे कर तुझीं तीं औषधें व ती वटवट! इथें तुझी डाळ नाहीं शिजायची."

वैद्यानें असाध्य रोग समजून व एक थाप देऊन कीं, मोठ्या वैद्यबुवांना पाठवून देतों, तेथून पाय काढला.

तिकडे यमदूत वसंतसेनेचा प्राण घेऊन यमाकडे गेला. यम त्याला फार रागावला. म्हणाला—"अरे मी ज्या वसंतसेनेला आणा-यला सांगितलें ती ही नव्हे. किती घोटाळा केलास पहा! तुला कळलें नाहीं तर तूं परत येऊन विचारून जायला नको होतें का? जा घेऊन हे प्राण परत आणि घाल त्या बिचारीच्या शरिरांत. लवकर जा. नाहीं तर लोक दहनविधि सुद्धां उरकून घेतील. आणि मी सांगितलें होतें त्या वसंतसेनेचा जीव घेऊन ये."

यमदूत धांवत धांवत वसंतसेनेला तो जेथें सोडून गेला होता तेथें आला. पण वसंतसेनेच्या शरिरांत दुसराच प्राण शिरलेला पाहून तो पेंचांत पडला कीं काय करावें. यमदूत अदृश्यपणें तेथें हिंडत फिरत होता. त्याला हें कळायला वेळ लागला नाहीं कीं, वसंतसेनेच्या शरिरांत वैरागी येऊन बसला आहे. वसंतसेनेचा प्राण कोणत्या तरी मृतदेहांत घालून खऱ्या वसंतसेनेचे प्राण वेळेवर पोंचते करण्याची त्याला घाई झाली होती. त्यानें मागचा पुढचा कांहीं एक विचार केला नाहीं व वैराग्याच्या मृतदेहांत वसंतसेनेचा प्राण घालून तो निघून गेला.

वैरागी उठून बसला व ओरडूं लागला—"परभृतिका! परभृतिका!" तो आवाज वसंतसेनेचा होता. पण शांडिल्यला वाटलें कीं, त्याचे गुरुजी जिवंत झाले आहेत.

वैराग्याच्या शरिरांत बसलेली वसंतसेना म्हणाली—"रामिलक! रामिलक!"

रामिलक जवळ जाऊन विचारूं लागला—"काय बुवा?"

"जवळ ये रामिलक! जवळ ये! माझा हात धर!" वैराग्याच्या बायकी अंगचेष्टा पाहून रामिलक थोडा वेळ देहभान विसरला. त्याला वसंतसेनाच आठवली. तिनें विचारलें—"इतका उशीर कां लावलास तूं?" थोड्या वेळानें आईकडे पाहून म्हणाली—"आई



Fullscreen

127






54 / 82


ये ग इकडे. मी इकडे आहें." आणि तिकडे वसंतसेना ठीक बैराग्यासारखें बोलत होती.

यमदूत आपलें तिकडचें काम उरकून पुन्हां इकडचें काम पुरें करण्यासाठीं आला. वसंतसेनेचा प्राण वसंतसेनेच्या शरिरांत पोंचविण्याची जबाबदारी त्याचीच होती.

त्यानें वसंतसेनेच्या शरिरांत बसलेल्या बैराग्याला नमस्कार करून विनंति केली– "बुवा! आतां हें शरीर सोडलें पाहिजे आपल्याला." त्यानें बैराग्याच्या शरिरांतून वसंतसेनेचा प्राण काढून घेतला होता.

बैरागी म्हणाला–"बरें तर!" आणि त्यानें स्वतःच्या शरिरांत प्रवेश केला. त्यानें वसंतसेनेचें शरीर सोडल्याबरोबर यमदूतानें वसंतसेनेचा प्राणतिच्या शरिरांत पोंचता केला. यमदूताचें काम संपलें व तो निघून गेला.

हें सर्व इतकें अदृश्यपणें झालें कीं यमदूत व बैरागी या दोघां शिवाय कोणाला कळलें नाहीं. सर्व चकित होऊन नुसती गंमत पहात होते.

वसंतसेना आतां पुन्हां स्वतःसारखी बोलूं लागली. तिनें आईला रामिलिकला व आपल्या सखींना ओळखलें. त्यांनीं ही कशी वरळत होती हें सांगितलें व म्हणाली– "आम्ही तर तू बरी होण्याची आशाच सोडून दिली होती."

बैरागी देखील आतां वसंतसेनेसारखें बोलण्याचें सोडून स्वतःच्या आवाजांत बोलूं लागला तेव्हां शांडिल्यानें चकित होऊन त्याला विचारलें–"गुरुवर! आपण इतका वेळ काय खेळ चालविला होता? मला भ्रम घालण्यासाठीं कीं आणखी कांहीं.

"सूर्यास्ताची वेळ झाली आहे. चल स्नान करून संध्या करूं व मग बोलूं या विषयीं!" असें सांगून बैरागी आपल्या शिष्याला घेऊन नदीवर आंघोळीला गेला.





# रंकाचा राव झाला

फ्रिजिया देशांत गॉर्डियस नांवाचा एक तरुण शेतकरी रहात असे. तो आपली बैलगाडी जुंपून आठवड्याच्या बाजाराला निघाला. एकटाच होता तो.

गाडी चालू असतां कोठून तरी एक गरुड पक्षी उडत येऊन गाडीच्या जोखडावर मधोमध बसला. ग्रीक लोकांच्या समजुती-प्रमाणें हा एक शुभ शकुन मानला जातो. गॉर्डियसनें विचार केला, आहे झालें कांहीं-तरी समजूत. आपण शेतकरी. आपल्या नशिबीं काबाडकष्ट करणें लिहिलें आहे तें सुटावयाचें आहे थोडेंच.

त्याचवेळीं केलिसस नगराचा राजा एकाएकीं मरण पावला. राज्यांत मारामारी व दंगेधोपे सुरू झाले. पण एक संत बाई समाधिस्थ होऊन बसली. लोक तिच्या चारी बाजूला जमा झाले. ती म्हणाली–"तुमचा राजा इकडेच बैलगाडींत बसून येत आहे. गाडींत त्याच्याबरोबर त्याची राणी देखील बसली आहे. गाडीच्या जोखडावर गरुड पक्षी बसलेला आहे!"

तें ऐकून प्रजा शांत झाली व नव्या राजाची वाट उत्सुकतेनें पाहूं लागली.

परंतु ती वाणी ऐकून एक तरुण स्त्री राजधानी बाहेर ज्या वाटेनें राजा येणार होता तिकडे पळत गेली. तिला वाटेंत एक बैलगाडी दिसली. त्या गाडीच्या जोखडावर गरुड पक्षी होता. गाडींत एक तरुण गांव-दळ शेतकरी बसला होता. पण त्याच्या-बरोबर कोणी बाई नव्हती.

त्या बाईनें गाडीसमोर उभी राहून गाडी थांबवली व गोर्डियसला म्हणाली– "मला घेऊन चल आपल्याबरोबर. गार्डि-यसनें जास्त विचारपूस न करतां गाडी

 Fullscreen  127      56 / 82 

थांबविली आणि त्या तरुण स्त्रीला गाडींत बसवून घेतलें. तेव्हां ती म्हणाली–"हें पहा, तूं मला एक वचन दे! तूं माझ्याशीं लग्न केलेंस तर आज संध्याकाळीं तुला एक मंगलवार्ता कळेल."

गरुड पक्षी पाहिल्यापासूनच गोर्डियसला ग्रीक लोकांच्या समजुतीप्रमाणें कांहींतरी शुभ होणार असें वाटत होतें. पण त्यानें तिकडे दुर्लक्ष केलें होतें. आतां या बाईनें येऊन पुन्हां तीच गोष्ट सांगितली तेव्हां त्या स्त्रीकडे थोडा वेळ पहात तो म्हणाला–"तुझ्यांत जितकें सौंदर्य आहे तितकीच बुद्धि असेल तर तुझ्याशीं लग्न करण्यांत मला कांहीं हरकत नाहीं."

"माझ्या बुद्धीवर विश्वास ठेव." ती स्त्री म्हणाली. नंतर ती भविष्य वाणी सांगून ती म्हणाली–"मी गाडींत बसून तुझ्या-बरोबर आलें तरच तूं राजा होशील."

गोर्डियसनें मान हलवून होकार दिला आणि गाडी पुढें चालूं लागली. काळोख होण्यापूर्वी गाडी राजधानींत पोंचली. बैल-गाडी, तिच्या जोखडावर गरुड पक्षी, गाडींत एक तरुण व तरुणी पाहून प्रजेनें त्यांना आपला राजा राणी मानून जयजयकार केला.

अशा प्रकारें गोर्डियस फेरिगस नगराचा राजा झाला.

ज्या जोखडावर गरुड बसला होता तें जोखड व जी दोरी त्या वेळीं त्याच्या हातांत होती, त्या दोरीनें त्यानें जोखडाला एक गांठ बांधली व तें जोखड व दोरी देवाला अर्पण केली. त्यानें असेंहि सांगितलें कीं जो कोणी ही गांठ सोडून दाखवील तो चक्रवर्ती होईल.

ती गांठ कोणी सोडवूं शकला नाहीं. विश्वविजयी शिकंदर बादशहा देखील ती गांठ सोडवूं शकला नाहीं. शेवटीं निराश होऊन त्यानें ती तलवारीनें कापून टाकली.



# लोभाला मर्यादा नाहीं !

एका गांवीं दोन लहानपणचे मित्र रहात असत. त्यांपैकीं एक विसाव्या वर्षी हिमालय पर्वतांत गेला व एका साधूची मर्जी संपादन करून त्यानें अनेक सिद्धी मिळविल्या. दहा वर्षांनीं तो आपल्या गांवीं परत आला. गांवकऱ्यांनीं त्याला गांवाबाहेर एका आमराईंत एक झोंपडी बांधून दिली. तींत तो राहूं लागला.

हळूहळू त्याला प्राप्त झालेल्या सिद्धींची चर्चा गांवोंगांव पसरली. लोक कोणाला कांहीं आजार झाला कीं साधूकडे येऊन त्याच्याकडून इलाज करवीत. साधूच्या हाताला असा कांहीं गुण होता कीं असाध्य म्हणून ठरलेला आजार देखील बरा होऊन जाई.

साधूचा मित्र कोठेंतरी मजुरी करून उदर निर्वाह करीत असे. आपल्या मित्राला सिद्धी प्राप्त झालेली ऐकून तो धांवत त्याला भेटायला आला व म्हणाला–"मित्रा, माझी गरीबी दूर कर! तूं चार पैसे दिलेस तर सुखानें चार दिवस जातील."

साधूनें आपल्या एका खड्याकडे बोट दाखवून तो घ्यायला सांगितलें. आश्चर्य असें कीं साधूनें बोट दाखविल्याबरोबर तो खडा सोन्याचा झाला होता.

तेवढ्यावर त्याच्या मित्राचें समाधान झालें नाहीं. म्हणाला–"हें किती दिवस पुरणार?"

साधूनें एका मोठ्या दगडाकडे बोट दाखवून म्हटलें–"तो दगड घेऊन जा!"

पण तेवढ्यानें देखील त्याच्या मनाचें समाधान झालें नाहीं. म्हणाला–"एवढेंच!"

साधूनें विचारलें–"मग आणखी काय पाहिजे?"

मित्र म्हणाला–"तुझें तें बोट देशील तर!"

साधूनें तुसतें स्मित केलें आणि म्हणाला–"उद्यां ये!"




Fullscreen

127





58 / 82



















# बालकांड

ऋष्यशृंगमुनि राजा दशरथाचे अतिथि म्हणून अयोध्येला आले. राजानें त्यांना राहण्यासाठीं एक सुंदर आश्रम बांधून दिला व त्यांना कोणत्याहि प्रकारें त्रास होऊं नये अगर कोणत्याहि वस्तूची उणीव भासूं नये याची काळजी घेतली राजानें एक दिवशीं ऋष्यशृंग मुनींना नमस्कार केला व विनम्रपूर्वक निवेदन केलें कीं, देवाच्या कृपेनें मला या जगांत सर्व प्रकारचें सुख व संपत्ति, धन-वैभव, राज्य, कीर्ति सर्व भरपूर लाभलें आहे. पण पुत्रप्राप्ति नाहीं. म्हणून आपण कांहीं तरी उपाय करावा.

मुनींनीं प्रथम अश्वमेध यज्ञ करण्यास सांगितलें. त्या प्रमाणें यज्ञाची तयारी सुरू झाली. जाबाली आदि तज्ञ मुनींना खास निमंत्रणें पाठविण्यांत आलीं.

वशिष्ठमुनींनीं यज्ञाला लागणाऱ्या वस्तूंची यादी करून दिली व यज्ञाचा घोडा सोडण्यास सांगितलें. घोड्या बरोबर चतुरंग सेना पाठविण्यांत आली.

सरयू नदीच्या उत्तरेकडील तीरावर यज्ञशाळा तयार करण्यांत आली. या कामासाठीं तज्ञ वास्तुशास्त्री, शिल्पशास्त्री, सुतार गवंडी वगैरे नेमण्यांत आले. ब्रह्मवृंदास उतरण्यासाठीं पर्णशाळा तयार करण्यांत आल्या.

मिथिलेचे महाराज जनक, काशीनरेश, दशरथ राजाचे श्वशुर केकेयराज, अंगनरेश


Fullscreen

127




60 / 82





रोमपाद वगैरे लहान थोर सर्व राजा रजवाड्यांस निमंत्रणें पाठविण्यांत आलीं. कित्येक राजांना स्वतः सुमंत्र निमंत्रण पत्र देऊन आला. अतिथि गृह भरून गेलें.

शुभमुहूर्त पाहून दशरथ महाराज यज्ञशालेकडे निघाले. यज्ञ प्रारंभ झाला. पहला हविर्भाग इंद्राला समर्पित करण्यांत आला. राजानें अतिथि अभ्यागतांच्या सत्काराची उत्तम व्यवस्था ठेवली होती.

अश्वमेध संपन्न झाल्यावर राजानें ऋत्विजांना आपली सर्व भूमि दान करून टाकली. परंतु ब्राह्मण म्हणाले—"राजा! ही भूमि घेऊन आम्ही काय करणार! तूंच याची योग्य ती व्यवस्था कर. दिलेलें दान परत घेणें धर्मविरुद्ध असल्या कारणानें राजानें ती जमीन ब्राह्मणांची म्हणून ठेवून घेतली व तिच्या लागवडीची व्यवस्था त्यांच्या वतीनें करावयाचें ठरविलें आणि गोदान केलें. दहा लक्ष गाई व कोट्यावधि सुवर्ण मुद्रा दान करून सर्वांचा आशीर्वाद मिळविला. नंतर उरलेलें सर्व धन ऋष्यशृंग व वशिष्ठ मुनींना दान करून टाकलें.

इतक्यांत एक गरीब ब्राह्मण हात जोडून राजा दशरथासमोर उभा राहिला. राजानें आपल्या हातांतील सुवर्णकंकण दान करून त्याचा आशीर्वाद देखील मिळविला.

अश्वमेध यज्ञ संपूर्ण झाल्यावर ऋष्यशृंग मुनींच्या आज्ञेनें दशरथ राजानें पुत्रकामेष्टी यज्ञ आरंभ केला. तेहतीस कोटी देव यज्ञास हजर होते. स्वतः ब्रह्मदेव देखील हजर होता. देवांनीं ब्रह्मदेवाला नमस्कार करून रावणाच्या विरुद्ध फिर्याद केली.

ब्रह्मदेवानें सर्वांचें गाऱ्हाणें ऐकून घेतलें व सर्वांना सांत्वना देत म्हणाला—"घाबरू नका. स्वतः शेषशायी विष्णु अवतार घेऊन तुमचें दुःख निवारण करील. दुष्ट रावणानें शंकराची भक्ति करून देव, दानव व मानव यांच्यावर अजिंक्यपद मिळविलें असलें तरी त्याचे दिवस सुद्धां भरत आले आहेत. विष्णूचा अंश दशरथ राजाची पट्टराणी कौसल्या हिच्या पोटीं जन्मास येऊन रावणाचा संहार करील." तें ऐकून देवांना आनंद झाला.

पुत्रकामेष्टी यज्ञ यथाविधि चालू होता. दशरथ राजाची भक्ति, वशिष्ठ, जाबाली वगैरे ऋषींचा आशीर्वाद आणि ऋष्यशृंग मुनींची तपश्चर्या या सर्वांच्या सहाय्यानें यज्ञ पूर्ण झाला. ब्रह्मदेवानें देवांच्या मनाचें सांत्वन केल्यावर थोड्या वेळानें हवनकुंडांतून एकाएकीं एक अद्भुत दैवीशक्ति बाहेर येत असलेली सर्वांस दिसली. तिच्या हातांत एक सुवर्णकलश होता. दशरथ राजानें देवीला साष्टांग नमस्कार केला. देवीनें राजाला आशीर्वाद दिला व म्हणाली—"राजन्! ही एक दिव्य खीर आहे. प्रजापतीच्या आज्ञेनें मी घेऊन आले आहे. तूं ही खीर आपल्या राण्यांना खायला दे. तुला पुत्रप्राप्ति होईल."

दशरथ राजानें नमस्कार करून त्या देवीच्या हातून तो सुवर्ण कलश घेतला व




Fullscreen

127




62 / 82






तीन वेळां देवीला प्रदक्षिणा करून पुन्हां साष्टांग नमस्कार केला. देवी अशीर्वाद देऊन अदृश्य झाली.

यज्ञ संपला दशरथ राजानें आनंदानें अर्धी खीर कौसल्येला दिली उरलेल्यांतली अर्धी सुमित्रेला दिली, पुन्हां उरलेल्यांतली अर्धी कैकेयीला दिली व जी उरली ती पुन्हां सुमित्रेला दिली. तिघींनीं तो देवीचा प्रसाद म्हणून खीर पिऊन टाकली.

योग्य समयीं तिघी राण्या गरोदर झाल्या. राजाला फार आनंद झाला. प्रजेला पण आनंद झाला.

इकडे विष्णु स्वत: अवतार घेणार हें ऐकून इतर देवांनीं पण मर्त्यलोकीं जन्म घेण्याचें ठरविलें. ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें देवांनीं वानररूप घेऊन पृथ्वीवर जन्म घेतला. इंद्राच्या कृपेनें वाली, सूर्याच्या कृपेनें सुग्रीव बृहस्पतीच्या कृपेनें तारा, कुबेराच्या कृपेनें गंधमादन, विश्वकर्माच्या कृपेनें नल, अग्नीच्या कृपेनें नील, वरुणाच्या कृपेनें सुशेण व वायुदेवाच्या कृपेनें हनुमान मर्त्यलोकीं अवतरले. सर्व एकाहून एक पराक्रमी होते. इतर देव लक्षावधि वानर होऊन आले. रावणाचा संहार करण्यासाठीं मर्त्यलोकीं जावयास सर्व देव तयार झाले. सर्व वानर किष्किंधापुरांत वाली व सुग्रीव यांना आपला राजा व नल, नील आणि हनुमान यांना त्यांचे मंत्री मानून राहूं लागले.

पुत्रकामेष्टी यज्ञ झाल्यानंतर सुमारें दहा महिन्यांनीं चैत्र शुद्ध नवमीच्या दिवशीं पुनर्वसु नक्षत्रांत कौसल्येच्या पोटीं श्री रामचंद्रानें अवतार धारण केला. पुष्य नक्षत्रांत कैकेयीच्या पोटीं भरत व आश्लेषा नक्षत्रांत सुमित्रेच्या पोटीं लक्ष्मण व शत्रुघ्न जन्मास आले.

अयोध्या नगरींत सर्वत्र आनंदी आनंद होता. दशरथानें असंख्य गाई व वस्त्रादींचें दान करून ब्राह्मणांचा आशीर्वाद मिळविला.

चार ही भावंडें लहानाचीं मोठीं होऊं लागलीं. त्यांच्या बाळलीला पाहून सर्व सुखी झाले. सर्व भावंडांचें परस्परांवर अपार प्रेम होतें. त्यांतल्या त्यांत लक्ष्मणाचें रामावर व शत्रुघ्नाचें भरतावर विशेष प्रेम होतें. खाणें पिणें, खेळणें, झोपणें सर्व बरोबर.

राजा दशरथानें राजकुमारांच्या विद्याभ्यासाची वसिष्ठ मुनींच्या सल्ल्यानें सर्व व्यवस्था केली. वेदवेदांग व धनुर्विद्येंत सर्व पारंगत झाले. मुलांना सोळावें वर्ष लागलेलें पाहून राजानें त्यांचा विवाह करण्याचें ठरविलें व वसिष्ठ मुनींचा सल्ला घेतला. त्याच वेळीं विश्वामित्र मुनि दशरथाकडे आले. राजा आनंदानें सिंहासनावरून उतरून वसिष्ठ मुनींच्या स्वागतासाठीं पुढें गेला व आदरपूर्वक नमस्कार करून येण्याचें कारण विचारलें.

विश्वामित्र ऋषींनीं राजाला आशीर्वाद दिला व विचारलें—“ राजा, तुझी प्रजा सुखी आहे ना! तिला शत्रूचें भय तर वाटत नाहीं ना ! ” नंतर वसिष्ठ आदि थोर मुनींना नमस्कार करून दरबारांत प्रवेश केला. राजानें विश्वामित्र ऋषींना बसावयास उच्च आसन




Fullscreen

127





64 / 82





देऊन सर्व प्रकारें त्यांचा गौरव केला व म्हणाला–

"मुनीश्वर! आपल्या आशीर्वादानें मी सकुटुंब सुखी आहें व प्रजापण सुखी आहे. आपण दर्शन देऊन आम्हां सर्वांस कृतार्थ केलेंत. आतां कांहीं सेवा योग्य कार्य असेल तर आज्ञा करावी. आपली आज्ञा शिरसावंद्य आहे."

विश्वामित्र मुनींना फार आनंद झाला. म्हणाले–"महाराज, मी यज्ञ आरंभिला आहें. परंतु मारीच व सुबाहु नांवाचे राक्षस यज्ञांत विघ्न घालीत आहेत. मी त्याचें पारिपत्य केलें असतें किंवा त्यांना शाप देऊन भस्म केलें असतें. परंतु तसें केल्यास व्रतभंग होईल. म्हणून मी मदतीसाठीं तुझ्याकडे आलों आहें. तुझा मोठा मुलगा राम हा फार पराक्रमी आहे असें मी ऐकलें आहे. त्याला माझ्या बरोबर पाठव. तो त्या राक्षसांचें पारिपत्य करूं शकेल, माझी खात्री आहे व वसिष्ठ मुनींना देखील या गोष्टीची कल्पना असेल."

तें ऐकून दशरथ राजा घाबरून गेला. सिंहासनावरून उतरून आला व विश्वामित्र ऋषींचे पाय धरून प्रार्थना केली कीं, रामाचें वय अजून कोंवळें आहे. त्याच्यावर मी हा भार कसा टाकूं. त्याच्या ऐवजी मी स्वतः आपली चतुरंग सेना बरोबर घेऊन येतों व त्या राक्षसांचा संहार करतों. रामावर ही जबाबदारी टाकतांना माझें मन कचरत आहे."

विश्वामित्र म्हणाले–"तूं रावणाचें नांव ऐकलेंच असशील त्यानें शंकराला प्रसन्न करून अनेक शक्ति मिळविल्या आहेत. त्याच्या आज्ञेनें हे राक्षस यज्ञांत विघ्न घालीत आहेत. त्यांचें पारिपत्य करणें तुला शक्य नाहीं. तूं माझें ऐक व रामाला माझ्याबरोबर पाठवून दे!"







Fullscreen 127 66 / 82

"मुनिवर ज्यांचें पारिपत्य करणें मला देखील शक्य नाहीं त्यांना राम कसा मारूं शकेल? आपणच विचार करावा. रामाला मी ह्या कामासाठीं आपणाबरोबर पाठविलें तर मला लोक नांवें ठेवतील." दशरथ म्हणाला.

तें उत्तर ऐकून विश्वामित्र ऋषींना राग आला. ते उभे राहले व म्हणाले—"वचन देऊन नकार देणारा राजा मी तुझ्या वंशांत पाहिला नाहीं. बरें तर मी येतों."

पण वसिष्ठ मुनींनीं राजाची समजूत घातली—"राजन! विश्वामित्र ऋषींचा पराक्रम तूं ओळखला नाहींस वाटतें! त्यांनीं आपलें क्षात्रतेज दाखवून कीर्ति मिळविली व तपश्चर्या करून राजर्षी झाले. त्यांनीं शस्त्र हातीं न घेण्याचें व्रत घेतलें आहे. त्यांनीं जीं अनेकानेक अस्त्रें मिळविलीं आहेत तीं रामाला शिकवून त्याच्या हातून राक्षसांचा संहार करवून घेतील. विश्वामित्र मुनी जवळ असे पर्यंत तुला रामाच्या रक्षणाची काळजी करण्याचें कारण नाहीं. या शिवाय एकदां वचन देऊन व तें परत घेऊन तूं ईक्ष्वाकु वंशाचें नांव कलंकित करीत आहेस. राक्षसांचें पारिपत्य करण्यासाठीं तुझ्या किंवा रामाच्या मदतीची विश्वामित्र ऋषींना काय गरज? तुझ्या मुलाचें हित करण्यासाठींच ते येथवर स्वतः आले आहेत. म्हणून तूं निश्चित होऊन रामाला त्यांच्याबरोबर पाठवून दे."

वसिष्ठमुनींचा सल्ला ऐकून दशरथ राजानें रामलक्ष्मणांना बोलाविलें आणि विश्वामित्र ऋषींच्याबरोबर त्यांना पाठवून दिलें. विश्वामित्र ऋषि प्रसन्न होऊन म्हणाले—"दशरथा! राम व लक्ष्मण यांचें रक्षण मी स्वतःच्या डोळ्यासारखें करीन." असें सांगून त्यांनीं राजाचा निरोप घेतला. रामलक्ष्मणाजवळ शस्त्रास्त्रें होतीं धनुष्यबाण होते व तलवार पण होती.



# खजुराहो

आज खजुराहो हें मध्य प्रदेशांतलें एक लहानसें खेडें आहे. परंतु मध्ययुगीन भारतांत तें एक वैभवशाली सुंदर नगर म्हणून प्रसिद्ध होतें. भारतीय शिल्पकलेचें व मूर्तिकलेचें खजुराहो हें एक इतिहास प्रसिद्ध उदाहरण आहे. येथील मूर्तिकला भारतांत अद्वितीय अशी आहे.

खजुराहो नगरीं एका काळीं ८५ देवळें होतीं. त्यांपैकीं आतां फक्त ३० देवळेंच पहावयास मिळतात. ह्या देवळांचा निर्माण काळ इ. स. ९५० ते १०५० च्या दरम्यान मानला जातो.

या सर्व देवळांचें शिल्प प्रेक्षणीय आहे. त्यांतल्या त्यांत कंटरिया महादेव याचें मंदिर, त्याची शिल्पकला व ८०० वर मूर्ति पाहून त्या मनुष्य निर्मितच आहेत कीं देव निर्मित अशी एक शंका मनांत येते.

चतुर्भुजालय, पार्श्वनाथालय वगैरे देवळें देखील उत्कृष्ट कलेचीं उदाहरणें आहेत. यांचें विशेष म्हणजे स्तंभावर केलेलें कोरीव काम.




Fullscreen
127




70 / 82


## त्याग



रामतीर्थ

एकदां दोन साधु एका वाटेनें कोठें तरी जात होते. दोघांनीं सर्व संग परित्याग केला होता. एका साधूला वाटत होतें कीं सर्वस्वाचा होम केल्याशिवाय मुक्ति मिळणें शक्य नाहीं. त्याच्या जवळ एक फुटकी कवडी देखील नव्हती.

दुसऱ्या साधूला वाटे कीं सर्वसंग परित्याग केला तरी या जगांत जोंपर्यंत जगावयाचें आहे तोंपर्यंत पैसा हा लागणारच. म्हणून अगदीं आवश्यक तितकेच पैसे जवळ ठेवीत असे.

दोघे संध्याकाळच्या सुमारास चालत चालत एका नदीकाठीं आले.

पहिला साधु म्हणाला—"आपण उद्यां सकाळीं जाऊं पैल तीरीं"

"येथें जवळ पास गांवबीव कांहीं दिसत नाहीं या निर्जन स्थानीं रानटी श्वापदें येण्याचा संभव आहे. आपण मदतीसाठीं कोणाला हाक मारली तरी कोणी येणार नाहीं. आपण दोघे या तरीवाल्याला चार पैसे देऊन पैल तिरीं जाऊं या. माझ्या जवळ आहेत पैसे." दुसरा साधु म्हणाला.

दोघे नदी पार गेले. गांवांत एका धर्म शाळेंत उतरले. धर्म शाळेतर्फे त्यांना जेवण मिळालें. जेवून खाऊन दोघे झोंपण्यासाठीं आडवे झाले.

"पाहिलेंत, पैसे होते म्हणून आपण नदीपार येऊं शकलों आणि निश्चितपणें आतां अंग टेकायला जागा मिळाली!" दुसरा साधु म्हणाला.

"पैसा होता म्हणून नाहीं आपल्याला आराम मिळाला, पैसा आपण सोडला. म्हणजे दिला म्हणूनच मिळाला. त्याग केल्यानें मनुष्य सुखी होतो याचें हें प्रत्यक्ष उदाहरण आहे!" पहिला साधु म्हणाला.



## फोटो जोडनांवें चढाओढ

ऑक्टोबर १९६१ :: बक्षिस १० रुपये





**कृपा करून जोडनांवें पोस्ट-कार्डावरच पाठवावीत**

वरील फोटोंची ओळख करून देणारीं जोडनांवें दोन ते चार शब्दांत किंवा त्याहून मोठीं पण परस्परांशीं थोडें फार साम्य दर्शविणारीं असावींत आणि तीं जोडनांवें पोस्ट-कार्डावर स्वतःचें नांव व संपूर्ण पत्त्यासह ५ ऑगष्ट १९६१ पूर्वी खालील पत्त्यासह पाठवावीत. पोस्ट-कार्डाखेरीज आलेलीं जोडनांवें स्वीकारण्यांत येणार नाहींत.

**चांदोबा फोटो जोडनांवें चढाओढ,**
**चंदामामा प्रकाशन, मद्रास-२६**

### ऑगष्ट महिन्याचा निकाल

या महिन्यासाठीं खालीलं जोडनांवें सर्वोत्तम ठरलीं आहेत. या महिन्याचा अंक प्रसिद्ध होताच बक्षिस १० रुपये मनिऑर्डरनें प्रेषकांचें नांवीं रवाना करण्यांत येईल.

पहिला फोटो: **ब्रह्मदेशाची मी कन्या हो; ब्रह्मगिरीची गिरिबाला!**
दुसरा फोटो: **मी मदनाची चापधारि रति, जिंकिन शिवशंकर भोळा!!**

प्रेषक: **श्री. रा. शं. अत्रे,**
खटाव बिल्डिंग, हेन्स रोड, भायखळा, मुंबई-२७


Fullscreen

127





12 / 80





# निरुपयोगी कला

एका गांवीं एक राजा होता. त्याच्या दरबारीं विद्वान लोकांना मान मिळत असे. उत्तम कारागिरांना बक्षिसें मिळत असत. निरनिराळ्या धंद्यांत प्राविण्य दाखवून कारागीर राजाकडून मान व इनाम दोन्ही मिळवीत. सुतार, लोहार, विणकर, सोनार व इतर धंदे करणाऱ्या लोकांनीं आपलीं कला कुसरीचीं कामें दाखवून मोठा नांवलौकिक मिळविला होता. राजाला विद्येचें व कलेचें खरें खुरें प्रेम होतें.

एकदां एका गांवाहून एका विणकरानें एक उत्तम शाल विणून आणली आणि राजाला दाखविली. ती शाल पाहून राजा इतका खूष झाला कीं, त्यानें त्याला दोनशें रुपयांचें वर्षासन लिहून दिलें.

त्याच गांवीं एक तांबट रहात होता. विणकराला वर्षासन मिळाल्याची गोष्ट त्याला कळली. त्यानें विचार केला, आपण देखील आपली कला राजाला दाखवून बक्षीस मिळवावें.

भांडीं करणें हा त्याचा मुख्य धंदा होता. पण भांड्यांत सुबकपणा आणून बक्षीस मिळविण्या इतकी त्याच्या हातांत कला नव्हती. भांड्यांची दुरुस्ती तो छान करीत असे. त्यांत त्याचा हातखंडा होता. भांड्याला भोंक पडलें असेल तर त्याला सांधा लावून तो नव्या भांड्यासारखें भांडें करून दाखवी. भांडें जुनें आहे कीं नवें, हें देखील कळायला जागा उरत नसे. त्या तांबटानें आपली ही कला राजाला दाखवून बक्षीस मिळविण्याचें ठरविलें. राजाच्यासमोर एका भांड्याला भोंक पाडून तें बुजवून दाखवावें म्हणजे राजाची खात्री पटेल असा त्यानें विचार केला.

त्या तांबटानें गांव भर फिरून तुमचीं जुनीं फुटकीं भांडीं फुकट नवीन करून आणतों असें गांवकऱ्यांना सांगून पुष्कळ भांडीं एकत्र केलीं व एका गाडींत घालून राजवाड्याकडे निघाला.

राजानें त्याला बोलावून येण्याचें कारण विचारलें. तो म्हणाला—"महाराज! मी एक तांबट आहें. आपण कारागिरांचा आदर केलेला ऐकून आपलें कसब दाखविण्यासाठीं आलों आहें. जुनीं फुटकीं भांडीं सांधा लावून मी नवीं करून देतों. सांधा कोठें लागला आहे हें देखील कळणें शक्य नाहीं. आपण एकदां माझें कसब पाहण्याची कृपा करावी."



राजानें होकार दिल्यावर तांबटानें जुनीं भांडीं उचलून त्यांना राजाच्यासमोर एकेक भोंक पाडलें व तें राजासमोरच बुजवून त्यानें राजाला दाखविलें. खरोखरच भांड्यांना भोंक कोठें पडलें होतें हें देखील कळायला जागा नव्हती. सर्वांनीं तोंडांत बोटें घातलीं. राजानें त्या तांबटाला त्याच्या त्या कौशल्याबद्दल बक्षीस देऊन त्याचा सत्कार केला.

तांबटानें घरीं गेल्यावर गांवच्या लोकांचीं भांडीं परत पोंचती केलीं.

त्यानें राजासमोर भांड्यांना जीं भोंकें पाडली होतीं तीं छान बुजली होतीं. पण जुनीं भोंकें जशींच्या तशींच होतीं आणि पाणी घातल्याबरोबर तीं गळूं लागलीं.

गांवकऱ्यांनीं अर्थातच त्याला विचारलें. म्हणाले—"तूं भांडीं नुसतीं उजळवून आणली आहेस. पहा सर्व गळत आहेत. हेंच का तुझें कौशल्य आणि ह्या कौशल्यावरच का तूं इतक्या फुशारक्या मारीत होतास? राजानें काय पाहून तुला बक्षीस दिलें देव जाणें!" तें ऐकून तांबटाला राग आला. राजाकडून त्यानें एवढा मानमरातब मिळविला

सौ. मंगला पाटील


Fullscreen
127




14 / 80



आणि हे गांवकरी त्याचा असा अपमान करतात म्हणजे काय? तो म्हणाला— "माझें कौशल्य स्वतः राजानें पाहिलें आहे. तुम्ही मला किती नांवें ठेवलीत तरी त्याची मला पर्वा नाहीं. तुम्ही जास्त बोललात तर मीच राजाकडे जाऊन तुमच्या विरुद्ध तक्रार करीन."

तांबटाचें तें उत्तर अर्थातच लोकांना आवडलें नाहीं. ते म्हणाले—"राजानें तुझा आदर केला असेल. पण आमच्याजवळ तुझ्या गमजा चालावयाच्या नाहींत. आमचीं भांडीं पुन्हां दुरुस्त करून देतोस कीं नाहीं." लोकांनीं विचारलें.

"मर्जी माझी. तुम्ही कोण विचारणार?" तांबटानें जरा ताठरपणानें उत्तर दिलें.

"मग घरोघरीं येऊन भांडीं मागून न्यायला कोणी सांगितलें होतें तुला? राजाच्या डोळ्यांत धूळ फेंकून तूं बक्षीस मिळविलें असशील. पण तुझी ही हात चलाखी आमच्याजवळ नाहीं चालावयाची!" लोक म्हणाले. त्यावर पुष्कळ भांडण झालें व मारामारी पर्यंत पाळी आली. शेवटीं— "आम्ही राजाकडेच फिर्याद करतों!" असें सांगून लोक राजदरबारीं गेले. त्यांनीं राजाकडे फिर्याद केली व तांबटानें दिलेलें उत्तर पण सांगितलें.

राजानें तांबटाला दरबारांत बोलावून जाब विचारला. म्हणाला—"तुझ्या हातून प्रजेची सेवा जास्त घडावी म्हणून मी हें बक्षीस तुला दिलें. जर गांवकऱ्यांना तूं व तुझी कला उपयोगी पडली नाहीं तर तुझी ती कला निरुपयोगी आहे."

राजानें कानउघाडणी केल्यावर तांबटाचें डोकें ठिकाणावर आलें व त्यानें लोकांचीं सर्व भांडीं पुन्हां नेऊन छान दुरुस्त करून पाठवून दिलीं.





# दक्ष-यज्ञ

## प्रथम अध्याय

ब्रह्मदेव एकांतामध्यें
बसला होता करित विचार।
एकाएकीं सुचला त्याला
यज्ञ करावा असा विचार॥

सुरगण मुनिगण धांवत आले
सारी सामग्री घेऊन।
सांब सदाशिव ध्यान धरुनिया
बसले बाजूला येऊन॥

ऋषी-मुनींनीं उच्च स्वरानें
केला मंत्रांचा उच्चार।
दुमदुमलें नभ विश्व व्यापलें
असा जाहला मंत्रोच्चार॥

होमाग्नीच्या मोठ्या ज्वाळा
चाटूं लागल्या आकाशा।
जिभा जणूं अग्नीच्या ग्रसण्या।
धांवत होत्या आकाशा॥

पडत आहुती होति तुपाची
सतत सारखी दिवस कितीक!
व्याप्त नभाला करीत होते
लोट धुराचे अधिकाधीक॥

दक्ष पाहुण्या यज्ञ पातला
त्याला आलेला पाहून।
तत्क्षण उठुनी करूं लागले
प्रणाम सुरमुनि त्यास लवून॥

ब्रह्मदेव तर जगत्पिता अन्
समाधिस्थ शंकर होता;
उठेल तो ही दक्ष अपेक्षा
करीत आलेला होता॥

परंतु उठले नाहिंत दोघे
क्रुद्ध जाहला हें पाहून;
आणि म्हणाला—"जांवइ शिव, पण
उठला नाहीं मज पाहून!

श्री. भालचंद्र आपटे, हैद्राबाद









Fullscreen 127 16 / 80



“कसली झाली घमेंड ह्याला ?
तुच्छ लेखितो का म्यां हा ?
ओळख माझी खरी न पटली,
कोण कुणाचा होतो हा !”

क्रोध पिउन पण जाउन बसला,
धुमसत अग्नी होता शांत।
लाल लाल डोळ्यांनीं सर्वां
होता तो सारखा पहात ॥

वक्र दृष्टिनें शिवाकडे पण
पहात होता वारंवार।
काय करावें, क्षुब्ध मनानें
करीत होता हाच विचार ॥

बसवेना पण क्षणभर देखिल
स्वस्थ मनानें दक्षाला।
उभा राहिला आणि म्हणाला–
“आज सांगतों, सर्वांला !

“घमेंड ह्याला कसली झाली ?
न कळे मजला कुणि सांगा।
मागत भिक्षा आला होता
भस्म लावुनी हा अंगा ॥

“व्यर्थ वाटतें, ह्याला जें मीं
होतें केलें कन्यादान।
नव्हतें ठाउक करिल असा हा
कधींतरी माझा अपमान ॥

“काम न धंदा ह्याला कांहीं
एक आळशी मुलखाचा।
गळ्या भोंवती सर्प भयंकर
वस्त्र न अंगावर ह्याच्या ॥

“निवास ह्याचा स्मशानांत अन्
फिकीर जगताची नाहीं।
लाज मनाची नसेल ह्याला
चाड जनाची तरि कांहीं ?

“आलों पाहुन मज सर्वांनीं
उठुन आज जो दिधला मान।
ह्यास कसा तो दिसेल बसतां
मिटून डोळे उघडुन कान ॥



“ब्रह्मदेव शेजारीं बसले
म्हणून दिसतो चढला मान।
सभेंत केला माझा ह्यानें
असा गर्व करुनी अपमान ॥

“कळेल, पण फळ ह्याचें मिळतां
करिल व्यर्थ हा पश्चात्ताप।
यज्ञभाग नच नशिबीं ह्याच्या
ह्याला माझा हा अभिशाप !!”

असें सांगुनी मंत्रवलेलें
शिंपडलें त्यानें पाणी।
चकित जाहले सुरमुनि ऐकुनि
क्रोधित दक्षाची वाणी ॥

हजर तिथें जे सुर-मुनि होते
म्हणूं लागले–“शिवास शाप !!
‘शिव’ ‘शिव’ ह्यानें काय समजुनी
दिधला शिवास असला शाप !”

“अधिकारी पुरुषानें द्यावा
शाप आणि वर छोट्यांना।
शाप शंकरा थट्टा झाली !
कळेल का पण खोट्यांना ?”

भृगमुनिंना अन् अनुयायांना
गैर न दिसलें कांहीं त्यांत।
शाप-वाणि ती ऐकुन झाले
होते ते संतुष्ट मनांत ॥

नाहिं शिवाचें आवडलें त्या
तेज आणि वाढता प्रताप।
प्रसन्न म्हणुनी झाले होते
ऐकुनि दक्षाचा तो शाप ॥

यज्ञ समारंभाच्या वेळीं
सुरू जाहला वादविवाद।
तट पडले या विषयावरती
देतो कोण कुणाला दाद ॥



Fullscreen 127 18 / 80

शंकर होते समाधिस्थ अन्
स्वस्थ शांत मन निर्विकार।
पण नंदीनें क्रोधित होउन
अकस्मात केला हुंकार–

"महादेव शिव, दक्षाला या
करतिल उठुनी काय प्रणाम?
कीं दक्षानें स्वतः करावा
सांबशिवाचें घेउनि नाम?

"विचार इतका नसेल ज्या तो
असेल पशु ही नर नाहीं।
मूर्ख दक्ष तो पर्वा त्याची
आम्हां कोणाला नाहीं!

"देतों मी पण शाप तयाला
नरा सारखा देह मिळेल
डोकें मेंढ्याचें अन् अक्कल
तशीच त्याला खास असेल!!"

भृगु ऋषिंना तें ऐकुनि आला
क्रोध भयंकर अन् वदले–
"ऐक शाप तूं, भक्त शिवाचे
क्रोधी होतिल तर सारे।

"स्वस्थ चित्तता दुर्मिळ त्यांना
जडवत् जीवन घालवितील।
मूर्खपणानें सदा स्वतःवर
स्वतः संकटें आणवितील!"

चढाओढ शापांची पाहुनि
शंकर स्मित करुनी उठला।
यज्ञ वेदिका सोडुनि गेला
म्हणत–"यज्ञ हा का असला!"

नव्हतें मन कोणाचें तिकडे
पडत तुपाची होती धार।
यज्ञ राहिला होता चालू
कसा तरी अन् पडला पार॥






[ ११ ]

[ नागवर्मा कपिलपुरच्या किल्ल्याकडेच पळत येत आहे हें कळल्यावर चित्रसेननें आपले अनुयायी व उग्राक्षाचे अनुयायी सर्वांना लपून बसायला सांगितलें. करवीरनें सुचविलें कीं, किल्ल्यांत प्रथम सैन्य पाठवून मग आपण प्रवेश करावा. कारण त्यावरून शत्रु आंत लपून बसला आहे की नाहीं तें कळेल. पुढें वाचा. ]

करवीरचा सल्ला नागवर्माला पसंत पडला. कारण परिस्थिति पाहून त्याला देखील किल्ल्यांत पाऊल टाकायला भय वाटूं लागलें होतें. एकदां त्यानें पडक्या दरवाज्याकडे पाहिलें व म्हणाला–"तूं म्हणालास तें बरोबर आहे. आपण तसेंच करूं या." नंतर आपल्या सर्व सैनिकांना संबोधन करून तो म्हणाला–"शिरा भराभर किल्ल्यांत. नशिबानें किल्ल्यांत कोणी नाहीं व रक्त सांडल्याशिवाय किल्ला हातीं येत आहे. देव पाठिराखा आहे म्हणून भिण्याचें कांहीं एक कारण नाहीं."

आपल्या नायकाची आज्ञा होतांच सर्व सैन्य आंत शिरलें. आंत काय वाढून ठेवलें आहे हें त्यांना कोठें माहीत होतें? नागवर्मा व करवीर किल्ल्याबाहेर उभे राहून मोठमोठ्यानें ओरडत होते–"लवकर चला आंत. किल्ल्याची डागडुजी करून तारकेश्वराचें सैन्य

Fullscreen 127 20 / 80




येण्याच्या आधीं स्वतःच्या रक्षणाची व्यवस्था करावयास हवी. वगैरे वगैरे."

सर्व सैन्य किल्ल्यांत शिरलें. नागवर्मा व करवीर दोघांनीं थोडा वेळ किल्ल्यांतून कांहीं आवाज येतो का, पाहिलें. पण आंत सर्व सामसूमच आहे हें पाहून त्यांची हिंमत वाढली.

"आपण उगाच भ्यालों. किल्ल्यांत कोणी दिसत नाहीं. चला आंत जाऊन किल्ल्याच्या रक्षणाची कांहीं तरी व्यवस्था करूं या." नागवर्मा म्हणाला.

करवीरनें मान हालवून आपला होकार दिल्यावर दोघांनीं आपापले घोडे वळविले आणि एका पडक्या दरवाज्यांतून आंत जाऊं लागले. किल्ल्यांत चार पावलेंच ते गेले असतील, त्यांना ओरडा ऐकूं आला–"राक्षस! राक्षस !! पळा! पळा !!" आणि कांहीं सैनिक पळत येत असलेले दिसले.

"महाराज! आपण फंसलों. चांगलेंच फंसविलें आपल्याला. उलट पावलीं परतूं या! समोरासमोर राक्षसांशीं किंवा कोण-त्याहि सैन्याशीं युद्ध करण्यांत अर्थ नाहीं. जगलों तर शत्रूला तोंड देण्यासाठीं मार्ग शोधून काढतां येईल. आतां स्वरक्षणासाठीं पळ काढणें हा एकच मार्ग आहे." करवीर म्हणाला आणि त्यानें आपला घोडा फिरविला.

"चोर भामटे कोठले. यांनीं आपल्याला चांगलेंच ठकविलें म्हणावयाचें." असें म्हणत नागवर्मानें पण आपला घोडा वळविला आणि दोघांनीं भरधांव आपले घोडे सोडले.

"पहा तो बंडखोर पळाला. पकडा त्याला." चित्रसेनाचा आवाज नागवर्माच्या कानीं पडला. राक्षस सैनिक नागवर्माला धरण्यासाठीं त्याच्या पाठीमागें धावूं लागला. वाटेंत जे मोठमोठे दगड मिळाले ते उचलून मारूं लागले.



"महाराज! आपण झाडींत शिरूं या. झाडींत दगड लागणार नाहीं व पळतां येईल." करवीर म्हणाला.

"ठीक आहे! ठीक आहे!" असा ओरडत नागवर्मा करवीरच्या पाठोपाठ रानांत शिरला. पण तेवढ्यांत राक्षसानें फेंकलेली गदा करवीरच्या घोड्याला लागली. त्याचा मागचा पाय मोडला आणि घोडा कोलमडून खालीं पडला. त्याबरोबर करवीर देखील खालीं पडला. पण त्याला फारसें लागलें नाहीं. थोडें खरचटलें असेल एवढेंच. अंग झाडून पुसून तो धनुष्यबाण घेऊन एका झाडाआड जाऊन बसला.

करवीर खालीं पडतांना ओरडला–"महाराज!" नागवर्माचा घोडा थोडा पुढें निघून गेला होता. त्यानें घोड्याला थांबवून मागें वळून पाहिलें. करवीरचा घोडा तडफडत होता. करवीर एका झाडाआड बसलेला होता. राक्षस दूर होते. चित्रसेनाचें सैन्य तर पुष्कळच दूर होतें. त्या झाडींत दगड येऊन लागणें शक्य नव्हतें. नागवर्मा घोडा घेऊन करवीर जवळ आला. करवीर ओरडत "महाराज! महाराज!" जवळ येऊन उभा राहिला.



"येथें उभें राहण्यांत अर्थ नाहीं. राक्षस आणि सैनिक येण्यापूर्वी स्वतःच्या बचावा-साठीं दूर पळून गेलें पाहिजे." नागवर्मा म्हणाला.

करवीरनें किल्ल्याकडे वळून पाहिलें. त्यांचे कांहीं सैनिक दुसऱ्या वाटेनें पळत येत असलेले दिसले. त्यांना पाहून राक्षस तिकडे वळले. चित्रसेनाचे सैनिक देखील त्यांचा पाठलाग करूं लागले.

नागवर्मा म्हणाला—"करवीर आतां बचाव होणें कठीण. तुझा घोडादेखील मरून पडला आहे. पण तुला एकट्याला येथें


Fullscreen

127





22 / 80





सोडून जायला मी तयार नाहीं. दोघांनीं बरोबरच मरायचें किंवा जगायचें आले. चल दोघे एकाच घोड्यावर जितकें दूर पळतां येईल, पळूं या."

"महाराज! शत्रूनें आपल्याला फसविलें आहे. आपण देखील तेंच करूं या. 'शठे शाठ्यम्' दुसरा उपाय नाहीं. यांना हुलकावणी देऊन आपण दुसऱ्या बाजूनें पळून जाऊं या. पळत येणाऱ्या आपल्या दोघां सैनिकांना आपला घोडा देऊन त्यांना रानांत पळून जायला सांगूं या. त्यांना पाहून शत्रूला वाटेल कीं, आपण दोघे पळून जात आहों व ते त्या बाजूला जातील. आपण दुसऱ्याच वाटेनें पळून जाऊं या." करवीर म्हणाला.

करवीरचा सल्ला नागवर्मीला पटला. तो घोड्यावरून खालीं उतरला. पळत येत असलेल्या दोघां सैनिकांना बोलावून त्यांनीं घोड्यावर बसून पळायला सांगितलें. त्यांचें शिरस्त्राण काढून घेऊन आपलें त्यांना घालायला दिलें, आणि म्हणाले—"तुम्ही जिकडे वाटेल तिकडे पळा. ते पहा राक्षस व चित्रसेनाचे सैनिक येत आहेत." असें सांगून त्या दोघां सैनिकांना पाठवून दिलें आणि स्वतः दोघे एका खडकाआड उभे राहिले.

दोघां सैनिकांना वाटलें कीं, देव पावला व त्यांनीं भरधांव घोडा सोडला. नागवर्मा करवीरची पाठ थोपटून म्हणाला—"करवीर! तुझें डोकें सुपीक आहे यांत शंका नाहीं. काय पण शक्कल काढलीस! बरें आतां आपण येथून पाय काढला पाहिजे! कोणत्या बाजूला जाऊंया?"

करवीरनें चित्रसेनाचे सैनिक येत असलेले पाहिले व हालचाल केल्याशिवाय आड बसून राहायला सूचना केली.

चित्रसेनाच्या सैनिकांनीं एकाच घोड्यावर दोघांना पळत असलेले पाहिलें. त्यांचें

Fullscreen 127 24 / 80



शिरस्त्राण पाहून व त्यांनाच नागवर्मा व करवीर समजून ओरडले—"तो पहा नागवर्मा! बरोबर करवीर पण बसला आहे. एकाचा घोडा पडला आहे येथें. म्हणून दोघे चालले आहेत एकाच घोड्यावरून. पकडा त्यांना!"

त्यांचा आवाज ऐकून करवीर स्मित करून म्हणाला—"पाहिलेंत महाराज! आपली युक्ति यशस्वी झाली. चला, पश्चिमेकडे आपण पळून जाऊं या."

नंतर नागवर्मा व करवीर झाडीच्या आड लपत छपत चित्रसेनाच्या सैनिकांची नजर चुकवीत दाट रानांत जाऊन पोंचले. तेथें कोणाला हि त्यांचा मागमूस देखील लागणें शक्य नव्हतें.

सैनिकांनीं नागवर्मा व करवीर समजून ज्या दोघांना पकडून आणलें होतें त्यांना चित्रसेन व उग्राक्षासमोर हजर करण्यांत आलें. चित्रसेनानें त्यांना विचारलें—"कोठें गेले तुमचे नायक करवीर आणि नागवर्मा!"

बिचाऱ्यांनीं घडलेलें वृत्त खरें खरें सांगून टाकलें व म्हणाले—"महाराज! आम्हांला काय माहीत कीं, स्वतःचा बचाव करून घेण्यासाठीं त्यांनीं आम्हांला आगींत ढकललें आहे! ते कोठें गेले आम्हांला कांहीं माहीत नाहीं."

तें ऐकून चित्रसेन व उग्राक्ष फार काळजींत पडले. "एकूण आपला सर्व खटाटोप वायां गेला म्हणावयाचा. पण निराश होऊन स्वस्थ बसण्यांत कांहीं हंशील नाहीं." चित्रसेन म्हणाला.

"महाराज! आपण बेफिकीर रहावें. या रानांतून ते कोठें पळतात पाहातों. मी आपलें सर्व राक्षस सैन्य पाठवितों. आमच्या जातीला माणसाचा वास कळतो. सर्व रान



पालथें घालून दोघांना पकडून घेऊन येतों." उग्राक्ष म्हणाला. उग्राक्षाची आज्ञा होतांच राक्षस आपापलीं शस्त्रास्त्रें घेऊन रानांत शिरले.

कांहीं वेळानें चित्रसेनाचा सेनापति परत आला. चित्रसेनानें त्याला आपले वडील तारकेश्वर महाराज यांच्या मदतीसाठीं पाठविलें होतें. त्याच्या पाठोपाठ तारकेश्वर महाराज पण येऊन पोंचले. आपल्या मुलानें स्वतःच्या बळावर कपिलेश्वरचा किल्ला सर केला आहे हें ऐकून तारकेश्वर महाराजांना फार आनंद झाला. पण त्याबरोबरच नागवर्मा सर्वांच्या हातावर तुरी देऊन निघून गेला हें ऐकून थोडें वाईट वाटलें. म्हणाले—

"तो जिवंत राहिला तर आपल्या राज्यांत सुख शांति राहणें शक्य नाहीं. नित्य कांहीं ना कांहीं तरी उपद्रव होतच राहणार. कारण अग्निद्वीपाच्या लोकांशीं त्याचा संबंध आहे. सैन्याची जमवाजमव करून तो पुन्हां येणार नाहीं कशावरून!"

सर्वांच्या मनांत तीच शंका होती. परंतु उग्राक्षाचे अनुयायी त्या दोघांना पकडून आणतील एवढें मात्र सर्वांना वाटत होतें.

चित्रसेनानें आपले वडील तारकेश्वर महाराज व कपिलेश्वरचे महाराज वीरसिंह यांचा



परस्परांशीं परिचय करून दिला. वीरसिंहानें चित्रसेनाच्या उपकाराबद्दल त्याचे आभार मानले व म्हणाला—"चित्रसेनानेंच माझा बचाव केला. नाहींतर मी तरी जीवाची आशा सोडूनच दिली होती. मला राज्याचा मोह नाहीं. सुयोग्य वर पाहून मुलीचें लग्न करून दिलें कीं माझें या जगांतलें काम आटोपलें. सुदैवानें चित्रसेनासारखा वर लाभला आहे. आपली परवानगी असेल तर मी लग्नाची तयारी करतों."

तारकेश्वर महाराजांना कांतिमतीची सुटका चित्रसेनानें केल्याची गोष्ट व दोघांचें

Fullscreen 127 26 / 80

परस्परांवर प्रेम असल्याची गोष्ट सैनिकांनाही कळलीच होती. म्हणून त्यांनी आनंदानें आपली संमती दिली.

लग्नाचा मुहूर्त ठरला. विवाहाच्या दिवशीं चित्रसेनानें सर्व सैनिकांना इनाम वाटलीं. उमाक्षाला कांहींतरी विशेष इनाम देण्याचें ठरवून त्यानें त्याला विचारलें—"उमाक्षा ! मला तूं जी मदत केली आहेस त्या उपकाराबद्दल तुझा उतराई होणें अशक्य आहे. आम्ही दोघे तुझे फार फार आभारी आहों. या मंगलप्रसंगीं तूं काय वाटेल तें माग मी द्यायला तयार आहें."

"महाराज ! पुन्हां विचार करून बोला ! मी मागेन तें द्यायला तुमच्या मनाला कष्ट होईल." उमाक्ष म्हणाला.

"तसें कांहीं नाहीं उमाक्ष ! माग, काय वाटेल तें माग." चित्रसेनानें आग्रह केला.

"महाराज ! मागें मी आपणाकडे आपला पहिला मुलगा अठरा वर्षांचा झाल्यावर द्यायला सांगितलें होतें. पण माझा विचार आतां बदलला आहे. आपण आपलें पहिलें मूल मग तो मुलगा असो अगर मुलगी पांच वर्षांचें झाल्यावर मला द्यावें." उमाक्ष म्हणाला.

तें ऐकून चित्रसेन किंकर्तव्य विमूढ स्थितींत कांहीं वेळ बसून राहिला. नंतर त्यानें विचार केला कीं, मुलाला दिलें हें पाहिजेच. मग मुलगा मोठा झाल्यावर देण्यापेक्षां लहानपणींच द्यायला काय हरकत आहे ! असा विचार करून तो म्हणाला—"उमाक्षा ! ठीक ! तुझी इच्छा मला मान्य आहे !"

उमाक्षाला परमानंद झाला. त्यानें नमस्कार केला व म्हणाला—"महाराज ! मी याबद्दल आजन्म आपला ऋणी राहीन."

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]





# नवरी मुलगी बदलली....

कोशलदेशाच्या राजाचा एकुलता एक मुलगा कमलाकर हा रूपानें जणुं कांहीं मदनाचा अवतारच होता. कोशलदेशाच्या राजधानींत एक भाट रहात असे. देशाचा राजा व राजघराणें यांचें कीर्तिगान हा एकच धंदा तो करीत असे. तो स्वामिभक्त पण तसाच होता. भ्रमण करीत आपल्या राजाची कीर्ति गात तो विदिशानगरीं आला. तेथें तो एका नृत्यकलेच्या आचार्याच्या घरीं उतरला.

एके दिवशीं तो नृत्याचार्य म्हणाला—"आज राजकन्येचें नृत्य आहे. ती माझी शिष्या आहे. तुला नृत्य पहायला यायचें असेल तर ये." भाट नृत्याचार्यांच्या बरोबर राजसभेंत गेला. राजकन्या हंसावतीचें नृत्य सुरू झालें. तिचें सौंदर्य व नृत्य पाहून रंभा व उर्वशींच्या माना देखील खालीं झाल्या असत्या. भाटाच्या मनांत विचार आला ही राजकन्या आपल्या युवराजांजोगती आहे.

त्या दिवशीं राजसभा संपल्याबरोबर त्यानें आपल्या उपरण्यावर लिहिलें—"माझ्या चित्रकलेची बरोबरी करणारा कोणी असेल तर त्यानें पुढें यावें !" आणि राजद्वारांतच बसून राहिला.

राजाची नजर आकर्षण्यासाठींच त्यानें ती युक्ति काढली होती. राजानें त्याला बोलावून राजकन्येच्या महालाच्या भिंतीवर चित्रें काढण्यास त्याला पाठविलें. त्यानें राजकन्या हंसावतीच्या महालांत भिंतीवर कमलाकरचें सुंदर चित्र काढलें.

परंतु त्यानें तें कोणाचें चित्र काढलें आहे हें कोणाला सांगितलें नाहीं. हंसावतीनें देखील विचारलें नाहीं. तें चित्र

श्री. पां. ना. नाईक

Fullscreen 127 28 / 80



पाहून ती मुग्ध झाली. परंतु तिला वाटलें कीं चित्रकाराच्या कल्पनेंतलें तें चित्र असावें. मदनाला लाजविणारा हा राजपुरुष जगांत मिळणें अशक्य. ती टक लावून तासन् तास तें चित्र पहात राही.

आपला हेतु पार पडावा म्हणून भाटानें आणखी एक युक्ति केली. त्यानें आपल्या एका मित्राला विदूषकाचा वेषांत राजमहालांत जाऊन चातुर्यानें तें चित्र राजकुमार कमलाकरचें आहे हें राजकन्येच्याचें कानावर घालायला सांगितलें. विदूषक गमती करीत राजमहालांत गेला. राजघराण्यांतले लोक गमती पहायला जमा झाले. राजकन्येच्या महालांत जाऊन त्यानें कमलाकरचें चित्र पाहून जणुं कांहीं स्वतःलाच विचारलें— "अरे! हें तर राजकुमार कमलाकरचें चित्र दिसतें आहे. येथें कसें काय आलें? कोणी काढलें? कोणासाठीं काढलें?"

भाट तेथें होताच. त्यानें विदूषकाला विचारलें—"कायरे तूं पाहिलें आहेस का त्या राजकुमाराला? हें चित्र कल्पनेनें मी काढलें आहे!"

"आला आहे मोठा कल्पनेनें काढणारा! हें तर कोशलदेशाच्या युवराजाचें चित्र आहे!" विदूषक म्हणाला.

अशा प्रकारें अगदीं सहज विदूषकानें आपली कामगिरी बजावली. आजपर्यंत राजकन्या हंसावतीनें इतका सुंदर पुरुष पाहिला नव्हता. त्याचें रूपलावण्य पाहून तिच्या मनांत प्रेमांकुर रुजला व कमलाकराच्या दर्शनासाठीं तिचें मन अधीर झालें.

भाट एवढ्यावर थांबला नाहीं. तो स्वदेशीं गेला व त्यानें विदिशानगरीच्या राजकन्येच्या सौंदर्याचें वर्णन केलें. कमलाकराच्या मनांत देखील हंसावती विषयीं प्रेम वाढूं लागलें.



एकदां राजा युवराजाला बोलावून म्हणाला—"युवराज! तूं या देशाचा होणारा राजा! पराक्रम दाखवून राज्य वाढविलेंस तर तुझी कीर्ति अजरामर होईल. अंगदेशाचा राजा आपल्या देशावर स्वारी करण्याचा बेत करीत आहे. तूं तो निघण्यापूर्वीच त्याच्या राज्यावर स्वारी करून त्याचा पराभव कर."

कमलाकरनें विचार केला दिग्विजय करीत विदिशानगरीस जाण्यास छान संधि लाभली आहे. तिचा उपयोग करून कां घेऊं नये. त्यानें आपल्या वडिलांच्या इच्छेप्रमाणें दिग्विजय करण्यास निघण्याचें ठरविलें. तो पराक्रमी होताच. त्यानें अंगदेशावर स्वारी केली व अंगदेशाच्या राजाचा पराभव करून त्याला कैद करून आणलें. नंतर त्यानें आपल्या वडिलांकडे निरोप धाडला कीं, मी दिग्विजय करीत सावकाश राजधानीस परत येईन.

कमलाकर एका मागून एक देश जिंकीत विदिशानगरीजवळ येऊन पोंचला. नगरा बाहेर तळ देऊन त्यानें राजाकडे दूत पाठविले.

हंसावतीच्या वडिलांनीं कोशलदेशाच्या युवराजाचा पराक्रम ऐकलाच होता. तो नगराबाहेर तळ देऊन बसला आहे हें ऐकून विदिशाचा राजा घाबरला. युद्ध करण्या ऐवजीं संधी करून घेऊन मोकळें व्हावें, असें त्यानें ठरविलें.



पण कमलाकरच्या दूतांनीं युद्धाची किंवा संधीची गोष्ट सोडून हंसावतीला मागणी घातलेली पाहून त्याच्या जिवांत जीव आला. तो लगेच कमलाकरला भेटण्यासाठीं निघाला.

कमलाकरच्या खेम्यांत पोंचल्यावर म्हणाला—"युवराजांनीं स्वतः एवढी तसदी कशाला घेतली? कोणाबरोबर निरोप पाठविला असता तर मी स्वतः कोशलराजाच्या

Fullscreen 127 30 / 80



दरबारीं हजर झालों असतों. माझ्या मुलीचें केवढें भाग्य कीं युवराजांनीं स्वतः तिला मागणी घालावी. माझी मुलगी सुद्धां फार गुणी आहे हो. तिनें लहानपणापासून व्रतें व वैकल्यें करून गौरीची कृपा संपादन केली आहे. तिचा हात गुणच असा आहे कीं, कोणाला कितीहि ताप असो, माझ्या मुलीनें हात लावल्याबरोबर ताप बरा होतो."

विवाह मुहूर्त ठरला. हंसावतीला खरेंच वाटेना. भिंतीवर तिनें मदनाला लाजविणारें रूप पाहिलें होतें. हा युवराज तोच कीं आणखी कोणी दुसरा. वडिलांनीं त्याचें शक्ति सामर्थ्य पाहून मला त्याच्या गळ्यांत बांधून टाकण्याचा विचार तर केला नसेल !!

तिच्या दोन मैत्रिणी होत्या. एकीचें नांव होतें मंजरी व दुसरीचें कलिका. तिनें मंजरीला जवळ बोलावून तिच्या कानांत सांगितलें कीं, तूं जाऊन युवराजांना भेट. भिंतीवर ज्याचें चित्र आहे तोच तो आहे कीं आणखी कोणी, नीट पाहून ये.

मंजरी एका योगिणीचा वेष करून युवराजाला पाहून आली. त्याचें सौंदर्य पाहून ती स्वतःच त्याच्यावर मुग्ध झाली. त्याच्याशीं स्वतःच लग्न करावें असें ठरवून तिनें आपली मालकीण हंसावती हिला सांगितलें कीं, तुझ्या नशिबीं देवानें काय लिहून ठेवलें आहे कोणास ठाऊक ! मी गेलें तेव्हां लोकांनीं त्याला धरून ठेवलें होतें व त्याला खूप मारीत होते. म्हणे त्याच्या मानेवर भूत बसलें होतें तें उतरवीत होते. मग मी त्याच्याशीं काय बोलणार व तो काय बोलणार ?

"अगो बाई ! ऐकूनच माझ्या अंगावर शहारे उभे रहात आहेत. त्याची पीडा नको मला. सांग कांहीं तरी उपाय आपली सुटका करून घ्यायला." हंसावती म्हणाली.

"एक उपाय आहे सुटका करून घ्यायला, तुला पटेल तर ! लग्नाच्या वेळीं दुसरी कोणी उभी केली कीं झालें. तिला तुझे कपडे घालून उभें करावें. आपण दोघी कोठें तरी पळून जाऊं." मंजरीनें सुचविलें.

"आणखी कोण कशाला ? तूंच ही जबाबदारी पार पाड. मी आपली साडी चोळी तुला देतें, सर्व दाग दागिने देतें. ऐन वेळीं तूं हे कपडे घालून उभी हो म्हणजे झालें. मी चोरवाटेनें राजवाड्या-बाहेर पळून जाईन." मंजरीच्या बोलण्यावर पूर्ण विश्वास करून बिचारी म्हणाली.

लग्नाच्या दिवशीं हंसावतीच्या खोलींत तिच्याबरोबर मंजरी व कलिका होत्या. मंजरी नवऱ्यामुलीची साडी-चोळी नेसून तयार झाली हंसावतीनें मंजरीचे कपडे बदलून घेतले.

मंजरी हंसावतीला म्हणाली—"हें बघ ! मुहूर्त अगदीं जवळ येऊन ठेपला आहे. तूं पश्चिमेकडच्या दारानें बाहेर जा. सुमारें एका कोसावर एक मोठें वडाचें झाड आहे. त्या झाडाच्या बुंधाला एक पोकळी आहे. तींत लपून बस. मी तुला येऊन भेटेन." असें सांगून तिनें हंसावतीला पाठवून दिलें.



संध्याकाळची वेळ होती. हंसावती निघून गेल्याची गोष्ट कोणाला कळली नाहीं. एक कोस चालून गेल्यावर तिला वडाचें एक वाळकें झाड दिसलें. खरोखरच त्याच्या सोडाला एक पोकळी होती. पण काळोखांत त्या पोकळींत शिरण्याची तिला गरज भासली नाहीं. या शिवाय तिला भीति पण वाटत होती. म्हणून ती शेजारच्या दुसऱ्याच एका झाडावर चढून मंजरीची वाट पहात बसली.

तिकडे मंजरीनें कलिकाला सांगितलें कीं, राजकुमारीला हा संबंध आवडला नाहीं. म्हणून हा उपाय करावा लागला. परंतु या

Fullscreen 127 32 / 80



बाबतींत या कानाची गोष्ट त्या कानाला कळतां कामा नये. मी तुला आपल्याबरोबर घेऊन जाईन व सुखानें ठेवीन."

वधूला मांडवांत आणण्यांत आलें. रीती-प्रमाणें तोंडावर पदर होता म्हणून तिला कोणी ओळखलें नाहीं. लग्न समारंभ अटोपला. कमलाकर मंजरीला हंसावती समजून तिला घेऊन स्वदेशीं निघाला. त्यानें हंसावतीला पूर्वी कधींच पाहिलें नव्हतें. नवरा बायको अंबारींत बसून पश्चिमेकडील दारानेंच निघालीं. हत्ती त्या झाडाजवळ पोंचल्यावर मंजरीनें कमलाकरला घट्ट आवळून धरलें, जणुं कांहीं तिला कोणी धरायला येत आहे."

"काय, झालें काय भ्यायला?" कमलाकरनें तिला विचारलें. मंजरी म्हणाली— "कांहीं नाहीं, मला काल एक फार वाईट स्वप्न पडलें. मी याच झाडाजवळ आलें आणि झाडावरून एक भूत उतरून माझ्या मानेवर बसलें. तें मला खाणार इतक्यांत माझ्या नशिबानें तेथें एक ब्राह्मण मांत्रिक आला व त्यानें मला सोडविलें. त्यानें हें झाड जाळून टाकलें होतें. आतां तें पाहून मला भीति वाटत आहे."

तें ऐकून कमलाकरनें आपल्या सैनिकां-करवीं तें झाड जाळून टाकविलें व म्हणाला— "त्या झाडावरून कोणी उतरतांना दिसलें तर त्याला सुद्धां आगींत फेंकून द्या."

झाड जळून गेल्यावर मंजरीला हायसें वाटलें. आतां हंसावतीचें भूत माझ्या वाटेला येणार नाहीं. तिला फार आनंद झाला. कमलाकर तिला घेऊन आपल्या राजधानींत गेला. राजानें त्याचा राज्याभिषेक केला व स्वतः वानप्रस्थाश्रमांत प्रवेश केला. मंजरी आतां पट्टराणी म्हणून कोशलच्या राजवाड्यांत राहूं लागली.



दुसऱ्या झाडावर बसून हंसावतीनें तें सर्व दृश्य पाहिलें व मंजरीनें तिला कसें फंसविलें हे तिच्या चांगलें लक्षांत आलें. पण तिनेंच घाई केली होती व मंजरीच्या बोलण्यावर विश्वास केला होता. स्वतःच्या हातानें लावलेल्या विष-वृक्षाचीं फळें तिलाच चाखावीं लागलीं. तिला फार वाईट वाटलें. तिला जगाचा वीट आला. आत्महत्त्या करून मोकळें व्हावें असें तिला वाटलें. परंतु कोण जाणें पुन्हां आपलें नशीब उघडेल असा विचार करून तिनें आत्महत्त्येचा विचार मनांतून काढून टाकला. ती रानांत राहून तपश्चर्या करूं लागली. सूर्याची उपासना सुरू केली. फक्त फलाहार करून त्यावरच राहूं लागली.

तिकडे कमलाकर एकाएकीं आजारी पडला. त्याला भयंकर ताप आला व तो कमी होण्याऐवजीं सारखा वाढतच गेला. मंजरी भ्याली. हंसावतीच्या हातगुणाची गोष्ट सर्व जगाला माहीत होती. तिच्या प्रयत्नानें कमलाकरचा ताप उतरला नाहीं तर लोकांना संशय येईल. परंतु कमलाकर स्वतः ती गोष्ट विसरून गेला होता. म्हणून तिनें मनाची समजूत घालून घेतली.



पण तिच्या मनांत धाकधूक होत होती. ही कलिका कोणाजवळ बोलली तर! कलिकाचा कांटा दूर करायला व कमला-करचा ताप बरा व्हायला तिनें एक युक्ति योजली.

संधि साधून ती कलिकाला बरोबर घेऊन एका जुन्या पडक्या देवीच्या देवळांत गेली. तें कालीचें देऊळ होतें. तिनें एक बकरा बळी देऊन त्याच्या डोळ्याला धुरी दिली. नंतर तिनें कमलाकरचें एक चित्र काढलें व त्या चित्राला साष्टांग नमस्कार करून कलिकाला पण करायला सांगितला. मंजरीचा


Fullscreen

127



34 / 80



काय हेतु आहे हें न ओळखून विचारी कबूल झाली. लगेच मंजरीनें कट्यार काढून तिला मारण्यासाठीं वर उचलली. पण कलिका वेळेवर सावध झाली व उठून मोठ्यानें 'बांचवा बांचवा!' म्हणून ओरडत दूर निघून गेली. जवळपासचे लोक तिचा आवाज ऐकून जमा झाले. त्यांनीं मंजरीला देवळांत पाहिलें. नरबळी देण्याचा ती प्रयत्न करीत होती हें पाहून त्यांनीं तिला खूप बडवून काढलें. ती राजाची राणी आहे हें कोणालाहि माहीत नव्हतें. ते तिला धरून कोतवालाकडे गेले. पण कमलाकरच्यासमोर तिला आणावेंच लागलें नाहीं. त्यापूर्वींच ती गतप्राण झाली.

कलिकेकडून लोकांना व कमलाकरला सर्व वृत्त कळलें. हंसावती जिवंत असणार असें कमलाकरच्या मनाला वाटलें. त्यानें तिच्या शोधार्थ लोक पाठविले. स्वतः कलिका पण बरोबर गेली.

शोध काढीत काढीत लोक त्या रानांत पोंचले व हंसावती जेथें तपश्चर्या करीत होती तेथें येऊन पोंचले.

कलिका बरोबर असल्या कारणानें हंसावतीला ओळखणें कठीण नव्हतें. दोघी मैत्रिणी भेटल्या. कलिकेच्या तोंडीं मंजरीनें तिच्याशीं दगा करून स्वतः राणी व्हायचा कसा प्रयत्न केला हें ऐकून तिला वाईट वाटलें.

नंतर हंसावतीच्या वडिलांकडे निरोप पाठविण्यांत आला. हंसावती कमलाकरच्या सैनिकांबरोबर कोशल देशांत गेली. तिनें स्पर्श केल्याबरोबर कमलाकरचा ताप उतरला. पुन्हां एका सुमुहूर्तावर त्याचें हंसावतीशीं लग्न झालें.

त्यानंतर त्या दोघांचें पुढील आयुष्य सुखाचें गेलें. त्यांच्या राज्यांत नेहमीं सुख व शांतता नांदत होती.






# ठकांचा गुरु

बगदाद शहरांत एक श्रीमंत व्यापारी रहात असे. त्यानें जगाचा प्रवास केला होता. पण एका डोंगरी मुलखांतील एका गांवीं तो कधीं गेला नव्हता. तें गांव ठकांचें म्हणून त्या काळीं प्रसिद्ध होतें. त्या गांवाहून परत आलेल्या एका प्रवाश्याची व त्याची गांठ पडली.

त्यानें त्याला विचारलें—"त्या गांवीं कोणत्या वस्तूचा खप जास्त आहे?" तो म्हणाला—"चंदनाचें लाकूड पुष्कळ खपतें." पण त्या देशांतील लोक, त्यांची राहणी चाली रीती वगैरे संबंधीं त्यानें विचारलें नाहीं व त्यानें स्वतः होऊन कांहीं सांगितलें पण नाहीं.

व्यापारी चंदनाचें लाकूड एका उंटावर लादून त्या गांवीं निघाला. गांवांत प्रवेश करण्यापूर्वीं त्याला एक म्हातारी भेटली. ती मेंढरें चरायला घेऊन गेली होती. तिनें व्यापाऱ्याकडे पाहून कोणी परदेशी असावा हें ओळखलें व म्हणाली—"सांभाळून रहा बाबा! या गांवचे लोक भामटे चोर आहेत. ठकविद्येंत प्रवीण! परदेशी लोकांना फंसवून लुबाडणें हाच यांचा धंदा आहे. म्हणून जरा जपून रहा!" असें सांगून म्हातारी निघून गेली.

व्यापारी त्या गांवीं पोंचला तोंपर्यंत चांगला काळोख पडूं लागला होता. गांवाचें फाटक बंद झालें होतें. म्हणून त्याला ती रात्र गांवाबाहेरच काढावी लागली. दुसऱ्या दिवशीं उजाडतांच तो गांवांत गेला. वाटेंत त्याला एक मनुष्य भेटला. त्यानें व्यापाऱ्याला त्याचें नांव गांव विचारलें.

व्यापारी म्हणाला—"मी बगदादचा राहणारा आहें. चंदनाचा व्यापार ह्या गांवीं चांगला चालतो हें ऐकून आलों आहें."

श्री. बा. ल. सोमण

Fullscreen
127
36 / 80











"कोणीं सांगितलें तुला ? अरे आम्ही चंदनाचीं लाकडें सरपण म्हणून वापरतों. सरपणाच्या लाकडाची अशी काय मोठी किंमत येणार आणि त्यांत तुला फायदा तरी काय होणार ?" त्यानें विचारलें. नंतर तो मनुष्य निघून गेला.

तो म्हणाला त्यांत खरें किती व खोटें किती हें देखील कळायला जागा नव्हती. एका धर्मशाळेंत खोली घेऊन रहायचें ठरवून तो धर्मशाळेंत गेला. आंत पाऊल टाकल्या-बरोबर त्याला एक विचित्र गोष्ट दिसली. त्याला चंदनाचीं लाकडें सरपणासाठीं जाळतों म्हणून सांगणारा मनुष्य व आणखी एक मनुष्य आंगणांत चूल पेटवीत होते आणि चंदानाचीं लाकडेंच त्यांनीं चुलींत घातली होतीं. त्यानें विचार केला, तर मग तो म्हणाला तें खरें आहे. आपण उंटावरचीं सगळीं लाकडें विकलीं तरी दोनचार रुपया-पेक्षां जास्त काय मिळणार ?"

जवळ आल्यावर त्या दोघांनीं त्याला विचारलें—"काय हो ! काय माल आणला आहे विकायला ?" चंदन म्हणून कळल्या-वर त्यांनीं त्याची किंमत विचारली.

व्यापारी म्हणाला—"तुम्हीच बोला, काय किंमत द्याल ?"

असा काय मोठा माल आणला आहे तुम्ही ? चंदनाचीं लाकडेंच ना ! काय वाटेल तें मागून घ्या. चंदनाच्या वजनानें वजन करून घ्या !" दोघांपैकीं एक जण म्हणाला.

व्यापाऱ्यानें घासघीस न घालतां सर्व चंदन त्यांना देण्याचें कबूल केलें व गांव पहायला म्हणून निघाला. एतक्यांत एका मनुष्यानें त्याचा हात धरला व म्हणाला—"ह्यानेंच, ह्यानेंच माझा डोळा फोडला."

दोघांमध्यें दंगामस्ती सुरू झालेली पाहून लोक जमा झाले. "तूं कोण कोठला, मला माहीत नाहीं. मी कधीं तुला पाहिलें देखील नाहीं." व्यापारी म्हणाला व हात सोडवून घेण्याचा प्रयत्न केला.

परंतु जमा झालेल्या लोकांनीं डोळा फुटलेल्या माणसाची बाजू घेतली. म्हणाले—"डोळा भरून द्यावा लागेल."

व्यापारी म्हणाला—"मी धर्मशाळेंत उतरलों आहें. भरून देईन." असें सांगून तो पुढें निघून गेला.

या धांवपळींत त्याचा चढाव तुटला. त्यानें एका चांभाराला तो दुरुस्त करून द्यायला सांगितलें.

"क्या द्याल ?" चांभारानें विचारलें.

"माझ्या मनासारखें काम केलेंस तर तुला संतुष्ट करीन." व्यापारी म्हणाला. चांभाराकडे चढाव टाकून पलीकडे कांहीं लोक पैसे लावून पत्ते खेळत होते त्याची गंमत पहायला तो गेला. थोड्या वेळानें एकानें व्यापाऱ्याला तो परदेशी आहे हें ओळखून त्याला देखील पैसे लावायला सांगितलें. व्यापाऱ्यानें पैसे लावले व थोड्या वेळानें होतें नव्हतें तें सर्व घालवून बसला. एवढेंच नव्हे तर त्याच्या डोक्यावर कांहीं पैसे बसले. जुगार जिंकणाऱ्यानें त्याला




विचारलें—"बोल, समुद्राचें सर्व पाणी पिणार कीं अंगावरचे कपडे काढून ठेवणार दोन्हींपैकीं तुला जें पसंत पडेल तें कर !"

"उद्यांपर्यंत सवड दे. तुझे सर्व पैसे देऊन टाकतों, नाहींतर तूं म्हणशील तें कबूल." व्यापारी म्हणाला.

नंतर तो विचार करूं लागला, त्या म्हातारीनें सांगितलें तें खरें आहे. एकाहून एक मामटा आहे. असा विचार करीत गांवांत हिंडत असतां सुदैवानें त्याला ती म्हातारी एका जागीं भेटली. त्याचें तोंड पाहूनच तिनें ओळखलें कीं, बिचारा सर्व



घालून बसला असावा. तिनें सर्व ऐकून घेऊन तिला जो अनुभव त्या गांवचा आला होता तो तिनें सांगितला आणि म्हणाली—

"पाहिलेंस मी तुला म्हणूनच संभाळून राहायला बजावून सांगितलें होतें. एकाहून एक लुच्चा, चोर व भामटा आहे. अरे या गांवांत एका चंदनाच्या मोळीची किंमत दहा मोहरा आहे. तुला दोनशें मोहरा तरी मिळाल्या असत्या, अजून बिघडलें नाहीं. सावध रहा व मी सांगतें तसें कर. कदाचित तुला सर्व पैसे मिळतील. संध्याकाळीं काळोख पडूं लागला कीं, गांवा बाहेर फाटका जवळच्या झाडाखालीं एक आंधळा भिकारी येऊन बसतो. तो फकीर नसून या गांवच्या सर्व ठकांचा गुरु आहे. सर्व ठक रोज त्याच्याकडे जाऊन त्याचा सल्ला घेतात व त्याप्रमाणें वागतात. तूं लपून त्यांचें बोलणें ऐक. कदाचित कांहीं तरी मार्ग निघेल." म्हातारी म्हणाली.

अजून काळोख पडला नव्हता, व्यापारी गांवाच्या दरवाज्याबाहेर जाऊन म्हातारीनें सांगितलेल्या जागीं दगडाआड मागें उभा राहिला. दगडासमोर एक आंधळा फकीर बसला होता. काळोख पडूं लागल्यावर गांवांतले ठक एका मागून एक येऊं लागले व त्यांनीं दिवसभर काय केलें हें सांगूं लागले. व्यापाऱ्याला फंसविणारे ते चौघे ठक सुद्धां होते. त्यांपैकीं एक जण पुढें येऊन म्हणाला—

"फकीरसाहेब, मी एका परदेशी व्यापाऱ्या-कडून चंदनाचें लाकूड सरपणाच्या भावानें विकत घेतलें आहे."

"अरे हो पण कांहीं किंमत ठरलीच असेल कीं नाहीं." फकिरानें विचारलें.

"मी त्याला म्हटलें, चंदनाच्या वजनाची काय वाटेल ती वस्तु मागून घे! त्यानें चंदनाच्या वजनाचें सोनें मागितलें तरी मलाच जास्त फायदा आहे. कारण चंदनाची किंमत जास्त आहे." ठक म्हणाला.

"पण समज त्यानें चंदनाच्या वजनाच्या माशा मागितल्या आणि त्यांतल्या अर्ध्या रानटी मागितल्या तर? आणि त्या सुद्धां अर्ध्या नर व अर्ध्या माद्या हव्या म्हटल्या तर?" फकिरानें विचारलें.

तो ठक विचारांत पडला. दुसरा ठक पुढें येऊन म्हणाला—"फकीरसाहेब! मी एका परदेशी व्यापाऱ्याला खूप फंसविलें. मी त्यानेंच माझा डोळा फोडला म्हणून ओरडा केला. मी त्याला म्हटलें कीं तूं माझा डोळा भरून दे नाहींतर तुझ्याजवळ जें कांहीं आहे तें सर्व समोर ठेव."

"मूर्ख आहेस झालें! समज, त्यानें तुला म्हटलें कीं तुझा डोळा भरून देतों. तुझ्या डोळ्याच्या वजना एवढा माझा डोळा काढून देतों तर? तुझा दुसरा डोळा देखील जाईल. त्याचा एकच जाईल. डोळा काढ-ल्याशिवाय तराजूंत घालून कसें वजन करणार?"

नंतर चांभार पुढें आला. त्याचे वहाव माझ्याकडेच आहेत. मी दुरुस्त करून द्यायचें कबूल केलें आहे. तो म्हणाला—



Fullscreen 127 40 / 80

"काम पाहून मजुरी देईन. तुला संतुष्ट करून पाठवीन असें म्हणाला."

"तुला अकल कोठें आहे? अरे तो तुला दोन दिडक्या देखील देणार नाहीं. तो म्हणेल, काय काम केलें आहेस? माझा चढाव घाण करून ठेवला आहेस. पण तुला संतुष्ट करून पाठवीन असें म्हटलें होते ना? बरें तर सांग, आपल्या सुल्तानाचे सर्व शत्रु मारले गेले, कळलें का तुला? मनाला बरें वाटलें कीं नाहीं? तुला होकारच द्यावा लागेल? नकार दिलास तर फांशी!"

शेवटीं जुगारी ठक आला आणि म्हणाला—"मी एका परदेशी व्यापाऱ्याला जिंकलें आहे. मी त्याला म्हटलें कीं समुद्राचें सर्व पाणी जरी पिऊन दाखव नाहींतर तुझ्याजवळ जें कांहीं असेल तें समोर ठेव."

"तो तुला एक कवडी देखील देणार नाहीं. तो म्हणेल, भांड्यांत भरून दे, मी सर्व पितों तर?" तुझ्या तंगड्या तुझ्याच गळ्यांत अडकतील कीं नाहीं?" फकिरानें विचारलें.

व्यापाऱ्यानें सर्व ऐकून घेतलें. म्हणून दुसऱ्यादिवशीं कोणी त्याला फंसवूं शकला नाहीं. सर्वांनीं शेरास सव्वाशेर भेटलेला दिसतो आहे. असें मानून त्याच्या समोरून पाय काढला.

नंतर त्यानें चंदन सोन्याचा भावानें विकलें. त्याला खूप पैसा मिळाला. त्यानें त्या गांवांत आपल्या गांवीं नेण्यासारख्या वस्तु विकत घेतल्या गांवांत पाहण्यासारखें जें कांहीं होतें तें पाहून घेतलें आणि त्या म्हातारीला भेटला. त्यानें म्हातारीचे आभार मानले. तिला शंभर मोहरा बक्षीस दिल्या आणि तिचा निरोप घेऊन आपल्या गांवीं निघून गेला.

त्यानें पुन्हां या गांवांत पाऊल टाकायचें नाहीं असें मनाशीं ठरविलें.





# ❋ मजुरी ❋

एका गांवीं भीमू नांवाचा एक तरुण मुलगा होता. लहानपणींच त्याचे आई वडील वारले. त्याच्या आजीनें त्याला लहानाचा मोठा केला. ब्रह्मदेवानें जेव्हां अकल वाटली तेव्हां तो गैर हजर होता. पण शक्ति वाटली तेव्हां हजर होता. दोघे तिघे गैर हजर होते त्यांची शक्ति सुद्धां देवानें त्यालाच दिली होती. सर्व त्याला भीमू म्हणत.

त्याच्या आजीनें विचार केला कीं अशा मुलाला कोणत्या तरी कामांत गुंतवलें नाहीं तर त्रास होईल. म्हणून म्हातारीनें भीमूला कामाच्या शोधांत जायला सांगितलें. तिनें निरोप देतांना त्याला उपदेश केला—

"बोलल्या शिवाय काम करावें, भांडणा शिवाय मजुरी घ्यावी. जें काम घ्यावें तें मन लावून करावें. जें कांहीं घ्यायचें ओंजळ भरून घ्यावें."

आजीनें सांगितल्या प्रमाणें भीमू कामाच्या शोधार्थ निघाला. वाटेंत त्याला एका घरा-समोर एक सभ्य मनुष्य भेटला. भीमू त्याला म्हणाला—"मी काम शोधायला आलों आहें. मला बोलल्याशिवाय काम देणारा आणि भांडण केल्याशिवाय मजुरी देणारा मनुष्य पाहिजे आहे."

त्या माणसानें भीमूला एकदां आपाद-मस्तक पाहून ओळखलें कीं वेडा आहे. त्यानें त्याला एक सरडा दाखविला व म्हणाला—"तो पहा तुला बोलावितो आहे. बोलल्याशिवाय तो तुला काय सांगेल. भांडण केल्याशिवाय त्याच्याकडून मजुरी घे."

भीमूनें सरड्याकडे पाहिलें. तो मान हलवीत होता. भीमूला वाटलें, बोलल्याशिवाय हा बोलवीत आहे. बोलल्याशिवाय काम करायला तो देईल. तो त्या सरड्याजवळ

 Fullscreen  127      42 / 80 


गेला. सरडा भीमूला पाहून भिऊन जमिनींत बिळांत शिरला. भीमूनें विचार केला, हें त्याचें घर असावें. तो सहज आंत गेला पण आपण कसें आंत जायचें ?"

त्यानें बिळाजवळ एका दगडानें खूण केली. कुदळ फावडें घेऊन तो बीळ मोठें करूं लागला. तो संध्याकाळपर्यंत काम करीत राहिला. खणत असतां त्याला खण्ण असा आवाज ऐकूं आला. जास्त खणून पाहिलें तर एक तांब्याचें सोन्याचीं नाणीं भरलेलें पात्र.

भीमूनें विचार केला, "ओहो, मला त्यानें दिलेलें काम संपलें असावें. भांडण केल्या शिवाय त्यानें मजुरी दिली असावी. त्याच्या आजीनें त्याला जें कांहीं घ्यायचें ओंजळ भरून घ्यायला सांगितलें होतें. म्हणून त्यानें भांड्यांतली ओंजळ भरून नाणीं घेतलीं व भांडें पुन्हां खड्ड्यांत ठेवून घरीं निघून गेला."

सोन्याचीं नाणीं पाहून आजीचे डोळे दिपून गेले. "इतकें सोनें तुला कोठें मिळालें बाबा ?" आजीनें विचारलें व तें ऐकून म्हातारीनें विचारलें, "कोठें आहे तो खड्डा व कोठें आहे तें भांडें ? वेडा कुठला !"

त्या काळोख्या रात्रीं म्हातारी भीमूबरोबर पुन्हां त्या जागीं गेली. तिनें नातवाला तें मोहरांनीं भरलेलें भांडें उचलून घ्यायला सांगितलें आणि घरीं गेली. नंतर ती म्हणाली—"हें भांडें व ह्यांत सांपडलेल्या सोन्याच्या नाण्यांविषयीं कोणाला चकार शब्द सांगूं नकोस. तुझ्या लग्नाच्या वेळीं या सोन्याचा उपयोग होईल.

त्यानें फक्त होकारार्थी मान हलविली.

(पुढल्या महिन्यांत अशीच एक गंमत)



# अकल्पित लग्न

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतलें आणि स्मशानाकडे निघाला. तेव्हां नेहमींप्रमाणें प्रेतांत बसलेला वेताळ बोलूं लागला—"राजा ! ह्या अर्धरात्रीच्या वेळीं तूं दुसऱ्यासाठीं इतके कष्ट सहन करीत आहेस. यांत मला तरी असें वाटतें कीं, हा सर्व तुझ्या पूर्वजन्मीं केलेल्या कर्माचा योग आहे. पूर्वजन्मींचें कर्मफळ भोगावें लागतेंच. म्हणूनच सुप्रहर नांवाच्या एका तरुण कोळ्याचें एका राजकन्येवर मन गेलें आणि त्यामुळें तो स्वतःच्या प्राणास देखील मुकला. कंटाळा येऊं नये म्हणून मी तुला ती गोष्ट सांगतों. ऐक." त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

फार पूर्वी राजगृह येथें मलयसिंह नांवाचा एक धर्मभीरु राजा राज्य करीत असे. त्याला जीव कीं प्राण एकुलती एक मुलगी होती.

वेताळाच्या गोष्टी

Fullscreen 127 44 / 80



तिचें नांव मायावती होतें. ती नक्षत्रासारखी सुंदर होती.

एकदां ती आपल्या सखींबरोबर उद्यानांत विहार करीत असतां सुभद्र कोळ्यानें तिला पाहिलें. तिचें अप्रतिम सौंदर्य पाहून तो मुग्ध झाला. राजकन्येशीं कोळ्याचें लग्न कसें होणार ? गिड्डया माणसानें आभाळाला हात लावण्या इतकेंच अशक्य. हें सर्व कळत असूनहि त्यानें तिच्याशींच लग्न करण्याचें आपल्या मनाशीं ठरवून टाकलें. रात्रंदिवस त्याच्या मनांत तिचाच विचार येई. त्यानें आपला कामधंदा सोडला व जेवणखाण देखील सोडलें. त्याच्या म्हाताऱ्या आईला कळेना. 'झालें तरी काय या मुलाला !' म्हातारीनें प्रेमानें पाठीवर हात फिरवून विचारलें—"तूं दिवसभर बसून राहतोस. खातपीत नाहींस काम करीत नाहींस. रात्रभर अंथरुणावर तळमळत पडून असतोस. झालें तरी काय तुला ?"

सुभद्रनें कांहीं एक लपविल्याशिवाय सर्व कांहीं आपल्या आईला सांगून टाकलें. म्हातारी मोठी हिंमतीची बाई होती. म्हणाली—"एवढेंचना ? तुझी इच्छा पुरी करण्याचें माझ्याकडे लागलें. तूं घासभर खाऊन घे बरें !" आईच्या या प्रेमळ शब्दांनीं सुभद्रच्या मनाला विश्वास वाटला व तो त्या दिवशीं जेवला.

त्यानंतर म्हातारी एका टोपलींत उत्तमोत्तम मासे घेऊन राजवाड्यांत गेली व राजकुमारीला भेट घेऊन आलें आहे असा नोकरांतर्फे निरोप पाठविला. राजकुमारीनें तिला आंत बोलाविलें. सुभद्रच्या आईनें भेट समोर ठेवली व नमस्कार करून निघून गेली.

त्या दिवसापासून ती रोज उत्तम मासे आणून राजकुमारीला देऊं लागली. माया-

Fullscreen 127 46 / 80



वतीला हें सर्व पाहून आश्चर्य वाटलें. तिनें एकदां तिला विचारलें—"मला वाटतें, मनांत कांहीं तरी इच्छा ठेवूनच तूं रोज हे मासे आणून देत असावीस. मग सांगत कां नाहींस, तुला काय हवें तें? मी तुझी इच्छा शक्यतों पुरी करीन."

"राजकन्येनें अभयदान दिलें तर मी हळूंच अगदीं कानांत काय तें सांगीन." म्हातारी कोळीण म्हणाली.

मायावतीनें अभयदान दिल्यावर म्हातारीनें संकोच करीतच कानांत सांगितलें कीं, माझा मुलगा तुला पाहिल्यापासून तुझ्या प्रेमानें वेडा झाला आहे. तूं फक्त एकदांच आपल्या बोटानें त्याच्या हाताला स्पर्श केलास तरी पुरे." तें ऐकून राजकन्येला राग येण्या ऐवजीं हंसू आलें. पण तिनें वचन दिलें होतें, म्हणून ती म्हणाली—"तूं आपल्या मुलाला घेऊन ये."

म्हातारी आनंदानें घरीं गेली. तिनें मुलाला चांगले कपडे करून निघायला सांगितलें. दोघे राजवाड्यांत पोंचल्यावर राजकन्येनें कोळ्याला एका जागीं झोंपायला सांगितलें. त्याला अर्धवट झोंप लागल्यावर राजकन्या आली व त्याच्या हाताला बोटानें स्पर्श करून निघून गेली.

सुप्रहर स्वप्नें पहात होता. राजकन्या बोटानें स्पर्श करून निघून गेल्यावर त्याची झोंप मोडली. स्वप्नांत तो तिच्याशीं किती किती बोलला! पण जागेपणीं तिला समोर न पाहून तो तिच्या मोहानें खरोखरींच वेडा झाला आणि वेडेपणांतच बेशुद्ध होऊन मरण पावला.

तें ऐकून मायावतीला फार वाईट वाटलें. तिनें आपल्या वडिलांना घडलेला सर्व वृत्तांत सांगितला व म्हणाली—"मी त्याच्याबरोबर सती होणार!" राजानें तिला अनेक प्रकारें समजावून सांगितलें. पण मायावतीनें आपला विचार सोडला नाहीं. राजाला काय करावें कांहींच सुचेना. त्यानें स्नान केलें व शंकराच्या देवळांत जाऊन देवाजवळ आपलें गाऱ्हाणें सांगितलें. म्हणाला—"देवा तुझ्या कृपेनेंच ही मुलगी मला मिळाली. आतां या संकटांतून तूंच कांहीं मार्ग काढलास तर निभेल."

तेव्हां आकाशवाणी झाली—"राजन्! तुझी मुलगी मागच्या जन्मीं या कोळ्याची बायको होती. मागच्या जन्मीं हा कोळी जलधर नांवाचा एक ब्राह्मण होता. त्याचे वडील वारल्यावर त्याच्या नातेवाइकांनीं त्याला फंसवून त्याचें सर्व धन लुबाडून घेतलें. म्हणून जलधरला संसाराचा वीट आला. तो आपल्या बायकोबरोबर गंगाकाठीं येऊन हरिभजन करूं लागला. त्यांना कधीं कधीं चार चार पांच पांच दिवस कांहीं खायला प्यायला न मिळे. मरणासन्न पडला असतां त्याचें मन कोळ्याच्या टोपलीकडे गेलें. म्हणून त्याला या जन्मीं कोळ्याच्या पोटीं जन्म घ्यावा लागला. त्याच्या बायकोनें पातिव्रत्य धर्माचें पालन करून नवऱ्याची पुष्कळ सेवा केली होती. म्हणून ती या जन्मीं तुझ्या घरीं जन्मास आली. आतां कोळ्याला



Fullscreen 127 48 / 80

वांचवण्यास एकच उपाय आहे. तुझ्या मुलीनें आपलें अर्धे आयुष्य कोळ्याला द्यावें व त्याच्याशीं लग्न करण्यास तयार व्हावें. तर कोळी पुन्हां जिवंत होईल."

राजा घरीं आला. त्याचें मन मानीत नव्हतें. पण मुलीला वांचवण्यासाठीं त्यानें जी आकाशवाणी ऐकली होती ती सांगून टाकली. मायावती तयार झाली. सुप्रहर जिवंत झाला. त्याचें राजकन्येशीं लग्न झालें व तोच राज्याचा वारस पण झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा ! मला एक शंका आहे. मायावतीनें वचन दिल्याप्रमाणें कोळ्याच्या अंगाला स्पर्श केला. पण त्याच्याबरोबर सती होण्याचा हट्ट तिनें कां धरला ? तिचें त्याच्यावर प्रेम होतें म्हणून, कीं तिच्यामुळेंच तो प्राणास मुकला म्हणून, कीं मागच्या जन्मीं ती त्याची बायको होती म्हणून ? उत्तर माहीत असून दिलें नाहींस तर परिणाम माहीतच आहे तुला ? तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर आदळतील."

विक्रमार्क म्हणाला—"मायावती कोळ्याला खास प्रेम करूं लागली होतीं. पूर्वजन्मीच्या गोष्टी आठवून त्याला पति मानूं लागली असती तर नुसत्या बोटानें त्याच्या हाताला स्पर्श करून त्याच्या मृत्यूला ती कारण कां झाली असती ? फक्त वचन पालन केल्यामुळें जर तो मेला तर त्याची जबाबदारी तिच्यावर नव्हती. तो जिवंत असतांनाच तिनें त्याला मनानें वरलें असावें. म्हणूनच ती आपलें अर्धें आयुष्य देऊन त्याच्याशीं लग्नाला तयार झाली."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व पुन्हां झाडाच्या फांदीला लोंबकळूं लागला.

(कल्पित)





## ※ प्रतिज्ञा पूरी केली ※

काश्मीर देशाचा युवराज शिकारीहून परत येत असतां वाटेंत त्याला एक तेल्याची तरुण मुलगी दिसली. ती तीळ वाळत घालून राखण करीत उभी होती. युवराजाला तिची थोडीशी थट्टा करावीशी वाटली. त्यानें विचारलें—"तूं तिळांत जन्माला आलीस, तिळांतच वाढलीस अन् वर तेल्याची मुलगी आहेस, तर मग सांग बरें तिळाच्या पानाहून लहान पान कोणत्या झाडाचें असतें ?"

हा युवराज आपल्या कुळाचा अपमान करीत आहे असें वाटलें त्या मुलीला. तिनें उत्तरादाखल युवराजालाच प्रश्न विचारला—"फुलांत जन्माला येऊन, फुलांतच वाढून भूपाल म्हणविणाऱ्या युवराजा ! दोनच पाकळ्यांच्या फुलाचें नांव तर सांग, पाहातें !"

तो प्रश्न ऐकून घमेंडखोर युवराजाला राग आला. म्हणाला—"तेल्याची पोर तूं. लहान तोंडीं मोठा घास घेत आहेस. तुला अकलेचें अजीर्ण झालेलें दिसतें आहे. थांब, तुझ्याशीं लग्न करून तुला आयुष्यभर तुरुंगवास भोगायला लावलें नाहीं तर नांवाचा युवराज नाहीं मी."

"युवराज ! आपल्या घमेंडीत हट्टानें तूं माझ्याशीं लग्न करून घेऊन मला आपली पट्टराणी करून न घेतां मला तुरुंगांतच ठेवलेंस तर मी देखील सांगून ठेवतें, माझ्या पोटीं तुला छान बडवून काढणारा मुलगा जन्मास येईल. विसरूं नकोस !" तेल्याची मुलगी म्हणाली.

युवराज रागारागानें घरीं गेला. तो कोणाशीं कांहीं एक बोलला नाहीं, जेवला नाहीं. एका कोपऱ्यांत विचार करीत बसून

Fullscreen 127 50 / 80



राहिला. राजानें त्याला घेऊन विचारलें– "बाळ ! तूं शिकारीहून परत आलास. बराच वेळ झाला येऊन. पण जेवलास कां नाहीं अजून ?"

"माझ्या मनांतली इच्छा पुरी होईपर्यंत तोंडांत पाणी घालायचें नाहीं अशी मी प्रतिज्ञा केली आहे." युवराज म्हणाला.

"अशी प्रतिज्ञा तरी काय केली आहेस ऐकूं दे तरी !" राजानें विचारलें.

तेव्हां शिकारीहून परत येत असतां तेल्याच्या मुलीशीं झालेला संवाद सांगून तो म्हणाला–"मी त्या घमेंडखोर तेल्याच्या मुलीशीं लग्न करून तिची खोड मोडणार आहें."

"असला वेडेपणा करून कसें चालेल ? कुळगोत्र कांहीं पाहिलें पाहिजे कीं नाहीं ?" राजानें समजूत घालण्याचा यत्न केला.

युवराज म्हणाला–"त्या मुलीशीं लग्न करून द्यायला तुम्ही तयार नसाल तर मी परदेशीं निघून जाईन."

शेवटीं नाइलाजानें राजाला कबुली द्यावी लागली. मुलाच्या लहरीपणासमोर त्याला हात टेंकावे लागले.

राजा स्वतः तेल्याच्या घरीं गेला, त्याच्या मुलीला मागणी घातली व मुहूर्त देखील ठरवून आला. ठरलेल्या मुहूर्तावर लग्न समारंभ निर्विघ्न पार पडला. या अवधींत युवराजानें आपल्या वाड्याच्या उद्यानांत एक छोटें खानी राजवाडा बांधवला. त्यांत त्यानें आपल्या बायकोला ठेवलें व त्या राजवाड्यावर सतत पाहारा ठेवला. बायकोच्या सेवेला एक दासी मात्र ठेवली. एकूण त्यानें आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें बायकोला तुरुंगवास भोगायला लावलें.

तेल्याची मुलगी तरी कांहीं कमी नव्हती. तिनें देखील आपली प्रतिज्ञा पुरी करण्यासाठीं उपाय करण्याचें ठरवून दासीकडून वडिलांकडे निरोप पाठविला व आपल्या माहेरच्या घरापासून तर तिच्या तुरुंगवजा वाड्यापर्यंत एक चोर वाट खणून तयार करविली. त्या वाटेनें ती माहेरी जाऊं येऊं लागली.

तिच्या सांगण्यावरून तिचे वडील एका जादुगाराला व डोंबाऱ्याला बोलावून घेऊन आले. त्यांच्या राहण्या जेवण्याची व्यवस्था तिनें आपल्या वडिलांकडेच करविली. तिनें सतत तीन वर्षें मेहनत करून त्यांच्याकडून मंत्रविद्या व डोंबाऱ्याचें काम उत्तम प्रकारें शिकून घेतलें.

नंतर तिनें आपल्या डोंबारी गुरूला सांगितलें, आपण आपला खेळ राजाला दाखविला पाहिजे म्हणजे राजा खूप इनाम देईल.

दुसऱ्या दिवशीं डोंबारी आपल्या शिष्यिणीला बरोबर घेऊन राजवाड्यांत गेला. तेथें त्यानें तिच्याकडून निरनिराळीं कामें करवून दाखविलीं. बांबूवर चढून तिनें जी कसरत करून दाखविली ती पाहून तिच्या लवचिक शरीर काठीची सर्वांनीं वाखाणणी केली. युवराज तर इतका खूष झाला कीं ती ज्यावेळीं बांबूवर चढून काम करीत होती तेव्हां



त्यानें मध्येंच डोंबाऱ्याला बोलवून खेळ बंद करविला व म्हणाला–"इतक्या निर्दयपणानें आपल्या मुलीचा जीव धोक्यांत कां घालतोस ? फक्त पोटासाठीं ? आज तिला माझ्याकडेच राहूं दे ! मी तिला पुष्कळ इनाम देऊन पाठवीन."

युवराजाच्या मर्जी विरुद्ध डोंबारी काय करणार ? तेल्याच्या मुलीला सुद्धां तेंच हवें होतें. ती युवराजाबरोबर त्याच्या उद्यानांत गेली. ती त्याचीच बायको होती. परंतु तीन वर्षांत दोघांची भेट नव्हती. म्हणून स्वतःच्या बायकोला देखील युवराज ओळखूं शकला


Fullscreen

127





52 / 80


नाहीं. ती रात्र दोघांनीं उद्यानांतच काढली. जातांना युवराजानें आपल्या हातांतली अंगठी तिच्या बोटांत घातली.

तेल्याच्या मुलीची म्हणजे युवराजाच्या बायकोची इच्छा पूर्ण झाली. कालक्रमानें यथावेळीं तिला मुलगा झाला. परंतु युवराजाला या गोष्टीची कल्पना देखील नव्हती. कारण त्याच्या कल्पनेनें त्याची बायको उद्यानांतल्या महालांतच होती. चोर वाटेनें ती आपल्या माहेरी जाई येई. माहेरीच तिचा मुलगा लहानाचा मोठा झाला. सर्व विद्या शिकून तो पारंगत झाला. तिची प्रतिज्ञा फक्त अर्धीच पुरी झाली होती. तिला युवराजापासून मुलगा झाला. पण त्याच्याकडून युवराजाला चोप देवविणें बाकी होतें. तिनें ती अर्धी प्रतिज्ञा पुरी करण्यासाठीं आपल्या मुलाची मदत घेतली. तिनें आपल्या मुलाला सर्व नीट समजावून सांगितलें.

तो रानांत जाऊन राहूं लागला. तेथें एक म्हातारी होती. तिचीं गुरें तो चरायला घेऊन जाई. म्हातारी त्याला दोन वेळ जेवायला वाढी.

एकदां रात्रीं आईनें मिळविलेल्या मंत्रबळानें तो राजवाड्यांत शिरला व सरळ



आपले वडील युवराज यांच्या खोलींत गेला. त्यानें युवराजांच्या नाकासमोर एक मादक मुळी धरली व ते बेशुद्ध आहेत हें पाहून त्यांच्या पलंगाचे चारही पाय काढून घेतले आणि त्यांच्या जागीं बरोबर आणलेले केळीचे खांब लावून ठेवले. नंतर युवराजांच्या अंगावरले सर्व दागिने काढून घेतले आणि नदीकाठीं वाळूंत लपवून ठेवून दिले. रात्रीं परत म्हातारीच्या झोपडींत जाऊन झोपला.

उजाडल्यावर युवराजांच्या महालांत चोरी झाल्याची बातमी गांवभर पसरली. मंत्र्यानें कोतवालाला चोराचा शोध लावण्यास सांगितलें. त्या दिवशीं रात्रीं स्वतः मंत्र्याच्या घरीं चोरी झाली. मंत्र्याच्या बायकोचे सर्व दागिने चोरीला गेले. मंत्र्यानें कोतवालाला ताकीद दिली कीं, दोन दिवसांत चोराला धरून आणलें नाहीं तर शिक्षा केली जाईल.

कोतवालाला एक लग्न झालेली मुलगी होती. तिचा नवरा लहानपणींच परदेशीं गेला होता. युवराजाच्या मुलाला ही गोष्ट कळली. त्यानें कोतवाल व त्याची बायको दोघांसाठीं कांहीं कपडे बाजारांत जाऊन विकत घेतले आणि कोतवालाच्या शेजारच्या घरीं जाऊन विचारलें—"माझे सासरे कोतवाल कोठें राह-



Fullscreen 127 54 / 80



ताव, माहीत आहे का आपल्याला ?" त्यांनीं त्याला कोतवालाच्या घरीं पोंचतें केलें.

त्या दिवशीं कोतवाल चोराच्या शोधार्थ निघाला तेव्हां युवराजाच्या मुलानें त्याला विचारलें—"कोठें निघालांत ?" चोराला पकडायला म्हणून कळल्यावर त्यानें बरोबर येण्यासाठीं परवानगी मागितली.

ते हमरस्त्यानें चालले होते. एका जागीं एक लाकडी सांपळा पाहून त्यानें कोतवालाला विचारलें—"हें काय ?"

"चोराला या सांपळ्यांत ठेवायचें आहे. त्याला आंत ठेवून खिळा ठोकला कीं त्याला बाहेर येतां येणार नाहीं." कोतवाल म्हणाला.

"मी जरा आंत जाऊन पाहातों, चोराला बाहेर येतां येतें कीं नाहीं." मुलगा म्हणाला.

कोतवालानें विचार केला, जांवई इतक्या वर्षांनीं परदेशांतून परत आला आहे. त्याला आंत पाठविणें बरोबर दिसणार नाहीं. म्हणून तो म्हणाला—"नको मी आंत जाऊन दाखवितों." त्याप्रमाणें तो आंत गेल्यावर मुलानें खिळा ठोकला. कोतवाल सांपळ्यांत सांपडला. नंतर मुलगा म्हणाला—"खिळा येत नाहीं. आतां काय करूं ?"

"घरीं जाऊन सासुबाईकडून कुऱ्हाड-करवत जें मिळेल तें मागून घेऊन ये." कोतवाल म्हणाला.

मुलगा कोतवालाच्या घरीं गेला आणि कोतवालाच्या बायकोला म्हणाला—"मामांना राजाचे शिपाई धरून घेऊन गेले आहेत. ते घराची झडती घ्यायला येणार आहेत. घरांतले दाग दागिने जपून कोठेंतरी ठेवायला मामांनीं मला धाडलें आहे."

"घरांत कोठें लपवूं ? मी तुला सर्व दाग दागिने काढून देतें. तूंच कोठें ते नेऊन ठेव." कोतवालाची बायको म्हणाली. तिनें घरां-तले आणि स्वतःच्या व मुलीच्या अंगावरचे सर्व दागिने काढून एका पिशवींत घातले आणि पिशवी आपल्या जांवयाच्या हातीं देऊन त्याला पाठवून दिलें. तो ते दागिने नदी कांठीं लपवून घरीं निघून गेला.

सकाळीं शिपायांनीं कोतवालाला सोडविलें. घरचे सर्व दागिने त्यानें लांबविल्याचें ऐकून कोतवालाला फारच राग आला. तो मंत्र्याला सर्व वृत्तांत निवेदन करून म्हणाला—"हातावर तुरी देऊन तो पळून गेला हो."

तें ऐकून मंत्र्याला आश्चर्य वाटलें. म्हणाला—"बिलंदर चोर दिसतो आहे." नंतर मंत्री राजाकडे जाऊन म्हणाला—"हें काम इतर लोकांकडून होण्यासारखें नाहीं. मी स्वतः जाऊन धरून आणतों त्याला."

त्या दिवशीं रात्रीं मुलानें धोब्याचा वेष केला. तो कपड्यांचें एक मोठें गांठोडें घेऊन धोबी घाटावर जाऊन कपडे धुवूं लागला.

मंत्री घाटावर येऊन विचारूं लागला—"अरे! इतक्या रात्रीं तूं कपडे धुतो आहेस ?"

"काय करूं ? थोड्या वेळानें चोर येऊन कपडे घेऊन जातील. त्यांचेच कपडे आहेत हे. दिवसां नाहीं येत ते." मुलगा म्हणाला.



"चोराला धरायचें असेल तर मी सांगतों तसें करा. तुम्ही व तुमचे शिपाई जवळपास दिसले तर चोर या बाजूला येणार देखील नाहींत. म्हणून तुम्ही शिपायांना दूर जाऊन लपून बसायला सांगा." मुलगा म्हणाला. नंतर त्यानें एक मोठें टोपलें दाखविलें आणि म्हणाला—"तुम्ही यांत बसून रहा. मी हाक मारल्याबरोबर बाहेर येऊन चोरांना नीट पाहून खूण करा. शिपाई येऊन त्यांना धरतील."

मंत्र्याला वाटलें, आतां चोर हातांतून कसा निसटतो तें पाहातों. त्यानें शिपायांना

 Fullscreen 127     56 / 80 

दूर जाऊन लपून बसायला सांगितलें व स्वत: टोपल्यांत जाऊन बसला. मुलानें टोपल्यावर दोन मोठे मोठे दगड ठेवून दिले. मंत्र्यानें आपली पगडी व तलवार बाहेर ठेवली होती. ती घेऊन जाऊन वाळूंत लपवून ठेवली व पुन्हां घरीं जाऊन स्वस्थपणें झोपून राहिला.

मुलाला कळलें कीं, दुसऱ्या दिवशीं स्वत: युवराज चोराला धरण्यासाठीं निघणार आहेत. त्यानें विचार केला आज आईची प्रतिज्ञा पुरी होण्याची वेळ आली आहे. त्या दिवशीं त्यानें एका वाण्याचा वेष केला. नदीकाठीं एक पत्र्याचें झोपडें घालून दुकान लावून बसला. तेथें त्यानें कांहीं पोतीं व दोऱ्या देखील ठेवून दिल्या आणि दिवा लावून दुकानावर बसला.

युवराज रात्रभर राजधानींत गस्त करायची ठरवून सैनिकांबरोबर निघाला. बराच वेळ हिंडून युवराज या दुकानासमोर येऊन विचारूं लागला—"कायरे! या वेळीं दुकान मांडून बसला आहेस ?"

मुलगा घाबरल्याचें सोंग करून कोणाला ऐकूं जाऊं नये अशा स्वरांत युवराजांच्या अंगर्दी जवळ जाऊन हात जोडून नमस्कार करून म्हणाला—"महाराज! चोर आपला धंदा उरकून या बाजूनेंच जातील. त्यांची वाट पहात बसलों आहें."

"या चोरांना धरायला तूं मदत करशील का आम्हांला ?" युवराजानें विचारलें.

"चोराला पकडायचेंच असेल तर मी सांगतों तसें करा!" जरा आजूबाजूला पाहून मुलगा पुढें म्हणाला—"आपल्या या सैनिकांना किल्ल्याच्या दारावर उभे करा. तुम्ही एका पोत्यांत लपून बसा. चोर आल्यावर मी सांगेन. हें पहा तुमचें पोतें. ते पोतें उघडून पाहतील. बाहेर आल्याबरोबर तुम्ही शिपायांना बोलवा. शिपाई येऊन त्यांना धरतील." मुलानें सुचविलें.

युवराजानें सैनिकांना दूर जाऊन लपून बसायला सांगितलें. आपली पगडी, तलवार व पोषाख काढून बाहेर ठेवला व साधे कपडे घालून पोत्यांत बसून राहला. मुलानें पोत्याचें तोंड दोरीनें घट्ट बंद केलें. नंतर युवराजाचे कपडे स्वत: घातले व सैनिकांना बोलाविलें.

सैनिकांनीं रात्रीची वेळ असल्या कारणानें त्याला ओळखलें नाहीं. युवराज समजून त्याच्या आज्ञेप्रमाणें वागले. मुलगा सैनि-





Fullscreen 127 58 / 80

कांना म्हणाला—"चोरांचा सरदार हा पहा येथें आंत पोत्यांत आहे. मी धरून ठेवला आहे त्याला. चला घेऊन त्याला राजवाड्यांत."

सैनिकांनीं पोतें उघडल्याशिवाय पोत्याला लाथा मारल्या, खूप धक्के व बुक्के दिले व घेऊन राजमहालांत गेले. पोत्याच्या आंत युवराज ओरडत होता पण कोणी तिकडे लक्ष दिलें नाहीं.

राजाला हें ऐकून आनंद झाला कीं, युवराज चोराला धरून घेऊन आला आहे. पण प्रत्यक्ष दुसऱ्याच एका सरदाराला पाहून त्यानें विचारलें—"युवराज कोठें आहे? चोर कोठें आहे?"

मुलगा म्हणाला—"महाराज! मी चोर आहें व युवराज या पोत्यांत आहेत. ते मला पकडूं शकले नाहींत. मींच त्यांना धरून आणलें आहे." मुलगा म्हणाला.

पोतें उघडून पाहिलें तर आंत युवराज. युवराजाचा पोशाख करणारा हा कोणीतरी तोतया दिसतो आहे. राजानें त्याला पकडून फांशी द्यायला सांगितलें आणि निघून गेला.

तेवढ्यांत युवराजाची बायको म्हणजे त्या मुलाची आई तेथें आली व म्हणाली—"तुमच्या वडिलांनीं आपल्या नातावावर इतका राग दाखविण्याची गरज नाहीं. हा तुमचाच मुलगा आहे. आपली प्रतिज्ञा पुरी करण्यासाठीं मींच हें सर्व कारस्थान रचलें."

तेवढ्यांत तेथें तेलीपण आला. युवराजाला सर्व कांहीं त्याच्या बायकोकडून कळलें. त्यानें उद्यानांतल्या घरापासून तेल्याच्या घरापर्यंतची चोर वाट स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिली व त्यानें डोंबाऱ्याच्या मुलीला म्हणून जी अंगठी दिली होती ती पाहिली तेव्हां आपल्या बायकोच्या बोलण्यावर त्याचा विश्वास बसला.

त्यानंतर त्यांचा संसार सुखाचा झाला.






विश्वामित्र ऋषींबरोबर राम आणि लक्ष्मण अयोध्येहून निघाले ते सरयू नदीच्या दक्षिणेकडील काठावर येऊन पोंचले.

विश्वामित्र ऋषी प्रेमानें रामाच्या पाठीवर हात फिरवून म्हणाले—"बाळ! जाऊन आचमन करून ये. मी तुला बल व अतिबल नांवाच्या दोन शक्ति देणार आहें. या दोन शक्तींचा लाभ झाला तर तुला कधीं थकवा वाटणार नाहीं व तूं कधीं आजारी पडणार नाहींस. तुझें रूप सर्वदा असेंच राहील. तूं या मंत्राचा जप करीत राहालास तर कोणी तुझ्याहून अधिक बुद्धिमान, चतुर किंवा सुंदर होणार नाहीं. तुला भूक व तहान यांची बाधा होणार नाहीं. तुझी कीर्ति जगभर व्याप्त होईल व तुला प्रत्येक कामांत यश मिळेल.

रामानें विश्वामित्र मुनींची आज्ञा होतांच हातपाय धुऊन संध्या केली व विश्वामित्र मुनींजवळ येऊन बसला. त्यांनीं विधिवत त्याला बल व अतिबल या दोन शक्तींचा मंत्र दिला. तीन प्रहर उलटून गेल्यामुळें त्या दिवशीं सर्वांनीं सरयू नदी तीरावरच ती रात्र काढण्याचें ठरविलें.

पहाटे विश्वामित्र मुनींनीं दोघां राजकुमारांस जागें केलें. ते स्नान-संध्यादि आटोपून विश्वामित्र ऋषींबरोबर पुढें निघाले व सरयू आणि गंगा या दोन्ही नद्यांच्या संगमस्थानीं येऊन पोंचले. असें सांगतात

Fullscreen 127 60 / 80



कीं, त्या जागीं शंकरानें आश्रम स्थापन केला होता. तेथें तो तप करीत असे. याच जागीं कामदेवानें शंकराचा तपोभंग केला व शंकरानें आपला तिसरा डोळा उघडल्या-बरोबर कामदेव भस्म होऊन गेला. तेव्हां पासून त्या आश्रमांत शंकराचे शिष्य मुनि राहूं लागले. कामदेवाचें अंग म्हणजे शरीर ज्या जागीं भस्म झालें त्या जागेची आठवण म्हणून त्या जागेला अंग देश हें नांव पडलें.

विश्वामित्र ऋषींनीं तो जुना इतिहास राम लक्ष्मणांना सांगितला. त्यांनी ती रात्र तेथेंच विश्रांति घेण्याचें ठरविलें.

दुसऱ्या दिवशीं एका तरींत बसून ते गंगा पार गेले. गंगा पार एक दाट रान होतें. तेथें मनुष्यवस्ती नव्हती. निरनिराळीं श्वापदें हिंडतांना दिसत होतीं व त्यांचे भयंकर आवाज ऐकूं येत होते. झाडी इतकी दाट होती कीं, दिवसादेखील रात्रीसारखा काळोख वाटे.

तें वन पाहून रामाला आश्चर्य वाटलें. त्यानें विश्वामित्र मुनींना विचारलें—"मुनि-वर ! या वनाचें नांव काय ?" विश्वामित्र मुनींनीं त्या वनाची गोष्ट दोघांना सविस्तर सांगतली.

त्या प्रांतांत एका काळीं मलदम् व करू-शम् नांवाचे दोन देश होते. दोन्ही देश धन धान्य पूर्ण व समृद्ध होते. परंतु आतां ताटका नांवाची एक यक्षिणी व तिचा मुलगा मारीच दोन्ही देशांचा नाश करीत आहेत. त्यांच्या भीतीनें कोणी या देशाकडे फिरकत देखील नाहीं. ताटका एक साधारण स्त्री नसून तिच्या अंगांत सहस्र हत्तींचें बळ आहे. म्हणून हे समृद्ध देश आज ओसाड पडलेले आहेत."

तें ऐकून रामानें विचारलें—"मुनिश्रेष्ठ ! असें सांगतात कीं, यक्ष जातीच्या लोकांच्या





अंगांत बळ फार कमी असतें. मग या ताटकेच्या अंगांत इतकें बळ कोठून आलें व ती इतकी भयंकर कशी काय झाली ?"

त्यावर विश्वामित्र ऋषींनीं ताटकेची गोष्ट सांगितली.

"सुकेतु नांवाचा एक यक्ष होता. त्यानें पुत्र प्राप्तीसाठीं तपश्चर्या केली. ब्रह्मदेव प्रसन्न झाला. तेव्हां सुकेतूनें पुत्रप्राप्तीसाठीं तप-श्चर्या करीत आहे असें सांगितलें. ब्रह्मदेवानें त्याला पुत्र प्राप्तीचा वर दिला नाहीं. पण एका कन्येचा वर दिला व असेंहि सांगितलें कीं, जरी मुलगी असली तरी तिच्या अंगांत सहस्र हत्तींचें बळ येईल."

ब्रह्मदेवानें दिलेल्या वराप्रमाणें सुकेतूला कन्या झाली. हळू हळू ती मोठी झाली. तिचें अप्रतिम रूपलावण्य पाहून अनेक यक्ष कुमारांनीं तिला मागणी घातली. सुकेतूनें सुंद नामक एका तरुण यक्षकुमाराशीं तिचें लग्न लावून दिलें. त्यांना मारीच नांवाचा एक मुलगा झाला. तो महापराक्रमी निघाला. तो इंद्राची सुद्धां बरोबरी करूं लागला. परंतु त्याला आपल्या पराक्रमाचा गर्व झाला होता.

एकदां अगस्त्य मुनि तपश्चर्या करीत असतां सुंदनें विघ्न आणलें. म्हणून रागानें अगस्त्य मुनींनीं त्याचा वध केला. अर्थातच ताटका व मारीच दोघांना अत्यंत राग आला व ते अगस्त्य ऋषींना खायला धांवले. तेव्हां अगस्त्य ऋषींनीं त्यांना शाप दिला कीं, दोघं राक्षस व्हा ! त्याप्रमाणें मारीच राक्षस झाला व त्याची आई ताटका पण एक राक्षसीण झाली. तिचें सर्व सौंदर्य हरपलें व एक भयंकर रूप धारण करून ती नरहत्या करूं लागली.

ताटका अगस्त्य मुनींच्या वाटेला जाऊं शकली नाहीं. परंतु तिनें सर्व प्रदेश उध्वस्त करून टाकला. आज पावेतों तिच्या

Fullscreen 127 62 / 80

भीतीनें कोणी या देशांत पाऊल टाकायला देखील धजत नाहीं. रामा ! तूं तिचा वध करून या प्रदेशाचा उद्धार कर. ती स्त्री असली तरी इतकी दुष्ट आहे कीं तिचा वध केल्यानें तुला पाप लागणार नाहीं."

राम हात जोडून म्हणाला–" मुनिवर ! आमच्या वडिलांची आम्हांला अशी आज्ञा आहे कीं, आपल्या आज्ञेबाहेर आम्ही कांहीं करूं नये. आपल्या आज्ञेप्रमाणें मी ताटकेचा वध करावयास तयार आहे." असें सांगून रामानें धनुष्यावर दोरी चढवून ती एकदांच ओढली.

धनुष्याच्या दोरीचा टंकार ऐकून ताटका व रानांतील प्राणी आवाज कोठून येत आहे पाहूं लागले. आवाजाच्या दिशेनें ताटका धांवत धांवत, विश्वामित्र मुनींबरोबर राम लक्ष्मण जेथें उभे होते तेथें आली.

तिला पाहून राम लक्ष्मणाला म्हणाला– " लक्ष्मणा ! पाहिलेंस हिचें अकाळविकाळ रूप ! शूर वीर देखील हिला पाहून भिऊन पळून जातील. तरी पण तिचा वध करावेंसें मला वाटत नाहीं. ती स्त्री आहे. तिचे नाक व कान कापून तिला कुरूप करून सोडून द्यावें."

रामाचे ते शब्द तिच्या कानावर पडतांच ती रागानें राम लक्ष्मणांना धरण्यासाठीं पुढें आली. रामानें तिचे दोन्ही हात छाटून टाकले. लक्ष्मणानें तिचें नाक व कान कापून टाकले. पण ती मायावी राक्षसीण राक्षसी हास्य करीत पुढें येऊं लागली. हात, नाक व कान पुन्हां तिच्या अंगाला जाऊन चिकटले.

तेव्हां विश्वामित्र मुनि म्हणाले–"रामा ! अरे ही राक्षसीण ! हिच्यावर दया काय दाखविल्यानें काम भागणार नाहीं. ती जिवंत राहिली तर काय काय उपद्रव करील कोणास ठाऊक ? म्हणून संध्याकाळच्या आंत तिचा वध कर. सकाळीं व संध्याकाळीं या राक्षसांचें बळ वाढतें हें तुला माहीतच असेल."

तें ऐकून रामानें एक शक्ति सोडली. ती तिच्या छातींत लागली व ताटका जमिनीवर धडाम दिशी आदळली. त्या हबक्यानें सारी पृथ्वी हादरली. थोडा वेळ जमिनीवर तडफडून ती गार झाली.

विश्वामित्र ऋषींनीं आनंदाच्या भरांत रामाला शाबासकी दिली आणि म्हणाले– "रामा ! आज तूं ह्या राक्षसिणीचा वध





Fullscreen 127 64 / 80



करून सर्व ऋषी व मुनींना खूष केलें आहेस. तुझ्या हातूनच राक्षसांचा संहार होईल!"

दुसऱ्या दिवशीं सकाळीं स्नानसंध्यादि आटोपल्यावर विश्वामित्र ऋषींनीं रामाला बोलाविलें व पूर्वेकडे तोंड करून उभें रहावयास सांगितलें. नंतर त्यांनीं मंत्र म्हणून रामाला अनेक अस्त्रें दिलीं. तीं अस्त्रें रामापुढें हात जोडून उभीं राहालीं व म्हणालीं— "आम्ही आपले दास आहों! आज्ञा व्हावी!" तेव्हां रामानें त्यांना स्पर्श करून स्वतःच्या मनांत रहावयास सांगितलें.

नंतर विश्वामित्र ऋषींनीं रामाला अस्त्रांचा उपसंहार कसा करावयाचा हें देखील शिकविलें आणि त्यानंतर तिघे पुढें गेले.

कांहीं अंतर चालून गेल्यावर एका पर्वताच्या पायथ्याशीं एक सुंदर तपोवन दिसलें. तें पाहून रामानें विचारलें—"ह्या तपोवनांत कोणाचा आश्रम होता? हें फार रम्य असें स्थान आहे." विश्वामित्र ऋषी त्या आश्रमाची गोष्ट सांगूं लागले—

"बळी नांवाचा एक पराक्रमी चक्रवर्ती होऊन गेला. त्यानें त्रिलोक जिंकून स्वर्गावर स्वारी केली तेव्हां विष्णूनें वामनाचें रूप घेऊन अवतार घेतला. बळीनें जो यज्ञ चालविला होता तेथें तो गेला व तीन पावलें जमीन मागितली. बळी चक्रवर्ती दानी व उदार होता. त्यानें कबूल केल्यावर वामनानें दोन पावलांत अखिल ब्रह्मांड व्यापून टाकलें व तिसरें पाऊल ठेवायला जागा मागितली. ती नव्हती म्हणून त्यानें आपलें डोकें पुढें केलें. वामनानें त्यावर आपला पाय ठेवून बळीला पाताळ लोकीं पाठविलें. तो वामन व त्याचे वडील कश्यप याच आश्रमांत रहात असत. म्हणूनच मी देखील आपला आश्रम येथेंच स्थापन केला. राक्षस माझ्या यज्ञांत

Fullscreen 127 66 / 80

विघ्न घालीत आहेत. त्यांचा संहार करणें तुझें काम आहे."

त्या आश्रमाचें नांव सिद्धाश्रम होतें. रामालक्ष्मणाबरोबर विश्वामित्र ऋषींनीं आश्रमांत प्रवेश केल्याबरोबर आश्रमांतले ऋषी त्यांच्या दर्शनासाठीं जमा झाले. त्यांनीं विश्वामित्र ऋषींची पादपूजा करून रामालक्ष्मणांचा सर्व प्रकारें सत्कार केला.

रामालक्ष्मणांनीं कांहीं वेळ विश्रांति घेतली. नंतर ते विश्वामित्र ऋषींना म्हणाले—"महामुनि! यज्ञ आरंभ करावा. यज्ञाच्या रक्षणाचा भार आमच्यावर!"

दुसऱ्या दिवशीं यज्ञ आरंभ झाला. विश्वामित्र ऋषि समाधिस्थ बसले होते. रामालक्ष्मणांनीं हात जोडून विचारलें—"मुनिवर! राक्षस केव्हां येतील?"

यज्ञ मंडपांत बसलेले ऋषी म्हणाले—"विश्वामित्र ऋषी समाधीस्थ आहेत. म्हणून ते आतां बोलणार नाहींत. आज पासून सहा दिवस लागोपाठ राक्षसांच्या हातून यज्ञाचें रक्षण करावें."

रामालक्ष्मणांनीं रात्रंदिवस जागरूक राहून लागोपाठ पांच दिवस यज्ञाचें रक्षण केलें. सहावा दिवस उजाडला. यज्ञ चालू होता. एकाएकीं आकाश गडगडलें. सुबाहु, मारीच वगैरे राक्षस आपलें सैन्य घेऊन येत असलेले रामाला दिसले. रामानें मारीच राक्षसावर एक अस्त्र सोडल्याबरोबर तो समुद्रांत जाऊन पडला. नंतर रामानें आग्नेयास्त्र सोडून सुबाहूला ठार केलें व वायव्यास्त्र सोडून इतर राक्षसांचा संहार केला.

अशा तऱ्हेनें विश्वामित्र ऋषींचा यज्ञ निर्विघ्नपणें पार पडला. त्यांनीं रामाच्या शौर्याची स्तुति करून त्याला आशीर्वाद दिला.

[पुढें चालू.]



आपल्या भारतांतील आश्चर्यें :

# मंडूचे अवशेष

इंदूर शहरापासून सुमारें ६२ मैल दूर एका उंच पठारावर मंडूचा जुना किल्ला आहे. अकराव्या शतकांत परमार राजवंशाचें राज्य माळव्यांत असतांना या किल्ल्याला जास्त महत्त्व होतें.

इ. स. १३०४ ते १४०१च्या दरम्यान माळव्याचा सुपीक प्रदेश मुसलमान सुलतानांनीं काबीज केला. त्यानंतर घोरी व खिलजी राजघराण्यांच्या वंशजांनीं माळवा प्रदेशांत स्वतंत्र राज्य स्थापन झालें. या लोकांची राजधानी मंडू येथें होती.

मंडू शब्दाचा अर्थ आनंद नगर असा होता. पावसाळ्यांत हा प्रदेश इतका मनोहर होतो कीं, स्वतः जहांगीर बादशहानें लिहून ठेवलें आहे कीं येथील सुख व सौन्दर्य अन्यत्र दुर्मीळ आहे.

वर लिहिल्याप्रमाणें सुमारें १२५ वर्षें मंडू नगर खरोखरीच आनंद नगरच होतें.

तेथें एक सात मजली विजय स्तूप, संगमरमरी दगडाचा अश्रफी महाल, जुम्मा मशीद, हुशंगशाहाची समाधी (कबर), अद्वितीय असा जहाज महाल, हिंडोला महाल वगैरे प्रेक्षणीय इमारती आहेत. समोरच्या डोंगरावर रूपमती मंडप आहे.

ही रूपमती एक गायिका होती. मंडूचा शेवटचा सुलतान बाजबहादुर ह्याचें हिच्यावर फार प्रेम होतें. यांच्या प्रेमाविषयीं आज देखील कित्येक गीतें प्रसिद्ध आहेत. इ. स. १५६१ मध्यें अकबर बादशहानें मंडू शहर जिंकलें. बाजबहादुराचा पराभव झालेला ऐकून रूपमतीनें आत्महत्या करून घेतली.



Fullscreen 127 12 / 79



# गंगास्नानाचें फळ

एका गांवीं एक भावडा ब्राह्मण तरुण रहात असे. एकदां नकळत त्याच्या हातून कांहीं चूक झाली. त्याला गांवच्या थोरा-मोठ्यांनीं सांगितलें कीं तें पाप गंगास्नाना-शिवाय धुतलें जाणार नाहीं. हें गंगास्नान आयुष्यभर करावें लागेल.

त्या ब्राह्मणाला तें सर्व खरें वाटलें. त्यानें मागचा पुढचा विचार केला नाहीं व तीर्थ-यात्रेस निघाला. त्यानें गंगानदी पूर्वी कधीं पाहिली नव्हती. ती किती मोठी असेल ह्याची त्याला कल्पना देखील नव्हती. वाटेंत त्याला एक लहानशी नदी लागली. गांवकरी रोज नदीवर स्नानाला जात. आंघोळ करीत असतां एकानें "गंगे भागीरथी!" म्हणून पाण्यांत बुडी मारली. भावड्या ब्राह्मणाला वाटलें कीं तीच गंगानदी असावी. तो तेथें राहून रोज नदींत आंघोळ करूं लागला.

पुढें पांच वर्षांनीं आंघोळ करणाऱ्या एका गांवकऱ्यानें विचारलें—"काय हो कोठून आलांत?"

ब्राह्मणानें आपण केलेल्या पापाचें प्राय-श्चित्त म्हणून गंगास्नान करीत आहे असें सांगितलें.

त्यावर तो मनुष्य म्हणाला—"अहो! पण ही गंगानदी नव्हे! अरे कोठें गंगा-नदी आणि कोठें हा ओढा? वारुळाला हिमालय पर्वत समजणारा या ओढ्याला गंगा म्हणेल!"

तें ऐकून ब्राह्मण थक झाला आणि विचारूं लागला—"तर मग ही नदी गंगानदी नव्हे म्हणतां? मग खरी गंगानदी कोठें आहे?"

"फार दूर आहे!" असें उत्तर ऐकून ब्राह्मण गंगेच्या शोधार्थ निघाला.

भावडा ब्राह्मण दोन महिने पायीं प्रवास करीत एका नदीच्या काठीं पोंचला. ती नदी पुष्कळ मोठी होती. ब्राह्मणानें विचार केला कीं हीच गंगानदी असावी. त्यानें गंगेच्या काठीं एक लहान झोंपडें बांधलें व नदीवर रोज आंघोळीला जाऊं लागला. गांवांतले कांहीं लोक नदीकाठीं रहात असत. त्यांची वस्ती गंगेकाठची वस्ती म्हणून प्रसिद्ध होती. म्हणून कोणी विचारलें कीं, कोठें राहतां म्हणजे तो ब्रह्मण उत्तर देई—"गंगाघाटावर रहातों!" अशींच पांच वर्षें गेलीं तरी त्याला ती खरी गंगानदी नव्हे हें कळलें नाहीं.



कांहीं दिवसांनीं तेथें एक साधू आला. तो काशीयात्रा करून परत आला होता. त्याच्या तोंडीं ब्राह्मणाला कळलें कीं काशीला एक गंगानदी आहे. तेव्हां ब्राह्मण विचारूं लागला—"मग ह्या गंगेचें नांव काय? तेव्हां तो साधू म्हणाला—"अरे! ही गोदावरी नदी आहे!" साधूनें त्याला वेड्यांत काढलें. म्हणाला—"सरळ उत्तरेकडे दोन तीन महिने सतत चालत गेलास तर गंगेचें दर्शन होईल." विचारा ब्राह्मण निराश होऊन पुन्हां उत्तरेकडे निघाला. उन्हाळ्याचे दिवस होते. रोज दहा बारा मैलांपेक्षां जास्त चालणें शक्य नव्हतें. दोन अडीच महिने प्रवास केल्यावर त्याला पुन्हां एक नदी लागली. हीच गंगानदी असणार असें अनुमान करून ब्राह्मण नदीच्याकाठीं राहूं लागला. नित्य नियमितपणें स्नान संध्यादि करूं लागला आणि गंगेचें दर्शन झालें असें समजून समाधान मानूं लागला.

अशींच पांच वर्षें लोटलीं. एके दिवशीं तेथें तीर्थयात्रा करीत एक वृद्ध गृहस्थ आला व नर्मदेचें स्तोत्र म्हणून स्नान करूं लागला. तें ऐकून ब्राह्मण चकित झाला.


Fullscreen

127





14 / 79


त्यानें जवळ येऊन विचारलें—"काय हो! गंगेंत स्नान करतांना तुम्ही नर्मदेचें स्तोत्र म्हणतां हें काय?"

तो म्हातारा चकित होऊन विचारूं लागला—"गंगानदी! कोठली गंगानदी! ही तर नर्मदा आहे! वेड्या गंगानदी येथून पुष्कळ दूर आहे. महिनाभर उत्तरेकडे चालत गेलास तर कदाचित गंगेच्याकाठीं पोंचशील!"

ब्राह्मणानें त्या गृहस्थाचे आभार मानले व पुढें निघाला.

ब्राह्मण अगदीं हताश झाला. त्याला चालण्याचा उत्साह उरला नाहीं. परंतु गंगेचें दर्शन घडलें नाहीं तर पापाचें प्रायश्चित्त होणार नाहीं असा विचार करून तो चालूं लागला. वाटेंत त्याला खायला कधीं मिळे तर कधीं न मिळे. उपास तपास काढीत तो चालत होता.

सतत एक महिना चालत राहाल्यावर त्याला एक मोठी नदी दिसली. इतकी मोठी नदी त्यानें पूर्वी पाहिली नव्हती. नदींत लोक स्नान करीत होते. लोकांच्या तोंडीं हीच गंगानदी आहे हें कळल्यावर त्याला अतोनात आनंद झाला. तो गंगे भागीरथी म्हणत गंगेकडे धांवला. पण त्याच्या दुर्दैवानें त्याला ठेंच लागली व तो खालीं पडला. त्यांतच त्याचें प्राणोत्क्रमण झालें.

यमदूतांनीं त्याला यमासमोर नेऊन हजर केलें. यमानें चित्रगुप्ताला विचारलें—"ह्यानें काय काय पापें केलीं होतीं?"

"ह्यानें एकच एक पाप केलें होतें. परंतु गंगेचें नांव घेऊन त्यानें प्रत्येकवेळीं स्नान केल्यानें तो पापमुक्त झाला आहे." चित्रगुप्त म्हणाला.

यमानें त्याला स्वर्गलोकीं पाठविलें.





# दक्ष-यज्ञ

## द्वितीय अध्याय

घरीं अचानक अन् रागानें
पतीस आलेला पाहून,
पत्नी दक्षाची घाबरली
त्याची मुखचर्या पाहून॥

धीर करुनि ती येउनि जवळीं
वदली—"झालें विशेष काय?
रुक्ष स्वरानें दक्ष म्हणाला—
"नको विचारूं झालें काय?"

"तुझा जांवई पति पार्वतिचा
वागला असा तेथें आज।
नाहिं जगाची पर्वा त्याला
नाहिं जनाची देखिल लाज॥

ब्रह्मदेव पण करतो आदर
वांकतात दिक्पाल समोर।
विचार नाहीं परंतु ह्याला
कोण लहान नि मोठा थोर॥

काम न धंदा आणि भिकारी
वरती करतो अति अभिमान।
त्यानें केला यज्ञ प्रसंगीं
घमेंडींत माझा अपमान॥

अशक्य मिळणें यज्ञाचें फळ
देउन आलों आहें शाप।
भोगूं दे फळ कृतकर्माचें!"
दक्ष थांबला करुनि प्रलाप॥

ऐकुनि पतिची कठोर वाणी
दक्ष पत्नि जाहली चकित,
शाप जांवया कुणि देइल का!
होइल ऐकुनि विश्व चकित!!

परंतु दक्षा नव्हता उरला
क्रोधामध्यें कांहिं विवेक।
विचार केला त्यानें तत्क्षण
यज्ञ करावा मोठा एक॥

Fullscreen 127 16 / 79



उमापतीला सोडुनि त्यानें
सर्व जांवयां बोलविलें;
ऋषी-मुनींना स्वतः जाउनी
आदर पूर्वक बोलविलें।

शंकर यज्ञा आले नाहित
कारण समजेना कोणा।
मुखमुद्रा दक्षाची पाहुनि
नच उरली शंका कोणा॥

दिव्य वाहनें आकाशांतुन
उतरत होतीं हळूं हळूं।
जणुं नक्षत्रें आकाशांतुन
उतरत होतीं हळूं हळूं॥

पूर्व-पश्चिमे कडून आले
आणि दक्षिणे कडून देव।
नाहिं उत्तरे कडून आले
महादेव देवांचे देव॥

कैलासांतुन पहात होती
चकित पार्वती तें सर्व।
तिला कळेना आज अचानक
आला कसला हा पर्व॥

अनुमानानें परंतु कळलें
तिजला ऐकुनि जय जयकार,
यज्ञ घरीं वडिलांच्या अपुल्या!
करूं लागली उमा विचार॥

न कळे कां पण नाहीं आलें
पतीस त्याचें आमंत्रण।
जाउन तिकडे पाहुंया तरी
असेल आलें आमंत्रण॥

नसेल मजला सांगितलें पण
थट्टेनें अन् चिडविण्यास!
स्वभाव भोळा, करतिल थट्टा
कशी? चालली विचारण्यास॥

मनामधें पण शंका होती,
पाय पडत ना म्हणुन पुढें।
आव आणुनी उत्सुकतेचा
हांसत गेली पतीकडे॥



ध्यान मग्न शिवशंकर तिकडे
बसले होते एकांतांत।
पार्वति आल्याचें पण कळलें;
वदले-"कसल्या तूं शोधांत?"

वदली-"सोडुनि थट्टा सांगा;
आज ऐकतें यज्ञारंभ;
आलें अपणां आमंत्रण का
आजच का तो यज्ञारंभ?"

"निघायचें मग आपण केव्हां
बोलत प्रभुपण कां नाहीं?"
शंकर वदले-"अजुनि उमा का
कळलें कारण तुज नाहीं?"

सांगुन तुजला तुझ्या मनाला
कशास दुःखी व्यर्थ करूं?
योग्यवेळि तें कळेल तुजला
नको काळजी व्यर्थ करूं!"

परंतु उलटा तिच्या मनावर
झाला अनपेक्षित परिणाम।
वदली-"प्रभुला पाहुन चिंतित
सुचेल का मज कांहीं काम?

भागीदारिण सुखदुःखाची
सदा सांवली ही प्रभुची।
चिंता न करूं; कोण करिलतर
दासी सोडुन ही प्रभुची?"



शंकर वदले-"तुझ्या पित्यानें
यज्ञ योजिला रागानें।
अपमानास्तव माझ्या, त्यांचा
खटाटोप हा हट्टानें।"

केला नाहीं प्रणाम यास्तव
दिधला त्यांनीं मजला शाप।
लागत आहे पण भोगावा
व्यर्थ तुला सुद्धां तो शाप॥

नाहिं तुला पण बोलविलें बघ
पुत्रि लाडकी तूं त्यांची!
काय जाहली आजच नकळे
मर्जी तुजवरची त्यांची!!"










ऐकुनि वदली उमा शिवाला—
"पित्या जवळ का मान करूं ?
जिथें जनमल्यें मोठी झाल्यें,
आज तिथें का मान करूं ?

माहेरी जाण्याला कामी
निमंत्रणाची पाहूं वाट ?
शोभतो कसा जांवयाविना
विचारीत यज्ञाचा थाट ?

आज्ञा अपुली नसेल तर मी
करून हट्ट नाहीं जाणार।
पाहुनि यावा यज्ञ जाउनी
राग मला पण आहे फार ॥"

वदले शंकर—"जाउन ये पण
व्यर्थ वाटतें सर्व मला।
अनुभव माझा आणि जगाची
एक सांगतों रीत तुला ॥

निमंत्रणाविण कुणाकडेही
माहेरी पण जाउं नये।
सुधापान जरि मान विनाचें
सुज्ञानें स्वीकारूं नये !

पण बोलावुन दिधलें विषजरि
हंसत करावें त्याचें पान।
अपमानानें जगण्या पेक्षां
मानानें सोडावा प्राण !"

ध्यान-मग्न शिव पुन्हां जाहले
उमा निघाली माहेरी।
स्वारीसाठीं आला नंदी
आणि वाजली रणभेरी ॥

युद्ध कुणाशीं नव्हतें तरि पण
त्रिशूल घेउन गण आले।
खिन्न पार्वतिस, कांहिं कळेना,
कशास गण सारे आले !

# अग्निद्वीप

[ १२ ]

[नागवर्माच्या सर्व सैन्याची कपिलपूरच्या किल्ल्यांत कत्तल झाली. तो करवीर-बरोबर स्वत:चा जीव वांचविण्यासाठीं तेथ पाळून रानांत पळून गेला. किल्ल्यांत चित्रसेन व कांतिमतीचा लग्नसमारंभ थाटानें पार पडला. चित्रसेनानें उग्राक्षाची नवी इच्छा पुरी करण्याचें वचन दिलें. पुढें वाचा.]

उग्राक्षानें हाक मारल्याबरोबर त्याचे अनुयायी सर्व जमा झाले. त्यांच्याकडे बोट दाखवून उग्राक्ष म्हणाला—"महाराज! आपल्याला आमच्या मदतीची गरज असेल तेव्हां निरोप पाठवा. आम्ही सर्व तातडतोब येऊं."

चित्रसेन थट्टेत म्हणाला—"तुझ्या या अनुयायांच्या मदतीशिवायच माझ्या राज्यांत शांतता नांदो अशी माझी इच्छा आहे. तरी पण तूं एक मदद केलीस कीं पुरे. बंडखोर नागवर्मा व त्याचा तो कारस्थानी मित्र करवीर या दोघांना पकडून आणण्याची जबाबदारी तुझ्यावर व तुझ्या अनुयायांवर आहे माझ्यावर किंवा तुझ्यावर कधीं संकट आलेंच तर तें या दोघांच्यामुळेंच येणार आहे, म्हणून मी ही सूचना केली आहे."

"ते तूर्त कोठें दिसत नाहींसे झाले आहेत. पण सुटतात कोठें, पाहतों मी! मी आपल्या अर्ध्या अधिक अनुयायांना याच

Fullscreen 127 20 / 79



कामावर नेमतों. तूं अगदीं निश्चिंत रहा." उग्राक्ष म्हणाला.

परंतु अमरपालला नागवर्मा आतां हातीं लागेल कीं नाहीं याविषयीं शंकाच वाटत होती. तो म्हणाला—"महाराज! आपल्याला उशीर झाला असें माझें मत आहे. आतां-पर्यंत ते दोघे पूर्वेकडील समुद्रांतल्या अग्नि-द्वीपाकडे रवाना देखील झाले असतील."

चित्रसेनच्या मनांत देखील तीच शंका होती. पण तो कांहीं बोलला नाहीं. उग्राक्ष चित्रसेनाचा निरोप घेऊन आपल्या अनुयायां-सह आपल्या किल्ल्याकडे निघाला.

दोनतीन महिने गेले असतील, चित्रसेना-कडे प्रजेचीं गाऱ्हाणीं येऊं लागलीं. दिवसा ढवळ्या खून होत आणि दरोडे पडत व जाळपोळ वाढत चालली होती. गुन्हे कर-णारे लोक राज्यांतलेच आहेत कीं राज्या-बाहेरचे हें देखील कळायला मार्ग नव्हता. डोंगराळ प्रदेशांत दऱ्याखोऱ्यांत ते लपून रहात व छापे मारीत. त्यांनीं प्रजेला सता-वून सोडलें होतें. त्यांच्या पैकीं एक मनुष्य देखील जिवंत किंवा मेलेला पकडला गेला नव्हता. म्हणून ते लोक कोण आहेत, कोठून येतात वगैरे गोष्टींचा अंदाज लावणें देखील अशक्य प्राय झालें होतें.

चित्रसेनानें राज्यांत चहूकडे दवंडी पिट-विली कीं राज्यांत कामधंदा न मिळाल्यामुळें जे लोक धंदेवाईक चोर किंवा दरोडेखोर झाले असतील त्यांनीं येऊन सरकार दरबारीं माफी मागितल्यास त्यांना माफी मिळेल. त्यांना शेतें वांटण्यांत येतील व शेतसारा माफ केला जाईल. बैल विकत घेण्यासाठीं सरकार कडून थोडी फार मदत देखील मिळेल. मात्र या धंदेवाईक चोरांनीं आपलीं शस्त्रें स्वतः येऊन सरकारजमा करावी." चित्रसेनाची ही युक्ति यशस्वी ठरली. शेंकडों रामोशी



जातीच्या लोकांनीं आपापलीं शस्त्रें सरकार जमा केलीं व दरबारांत जातीनें हजर होऊन आपल्या चुकीची माफी मागितली. चित्रसेन आपला नवा सेनापति अमरपाल याच्यासह रामोशी लोकांचें म्हणणें ऐकण्यासाठीं राज-वाड्यासमोरच्या अंगणांत आला.

चित्रसेनानें व अमरपालनें दरोडेखोर लोकांना माना खालीं करून उभे असलेले पाहिले. अमरपालला त्या लोकांपैकीं कांहीं ओळखीचे वाटले. तो चित्रसेनाला म्हणाला—"महाराज! या दरोडेखोरांच्या घोळक्यांत नागवर्माच्या सैन्यांतले लोक देखील दिसत आहेत. म्हणून महाराजांनीं यांच्यावर विश्वास करून जमिनी वगैरे देणें कितपत बरोबर होईल याचा विचार करावा. सांपाला दूध पाजण्यांत अर्थ नाहीं. तो केव्हां उलटेल हें सांगतां येणार नाहीं."

चित्रसेनानें तें सर्व शांतपणानें ऐकून घेतलें व नंतर त्या दरोडेखोरांना विचारलें—"तुमचा नायक तो नागवर्मा कोठें आहे? त्यांच्या बरोबर तो करवीर होता. तो देखील दिसत नाहीं. आहेत कोठें?"

"महाराज! आमचा कोणी नायक नाहीं. नायक नाहीं म्हणून निराश होऊन



पोटा करितां वाटमारीचा धंदा करावा लागत आहे. महाराज, आपल्या सेनापतींनीं जी शंका केली ती बरोबर आहे. आम्ही नाग-वर्माचा सैन्यांतच होतों. परंतु त्या दिवशीं नागवर्मानें आम्हांला किल्ल्यांत जायला सांगून आम्हांला आगींत ढकललें व स्वतः करवीर बरोबर पळून गेला. आम्ही देखील जीव वांचविण्यासाठीं वाट फुटेल तिकडे पळालों. आतां त्यांच्यावर आमचा मुळींच विश्वास नाहीं. आज आमचा कोणी नायक नाहीं. नागवर्मा कोठें गेला हें आम्हांला माहीत देखील नाहीं." दरोडेखोरांपैकीं एक जण

Fullscreen 127 22 / 79



पुढें येऊन म्हणाला. "पण तुमच्या बोलण्यावर विश्वास कसा काय करावयाचा ?" चित्रसेनानें विचारलें.

"पोटाकरितां आम्ही आजवर चोऱ्या केल्या, दरोडे पाडले आणि जाळपोळ केली. परंतु महाराजांनीं पोटापाण्याची व्यवस्था करून दिल्यावर आम्ही तो धंदा कां करायला जाऊं ? स्वतः होऊन महाराजांच्या पायाजवळ आपलीं शस्त्रास्त्रें ठेवायला आम्ही आलों आहों. महाराजांनीं आम्हांला कैद केलें, फांशी दिली, किंवा हत्तीच्या पायांखालीं तुडविलें तरी आम्ही महाराजांच्या विरुद्ध उलटणार नाहीं. आम्हांला माफ करून महाराजांची प्रजा म्हणून मानानें रहायला महाराजांनीं संधी द्यावी." एवढीच आमची इच्छा आहे. एक दरोडेखोर म्हणाला.

"मी तुम्हांला शेतें वांटून द्यायला तयार आहें. परंतु तुम्ही तर पन्नास जणच दिसतां आहां ! बाकी लोक कोठें आहेत ?" चित्रसेनानें विचारलें.

"महाराजांनीं शरणागताला शरण दिल्याचें ऐकून इतर लोक देखील धांवत येतील महाराज !" दरोडेखोरांचा सरदार म्हणाला.

अमरपालनें चित्रसेनाजवळ जाऊन त्याच्या कानांत सांगितलें, महाराज ! आपण यांच्यावर विश्वास करूं नये. यांत नागवर्माचाच कांहींतरी डाव असावा अशी मला शंका वाटते. नागवर्माचें कारस्थान उघडकीस आणण्यासाठीं यांना कांहीं दिवस कैदेंत टाकून पहावें.

"मी तें करणार नाहीं. वचन देऊन तें मोडणें मला पसंत नाहीं. मग माझी प्रजा माझी काय किंमत करील ?" चित्रसेनानें उत्तरादाखल विचारलें.



"तर मग एक क्षणभर आपण मला संधी द्यावी. मी धमकी देऊन यांची परीक्षा घेऊन पाहातों." असें सांगून व चित्रसेन 'हो' म्हणाल्यावर अमरपाल दरोडेखोरांना संबोधन करून म्हणाला—"महाराजांना या गोष्टीची खात्री आहे कीं, तुमच्यापैकीं कांहीं लोकांना नागवर्मा कोठें आहे याची चांगली माहिती आहे. जर तुम्ही निमूटपणें सर्व कांहीं सांगितलें नाहीं, तर तुम्हां सर्वांना आयुष्यभर तुरुंगांत खितपत पडावें लागेल !"

अमरपालची ती धमकी ऐकल्या बरोबर दरोडेखोरांच्या सरदारानें हात पुढें करून तळहातावरची विषाची गोळी दाखवीत म्हटलें—"महाराज ! आम्ही त्याची देखील तयारी करून आलों आहों. आपले शिपाई पुढें येण्यापूर्वीच ही गोळी खाऊन आम्ही मुक्त होऊं." सरदारानें असें म्हटल्याबरोबर सर्वांनीं हात पुढें करून तळहातांतली विषाची गोळी दाखविली.

तेव्हां अमरपालची पण खात्री पटली कीं, दरोडेखोरांच्या बोलण्यावर विश्वास करण्यास हरकत नाहीं. चित्रसेन किंचित स्मित करून म्हणाला—"आज पासून माझी प्रजा म्हणून तुम्हांला माझ्या राज्यांत सर्व



अधिकार मिळतील. मी तुम्हांला शेतीसाठीं जमीन देण्याची व्यवस्था करून देतों." दरोडेखोरांनीं आनंदानें चित्रसेनाचा जयजयकार केला.

राज्यांतल्या इतर दरोडेखोरांना जेव्हां ही बातमी कळली तेव्हां त्यांनीं येऊन आपला अपराध स्वीकार केला व आपलीं शस्त्रास्त्रें देऊन पोटापाण्याची व्यवस्था करण्यास विनंति केली. चित्रसेनानें त्यांना देखील जमिनी वांटून दिल्या !

राज्यांत दंगे धोपे बंद होऊन शांतता नांदूं लागली. पण नागवर्मा व करवीर जिवंत





Fullscreen

127





24 / 79



पळून गेल्यामुळें ते अग्निद्वीपांत जाऊन भयंकर पक्ष्यांचें सैन्य घेऊन येतील याची भीति चित्रसेनाला वाटत होती.

एक ही काळजी होती. काळजीला दुसरें एक कारण झालें. कांतिमति गरोदर होती. मूल झाल्यावर पांच वर्षांनीं त्याला उग्राक्ष मागून घेऊन जाणार, या विचारानें चित्रसेनाचें काळीज कांपूं लागलें. त्यानें ती गोष्ट कांतिमतीला सांगितली नव्हती. तिच्या मनावर त्या परिस्थितींत वाईट परिणाम झाला असता.

कांतिमती यथावेळीं प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. राज्यांत सर्वत्र आनंदी-आनंद पसरला. पण त्या आनंदाच्या प्रसंगीं उग्राक्ष आला व पाळण्यांत मुलाला पाहून वेड्यासारखा नाचूं लागला. चित्रसेन उदास चित्तानें जवळ उभा राहून तें दृश्य पहात होता. उग्राक्षाच्या तोंडांतून निघालेले शब्द—"आज पासून पांच वर्षांनीं !" चित्रसेनाच्या कानांत घुमत होते.

दिवस, महिने व वर्षे लोटलें. तान्हे युवराज वाढत होते. आनंदाला पारावार नव्हता. अशींच पांच वर्षें पण लोटलीं.

प्रजेला रात्रीं आकाशांत मधून मधून जाळ दिसे. हळू हळू ते अग्निपक्षीच असले पाहिजेत अशी सर्वांस शंका वाटूं लागली. चित्रसेनाच्या हेरांनीं येऊन सांगितलें कीं, अग्निपक्षी राजधानीवर घिरट्या घालूं लागले आहेत.

पांच वर्षें ज्या दिवशीं पुरी झालीं त्या दिवशीं सकाळीं उग्राक्ष येऊन बडकला आणि विचारूं लागला—"कोठें आहे राजकुमार ?"

चित्रसेनानें शांत पणें उत्तर दिलें—"मी घेऊन येतों त्याला !" असें सांगून तो अंत:पुरांत गेला.

चित्रसेनाच्या तोंडावर एक देखील सुरकुती न पडलेली पाहून उग्राक्षाला आश्चर्य वाटलें. मुलांत कांहीं व्यंग तर नसेल ना !


Fullscreen






26 / 79



लंगडा किंवा आंधळा मुलगा असेल तर मीच फसलों म्हणावयाचा.

उग्राक्ष याच विचारांत उभा होता, इतक्यांत दासींनीं एका हृष्टपुष्ट मुलाला आणून दरबारांत हजर केलें. उग्राक्षानें आनंदाच्या भरांत मुलाला खांद्यावर उचलून घेतलें आणि जातांना म्हणत जात होता—" महाराज ! तुमचे हे उपकार मी कधीं विसरणार नाहीं."

उग्राक्ष रानांत पोंचल्यावर मुलानें एका झाडाखालीं पडलेल्या वाळक्या काटक्या दाखवून त्या घेण्यासाठीं हट्ट केला.

उग्राक्षानें त्याला खांद्यावरून खालीं उतरवलें आणि काटक्या गोळा करायला सांगितल्या. नंतर त्यानें त्याला विचारलें—" बाळ ! या काटक्या घेऊन काय करणार तूं ?"

" या मी बाबांना नेऊन देईन ! धूर झाला म्हणजे बाबा काटक्या घालून जाळ करतात !" मुलगा म्हणाला.

उग्राक्षाला उलगडा नाहीं झाला. चित्रसेनाला काटक्यांची काय गरज ? आणि तो जाळ कसला करणार ! आपल्याला चित्रसेनानें फसविलें तर नाहीं ? त्यानें विचारलें—" तुझे बाबा काय करतात बाळ ?"

" सैंपाक करतात ! छान सैंपाक करतात ! लाडू, जिलब्या, खीर सर्व छान करतात." तो मुलगा म्हणाला.

उग्राक्ष त्या मुलाकडे चकित होऊन पहात उभा राहिला. म्हणजे माझी समजूत घालण्याकरतां सैंपाक्याच्या पोराला माझ्याबरोबर पाठविलें आहे. त्याला इतका राग आला कीं जाऊन चित्रसेनाचा राजवाडा जमीन दोस्त करावा असें त्यानें ठरविलें आणि रागाच्या भरांत मुलाला खांद्यावर घेऊन झपाझप पावलें टाकीत तो कपिलपुराकडे निघाला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]





# प्रश्नांचें मौन उत्तर

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. झाडाजवळ जाऊन प्रेत खांद्यावर काढून घेतलें आणि स्मशानाकडे मुकाट्यानें निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ बोलूं लागला. म्हणाला—" स्वतःच्या अंगचे गुणच कित्येकांच्या उन्नतीस बाधक होतात. हेंच पहा ना, मी तुला जे जे प्रश्न विचारले, त्यांचीं तूं उत्तरें देत गेलास आणि तुझ्या कामांत बिघाड झाला. तुला फायदा तर कांहींच झाला नाहीं. तुझ्यासारखीच नागकन्या अनंगराग सर्व प्रश्नांचीं उत्तरें देत असे व त्यामुळें तिचें लग्न बरेच दिवस होईना. परंतु शेवटीं तिला यश मिळालेंच. तिची गोष्ट मी तुला आज सांगणार आहें." असें सांगून त्यानें गोष्ट सुरू केली.

एका काळीं सूर्यकांत नांवाचा एक राजा एका देशांत राज्य करीत असे. आपल्या पराक्रमानें तो चक्रवर्ती झाला.

Fullscreen  127     28 / 79



वेदवेदांगाचा त्यानें छान अभ्यास केला होता. रूपानें तर तो मदनाचा पुतळाच होता. त्याच्या राज्यांतल्या सर्व स्त्रियांचें मन त्यानें जणुंकांहीं हिरावून घेतलें होतें. पण त्याचें मन मोहित करूं शकेल अशी एक देखील स्त्री त्याच्या राज्यांत नव्हती.

स्त्रियांचें नांव ऐकलें कीं राजाच्या कपाळाला आंठ्या पडत. लग्न करण्याचा विचार त्याच्या मनांत कधींच आला नाहीं. वंशाची वाढ आतां कशी होणार? आणि त्यांत राजघराणें! राजाला वारस नसेल तर राज्यांत अराजकता माजेल. मंत्र्यांना फार काळजी वाटूं लागली. त्यांनीं राजाची समजूत घालण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण त्यांचे सर्व प्रयत्न फुकट गेले. त्यांनीं एकाहून एक सुंदर स्त्रिया आणून त्यांच्यावर राजाची नजर पडावी असा प्रयत्न केला. पण राजानें त्यांच्याकडे एकदां वळून देखील पाहिलें नाहीं. शेवटीं प्रधान अमात्यानें धीर करून निवेदन केलें—

"महाराज! आपला विवाह व्हावा अशी सर्व मंत्री, दरबारी व प्रजेची इच्छा आहे. आपण विवाह केला नाहीं तर आपल्या या घराण्याचें नांव पुढें कोण चालवणार?"

पण राजा कांहींच बोलला नाहीं. शेवटीं पंतअमात्यांनीं राज्यभर घोषणा करविली कीं, जो कोणी राजाचें मन विवाह करण्यास वळवील त्याला एक लाख मोहरा इनाम मिळतील.

तें ऐकून कित्येक मांत्रिक येऊन राजावर आपल्या मंत्राचा प्रयोग करूं लागले. वैद्य औषधी व वनस्पती घेऊन आले. राजाला जेव्हां ही गोष्ट कळली तेव्हां त्यानें मांत्रिक व वैद्यांना कैदेंत टाकलें. नंतर त्यानें असा हुकूम काढला कीं, राजाच्या नजरेसमोर जर कोणी स्त्री आली तर तिला हद्दपारीची शिक्षा देण्यांत येईल. एवढें झाल्यावर मात्र पंतप्रधानांनीं हात टेंकले.

एकदां एक चित्रकार राजधानींत आला. नागरिकांच्या तोंडून राजा लग्न करायला तयार नाहीं हें ऐकून व स्त्रीजातीच्या विरुद्ध निघालेला नवा हुकूम ऐकून तो पंतप्रधानांना जाऊन भेटला व म्हणाला—"तुमच्या राजाचें लग्नाला मन वळविण्याची जबाबदारी घ्यायला मी तयार आहें."

पंतप्रधानानें त्याला एक लाख मोहरा त्या कामासाठीं बक्षिस म्हणून देऊं केल्या. चित्रकार पंत प्रधानांना म्हणाला—"तुम्ही कांहीं तरी उपाय करून राजाकडून मला बोलावणें येईल असें करा. त्यानंतर जें कांहीं करावयाचें तें मी पाहून घेईन."

प्रधानानें राजाला जाऊन सांगितलें कीं, गांवांत एक मोठा चित्रकार आला आहे. राजवाड्याच्या भिंतीवर उत्तम चित्रें काढण्याचें काम त्याला देण्यास हरकत नाहीं. त्याच्यासारखा चित्रकार दरबारांत असला तर आपल्या दरबाराचा मान देखील वाढेल."



सूर्यकांत महाराज स्वतः एक उत्तम कलाप्रेमी व चित्रकार होते. ते म्हणाले—"त्यांत माझ्या आज्ञेची वाट पाहण्याचें कारणच नव्हतें. तुम्ही जाऊन त्याला आदरपूर्वक माझा निरोप सांगा व त्याला दरबारांत घेऊन या."

दुसऱ्या दिवशीं चित्रकार राजाकडे आला आणि म्हणाला—"महाराज! आपल्या दर्शनानें मी धन्य झालों. परवानगी असेल तर मी आपल्या कलेचे एक दोन नमुने महाराजांस दाखवूं इच्छितों. प्राकृतिक दृश्य, पौराणिक व धार्मिक चित्रांबरोबर मनुष्य


चांदोबा

Fullscreen 127 30 / 79

समाजांतले निरनिराळे प्रसंग निवडून चित्रें काढलीं आहेत.

राजाच्या आज्ञेनें चित्रकाराच्या कलेचें प्रदर्शन एका मोठ्या दालनांत करण्याची व्यवस्था करण्यांत आली. राजा चित्रकला पाहण्यास आला. एका मागून एक चित्र पहात असतां त्याला एका स्त्रीचें चित्र दिसलें तें पाहतांच राजा बेशुद्ध होऊन खालीं पडला.

चित्रकारानें मंत्र्यांना हंसतमुखानें विचारलें—"तुम्ही म्हणाला होतां तशी चिकित्सा मी केली आहे कीं नाहीं? आतां मला माझें इनाम देऊन निरोप द्यावा."

"परंतु आमच्या इच्छेप्रमाणें परिणाम झाला आहे कीं नाहीं हें प्रथम कळलें पाहिजे!" मंत्री म्हणाले.

"राजाला शुद्ध आल्यावर राजा काय बोलतो व काय करतो हें कळल्यावर तुमच्या मनांत शंका असेल तर ती दूर होईल. मी तों पर्यंत थांबावयास तयार आहें." चित्रकार म्हणाला.

चित्रकार बाहेर जाऊन बसला. थोड्या वेळानें राजा शुद्धीवर आल्यानंतर विचारूं लागला—"कोठें गेला तो चित्रकार? बोलवा त्याला!"

"तो आतांच बाहेर गेला महाराज!" प्रधान म्हणाले.

"संध्याकाळ पर्यंत त्याचा शोध काढून त्याला आणलें नाहीं तर लक्षांत ठेवा. तुमच्या बरोबर सर्व मंत्र्यांना हत्तीच्या पायां खालीं तुडवून देण्याची शिक्षा होईल. मंत्र्यांनीं शोध काढण्याचें थोडें सोंग करून चित्रकाराला राजासमोर हजर केलें.

राजानें सर्वांस बाहेर जायला सांगून चित्रकाराजवळ एकांतांत बोलायचें ठरविलें. सर्व लोक निघून गेल्यावर राजा म्हणाला—"तुझी कला पाहून मी चकित झालों आहें. तूं ज्या स्त्रीचें चित्र मला दाखविलेंस ती पूर्व जन्मीं माझी स्त्री असावी असें मला वाटत आहे. तूं तिला केव्हां व कोठें पाहिलेंस तें सांग. तूं मागशील तें इनाम मिळेल. तिच्याशीं माझा विवाह झाला तर मी सुखी होईन!"

चित्रकार म्हणाला—"महाराज! तिला आपण विसरून जावें हेंच बरें. कारण आज ती ज्या जागीं निवास करीत आहे तेथें पोंचणें अशक्य आहे. ती नागराजाच्या घरीं अनंगराग नांवानें जन्मास आली आहे. ती एका रानांत एकटी राहाते. कित्येकांनीं





Fullscreen  127     32  / 79




तिच्याशीं लग्न करण्यासाठीं नागराजाकडे मागणी घातली. पण तिला एकहि राजकुमार पसंत पडला नाहीं. आणखी एक विचित्र गोष्ट तिच्या संबंधीं मी ऐकली आहे. तिला मागणी घालणाऱ्या प्रत्येक राजकुमारानें तिला रोज एक प्रश्न विचारला पाहिजे. त्याचें ती उत्तर देते. ज्या राजकुमाराच्या प्रश्नाचें उत्तर ती देऊं शकणार नाहीं त्याच्याशीं ती लग्न करणार आहे. परंतु ज्या राजकुमाराला अपयश येईल त्याला आयुष्यभर नागकन्येचें दास्य करावें लागेल. महाराजांनीं माझें मतें त्या नागकन्याचा नाद सोडून द्यावा."

सूर्यकान्त महाराज म्हणाले—" काय वाटेल तें झालें तरी मी त्या नागकन्येला जाऊन भेटणार आहें. मी तिचा पराजय करून तिच्याशीं लग्न तरी करीन किंवा आयुष्यभर तिचें दास्य करीन."

राजानें अनंगरागच्या महालाकडे जाणारी वाट विचारून घेतली आणि तिची भेट घेण्यासाठीं निघाला. महाराज निघालेले पाहून त्यांचा बालमित्र विनोद देखील त्यांच्या बरोबर निघाला. तसा विनोद राजाच्या दरबारीं एक विदूषक म्हणून काम करीत असे. तो महाराजांना येऊन म्हणाला—" महाराज! त्या नागकन्येच्या नादीं काय लागतां? तिचें चित्र पाहल्यापासून आपली अर्धी बुद्धी लयास गेली आहे. उरलेली अर्धी तिला पाहाल्याबरोबर नाहींशी होईल. म्हणून माझी बुद्धि आपण उधार म्हणून घ्यावी." विनोदनें विनोदपूर्वक सूचना केली.

सूर्यकान्त विनोदी मित्र विनोद बरोबर नागकन्येच्या महालाजवळ येऊन पोंचला. विनोदनें म्हटल्याप्रमाणें खरोखरच राजाची बुद्धि पूर्णपणें लयास गेली. काय बोलावें हेंच त्याला सुचेना.

विनोदनें येण्याचें कारण अनंगरागला सांगितलें. नियमाप्रमाणें आतिथ्य सत्कार संपल्यावर अनंगरागनें लग्नापूर्वीं पाळावयाची आपली अट सांगून प्रश्न विचारावयास सांगितलें. रोज एक या प्रमाणें एक वीस दिवस प्रश्न विचारावे. ज्या दिवशीं प्रश्नाचें सयुक्तिक उत्तर मी देऊं शकणार नाहीं त्या दिवशीं मी आपणांशीं लग्न करीन. आपल्याला या प्रयत्नांत यश मिळालें नाहीं तर मात्र आपल्याला माझें दासत्व करावें लागेल. " असें सांगून ती तेथून निघून गेली."

अनंगरागच्या महालांतच राजा व त्याचा विनोदी मित्र दोघांची राहण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. राजाच्या वतीनें विनोद रोज एक गोष्ट सांगून अनंगरागला एक प्रश्न विचारीत असे व ती त्याचें समाधान कारक उत्तर देऊन निघून जात असे.

अशाप्रकारें एकोणीस दिवस लोटले व विसावा दिवस उजाडला. विनोद तिला जिंकू शकला नाहीं. राजा अनंगरागचें सौंदर्य पाहून मोहित झाला असल्यामुळें त्याच्या तोंडून एक शब्द देखील निघत नसे. म्हणून विनोदनें कोणता प्रश्न विचारला व तिनें काय उत्तर दिलें हें देखील त्याला



कळलें नाहीं. पण अनंगरागच्या चेहऱ्यावर थोडा फरक पडत चालल्याचें त्याला उमगलें. पहिल्या दिवशीं तिनें त्याच्याकडे तोंड फिरवून पाहिलें देखील नाहीं. दुसऱ्या दिवशीं एकदां पाहिलें. त्यानंतर राजाकडे एक दोनदां पाहल्या शिवाय तिला चैन पडत नसे. हळू हळू ती राजाकडे पहायला लाजूं लागली. तिचा चेहरा एकाएकीं लाल होऊं लागला. कधीं कधीं निश्वास सोडून मान खालीं करून बसूं लागली.

हें सर्व पाहून राजानें विचार केला, तिच्या मनावर खात्रीनें माझा पगडा बसला

Fullscreen 127 34 / 79

आहे. त्याला एका एकीं एक प्रेरणा झाली. तो विनोदला म्हणाला—"आज मी एक प्रश्न विचारणार आहें. तुला अपयश आल्याचें मला फार दुःख होईल. त्या प्रश्नाचें उत्तर ती देऊं शकणार नाहीं मी नक्की सांगतों."

त्या दिवशीं अनंगराग आल्याबरोबर राजानें तिला प्रश्न केला. तो प्रश्न ऐकतांच तिनें धांवत येऊन राजाला विचारलें—"महाराज! हा प्रश्न आजवर मला कां नाहीं विचारला? माझा अंत पाहण्याचें ठरविलें होतें का?"

राजानें तिला विचारलें कीं, मी जिंकावें असें जर तुला वाटत होतें तर तूं आम्ही विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर द्यायचें नव्हतेंस!

"पण महाराज! आम्हां स्त्रियांचें ज्यांच्यावर प्रेम असतें त्यांना त्रास देण्यांत व त्यांची परीक्षा पाहण्यांत आम्हांला आनंद वाटतो." अनंगराग म्हणाली.

पुढें दोघांचा विवाह झाला. दरबारी व मानकरी खूष झाले.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें—"राजा, मला हें समजत नाहीं कीं, अनंगरागला राजानें कोणता प्रश्न विचारला असावा? या प्रश्नाचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे! तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर पडतील."

विक्रमार्क म्हणाला—"त्यांत काय, राजानें विचारलें असेल, तूं उत्तर देऊं शकणार नाहींस असा कोणता प्रश्न असूं शकेल?" त्या प्रश्नाचें ती उत्तर काय देणार? ही सोपीशी गोष्ट दुसऱ्या कोणालाहि सुचली नाहीं."

अशाप्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवाबरोबर अदृश्य झाला आणि झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.

(कल्पित)






# मेलेला जिवंत झाला

दुसऱ्या दिवशीं आजीनें भीमूला समजावून सांगितलें कीं, बाळ, काल तुला ज्यानें काम सांगितलें होतें तो लबाड होता. त्याच्यासारख्या लोकांचें ऐकत जाऊं नकोस. कोणातरी म्हाताऱ्या साधूची सेवा केलीस तर तुला निदान मुक्ति तरी मिळेल.

भीमू निघाला. वाटेंत एका जागीं त्याला एक आंधळा भिकारी भेटला. आंधळ्याची काठी धरून एक लहान मुलगा पुढें वाट दाखवायला चालत होता. भीमू व तो मुलगा दोघे परस्परांशीं बोलत एका जागीं बराच वेळ उभे राहाले. भीमूला कळलें कीं, तो मुलगा आईबापांशीं भांडण करून घरांतून पळून आला होता. तो म्हणाला—"हा आंधळा भिकारी साधुपुरुष आहे. त्याच्या सेवेंत मला पुष्कळ लाभ झाला आहे."

भीमूनें त्या साधूची सेवा कांहीं दिवस करण्याची इच्छा दर्शवली. तो मुलगा त्या गोष्टीस कबूल झाला आणि आंधळ्याला म्हणाला—"या पुढें हा तुमची काठी धरून चालेल. तुम्ही ह्याला आपला शिष्य करून घ्या. मी येतों." असें सांगून व आंधळ्याच्या काठीचें एक टोक भीमूच्या हातीं देऊन तो मुलगा निघून गेला.

भिकारी म्हणाला—"मला दिसत नाहीं. तूं एक टोक धरून पुढें चालत रहा मी मागें येत राहीन. उंच सखल जागा असली किंवा पाणी बिणी असलें म्हणजे मला सांगत जा म्हणजे झालें. तसें तुला मागें पाहण्याची सुद्धां गरज नाहीं. संध्याकाळीं जी भीक मिळेल ती धर्मशाळेंत बसून शिजवून खाऊं. सैंपाक तुलाच करावा लागेल. कोठें जाण्यापूर्वी बरोबरचें सर्व सामान आहे किंवा नाहीं

Fullscreen  127     36 / 79 



हें सर्व तुलाच प्रथम पहावें लागणार. आपल्या जवळ तसें फारसें सामान नाहीं. फक्त ताटली, टोपली, तपेली, एक चिमटा आणि ही काठी....बस. भीमूनें सर्व लक्षपूर्वक ऐकून घेतलें. संन्याश्याकडे एक काठी होती. काठीच्या दोन्ही टोकांना गांठोडें अडकवण्याची व्यवस्था होती.

भिकारी खांद्याला अडकवून काठीचें एक टोक धरून चालत असे व भीमू टोपली डोक्या-वर ठेवून काठीचें दुसरें टोक धरून पुढें पुढें चालत असे. दोघे एका गांवाला जात होते. भीमू मधून मधून मागें वळून पहात असे कीं आंधळा भिकारी येत आहे कीं नाहीं. भिकारी त्याला म्हणाला—“ मागें पाहण्याची गरज नाहीं. कोठें खांच खळगा आला किंवा पाणी असलें म्हणजे सांग.”

भीमूनें मागें वळून न पाहण्याची जणुं-कांहीं शपथच खाल्ली. कांहीं अंतर चालून गेल्यावर मध्यें एक ओढा लागला. भीमू मागें वळून पाहाल्याशिवाय म्हणाला—“ गुरु-वर ! पुढें पाणी आहे ! ”

“ कोणी पायीं पार करीत आहे का ? ” भिकाऱ्यानें विचारलें.

ओढ्याच्या पाण्यांत उतरत भीमू म्हणाला—“ होय ! गाई पार करीत आहेत ! ”

“ तर मग चल ! ” भिकारी म्हणाला.

भीमू ओढ्यांत चार पावलें चालल्यावर म्हणाला—“ दगड ! ” आणि पाय अडखळून खालीं पडला. भिकारी पण पाण्यांत पडला. त्याची झोळी काठीच्या टोकाला अडकून राहिली. इतक्यांत एकदम लोंढा आला आणि भिकारी गेला वाहून. काठीला अडकलेल्या झोळींत मासे व एक सांप काठीचें टोक व झोळीची गांठ यांत असा सांपडला होता कीं त्याला निसटून जाणें शक्य नव्हतें व तो मरून गेला.

भीमूनें मागें वळून देखील पाहिलें नाहीं. झोळी फरपटत ओढत नुसता चालत होता. गांवांत पोंचल्यावर लोक ओरडूं लागले—“ अरे, सांप ! सांप ! ”

“ सांप नाहीं ! माझे गुरु आहेत ते ! ” भीमू म्हणाला.

“ सांप आहे, तुझा गुरुबिरु कोणी नाहीं. एकदां मागें वळून तर पाहशील ? ” लोक म्हणाले.

“ मागें वळून पाहणार नाहीं. पाहूं नये अशी गुरूची आज्ञा आहे. ” भीमू म्हणाला. लोक जमा झालेले पाहून त्यानें संवयी प्रमाणें “ गुरु ! ” म्हणून म्हटलें. पण “ जय सीताराम ! ” असें उत्तर न आल्यामुळें त्यानें मागें वळून पाहिलें. तेव्हां त्याला तेथें त्याचे गुरु दिसले नाहींत व सांप दिसला.

लोक थट्टेंत म्हणाले—“ अरे ! सांप तुझा गुरु आहे कीं गुरु सांप झाला आहे ? तुझे गुरु गेले स्वर्गाला आणि ह्यां रूपानें इहलोकीं राहाले.”

भीमूने विचार केला कीं आतां काय करावें. जवळ जाऊन पाहिलें तर सांप मेलेला. त्यानें गांवाबाहेर जाऊन एक खड्डा खणला



Fullscreen 127 38 / 79

व त्यांत सांपाला पुरून टाकलें. सांपाच्या थडग्यावर त्यानें तुळशीचीं दोन तीन रोपें देखील लावून ठेवलीं.

भिकाऱ्याच्या आयुष्याची दोरी अजून बळकट होती. तो त्या लोंढ्याबरोबर वाहून गेला तरी एका खडकाला जाऊन लागला व बराच वेळ तेथेंच बसून राहिला. नंतर तो पुन्हां भीक मागूं लागला. त्याच्याजवळ काठी नव्हती कीं काठी धरणारा मुलगा नव्हता. बिचाऱ्याला चांचपडत चालावें लागे. अगदीं दमून जाई.

सांपाला पुरून भीमू कांहीं दिवसांनीं तिकडेच येत असतां भिकाऱ्याला पाहून त्याला आश्चर्य वाटलें. म्हणाला—"गुरूची माया माझ्यावर किती होती! त्यांनीं मला टोपली, ताटली, तपेली सर्व दिलें होतें. पण हें तर त्यांचें भूत दिसतें आहे. नको बाबा तें सामान!" असें म्हणत त्यानें डोक्यावरचें टोपलें जमिनीवर फेंकलें व ओरडून म्हणाला—"गुरु! तुमचें टोपलें, ताटली सर्व ठेवलें आहे येथें. सर्व घ्या आणि माझी पाठ सोडा!" असें म्हणत तो पळून गेला.

भीमूचा आवाज ओळखून भिकारी रागानें म्हणाला—"गुलामा! मला आंधळ्याला फसवायला निघाला होतास नाहीं का? मला डोळे नसले तरी त्या देवाला आहेत ना! ये तर जवळ, मग पाहतों तूं कोठें पळतोस तो."

भीमू पळत पळत सरळ आजीकडे गेला व म्हणाला—"आजी! तुम्हीच सांगा! काय माझी चूक! माझे गुरु माझ्यावर उगीच रागावले.

"तूं आहेस मूर्ख! कोणाची सेवा करायला तूं जाऊं नकोस! रानांत जाऊन लाकडें फोडून आणित जा, म्हणजे मिळविली."





# विधि लिखित

एका शेतकऱ्याकडे शितू नांवाचा एक पोऱ्या गुराख्याचें काम करीत असे. तो त्याचीं गाईगुरें चरायला घेऊन जात असे. तो रोज सकाळीं गोठा साफ करी आणि न्याहरी करून गुरें चरायला घेऊन जाई.

गांवाबाहेर एक ओसाड आमराई होती. एका काळीं त्या आमराईंतले आंबे फार प्रसिद्ध होते. पण झाडें जुनाट म्हातारी झाल्यामुळें वाळूं लागलीं होती व आमराईंत पुष्कळ गवत उगवलें होतें. गाईगुरें तेथेंच चरायला जात व कोणी विचारणारा पण नव्हता. गुराखी झाडावर चढत व खेळत आणि खूप गमती करीत. एखादी कैरी किंवा आंबा सांपडला कीं दगड मारून पाडून खात. शितू आपल्या साथी सवंगड्यांबरोबर तेथेंच गुरें चरायला घेऊन येत असे. संध्याकाळपर्यंत तेथेंच सर्व गुराखी रहात. सायंकाळीं नदीवर पाणी पाजून गुरांना घरीं घेऊन येत.

एकदां शितू गुरें चरायला घेऊन त्याच बागेंत गेला. त्या दिवशीं कसला तरी सण होता. म्हणून कोणी दुसरा गुराख आला नव्हता. पण शितूला सणाची गोष्ट माहीत नव्हती व मालकानें पण त्याला जाऊं नको म्हणून सांगितलें नाहीं. एकूण तो एकटाच त्या दिवशीं गुरें चरायला घेऊन आला होता. त्या दिवशीं त्याला बागेंत चुकल्या चुकल्या सारखें झालें. त्याला आपल्या मालकावर व सवंगड्यांवर राग आला. पण करणार काय? कोणी जवळ नव्हता. म्हणून त्यानें आपला सर्व राग गाईंवर काढला. त्यांना विना कारण इकडून तिकडे आणि तिकडून इकडे पळवूं लागला. पण त्याचा वेळ जाईना.

Fullscreen 127 40 / 79

एकटेपणामुळें शितूचें डोकें एक तर तापलेलें होतें. त्यांत एक गांधीलमाशी येऊन त्याच्या डोक्यावर घिरट्या घालं लागली. तिला जवळ एका जागीं बसलेली पाहून त्यानें एक तडाखा दिला. तिचे दोन तुकडे झाले व ती दूर एका झुडपांत जाऊन पडली. शितू पहात उभा होता. थोड्या-वेळानें तिचा मागचा पुढचा भाग आपोआप जोडला गेला व ती हालं-डोलं लागली. एवढेंच नव्हेतर उडून दूर निघून गेली.

शितूला आश्चर्यच वाटलें. त्यानें जवळ जाऊन गांधीलमाशी ज्या झुडपावर जाऊन पडली होती तें पाहिलें. झुडपावर मऊ कोंवळी पालवी होती. त्याला वाटलें कदा-चित पालवीच्या प्रभावानेंच गांधीलमाशी जिवंत झाली असावी. त्यानें संजीवनी वनस्पतीचें नांव ऐकलें होतें. त्यानें ती जागा नीट पाहून घेतली आणि खूण म्हणून तेथें एक दगड देखील ठेवला.

त्या संजीवनी वनस्पतीवर त्याचा विश्वास बसेना. त्याला वाटलें कदाचित मी मारून टाकलेली गांधीलमाशी ती नसावी. म्हणून त्यानें एक मेलेला नाकतोडा कोठून तरी आणला आणि तोच त्या झुडपावर टाकला,



आणि नाकतोडा जिवंत होऊन उडून गेला. आतां ती संजीवनी बूटीच असली पाहिजे यांत शंका राहिली नाहीं. ही गोष्ट आपल्या साथी सवंगड्यांना कळविण्यासाठीं त्याचें मन अधीर झालें.

दुसऱ्यादिवशीं तो आपल्या मित्रांबरोबर गुरें घेऊन निघाला तेव्हां त्यानें त्यांना संजीवनी बूटीची गोष्ट सांगितली. मेलेली गांधीलमाशी जिवंत कशी झाली, व खात्री करून घेण्यासाठीं त्यानें मेलेला नाकतोडा कसा टाकला व तो जिवंत होऊन कसा उडून गेला सर्व तिखटमीठ लावून वर्णन करून सांगितलें. तें कोणाला खरें वाटलें नाहीं. म्हणून शितूनें त्यांना तें संजीवनी बूटीचें झुडुप दाखविलेंच नाहीं.

कांहीं दिवसांनीं गांवचे पाटील एका-एकीं मरण पावले. गांवांत त्यांचें दोन मजली घर होतें. ते दानी व धर्मभीरू होते. गांवकरी त्यांना फार मान देत. सुमारें एक महिनाभर ते अंथरुणाला खिळून होते. रोज नवीन वैद्य व डॉक्टर येऊन तपासून जात, पण गूण पडला नाहीं.

सकाळीं पाटलांच्या घरीं मोठी गर्दी जमली. सर्व त्यांच्या औदार्याची व गोड



Fullscreen 127 42 / 79

स्वभावाची प्रशंसा करीत होते. सर्व म्हणत "देव चांगल्या माणसांना लवकर उचलून घेतो. वैद्य डॉक्टर औषधें देतात. विधि लिखित कांहीं टळत नाहीं." मृताला जिवंत करणें कांहीं त्यांना शक्य नाहीं.

ही गोष्ट शितूच्या कानावर पडली. तो गुरें घेऊन निघाला होता. तो जवळ येऊन म्हणाला—"पाटलांना जिवंत करायला औषध आहे मला माहीत. आमराईंत संजीवनी वनस्पती आहे!" नंतर त्यानें स्वतः डोळ्यांनीं पाहलेलें दृश्य वर्णन करून सांगितलें. कोणाला त्याच्या बोलण्यावर विश्वास बसेना. तरी एक दोघे त्याच्या-बरोबर आमराईंत गेले.

शितू धांवत पुढें गेला. तें झुडुप कोठें आहे हें त्याला माहीत होतें. त्यानें खुणे साठीं एक दगड देखील तेथें आणून ठेवला होता. तो रोज एकदां जाऊन तें झुडुप पाहून येई. म्हणून तो सरळ त्या जागीं गेला. पण आज तेथें तें झुडुप नव्हतें कीं त्यावरची कोंवळी पालवी नव्हती. त्याला वाटलें कीं कदाचित मी चुकून दुसऱ्या-बाजूला निघून आलों.

गांवकऱ्याना राग आला. ते म्हणाले—"तूं आमच्याबरोबर थट्टा करीत होतास नाहीं का!" असें म्हणत त्यांनीं बिचा-ऱ्याला खूप बडविलें. इकडे त्याला लोकांनीं मारल्याचें दुःख होत होतें आणि तिकडे मनांत विचार चालू होते कीं देवानें तें झाड कोठें नेलें? पंधरा वेळां फिरून पाहिलें तरी तें झुडुप त्याला पुन्हां दिसलें नाहीं.

शेवटीं त्यानें मनाचें समाधान करून घेतलें कीं पाटलांचें मरण विधिलिखित होतें. तें कसें टळणार? म्हणून देवानें तें खरें करून दाखविण्यासाठीं तें झुडुप नाहींसें केलें असावें.





# ※ सायमन ※

पोलंड देशांतल्या एका गांवीं एक खाना-वळ होती. खानावळीच्या मालकाला एक मुलगा होता. त्याचें नांव सायमन असें होतें. सायमन रंगारूपानें सुरेख होता आणि तसाच हुशार पण होता. त्यानें पुष्कळदां असामान्य साहसाचीं कामें पण करून दाख-विली होतीं. परंतु स्वभावानें तो फार आळशी होता. वयाबरोबर स्वतःविषयीं किंवा कुटुंबा-विषयीं जी एक प्रकारची जबाबदारी वाढा-वयास हवी ती त्याच्यांत मुळींच नव्हती. मी 'हें करीन आणि तें करीन' च्या गप्पा मात्र तो खूप मारीत असे. परंतु महत्वाकांक्षेप्रमाणें स्वतःची योग्यता वाढविण्यासाठीं त्यानें कधीं प्रयत्न केला नाहीं. उलट जुगारींत आणि दारूंत वडिलांचा पैसा त्यानें खूप उडविला.

बापानें मुलाला मार्गावर आणण्याचा पुष्कळ प्रकारें प्रयत्न करून पाहिला. परंतु शेवटीं निराश होऊन त्यानें त्याला घराबाहेर काढण्याचा निश्चय केला. धक्के टोणपे खाल्ल्याशिवाय डोळे उघडणार नाहींत असा विचार करून त्यानें त्याला फौजी पोशाख दिला आणि एक तलवार देऊन म्हणाला—"जा! यापुढें राजाच्या पदरीं नोकरी करून पोट भर!"

सायमननें राजाच्या पदरीं नोकरी धरली. त्याला पाहरेकऱ्याची नोकरी मिळाली. रात्रीं गांवांत गस्त देण्याच्या कामावर त्याला नेमण्यांत आलें. परंतु संवयीला औषध नाहीं म्हणतात. तो वाईट संगतींत पडला. दारू-पिणें, जुगार खेळणें आणि मारामारी सर्व तसेंच चालू होतें. तो एका म्हाताऱ्या सैनिकाच्या घरीं राहून फुकटचा तुकडा झोडीत असे. तो त्या म्हाताऱ्यासमोर गप्पा मारी कीं, आमचें घर इतकें मोठें आहे,


Fullscreen

127



44 / 79





रोज पकाचें झोडीत असें मी, कधीं पायीं चालत नसे. शाळेंत गाडींत किंवा घोड्यावर बसून जात असें, वगैरे."

म्हातारा म्हणे—"होय ना? मग घरून पैसे कां नाहीं मागवीत? बापाला पत्र टाक कीं तुला आतां मोठी नोकरी लागली आहे. मेजवानी देण्यासाठीं पैसे पाठव. तो जरूर पैसे पाठवील."

सायमननें त्याप्रमाणें आपल्या वडिलांना खोटें पत्र लिहिलें. मुलाला मोठी नोकरी मिळाली आहे हें ऐकून बापाला आनंद झाला व त्यानें मुलाच्या पत्राप्रमाणें पैसे पाठविले. सायमननें त्या पैशावर कांहीं दिवस चैन केली. पण तें भांडवल किती दिवस पुरणार. थोड्याच दिवसांत तें संपुष्टांत आलें.

वडिलांकडून पैसे उकळण्याची युक्ति त्याला कळली होती. त्यानें कांहीं दिवसांनीं पुन्हां एक पत्र लिहिलें. व आपल्या शौर्य व साहसाचें खोटें वर्णन लिहून हुद्दा वाढल्याचें कळविलें व पुन्हां पैसे पाठवायचा आग्रह केला. आतां मी जमादार झालों आहें व लवकरच कोतवाल होणार आहें. बापाला सर्व खरें वाटलें व त्यानें पुन्हां पैसे पाठविले. पुढें कोतवाल झाल्याचें कळविलें व आणखी कांहीं दिवसांनीं सुबेदार झाल्याचें लिहिलें व असेंहि कळविलें कीं, आतां माझी दहा हजारी मनसबदाराच्या जागीं नेमणूक होणार आहे. बाप प्रत्येक वेळीं पैसे पाठवी. आई वडील विचार करीत, मोठ्या हुद्यावर पोंचल्यावर त्याचें लग्न करून दिलें कीं आपली जबाबदारी संपली.

सायमनला पुढें कांहीं दिवसांनीं पुन्हां पैशांची तूट भासली व त्यानें मनसबदार झाल्याचें बापाला लिहिलें. बापाला फार आनंद झाला. त्यानें पैसे पाठविले आणि विचार केला कीं, एकदां मुलाला भेटून यावें. इतक्या मोठ्या हुद्यावर त्याला काम करतांना पाहून डोळ्यांचें पारणें फिटेल. सायमनचा बाप असा विचार करून बायकोला बरोबर घेऊन राजधानीच्या गांवीं निघाला.

नवराबायको राजधानींत पोंचलीं तेव्हां एका मैदानांत कसली तरी परेड चालली होती. त्यांनीं विचार केला, सायमन अधिकाऱ्याच्या पोशाखांत हत्तीवर किंवा घोड्यावर बसून सैन्याची पाहणी करीत असेल. दोघे एका बाजूला, सायमन दिसेल या आशेनें, बराच वेळ वाट पहात एकाजागीं उभे राहाले. पण त्यांना निराश व्हावें लागलें. शेवटीं त्यांनीं एका प्रतिष्ठित गृहस्थास विचारलें—"मनसबदार सायमन आज आले नाहींत का?"

तो गृहस्थ चकित झाला. तें नांव त्यानें प्रथमच ऐकलें होतें. नंतर चवकशी करतां असें कळलें कीं, गांवांत गस्त देणारा त्या नांवाचा एक पाहारेकरी आहे. तें ऐकून म्हाताऱ्याच्या तळपायाची आग मस्तकाला पोंचली. स्वतः उपाशी राहून अगर एक वेळ खाऊन त्यानें मुलाला जे पैसे पाठविले त्याचा त्यानें दुरुपयोग केला. म्हाताऱ्यानें कोतवालाकडे जाऊन मुलाला नोकरीवरून काढून टाकायला सांगितलें. स्वतः बापच सांगतो आहे तेव्हां खोटें नसणार असें समजून कोतवालानें सायमनला नोकरीवरून कमी केलें.



मुलाच्या अपराधाबद्दल बापानें त्याला चांगली शिक्षा द्यावयाचें ठरविलें. त्या काळीं त्या देशांत प्राणदंड देण्याचा अधिकार देखील बापाला असे. सायमनच्या आईनें नवऱ्याचा राग कमी करण्याचा यत्न करून पाहिला. म्हणाली—"पोटच्या पोराला गुरां ढोरां सारखें झोडपणें किंवा ठार करणें बरोबर होईल का?"

Fullscreen 127 46 / 79

बाप म्हणाला—"गुरें फंसवीत तरी नाहींत. चोरी लबाडी तरी करीत नाहींत आणि हा माणसासारखा माणूस आणि प्रत्यक्ष बापाला फंसवितो!" त्यानें सायमनला हात पाय बांधून गाडीमागें बांधलें आणि गाडी चालू केली.

सायमन ज्याच्या घरीं रहात असे त्या म्हाताऱ्या सैनिकाला हें सर्व कळलें. तो त्याच्या मदतीला धांवला व सायमनच्या बापाची नजर चुकवून त्यानें सायमनला मुक्त केलें. सायमन रानांत पळून गेला. आज त्याला वाटलें कीं, त्याला पुनर्जन्म मिळाला. आई-बाप कोणी आपली पर्वा करायला नाहीं. स्वतःच्या हिंमतीवर व मिळकतीवरच पोटापाण्याची व्यवस्था करावी लागणार!

तो कांहीं दिवस रानोमाळ फिरत राहिला. कंदमुळें खाऊन कसे तरी दिवस काढले. फार कष्टांत दिवस काढावे लागले त्याला. मनोरंजनासाठीं त्यानें एक बांसरी करून घेतली व हळू हळू त्याला बांसरी वाजवितां देखील येऊं लागली.

एकदां त्याला एका जागीं दूर डोंगरावर एक राजवाडा दिसला. डोंगराच्या पायथ्याशीं पण एक राजवाडा दिसला. परंतु तो वाडा नवीन दिसला. डोंगरावरचा जुनाट व पडका वाडा असावासा त्याला वाटलें. चवकशी करतां त्याला कळलें कीं, डोंगरावरच्या वाड्यांत एक क्रूर राजा रहात असे. त्याच्याकडे अलोट संपत्ति होती. पण तो गरीबांना पिळून काढीत असे. मेल्यावर तो भूत झाला व त्याच महालांत राहात आहे. वाड्यांत राहणाऱ्या लोकांना त्यानें पिच्छा पुरविला म्हणून त्याच्या मुलानें तो राजवाडा सोडला व डोंगराच्या पायथ्याशीं दुसरा वाडा बांधून त्यांत तो आपल्या मुलीबरोबर रहात आहे. सायमनला असेंहि कळलें कीं, ती राजकन्या फार सुरेख आहे. परंतु तिच्याशीं कोणी लग्न करायला येत नाहीं. कारण तिच्या आजाचें भूत जोंपर्यंत डोंगरावरच्या महालांत आहे तों पर्यंत जो कोणी तिच्याशीं लग्न करील त्याला तें भूत खाऊन टाकील, अशी सर्वांना भीति होती. परंतु जो कोणी त्या वाड्यांतून भुताला पळवून लावील त्याच्याशीं तिचें लग्न होईल.

किस्येक राजकुमारांनीं प्रयत्न करून पाहिला. पण सर्व प्राणास मुकले. पुढें






Fullscreen

127





48 / 79





कोणाची हिंमतच होईना. राजा नेहमीं राजकन्येच्या काळजींत पडलेला असे.

सायमननें विचार केला, त्या भुताला पळवून लावण्यांत आपल्याला यश मिळालें तर किती बरें होईल. त्या प्रयत्नांत जीव गेला तरी चालेल. कांहीं तरी अपूर्व असें करून दाखविण्यांत प्राण गेला तरी हरकत नाहीं. त्याला भुताची भीति नव्हती कीं वाघ-सिंहांची नव्हती. तसा जात्याच तो साहसी होता.

रात्रभर त्याच विचारांत तो एका झाडाखालीं पडून राहिला. स्वप्नांत राजकुमारी आली आणि एक भूत पण आलें. प्रथम तो भ्याला. परंतु नंतर स्वतःला सावरून त्यानें त्या भुताशीं युद्ध केलें व त्याला जिंकलें. सकाळीं झोंप मोडल्यावर बांसरी काढून वाजवूं लागला. बांसरीचा मंजुळ आवाज वाऱ्याच्या झुळकी बरोबर राजकुमारीला ऐकूं आला. तिनें वडिलांना विचारलें—"बाबा! कोण वाजवतो आहे ती बांसरी? त्याला बोलवून आणा न!"

राजानें नोकराला हाक मारून बांसरी वाजवणाऱ्याला बोलवून आणायला पाठविलें. परंतु राजकुमारीला इतका धीर नव्हता. ज्या दिशेनें आवाज येत होता त्याच्या अनुरोधानें ती सायमन ज्या झाडाखालीं बसला होता तेथें आली. तिनें त्याला राजवाड्यांत यायला सांगितलें. तिला पाहून सायमननें विचार केला कीं, सौन्दर्याचें जें वर्णन ऐकलें होतें अगदीं हुबेहूब तसेंच सौंदर्य आहे. स्वप्नांत ज्या राजकन्येला पाहिलें होतें तिच्याहून सुंदर आहे ही. अप्सरांचें सौंदर्य याहून अधिक तें काय असणार? प्रथम दर्शनींच दोघांनीं परस्परांचें मन चोरून घेतलें.

त्या दिवशीं सायमनला राजवाड्यांत राजाच्या पंक्तीला जेवायला मिळालें. त्याची बांसरी ऐकून राजा देखील फार खूष झाला



व त्यानें त्याला आपल्या पदरीं नोकरी दिली. राजाकडून त्याला कळलें कीं. मयत राजा भूत होऊन डोंगरावरच्या महालांत रहात आहे. त्याचें भूत पळवून लावणाराचें राजकन्येशीं लग्न होईल.

सायमन म्हणाला—"मी देखील तसेंच ऐकलें आहे. आपल्या भाग्याची परीक्षा करून पाहणार आहें! माझ्या आईवडिलांनीं मला स्वतः घराबाहेर काढलें आहे. जगांत दुसरा कोणी माझा असा नाहीं. जर मला यश मिळालें तर राजकन्या सुखी होईल. नाहीं मिळालें तरी माझ्यासाठीं शोक करणारा या जगांत कोणी नाहीं."

राजकन्या सर्व लक्ष देऊन ऐकत होती. जर सायमनला यश मिळालें तर त्याच्या बरोबर आपलें लग्न होईल व सर्व आयुष्य सुखा समाधानाचें जाईल. तिच्या मनांत हा विचार चालू होता. त्याच बरोबर दुसरा विचार पण तिच्या मनांत आला. यदा कदाचित यश न मिळालें तर....! तो विचारच तिला करवेना. आपल्या सुखासाठीं आपल्या प्रियकराचा जीव धोक्यांत पडावा हा विचारच तिला रुचला नाहीं. तिनें आपल्या वडिलांना जाऊन सांगितलें.



राजानें सायमनचें मन पालटण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु त्याचा अढळ निश्चय पाहून त्याला महालापर्यंत पोंचविण्यासाठीं त्यानें गाडी पाठविली. सूर्यास्ताच्या सुमारास सायमन डोंगरावरच्या महालांत पोंचला.

सायमन सरळ महालांत गेला. त्यानें मागचा पुढचा कांहीं एक विचार केला नाहीं. आंत एक मोठा दिवाणखाना होता. भिंतींत आरसे व सोन्याची फ्रेम असलेल्या तसबिरी बसविलेल्या होत्या. इतर सामान अस्तव्यस्त पडलेलें होतें व त्यावर पुष्कळ धूळ पडलेली होती.


Fullscreen

127





50 / 79



सायमन दिवा लावून एका बांकावर बसून बरोबर आणलेलें पुस्तक वाचूं लागला. पुष्कळ वेळ तो असाच वाचत भुताची वाट पहात बसला. पण भूत आलें नाहीं. मध्य रात्रीच्या सुमारास त्याला पावलांचा आवाज ऐकूं आला. हळूहळू तो आवाज जवळजवळ ऐकूं येऊं लागला. त्याला मनांतून भीति वाटत होती. परंतु जागचा हलला नाहीं.

थोड्या वेळानें दिवाणखान्याचा दरवाजा उघडला. सायमनला एक काळा मनुष्य समोर येत असलेला दिसला. त्याचे डोळे लकाकत होते. त्याच्या हातांत किल्ल्यांचें जुडगें होतें.

सायमननें फक्त एकदांच त्याला पाहिलें व पुन्हां पुस्तक वाचण्याचें सोंग करूं लागला. तो जवळ आला तरी त्यानें मान वर करून त्याच्याकडे पाहिलें नाहीं. त्याच्या कानावर हे शब्द पडले—“ह्या महालांत कोणाच्या परवानगीनें तूं आलास?”

सायमन मान वर केल्याशिवाय खण-खणीत आवाजांत म्हणाला—“मी ही रात्र काढण्याकरितां येथें आलों आहें. येथें कोणी नाहीं असें समजून मी बसलों आहें.”

“असें होय! ह्या महालांत पाऊल टाकण्याचा ज्यानें ज्यानें प्रयत्न केला तो येथून परतला नाहीं हें तुला माहीत असेलच?” भुतानें विचारलें.

“तुमच्या या धमक्या ऐकून मी भिऊन जाईन असें वाटलें वाटतें तुम्हांला. लक्षांत ठेवा, मी एका शेतकऱ्याचा मुलगा आहें!” सायमननें तितक्याच उच्चस्वरांत उत्तर दिलें.

“थांब, तुझी बटबट मी आतांच बंद करतों. घे ह्या किल्ल्या आणि जा, तें खोलीचें दार उघड!” भूत म्हणालें.

“तूं म्हणशील तिकडे यायला मी तयार आहें. पण तूं म्हणशील तें करायला मी तुझा कांहीं नोकर नाहीं! कोणावर दास-वतोस एवढा अधिकार?” सायमननें निर्भय पणें विचारलें.

ही स्वारी निराळीच दिसते आहे, असें भुताला वाटलें असावें. कारण तें कांहींच बोललें नाहीं. स्वतःच दरवाजा उघडून पलीकडच्या खोलींत प्रवेश केला. प्रवेश केल्याबरोबर त्याचे काळे केस पांढरे झाल्याचें सायमनला दिसलें. त्याला आश्चर्यच वाटलें.

त्या खोली पलीकडच्या खोलींत भुतानें प्रवेश केला. सायमन पाठोपाठ येतच होता. एका मागून एक दालनें पार करीत जात असतां भुताचा व त्याच्या कपड्यांचा रंग






Fullscreen 127 52 / 79

वरून खालपर्यंत पांढरा होऊं लागला. पुन्हां भुतानें सायमनला किल्ल्या दाखवून दरवाजा उघडायला लांगितलें. भुताच्या आज्ञेचें पालन केल्यास भूत मानेवर बसेल असा विचार करून तो म्हणाला–"तुझें घर आहे. तूं उघड दरवाजे."

एका मागून एक अकरा दालनें पार करून भुताबरोबर सायमन बाराव्या दालनांत आला. तोंपर्यंत भूत वर पासून खालपर्यंत नखशिख पांढरें फक्क होऊन गेलें. बारावा दरवाजा उघडल्याबरोबर कुजलेल्या प्रेतांचा वास आला. समोर मढ्यांची एक रास पडली होती. दुर्गंधीनें सायमनला मोंवळ आल्यासारखें वाटलें. तरी मनाचा धीर करून तो पुढें गेला.

भूत सायमनला म्हणालें–" हे सर्व माझ्या आज्ञेशिवाय महालांत पाऊल टाकल्याचें फळ भोगीत येथें पडले आहेत. परंतु मला मुक्ती देण्याची युक्ति एकाला हि माहीत नव्हती. कदाचित शेतकऱ्याच्या पोरालाच तें श्रेय मिळणार असेल. माझ्याशीं कसें बोलावें व काय करावें हें फक्त तुलाच कळलें. तुझा जीव तर आतां वांचलाच आहे, तूं या महालांत देखील पुन्हां प्राण घालूं शकशील. तुझ्या हातून मला मुक्ति मिळणार आहे. परलोकीं मला सुख मिळणार कीं दुःख मला माहीत नाहीं. या जगांतूनतर मी सुटलों. हा घे परशु! ह्यानेंच मी आजवर या सर्वांचा वध केला. ह्यानेंच माझें डोकें फोडून मला मुक्ति दे. मी आनंदानें निघून जाईन."

सायमन थोडा वेळ किंकर्तव्यविमूढ स्थितींत उभा राहिला. परंतु अधिक विचार न करतां त्यानें परशु घेऊन वार केल्या बरोबर भुताचें शरीर जणुं कांहीं विरघळून गेलें आणि त्यांतून एक पक्षी निघाला आणि खिडकीवाटे बाहेर उडून गेला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]





# गरिबाचें भाग्य

एका गांवीं एक शेतकरी रहात असे. नवराबायको स्वभावानें फार गरीब होतीं. त्यांना चार मुलें होतीं. दोघं जिवापाड मेहनत करीत. पण त्यांना कधीं पोटभर खायला मिळत नसे. कित्येकदां तर उपाशीच झोपावें लागे. इतकी गरीबी असून दोघं इतकीं उदार होतीं कीं कोणी अतिथि आला कीं जी मीठ भाकर तीं खात ती त्याला पण वाढीत. कधींकधीं तर पेज किंवा आंबील पिऊन दोघं झोपीं जात.

एकदां त्यांना फारच कमी मजूरी मिळाली. प्रथम मुलांना वाढून नवराबायको नुसती पेज प्यायला बसणार, तेवढ्यांत एक म्हातारा पाहुणा दत्त म्हणून उभा राहिला आणि म्हणाला–"दादा! फार दुरून आलों आहें. उन्हाची वेळ आहे. पाणी पिऊन पडवींत पडून राहीन व ऊन उतरल्यावर पुढें जाईन. मग बसूं का पडवींत? देतां का पाणी प्यायला?"

शेतकरी म्हणाला–"काका! आंत या. उन्हांत दमून आला असाल. नुसतें पाणीच काय आमच्या बरोबर घोटभर पेज तुम्ही पण प्या!" असें सांगून त्यानें त्याला आदर पूर्वक घरांत बोलवून बसायला सांगितलें.

पेज प्याल्यावर पाहुण्याच्या अंगांत इतका हुरूप आला कीं, जणुंकांहीं त्याला अमृतच प्यायला मिळालें आहे. त्यानें शेतकऱ्याच्या मुला बाळांची चवकशी केली आणि म्हणाला–"देव तुम्हां सर्वांना सुखी ठेवील. घरची गरीबी किती हि असली तरी तुमच्या मनाची श्रीमंती ओळखल्या शिवाय का तो राहील?" नंतर त्यानें शेतकऱ्याला पेज शिजवायचें मातीचें भांडें

सौ. शारदा पाटील

Fullscreen 127 54 / 79

आणायला सांगितलें. शेतकऱ्याची बायको मडकें घेऊन आली. तें घेऊन म्हातारा म्हणाला—"आज तूं माझ्या सारख्या म्हाताऱ्या गरिबावर जी दया दाखवलीस ती मी आयुष्यभर विसरणार नाहीं. यापुढें तुला अन्नाची वाण भासणार नाहीं. राजाच्या घरीं जीं पक्वान्नें होतील तीं तुला या मडक्यांत मिळतील. त्यावर तुझ्या कुटुंबाचा उदरनिर्वाह छान चालेल." असें सांगून म्हातारा निघून गेला.

शेतकऱ्याला व त्याच्या बायकोला वाटलें कीं, म्हातारा जें कांहीं म्हणाला तो फक्त आशीर्वाद आहे. परंतु संध्याकाळीं शेतकऱ्याची बायको मडकें घेऊन आली तेव्हां तें पक्वान्नानें भरलेलें होतें. सर्व पोटभर जेवले व अपरिचित पाहुण्याचे मनांतल्या मनांत आभार मानूं लागले.

त्यानंतर शेतकऱ्याच्या घरीं घरच्या लोकांबरोबर पाहुण्यांना सुद्धां पंचपक्वान्नाचा लाभ होऊं लागला. तो पाहुण्यांना सांगे—"आम्ही जें कांहीं वाढूं, त्याचा स्वीकार करावा व त्याच्या विषयीं कोणाजवळ कांहीं बोलूं नये!" परंतु लोक त्याच्याकडून जेवून गेले कीं गांवभर सांगत कीं, त्या



शेतकऱ्याच्या घरीं आज जसें जेवण मिळालें तसें राज दरबारींच मिळालें तर कदाचित मिळेल.

तिकडे राजाच्या पाकशाळेंत अद्भुत प्रकार घडूं लागला. सैंपाकी पक्वान्नें करूं लागले कीं पक्वान्नें प्रमाणा पेक्षां कमी होत. सुरवातीला सैंपाक्यांना कळत नसे. एकेक दिवस अर्धीं अधिक पक्वान्नें नाहींशीं होत. भुताटकी होऊं लागली आहे अशी सैंपाक्यांनीं तक्रार केली. कोळंगे भरून खीर तयार करून ठेवली होती. पण आपोआप अर्धी नाहींशी झाली.

राजा व मंत्र्याला ही गोष्ट कळली तेव्हां त्यांना वाटलें कीं, कोणी तरी चोर सैंपाकघरांत शिरून चोरी करीत असावा किंवा एखादा सैंपाकीच चोर असावा. राजानें पाहारेकरी नेमले व चवकशी केली तेव्हां सैंपाक्याचें म्हणणें खरें ठरलें. पण राजाचा त्याच्यावर विश्वास बसेना.

राजाच्या महालांतल्या गोष्टी कधीं गुप्त रहात नाहींत म्हणें. राजधानीभर राजाच्या पाकशाळेंतील चोरीची चर्चा सुरू झाली. शेतकऱ्याच्या घरांत पंचपक्वान्नांचें जेवण व राजाच्या पाकशाळेंत पक्वान्नांची चोरी



 Fullscreen  127      56 / 79 

ह्यांत काहींतरी संबंध असावा, असें राजा व मंत्री दोघांना वाटूं लागलें. प्रत्यक्ष खरें कीं खोटें हें पाहण्या साठीं दोघांनीं वेष पालटून शेतकऱ्याच्या घरीं जावयाचें ठरविलें. पाकशाळेंत कोणतें पक्वान्न तयार करण्यांत आलें आहे हें विचारून व चाखून दोघे निघाले.

जातांना दोघे परस्परांशीं बोलत चालले होते. राजा म्हणाला—"शेतकऱ्यानें चोरीचा धंदा छान सुरू केलेला दिसतो आहे."

मंत्री म्हणाला—"शेतकरी स्वभावानें सुशील आणि गरीब आहे असें मी ऐकतों. तो चोरी करील असें मला वाटत नाहीं."

त्यावर राजा म्हणाला—"आतां प्रत्यक्ष पहावयास मिळेलच."

शेतकऱ्याच्या घरीं घरचीं मंडळी जेवायची तयारी करीत होती. तेवढ्यांत दरवाज्यावर थाप ऐकून शेतकऱ्यानें दरवाजा उघडला. समोर दोघे परदेशी उभे होते. दोघे मोठें पागोटें बांधून आले होते. एक जण म्हणाला—"आम्ही दोघे परदेशी आहों. दुपारची वेळ आहे. जेवायची व्यवस्था झाल्यास विचारायला आलों होतों."

शेतकऱ्यानें आदरपूर्वक त्यांना आंत बोलावून हात पाय धुवून यायला सांगितलें. पानें मांडून जेवायला बसावें अशी विनंति केली. "जी कांहीं मीठ भाकर आहे गोड करून घ्यावी." अशी विनंति पण केली.

एका मागून एक पदार्थ पानावर येऊं लागले. राजा व मंत्री परस्परांकडे सार्थक मुद्रेनें पाहूं लागले. राजवाड्याच्या पाकशाळेंत त्या दिवशीं शिजलेले सर्व पदार्थ पानावर आले. राजानें शेतकऱ्याला विचारलें—"कायरे! हे सर्व पदार्थ कोठून आले? तूं शेतकरी आणि हा राजभोग तुझ्या घरीं कसा काय?"

शेतकरी हात जोडून म्हणाला—"तें सर्व त्या परमेश्वराला ठाऊक? मी काय सांगूं?"

"तूं सर्व काय तें सांगितलें नाहींस तर आम्ही या अन्नाला हात लावणार नाहीं." राजा म्हणाला.

शेतकऱ्यानें नाइलाजानें सर्व वृत्त थोडक्यांत सांगितलें आणि मडकें आणून दाखविलें. तें मडकें पाहून राजाला राग आला. म्हणाला—"चोर भामटा कुठला! म्हणे, देवाची कृपा! थांब तुझी चामडी लोळवितो. पाहातों तुझा कोण देव तुला वांचवायला येतो तें." असें सांगून त्यानें मडकें फोडून टाकलें आणि मंत्र्याबरोबर निघून गेला.

शेतकऱ्याची बायको व मुलें रडूं लागलीं. पण शेतकरी म्हणाला—"त्या परमेश्वराला जें मान्य असेल तेंच होणार! त्याच्यावर भरंवसा ठेवून मनुष्यानें रहावें. कांहीं दिवस पक्वान्नें खायचें नशिबीं होतें. आतां पुन्हां आपली मीठ भाकर आहेच. त्यांत रडायचें कारण काय?"

शेतकऱ्याचें मडकें फोडून राजा व मंत्री राजवाड्यांत परत आले. पण तेथें येऊन



Fullscreen 127 58 / 79

पाहतात तर पाकशाळेंत एकहि पक्वान्न नाहीं. सैंपाक्यानें घडलेला प्रकार वर्णन करून सांगितला. म्हणाला–

"चुलीवर कोणताहि पदार्थ एक क्षण भर देखील रहात नाहीं. तांदूळ, डाळ, भाजी, दूध जें कांहीं ठेवावें, चुलीवर ठेवल्या-बरोबर नाहींसें होत आहे. तीन तीन चार चारदां तांदूळ ओयरून पाहिले. पण ओयरल्याबरोबर ते अदृश्य झाले."

मंत्र्यानें आपल्या घरून राजासाठीं ताटें वाढून मागविलीं. परंतु राजवाड्यांत पोंचें-पर्यंत त्यांतलें अन्न नाहींसें झालें. तेव्हां कोठें राजाचे डोळे उघडले. आपण शेतकऱ्या-वर अन्याय केला आहे. देवाला तें कसें मान्य होईल? माझ्या घरीं पक्वान्नें होतात आणि गरीब शेतकऱ्याला पोटभर खायला देखील मिळत नाहीं. ज्याच्या राज्यांत प्रजा सुखी रहात नाहीं त्याला प्रजा रक्षक कसें म्हणतां येईल? तो मंत्र्याबरोबर पुन्हां शेतकऱ्याच्या घरीं गेला व म्हणाला– "मी रागाच्या भरांत तुझें मडकें फोडलें. तें मडकें फोडून मी देवासमोर अपराधी ठरलों आहे. त्याचें प्रायश्चित्त म्हणून मी तुला एक जहागीर लिहून देतों. राजवाड्याची पाकशाळा तुझीच आहे असें समज. तेथें शिजणाऱ्या अन्नाचा अर्धा वांटेकरी तूं आहेस. आतां मला उपाशीं मारूं नकोस."

शेतकऱ्याला तें सर्व ऐकून आश्चर्य वाटलें. तो म्हणाला–"ही त्या भगवंताची कृपा आहे! तो ठेवील तसें रहावें. मनुष्यानें प्रयत्न करावयाचा असतो परंतु भरंवसा देवावर ठेवून!"

तिकडे पाकशाळेंत चमत्कार घडला. राजानें इकडे म्हटल्याबरोबर कीं शेतकरी अर्ध्या अन्नाचा वांटेकरी राहील. सर्व भांडीं पंचपक्वान्नांनीं भरून गेलीं.






विश्वामित्र ऋषींचा यज्ञ निर्विघ्नपणें पार पडला. त्या दिवशीं रात्रीं रामलक्ष्मण निश्चितपणें झोपूं शकले. सकाळीं उठल्यावर स्नानसंध्यादि आटोपून त्यांनीं विश्वामित्र ऋषींना नमस्कार केला. विश्वामित्र ऋषींच्या आश्रमांतले सर्व ऋषी व मुनी त्यांच्याकडे आले होते. त्यांना देखील रामलक्ष्मणांनीं नमस्कार केला. नंतर श्रीरामचंद्रानें नम्रता-पूर्वक विश्वामित्र ऋषींना विचारलें–"मुनिवर! सेवायोग्य कांहीं कार्य असेल तर आज्ञा व्हावी."

मुनि म्हणाले–"ज्या कामासाठीं म्हणून मी तुम्हां उभयतांना बोलावून घेऊन आलों होतों तें काम संपलें. आम्ही सर्व आज मिथिला नगरीस जात आहों. मिथिलेचा राजा जनक महा ज्ञानी आहे. त्याच्या दर्शनास जावें असा आमचा विचार आहे. जनक राजाकडे शंकराचें एक जुनें धनुष्य आहे. जनकानें श्रद्धा व भक्तिपूर्वक त्या धनुष्याची आजवर पूजा केली. जनकाच्या पुण्याईनें म्हणा किंवा शंकराचें तें धनुष्य आहे म्हणून म्हणा, त्या धनुष्यांत एक विशेष आहे. त्याला कोणी उचलूं शकत नाहीं. मग त्याच्यावर दोरी चढवून बाण मारणें तर अशक्यच. आजपर्यंत देव, दानव आणि मानव सर्वांनीं अनेक प्रकारें प्रयत्न करून पाहिला. परंतु एकाला देखील यश मिळालें नाहीं. जनक राजाचें तें धनुष्य


Fullscreen

127




60 / 79




तुम्हांला पहायला मिळेल. आपण सर्वच बरोबर जाऊं."

विश्वामित्र ऋषींनीं निघण्यापूर्वी सिद्धाश्रमाला तीन वेळां प्रदक्षिणा घातली व त्याच्या रक्षणाची पण उत्तम व्यवस्था केली. दिवस भर पायीं प्रवास केल्यावर विश्वामित्र ऋषि रामलक्ष्मणासह सोन नदीच्या कांठीं आले. सर्वांनीं तेथें स्नान केलें, संध्या केली व सर्व एका झाडाखालीं येऊन बसले. रामानें विश्वामित्र ऋषींना विचारलें—"मुनिवर! वनावृत नांवाचा देश कोठें आहे? त्याची माहिती आपण थोडी सांगावी."

त्या प्रश्नाचें उत्तर म्हणून विश्वामित्र ऋषींनीं त्या देशाचें वर्णन केलें. त्याबरोबर त्यांना आपल्या पूर्वजांचें वर्णनसुद्धां करावें लागलें. विश्वामित्र म्हणाले—

"पूर्वी ब्रह्मदेवाचा कुश नामें पुत्र एक मोठा तपस्वी होऊन गेला. त्याचें वैदर्भी नांवाच्या राजकन्येशीं लग्न झालें होतें. त्याला चार मुलें होतीं—कुशांब, कुशनाभ, अधूर्तयश आणि वसु.

"क्षत्रिय धर्माला अनुसरून कुशनें आपल्या मुलांना जमिनीचे वांटे करून दिले आणि त्यांना बजावून सांगितलें कीं, क्षत्रिय धर्माप्रमाणें प्रजेला पुत्रासारखें मानून न्यायानें राज्य करावें. त्यानंतर प्रत्येकानें आपल्या राज्याची राजधानी म्हणून एकेक सुंदर नगर वसविलें. कुशांबनें कौशांबी नांवाची, कुशनाभनें महोदय नांवाची, अधूर्तयशानें धर्मारण्य नांवाची आणि वसूनें गिरिव्रज नांवाची राजधानी स्थापन केली. आपण आतां आहों तो देश याच चौघां भावंडांचा आहे.

"या देशाच्या चारही बाजूला पांच पर्वतांच्या रांगा आहेत. सोन नदीचा उगम याच पर्वतांतून झाला आहे. या नदी मुळेंच या देशांतली जमीन सुपीक व शस्य श्यामला आहे. या नदीचा उगम पूर्वेकडे होतो व ही पश्चिमेकडे वाहाते.

"चौघां भावंडांपैकीं कुशनाभ याच्या बायकोचें नांव घृताची असें होतें. त्यांना शंभर मुली होत्या. सर्व एकीहून एक सुंदर. एकदां त्या मुली आनंदानें वनविहार करीत असतां एकाएकीं वायुदेव प्रगट झाला. त्यांचें सौंदर्य पाहून तो मोहित झाला व त्यानें त्यांच्याशीं विवाह करण्याची इच्छा दर्शविली. तो म्हणाला—"माझ्याशीं लग्न केल्यास तुम्हांला कधीं वार्धक्य येणार नाहीं व अमरत्व मिळेल. तुम्हांला या मर्त्यलोकांत राहण्याची गरज राहणार नाहीं. नंदनवनांत विहार करावयास मिळेल."

अर्थातच मुली चकित झाल्या. त्यांनीं त्याला उत्तर दिलें कीं, आमचे आई वडील आमचे पति म्हणून ज्या पुरुषाची निवड करतील त्यांच्याशींच आम्ही लग्न करणार. तें ऐकून वायूला राग आला व त्यानें त्या सर्वांना शाप दिला. शापाच्या प्रभावानें त्या सर्व गिड्ड्या व खुज्या दिसूं लागल्या. रडत रडत त्या आपल्या वडिलांकडे गेल्या.

"मुलींनीं राखलेली कुलमर्यादा पाहून कुशनाभला आनंद झाला. शापाच्या प्रभावामुळें त्या गिड्ड्या दिसूं लागलेल्या पाहून कुशनाभला फार वाईट वाटलें. पण तो म्हणाला—"भिऊं नका. देव साक्षी आहे. तो तुमचा खास उद्धार करील." कुशनाभ काळजींत पडला. त्यांना अविवाहित ठेवून तरी कसें चालणार? म्हणून त्यानें कांपिल्यपूरचा राजा ब्रह्मदत्त याच्याकडे जाऊन त्याला सर्व परिस्थिति सांगून त्याच्याशीं त्यांचा विवाह करून दिला. ब्रह्मदत्तानें स्पर्श केल्याबरोबर त्यांना स्वस्वरूपाचा लाभ झाला.



"मुलींचें लग्न करून दिल्यावर व त्यांना पुन्हां स्वस्वरूप मिळाल्यावर कुशनाभला

Fullscreen 127 62 / 79




आनंद झाला. पण पुत्रसंतान नाहीं या बद्दल त्याला काळजी वाटूं लागली. त्यानें पुत्रकामेष्टी यज्ञ केला. त्याला एक मुलगा झाला. त्याचें नांव त्यानें गाधि असें ठेवलें. कुशनाभनें आपल्या मुलाला उत्तम शिक्षण दिलें व त्याला गादीवर बसवून स्वतः वानप्रस्थाश्रमांत प्रवेश केला. गाधिराज एक धर्मपरायण राजा होता. हे गाधिराजच माझे वडील. मला सत्यवती नांवाची एक बहीण होती. तिचें रुचीकाशीं लग्न झालें. ती पतिव्रता होती. गाधिराज कुशिक याच्या नांवानेंच मला कौशिक असेंहि नांव मिळालें. माझ्या बहिणीच्या नांवानें कौशिकी नांवची एक नदी देखील आहे. बहिणीचा मला फार लळा होता. म्हणून मी हिमालयांत कौशिकी नदी काठीं राहातों यज्ञ करण्यासाठीं सिद्धाश्रमांत वास करावा लागला. बोलतां बोलतां मध्यरात्र उलटण्याची वेळ आली पहा! आतां तुम्ही दोघे जाऊन झोंपा."

प्रवासाचा थकवा वाटत असल्यामुळें दोघांना छान झोंप लागली. सकाळीं विश्वामित्र मुनींनीं त्यांना जागें केलें तेव्हां दोघे उठले. स्नानसंध्यादि आटोपून विश्वामित्र ऋषींबरोबर सर्व पुढल्या प्रवासाला निघाले.

दुपारच्या सुमारास ते गंगा नदीच्या तीरावर येऊन पोंचले. त्यांनीं गंगास्नान केलें. दुपारचें जेवण झाल्यावर एका झाडाखालीं बसून त्यांनीं विश्वामित्र ऋषींना गंगानदीची कथा सांगावयास विनंति केली. विश्वामित्र ऋषींनीं गोष्ट सांगायला सुरवात केली—

"हिमवन्त नामक पर्वतराजाला दोन मुली आहेत. एकीचें नांव गंगा व दुसरीचें उमा. पर्वत राजाजवळ विनंती करून देव गंगेला स्वर्गलोकीं घेऊन गेले. उमाचा विवाह शंकराशीं झाला. पुढें सगर राजाचा नातू भगीरथ यानें आपल्या पितरांचा उद्धार करण्यासाठीं अखंड तपश्चर्या करून गंगेला पृथ्वीवर आणलें."

विश्वामित्र ऋषींनीं गंगावतरणाची व कार्तिकेय याच्या जन्माची गोष्ट रामलक्ष्मणांना सविस्तर सांगितली. ती रात्र सर्वांनीं गंगेच्या दक्षिण तिरावरच काढली. सकाळ नावेंत बसून ते गंगा पार गेले. तेथें त्यांना एक मोठें नगर दिसलें. त्या नगराचें सौंदर्य पाहून रामानें त्या नगराचा वृत्तांत वर्णन करून सांगण्यास विनंति केली. म्हणाला—"मुनिवर! येथें हल्लीं कोणाचें राज्य आहे! तो कोणत्या वंशाचा राजा आहे? ह्या नगराची स्थापना कोणी केली!"

या प्रश्नाचें उत्तर म्हणून विश्वामित्र ऋषींनीं प्रथम देव व दानव यांनीं कसें समुद्राचें मंथन केलें व त्यांतून रत्नांबरोबर विष कसें निघालें व नीलकंठ शंकरानें तें पिऊन सर्वांचें रक्षण कसें केलें, अमृत निघाल्यावर देव दानव भांडूं लागलेले पाहून विष्णूनें मोहिनीचें रूप घेऊन ते




अमृत कसें देवांना पाजलें वगैरे समुद्रमंथनाचा वृत्तांत अथपासून इतिपर्यंत वर्णन करून सांगितला.

दैत्यांचा संहार विष्णूच्या कारस्थानामुळें पुढें देव दानवांचें युद्ध झालें आणि त्यांत राक्षसांचा पराभव झालेला पाहून त्यांची आई दिति, तिचे पति कश्यप यांच्याकडे गेली आणि म्हणाली—"इंद्राचा देखील वध करूं शकेल असा पुत्रलाभ करून द्यावा."

कश्यप म्हणाला—"तूं हजार वर्षें श्रद्धा व भक्तीपूर्वक तपश्चर्या केलीस तर तुझ्या

Fullscreen 127 64 / 79



इच्छेप्रमाणें तुला मुलगा होईल. तो त्रिलोक जिंकून इंद्राचा वध करील."

दितीला आनंद झाला व तिनें कुशप्लव नामक स्थानीं तपश्चर्या सुरू केली. इंद्राला ही गोष्ट कळली व तो तिच्याकडे येऊं लागला. तो तिची सेवा करूं लागला. पाणी, समिधा, कंदमुळें व फळफळावळ आणून देऊं लागला.

नऊशें नव्वद वर्षें लोटलीं. फक्त दहाच वर्षें उरलीं. दहा वर्षांनीं तिला जो मुलगा होईल तो इंद्राचा वध करील ही गोष्ट पण ठरलेली होती. एके दिवशीं दितीनें इंद्राला बोलावून आशीर्वाद दिला—"बाळ! तूं मला पंख्यानें वारा घालीत आहेस व सर्व प्रकारें माझी सेवा करीत आहेस. मला जो मुलगा होईल त्यानें तुझ्याशीं मैत्री करावी असें मी त्याला सांगेन." असें सांगून अनवश ती उशीकडे पाय करून उलटी झोंपी गेली. त्यामुळें तिची सर्व तपश्चर्या व्यर्थ झाली. इंद्र याच संधीची वाट पहात होता. त्यानें तिच्या पोटांत प्रवेश करून तिच्या पोटांत वाढणारा शत्रूचा पिंड पाहून आपल्या वज्रायुधानें त्याचे सात तुकडे करून टाकले. त्यामुळें दितीला सात मुलें झालीं.

"रामा! दिति याच प्रदेशांत तप करीत असे आणि इंद्रानें येथेंच तिची सेवा केली होती. पुढें ईक्ष्वाकु नांवाचा एक राजा झाला. त्याला विशाल नांवाचा मुलगा होता. त्यानें या जागीं एक नगरीची स्थापना केली. त्याच्या नांवावरून या नगरीचें नांव वैशाली असें पडलें. त्याचा वंशज सुमति नांवाचा राजा तेथें राज्य करीत आहे."

सुमती राजाला विश्वामित्र ऋषी राम-लक्ष्मणांबरोबर आपल्या राज्यांत आले आहेत हें कळलें. तो त्यांच्या दर्शनास आला. विश्वामित्र ऋषींनीं राम-लक्ष्मणाचा परिचय

 Fullscreen  127     66 / 79 

करून दिल्यावर सुमती राजाच्या आग्रहास्तव सर्वांनी राजाचें आतिथ्य स्वीकारलें. दुसऱ्या दिवशीं राजाचा निरोप घेऊन त्यांनीं पुढला प्रवास सुरू केला.

मिथिलेच्या अगदीं जवळ एक जुनाट आश्रम दिसला. रामानें त्याची कथा सांगायला आग्रह केला. विश्वामित्र म्हणाले—

"गौतम मुनी व त्यांची पत्नी अहल्या या आश्रमांत रहात असत. गौतम मुनि स्नानाला गेले असतां इंद्र गौतम मुनींचें रूप घेऊन आला. तरी अहल्येनें इंद्राला ओळखलें. परंतु ती मोहाला बळी पडली. इंद्र आश्रमांतून परत जात असतां गौतम मुनि आले. त्यांनीं इंद्राला ओळखलें व शाप दिला. त्यांनीं अहल्येला देखील शाप दिला. अहल्येला पश्चात्ताप झाला व तिनें पतीची माफी मागितली. पण मुनि म्हणाले— "दिलेला शाप परत घेणें मला शक्य नाहीं. योग्यवेळीं तुला मुक्ति मिळेल." ती वायुभक्षण करून याच आश्रमांत अदृश्य रूपें समाधिस्थ होऊन रहात आहे. गौतम मुनींनीं तिला सांगितलें आहे कीं रामाचें दर्शन व स्पर्श झाल्यास तूं शाप मुक्त होशील. म्हणून रामा! चल, आपण या आश्रमांत प्रवेश करूं. तुझ्या दर्शनानें ती शापमुक्त होईल."

विश्वामित्र ऋषींच्या आज्ञेप्रमाणें राम त्यांच्याबरोबर आश्रमांत गेला. रामाच्या दर्शनानें अहल्या शापमुक्त झाली. तिनें रामाचा चरणस्पर्श केल्यावर थोड्या वेळानें गौतम मुनि पण आश्रमांत परत आले. तो प्रसंग खरोखर अवर्णनीय असाच होता. गौतम मुनि व अहल्येनें विश्वामित्र ऋषींचे आभार मानले. दोघांनीं रामाचे पण आभार मानले.

पुढें विश्वामित्र ऋषि रामालक्ष्मणाबरोबर मिथिलेला येऊन पोचले.

[पुढील गोष्ट पुढील अंकीं]



आपल्या भारतांतील आश्चर्यें :

# मदुरा मीनाक्षीचें देऊळ

मदुरेच्या मीनाक्षीचें देऊळ भारतांतील सुप्रसिद्ध देवालयांपैकीं एक आहे. हें देऊळ द्राविड स्थापत्य-कलेचें व शिल्पकलेचें एक उत्कृष्ट उदाहरण म्हणून समजलें जातें.

त्या देवळाच्या चारी बाजूला चार गगनचुंबी गोपुरें आहेत. मुख्य द्वार व त्या वरील भव्य गोपुर पूर्वेकडे आहे.

देवळाच्या चारी बाजूला किल्ल्यासारख्या मोठमोठ्या भिंती आहेत व आंत दोन देवळें आहेत - १. मीनाक्षीचें म्हणजे पार्वतीचें - २. सुंदरेश्वराचें म्हणजे शंकराचें.

देवळासमोर एक सहस्र स्तम्भांचा सभामंडप आहे. वास्तविक ९८५ स्तंभ आहेत व प्रत्येकावर शिवलीलेचे प्रसंग कोरलेले आहेत. हे स्तंभ उत्कृष्ट शिल्पकलेचे नमुने म्हणून प्रसिद्ध आहेत. त्याचा निर्माणकाल इ.स. १५६० आहे.

देवळाच्या बाहेर कांहीं स्तंभ असे कोरलेले आहेत कीं त्यांवर शिलातरंग वाजवितां येतें.

देवळाच्या पूर्व कडील भागांत वसंतमंडप आहे. या मंडपांत नायक राजकर्त्यांच्या सुंदर प्रस्तर प्रतिमा आहेत.

विजयनगर साम्राज्यांतील नायक राजकर्त्यांच्या अमदानींत सतराव्या शतकांत हें नगर भरभराटीस आलें. १४ व्या शतकापर्यंत पांड्य राजांचें राज्य मदुरेला होतें. मदुरा फक्त एक तीर्थक्षेत्रच नव्हे, तर तामीळ संस्कृति, सभ्यता, कला व साहित्य यांचें











Fullscreen 127 12 / 108



# शंका समाधान

भीमूच्या गांवीं एक श्रीमंत गृहस्थ रहात असे. रोज निरनिराळीं पक्वान्नें करून खायची त्याला फार हौस होती. त्यानें या कामावर एका आचाऱ्याला नेमलें होतें. मालक दिवसांतून निदान तीनदां तरी खात असे. प्रत्येक वेळीं नवीन चवदार पदार्थ त्याला लागे.

सैंपाक्याला देखील खूप खायची संवय होती. खाऊन पिऊन मालक झोंपला कीं, आचारीपण उरलेलीं पक्वान्नें फस्त करून झोंपी जाई. पण मालकानें हांक मारली कीं त्याला जावें लागे. त्यानें विचार केला कीं, हाता-खालीं एक पोऱ्या ठेवून घ्यावा.

एके दिवशीं त्यानें तें आपल्या मालकाला सांगितलें. मालकानें कबूल केलें. आचारी भीमूच्या आजीकडे आला आणि भीमूला कामाला पाठवायला सांगितलें. म्हातारीनें विचार केला, बरें झालें. त्याचें पोट भरेल व येतांना कांहीं तरी अन्न बरोबर घेऊन येईलच कीं नाहीं. त्यावर आपला उदर-निर्वाह चालेल. म्हातारीनें भीमूला बोलावून आचाऱ्याची ओळख करून दिली. आचारी त्याला बरोबर बोलावून घेऊन गेला.

तो श्रीमंत मनुष्य जेवला कीं झोंपे व झोंपून उठला कीं, खायला काय केलें आहेस म्हणून विचारी. आचारी जें कांहीं समोर-आणून ठेवी तें खाऊन पिऊन पुन्हां झोंपी जाई.

कधीं कधीं तो मध्येंच उठून विचारी— "अरे, खायला प्यायला काय केलें आहेस?" झोंपेंत उठून खाल्यामुळें आपलें जेवण झालें असल्याचें तो पार विसरून जाई.

आचारी म्हणे—"मालक, आतांच तर आपण जेवून झोंपलांत!" पण धन्याला तें खरें वाटत नसे. सैंपाक्यानें खरकटें ताट आणून दाखविलें म्हणजे त्याला खरें वाटे. म्हणून सैंपाक्यानें मालकाचें जेवण झाल्यावर त्याचें ताट त्याच्या पलंगाखालींच ठेवण्याचा प्रघात ठेवला. मालकानें विचारल्याबरोबर तो तें ताट दाखवी.

कांहीं दिवसांनीं सैंपाक्याला एक युक्ति सुचली. कारण त्याला स्वतःला जेवल्या-नंतर झोंप येई. सैंपाक करण्याचा आळस त्याला वाटूं लागला. म्हणून त्यानें मालकाला या शिवाय खरकटें ताट दाखवूनच कित्ये-कदां काम भागवून नेलें. तो मालकाच्या ओंठाला हळूच तूप व साखर लावून निघून जाई आणि घोरत पडत असे.

मालकानें जेवण आणायला सांगितलें म्हणजे म्हणें—"आतांच तर जेवलात मालक! पहा, हें ताट आणि तोंड सुद्धां नाहीं धुतलें मालकांनीं." मालक ताट पाहून व ओंठावर तूप व साखरेचा अंश राहलेला पाहून विशेष तक्रार वगैरे करीत नसे.

ज्या दिवशीं भीमू नोकरीवर आला त्या दिवशीं सैंपाक्यानें सैंपाक करून स्वतःच सर्व



खाऊन टाकलें व उष्टें ताट भीमूच्या हातांत देऊन तें मालकाच्या पलंगाखालीं नेऊन ठेवायला सांगितलें. नंतर तूप व साखर देत असेंहि सांगितलें कीं, मालक झोंपलेले आहेत त्यांच्या वरच्या ओंठाला हळूच लावून ये. कांहीं भीति नाहीं. छान घोरत पडले आहेत.

भीमूनें छान समजल्यासारखी मुंडी हलविली आणि मालकाच्या पलंगाखालीं ताटवाटी नेऊन ठेवली आणि तूप साखर मालकाच्या वरच्या ओंठाला लावण्यासाठीं पुढें सरसावला. पण वरच्या ओंठावर तर

       

Fullscreen 127 14 / 108

मिशा होत्या. मिशांवर नाक होतें. मिशांवर लावावें कीं नाकावर याचा त्याला उलगडा होईना. शेवटीं त्यानें मालकाला जागें केलें. म्हणाला—"मालक, आचाऱ्यानें तुमच्या वरच्या ओंठाला तूप साखर लावायला सांगितलें आहे. पण तुमच्या मिशा पहा किती मोठ्या आहेत. मग ही तूप साखर मिशांना लावूं कीं नाकाला. आपण सांगाल तसें करतों."

मालक झोंप मोडल्याबरोबर विचारूं लागला—"अरे पण ताट नाहीं का वाढून आणलेंस?"

"सैंपाक्याचें जेवण झालें मालक. त्यानेंच हें ताट येथें ठेवून तुमच्या ओंठाला तूप साखर लावून ठेवायला सांगितलें आहे. पण तुमच्या ओंठावर मिशा आहेत व मिशांवर नाक आहे. आतां ही तूप साखर मिशांना लावूं कीं नाकाला. आपण सांगाल तसें करतों." भीमू म्हणाला.

"ही काम भानगड आहे? बोलाव आचाऱ्याला." मालक म्हणाला.

"पण तो तर झोंपला आहे मालक! आपण उठलांत म्हणजे आपलें जेवण झालें आहे असें सांगून आपल्याला हें ताट दाखवायला सांगितलें आहे." भीमूनें सर्व सांगून टाकलें."

तेव्हां मालकाला कळलें कीं इतके दिवस सैंपाक्यानें स्वतः खाऊन पानें माझ्या तोंडाला पुसली आहेत. त्यानें एक सोंटा घेतला व आपल्या सैंपाक्याला व भीमूला छान बडवून काढलें आणि म्हणाला—"चालते व्हा सगळे. आचाऱ्यानें पण भीमूला खूप बडवून काढलें. कारण त्याच्या मूर्खपणामुळेंच त्याची नोकरी गेली होती."





# दक्ष-यज्ञ

## तृतीय अध्याय

सतीस येतांना पाहुनिया
तोंड फिरविलें दक्षानें।
समोर कोणी नाहीं आला
नाहिं बोलला सुमुखानें ॥

बसला होता दूर जरी तरि
उच्च आसनावर दक्ष,
आली सति हें कळलें त्याला
नाहीं दिधलें पण लक्ष ॥

होम पेटला होता, कां पण
ज्वाळा दक्षाच्या डोळ्यांत?
सतीस दिसलें सर्व वेगळें,
थक्क जाहली चकित मनांत ॥

लक्षावधि मुनि, देव, विप्रगण
पहात होते तो यज्ञ।
नव्हते आले फक्त एकटे
परमेश्वर शिव सर्वज्ञ ॥

उठून गेला गोंधळ ऐकुन
"हरहर शंभो" चा जयघोष।
माता आली मुलीस भेटून
झाला तिजला अति संतोष ॥

भीति पतीची परंतु तिजला
वाटत होती, म्हणतिल काय!
कारण माहित होतें सगळें;
मन मातेचें, करील काय !!

राग जांवया वरति पतीचा
समोर आलेली मुलगी;
कळवळलें तें मातृ-हृदय अति,
पवित्र निर्मल एक जगीं ॥

माता-पुत्री भेटल्या जणूं,
भेटे पाडस हरिणीला,
गाय वासरा, तसें भासलें
हृदय मनोहर सर्वांला।

श्री. भालचंद्र आपटे, नवी दिल्ली

Fullscreen 127 16 / 108












करीत होते कौतुक सगळे
राग भडकला दक्षाचा।
दक्षपत्नि बाजूला झाली
क्रोध पाहुनी नवऱ्याचा ॥

वहिणी "ताई!" म्हणत धांवल्या
होत्या, त्या पण चपापल्या;
फिरल्या मागें भिउन पाहुनी
नजर पित्याची पण अपुल्या ॥

प्रसंग दिसला सतिस वेगळा
दुःखि जाहलें चित्त तिचें।
परतावें कीं, रहावें तिथें,
काय करावें तिज न सुचें ॥

धीर करुनि ती हात जोडुनी
उभी राहिली पित्याजवळ।
वक्र करुनि तो भ्रुकुटी वदला-
"बोल काय तें पतीजवळ ॥

"निघून जा तूं परत पावलीं
स्थान न माझ्या घरीं तुला!
करास आलिस येथें कोणी
बोलविलें का सांग तुला?"

वाणी निष्ठुर ऐकुनिया ती
थक जाहली सती अशी,
वज्र शिरावर पडलें असतां
दुःखित व्हावी मृगी जशी ॥

वाहुं लागले अश्रु घळघळां
क्षणांत डोळ्यांतून तिच्या।
कीं क्रोधाग्नीच्या त्या होत्या
ठिणग्या डोळ्यांतील तिच्या ॥

"मन मोडुन मी पतिचें आलें
माहेराचा मान धरून;
काय मिळविलें येउन येथें
पतिचा अन् अपमान करून!"

ऐकला तिनें करीत होते
विप्र-देव-मुनि मंत्रोच्चार।
करीत नव्हता परंतु कोणी
चुकुन शिवाचा नामोच्चार ॥



विंचु चावला जणूं वाटलें
पाहुन पतिचा तो अपमान।
मानत आली होति सदा ती
पतिच्या मानामध्यें मान ॥

थरथर सहसा कांपुं लागलें
क्रोधाग्नीनें तिचें शरीर।
पित्यास संबोधुन ती वदली,
वाणी होती अति गंभीर-

"जन्म दिला मज, उपकारास्तव
पित्यास करतें प्रथम प्रमाण,
ऐका अन् पति अपमानाचा
भोगा होईल जो परिणाम ॥

"शिवा शिवायच यज्ञ कशाचा?
काय वाटला तुम्हां खेळ?
कुडल्याचा खोलांत पाय हा!
हंसेल तुम्हां जो ऐकेल ॥"

दक्ष ऐकुनी ओरडला-"जा,
बंद तोंड तूं कर अपुलें।
लहान तोंडीं मोठा घेणें
घास शोभतें का असलें?

"नको पित्याला पतीस कर जा,
तुला पाहिजे तो उपदेश।
ऐकलेंस तूं नाहिंस जर तर
काढिन धरुनी झिंजा केस!"



क्षुब्ध ऐकुनी शिवगण झाले
नाद भयंकर अन् केला।
शांत करुनि बसविलें सतीनें
तत्क्षयमीं ज्याला त्याला।

पित्यास वदली-"थोर तुम्ही पण
केला आहे हा अविचार!
करी नित्य जो शुभ जगताचें
त्याच्याविषयीं असा विचार?"

"गर्व सर्व हा होइल तुमचा
ध्वंस यज्ञपण क्षणांत हा!
बाप तुम्ही, पण शाप तुम्हांला!-
कांटा राहिल मनांत हा!"


Fullscreen

127





18 / 108


शाप देउनी मनांत साध्वी
सती जाहली दुःखी फार।
उत्तरेकडे मुख ती करुनी
बसली पतिचा करित विचार॥

ध्यान धरुनि ती बसतां ज्वाला
निघूं लागल्या अंगांतून,
शक्य न झालें कुणा वांचणें
दिव्य तिच्या त्या तेजांतून॥

जळून गेली मेणावाणी
मूर्ति सतीची ती साकार।
यज्ञ मंडपाध्यें नंतर
उठून गेला हाहाकार॥

शिरून नंदी, गण ओरडले,
सुटला कित्येकांचा धीर–
"पकडा त्याला कुठें दक्ष तो"
पळूं लागले ऐकुनि वीर!

दक्ष पळाला दृश्य पाहुनी
लपला मागें भृगुमुनिंच्या।

अग्नि अस्त्र घेउनी पातले
सैनिक मंत्रनें त्यांच्या॥

आणि गणांचें युद्ध जाहलें
एक भयंकर त्यांच्याशीं।
यज्ञभूमि जणुं युद्धभूमि ती:–
पडल्या प्रेतांच्या राशी॥

गंमत बघण्या यज्ञाची जे
आले होते प्रेक्षकगण।
पाय काढला त्यांनीं तत्क्षण
होता मोलाचा तो क्षण॥

मावळतां रवि पाठ दाखविलि
सर्व गणांनीं प्राणभयें;
पाठ दाखवुन रणांगणाला
सर्व पळाले भृगूभयें॥

युद्ध थांबलें, नारदमुनि पण
म्हणत निघाले–"नारायण!"
किती व्यर्थ हें रक्त सांडलें–
"नारायण हरि, नारायण!"




[ १२ ]

[ चित्रसेननें राज्यांत माजलेली अराजकता नाहींशी करण्यासाठीं अनेक उपाय केले. चोर व लुटेरे यांना वश करून त्यांना शेतीसाठीं जमिनी दिल्या. या अवधींत महाराणी कांतिमतीला एक मुलगा झाला. तो पांच वर्षांचा होतांच उग्राक्ष त्याला घेऊन जाण्यासाठीं आला. चित्रसेननें एका मुलाला आणून उग्राक्षासमोर उभा केला. त्यालाच युवराज समजून उग्राक्ष त्याला घेऊन गेला. पण तो मुलगा युवराज नसून सैंपाक्याचा मुलगा आहे हें उग्राक्षाला कळलें. पुढें वाचा ]

उग्राक्ष रागारागानें त्या मुलाला घेऊन कपिलपुराच्या किल्ल्यापर्यंत आला. दुरूनच त्याला येत असलेला पाहून अमरपालनें चित्र सेनाला सावध केलें–"महाराज, तो राक्षस इतका रागवलेला दिसत आहे कीं तो काय करील हें सांगवत नाहीं."

चित्रसेन काय बोलणार! राणी कांतिमति घाबरूनच गेली. चित्रसेन म्हणाला–"म्हणजे तो मुलगा युवराज नव्हे हें उग्राक्षाला कळलें आहे."

"त्याला फसविणें इतकें सोपें नाहीं महाराज!" अमरपाल म्हणाला.

चित्रसेन कांतिमतीकडे वळून जें केलें हें कांहीं बरोबर केलें नाहीं असें दाखवीत म्हणाला–"बरोबर आहे, तुझें म्हणणें. मी वचन दिलें, तेव्हां या भयंकर परिस्थितीची





Fullscreen 127 / 108




मला कल्पना देखील नव्हती." "आपण त्याचा कांटा दूर केला तर, महाराज?" अमरपालनें विचारलें.

"तुला वाटतें तितकें तें सोपें नाहीं. या शिवाय दिल्लें वचन मोडून विश्वास-घातानें मित्राचा वध करणें क्षत्रियाला शोभत नाहीं. माझी प्रजा व माझे अधि-कारी माझी काय किंमत करतील! तूंच विचार करून पहा!"

राणी कांतिमति म्हणाली—"या राक्षसाचा प्रश्न माझ्यावर टाकावा!" असें सांगून ती आंत निघून गेली.

इतक्यांत उग्राक्ष गर्जना करीत व पाय आपटीत राजवाड्यांत पोंचला. चित्रसेननें विचारलें—"काय झालें उग्राक्ष? तुझ्या विषयींच आम्ही बोलत होतों."

"महाराज! तुम्ही आपलें वचन मोडलें आहे. हा कोणाचा तरी पोरटा माझ्या गळ्यांत बांधून मला फंसविण्यांत आलें आहे." उग्राक्ष म्हणाला.

"ही दासींची चूक आहे, उग्राक्ष! त्यांनीं घाईंत युवराजांच्या ऐवजीं मंत्र्यांचा मुलगा आणून दिला!" अमरपाल म्हणाला.

"हा मंत्र्याचा मुलगा आहे! हा: हा: हा: हा:!" करून उग्राक्ष मोठ्यानें हंसला व मुलाला उचलून म्हणाला—"हा सैंपाक्याचा मुलगा आहे, मंत्र्याचा मुलगा नाहीं. मला हवा आहे चित्रसेन महाराजांचा पहिला मुलगा. त्याच्या ऐवजीं त्यांनीं आपलें सर्व राज्य मला दिलें तरी तें मला नको!"

"थांब, मुलाला घेऊन येतों." असें म्हणत चित्रसेन आंत गेला.

त्या अवधींत चार दासी एका मुलाला सुंदर रेशमी कपडे घेऊन आल्या व उग्राक्षा-समोर त्याला उभा केला. उग्राक्षानें दोन तीनदां त्या मुलाकडे व दासींकडे संशय-



मुद्रेनें पाहिलें व म्हणाला—"अरे पण तुम्ही युवराजांऐवजीं घाईंत आणखी कोणाला तर नाहीं आणलेंत? पहा, बरें का!"

"तुला इतकी शंका वाटत असेल तर तूंच कां नाहीं विचारीत मुलाला?" दासी म्हणाल्या. उग्राक्षानें मुलाजवळ जाऊन त्याला हळूंच उचलून घेतलें व विचारलें—"तुझें नांव काय बाळ?"

"युवराज!" मुलगा म्हणाला.

दासी जोरानें हंसत म्हणाल्या—"वाह बाई! काय तरी प्रश्न हा! तूं कोणाचा मुलगा म्हणून कां नाहीं प्रश्न विचारलास उग्राक्ष? तुझा संशय दूर झाला असता!"

"मला फंसविण्यासाठीं तुम्ही त्याला पढवून ठेवलें नसेल कशावरून? म्हणून मी मुद्दाम दुसराच प्रश्न केला!" उग्राक्ष म्हणाला.

"आतां तरी झालें का समाधान तुझें?" दासींनीं विचारलें.

"याचें उत्तर उद्यां सांगेन! मी रानांत जाऊन त्याची परीक्षा घेईन व तो कोणाचा मुलगा आहे हें घेऊन सांगेन! जर का हा युवराज ठरला नाहीं तर तुम्हां चौघींना उचलून घेऊन जाईन व माझ्या राक्षस




अनुयायांशीं तुमचें लग्न लावून देईन." उग्राक्ष म्हणाला.

उग्राक्षाचें तें वाक्य ऐकून दासी दचकल्या. उग्राक्ष मुलाला खांद्यावर उचलून घेऊन लांब लांब पावलें टाकीत किल्ल्याच्या फाटका-बाहेर निघून गेला.

रानांत पोंचल्यावर उग्राक्षानें मुलाची परीक्षा घेण्यासाठीं त्याच्या हातांत एक काठी दिली व विचारलें—"तुला आवडली का ही काठी?"

मुलगा म्हणाला—"हो छान आहे! मी घेऊं का ही काठी!"

Fullscreen 127 22 / 108



उग्राक्ष म्हणाला—“हो घे कीं, तुझ्या-साठींच तर मी शोधून काढली आहे. ह्या काठीनें तूं काय करणार बाळ?”

“काय करणार! कां! खिडक्यांतून मेंढरूं कोठें बाहेर पळूं लागलें तर एक देईन सडकून.” मुलगा म्हणाला.

“अरे गुलामा! म्हणजे तूं राजाच्या धनगराचा पोर आहेस तर! असें काय! पाहतों तर! धनगराच्या पोराला धरून राजकुमार म्हणून माझ्या गळ्यांत बांधायला निघाल्या होत्या नाहीं का त्या दासी!” रागानें त्याचें सर्व अंग थर थर कांपूं लागलें.

त्यानें मुलाला उचलून घेतलें आणि “लुच्चेगिरी! दगा! फसवणूक! असे ओरडत कपिलपुरच्या किल्ल्याकडे धांवला. त्याच्या पायाच्या धक्यानें किल्ल्याच्या भिंती देखील हालूं लागल्या.

उग्राक्षानें जवळ आल्यावर पाहिलें कीं, राजवाड्याच्या दिंडी दरवाज्यासमोर त्याला सैन्य उभें असलेलें दिसलें. त्याला वाटलें कीं चित्रसेनानें माझ्याशीं युद्ध करण्यासाठीं हें सैन्य उभें केलें असावें. पण त्यानें जवळ जाऊन न्याहाळून पाहिलें तेव्हां त्याला अमरपाळ एका मुलाला घेऊन उभा असलेला दिसला. मुलाच्या अंगांत राजसी पोशाख होता. त्याचा तेजस्वी चेहरा पाहून उग्राक्षाला वाटलें, हा युवराज असावा.

उग्राक्ष अजून दूरच होता, अमरपाळ ओरडून म्हणाला—“उग्राक्ष! हे आहेत युवराज! दासींनी दोनदां चूक केली.

“ह्या सर्व चुका दासींच्याच आहेत, असें म्हणावयाचें आहे का तुला?” उग्राक्षानें व्यंग करीत पुढें विचारलें—“आणि आतां तूं हे युवराज कोठून आणले आहेस?”

“हे युवराजच आहेत, उग्राक्ष! माझ्या बोलण्यावर तूं विश्वास कर! मी तुला



फसवीन असें का वाटतें तुला? महाराजांचा पहिला मुलगा तुला हवा होता, तो हा आहे!” अमरपाळ म्हणाला.

उग्राक्षानें लक्षपूर्वक मुलाकडे पाहिलें. अमरपाळच्या डोळ्यांत त्याला विवशता दिसली. डोळे ओले पण झालेले होते. आतां त्याला संशय राहिला नाहीं. “मला दोनदां विनाकारण कां त्रास दिलात? पहिल्यानेंच ह्याला दिलें असतें तर काय हरकत होती?” उग्राक्षानें विचारलें.

“उग्राक्ष तूं राक्षस आहेस. तुला मातेच्या हृदयाची कल्पना नाहीं. राणी साहेब बेशुद्ध होऊन पडल्या आहेत. महाराज त्यांच्या शुश्रूषेसाठीं तेथें गेले आहेत. महाराजांना या सर्व प्रकारामुळें किती वाईट वाटत आहे याची कल्पना तुला काय असणार उग्राक्ष! मागचा पुढचा कांहीं एक विचार न करतां महाराणीची अनुमति मिळविल्याशिवाय त्यांनीं तुला तें वचन दिलें होतें. तें पुरें करण्याची जबाबदारी त्यांच्यावर होती. पण राणीसाहेबांनीं वचन कोठें दिलें होतें. ह्या मुलावर महाराजांचा जितका अधिकार आहे तितकाच राणी साहेबांचा देखील आहे!” इतकें बोलून अमरपाळ



गप्प झाला. उग्राक्ष थोडा वेळ विचारांत पडला. नंतर मुलाला उचलून खांद्यावर घेत म्हणाला—“ठीक! महाराजांच्या दर्शनाला येईन एकदां!” असें सांगून तो निघाला.

तो जात असतां अमरपाळ त्याला म्हणाला—“युवराजांच्या रक्षणाची जबाबदारी तुझ्यावर, विसरूं नकोस!”

उग्राक्ष थांबून व मागें वळून म्हणाला—“आजपासून हा मुलगा चित्रसेन महाराजांचा नाहीं. माझा मुलगा उग्रदत्त आहे. लक्षांत ठेव, तूं देखील विसरूं नकोस!” उग्राक्ष आनंदानें उड्या मारीत पाय वाटेनें

Fullscreen 127 24 / 108



आपल्या किल्ल्याकडे चालला होता. त्यानें खांद्यावर बसलेल्या युवराजाला म्हटलें— "बाळ ! तूं आतां माझ्याकडेच राहायचें बरें का ! मी तुला गंमती गंमती आणून देईन. तुला मी उग्रदत्त म्हणून हाक मारीन. माझे नोकर चाकर सर्व तुला उग्रदत्तच म्हणतील."

उग्राक्ष आपल्या किल्ल्याजवळ आला. किल्ल्यासमोर राक्षस सकुटुंब त्याची वाट पहात उभे होते. त्यांनीं उग्राक्ष व राजकुमाराचा जय घोष केला.

उग्राक्ष आपल्या अनुयायांना म्हणाला— "हा आहे तुमचा होणारा राजा ! नायक व धनी ! याचें नांव आहे उग्रदत्त !" सर्वांनीं "उग्रदत्त की जय !" असा जय घोष केल्यावर उग्राक्ष उग्रदत्ताला घेऊन किल्ल्यांत गेला. आपल्या राजवाड्याच्या एका सुंदर दालनांत मुलाला खालीं उतरून ठेवीत तो म्हणाला—"हा पहा तुझा महाल ! तुझ्याबरोबर खेळायला तुझ्याबरोबरचीं दोन मुलें मी घेऊन येतों. मग तुम्ही सर्व मिळून खूप खेळा !"

नंतर उग्राक्षानें आपल्या दोघां विश्वस्त नोकरांना बोलाविलें आणि म्हणाला—"तुम्ही जाऊन उग्रदत्तच्या वयाच्या दोन मुलांना धरून घेऊन या. कोणाला कळतां कामा नये कीं कोणी मुलाला उचलून नेलें. चित्रसेन महाराजांना पण हें कळतां कामा नये कीं, त्यांच्या राज्यांतल्या मुलांना आम्ही पळवून नेत आहों."

"तर मग हें काम रात्रींच करावें लागेल !" एक सेवक म्हणाला.

"पण रात्रीं काळोखांत मुलगा आंधळा, लंगडा, कसा आहे हें काय कळणार तुम्हांला ? तशा मुलाला घेऊन आलात तर चामडी लोळवीन तुमची, लक्षांत ठेवा. ज्या घरांतून मुलगा उचलून आणाल त्या









प्रत्येक घरांत ही मोहरांची एक पिशवी ठेवून या." उग्राक्षानें बजावून सांगितलें आणि एकेकाला एकेक मोहरांची पिशवी दिली.

दुसऱ्या दिवशीं उग्राक्ष उग्रदत्त बरोबर खेळत असतां दोघे राक्षस येत असलेले दिसले. प्रत्येकाच्या खांद्यावर एकेक सुंदर मुलगा होता.

त्यांना पाहून उग्रदत्त आनंदानें नाचूं बागडूं लागला. पण तीं दोघं मुलें मात्र भीतीनें थरथर कांपत होतीं. तें पाहून उग्राक्ष म्हणाला—"सर्व मुलांना जरा बागेंत खेळायला घेऊन जा. तेथें जनावरांच्या पिलांबरोबर खेळूं लागलीं म्हणजे त्यांचें मन रमेल." नंतर थोडावेळ थांबून त्यानें विचारलें—"या मुलांना आणतांना तुम्हांला कोणी पाहिलें तर नाहीं ?"

"मालक ! कोणाला कळणार ? शेतांत झोपडींत हीं मुलें एकटीं होतीं. त्यांना उच-लून घेऊन आलों व आपल्या हुकमाप्रमाणें मोहरांची पिशवी त्याच झोपडींत टाकून आलों आहों."

नंतर उग्राक्षानें सांगितल्याप्रमाणें राक्षस मुलांना घेऊन बागेंत गेले. तेथें अस्वलांचीं व वाघाचीं पिलें खेळत होतीं. त्यांना पाहून मुलें राक्षसांच्या खांद्यावरून उतरलीं व त्या पिलांबरोबर खेळायला धांवलीं. त्यांची भीति पार पळून गेली. त्यांनीं लाकडी खेळणीं पाहिली होतीं. पण हीं जनावरें प्रत्यक्ष पाहून त्यांना जो आनंद झाला तो काय वर्णावा ! उग्राक्षाची युक्ति एकंदरींत यशस्वी ठरली. उग्रादत्त त्यांच्या संगतींत छान रमला.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# नागकन्या

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत काढून खांद्यावर घेतलें आणि स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याच्याशीं बोलूं लागला. म्हणाला—"राजा, तूं आपल्या प्रयत्नांत जी आस्था दाखवीत आहेस ती पाहून मला केव्हां केव्हां शंका येते कीं, कोणाच्या तरी प्रेमांत गुरफटून तूं हें कष्ट-साध्य काम करण्याच्या फंदांत पडला असावास. कारण मनुष्याच्या हृदयांत एकदां प्रेमाचा शिरकाव झाला कीं मनुष्याला जणुं-कांहीं दैवी शक्तीचा लाभ होतो. याचें उदाहरण म्हणजे राजा केशववर्मा. मी तुझ्या मनाला थोडा तरी आराम मिळावा म्हणून त्या राजाची गोष्ट सांगणार आहें." त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

फार पूर्वी अपराजिता नांवाची एक नागकन्या पाताळ लोकांत रहात असे.

वेताळाच्या गोष्टी









Fullscreen 127 28 / 108



नागकन्याच ती, तिला कोठें जायला अटकाव म्हणून नव्हता. कधीं कधीं ती पाताळ लोकांतून भूलोकांत येई. एका लहानशा सरोवराच्या काठीं येऊन ती विहार करी.

त्या सरोवरापासून थोड्या अंतरावर एक नगर होतें. तेथील राजाचें नांव केशववर्मा असें होतें. तो रूपानें जणुंकांहीं मदनाच्या पुतळाच होता. पण स्त्रीजाती विषयीं त्याच्या मनांत एक तऱ्हेची चीड होती. कारण त्याचे वडील देवेन्द्रवर्मा यांच्या अंतःपुरांत अनेक राण्या असूनहि त्यांना कधीं खरें संसार सुख असें मिळालें नाहीं उलट सारें आयुष्य काळजींत व दुःखांतच गेलें. ही गोष्ट केशववर्माला त्याच्या वडिलांकडून कळली होती. म्हणून तो कोणत्याहि स्त्रीकडे फिरकून पहात देखील नसे.

राजधानींत रूपरमण नांवाचा एक न्हावी रहात असे. त्याचें रूप त्याच्या नांवाला साजेल असें नव्हतें. एक तर तो लंगडा होता पाठीवर मोठें कुबड होतें. त्याचा एक डोळा गेला होता. रंग तर कांहीं विचारूंच नका.

एकदां रूपरमण फिरत फिरत अपराजिताच्या सरोवराच्या बाजूला आला व तिचें सौंदर्य पाहून मुग्ध झाला. अपराजितानें पण तिला पाहिलें. पण तिच्या मनावर अगदीं उलटा परिणाम झाला. ती तोंड फिरवून उभी राहिली आणि म्हणाली— "चालता हो माझ्या डोळ्या समोरून!"

रूपरमण परतला. परंतु त्याचें मन त्याच्या स्वाधीन नव्हतें.

पुढें कांहीं दिवसांनीं केशववर्मा शिकारी साठीं म्हणून रानांत गेला असतां त्याचा घोडा बुजून पळूं लागला. नोकर चाकर मागें राहून गेले आणि केशववर्मा अपराजिताच्या सरोवरा नजीक येऊन पोंचला.



पाणी पिण्यासाठी तो त्या सरोवरा जवळ गेला. अपराजितानें त्याला दुरून पाहिलें होतें. ती हळूं हळूं त्याच्या मागें येऊन उभी राहिली. पण तिच्या पैंजणांचा व बांगड्यांचा आवाज ऐकून केशववर्मानें मागें वळून पाहिलें. अप्सरेलाहि लाजवणारें तिचें तें सौंदर्य पाहून केशववर्मा मोहित झाला. परस्परांचें परस्परावर अकस्मात भेटीमुळें जें प्रेम उत्पन्न झालें, तें थोड्या वेळानें दोघांना दुःखी करण्यास कारण झालें. कारण केशववर्मानें विवाह करण्यास नकार दिला तो म्हणाला— "स्त्रीजात मायावी असते. तिचा स्पर्श सर्पदंशाहून जास्त भयंकर असतो. म्हणून मी स्त्रीजातीच्या सावलीला देखील स्पर्श करीत नाहीं." असें सांगून तो निघून गेला.

केशववर्मा राजधानींत परतला. पण त्याचें मन अपराजितानें हिरावून घेतलें होतें.

त्या दिवसापासून केशववर्माचें लक्ष राज्य कारकारांत लागत नसे. भूक, तहान व झोंप पार उडून गेली. परंतु त्याच्या आजाराचें खरें कारण कोणालाच कळलें नाहीं. भूत पिशाच बाधा झाली असावी असें समजून प्रधानानें मांत्रिकांना बोलाविलें. त्यांनीं आपापल्या समजुती प्रमाणें इलाज करून




पाहिला. पण कांहींच फायदा झाला नाहीं. राजा विरह दुःखानें आजारी असेल याची कोणाला कल्पना देखील नव्हती. रानांत अपराजिताची व त्याची भेट झाली ही गोष्ट कोणाला माहीत नव्हती.

तिकडे राजाच्या प्रेमामुळें अपराजिता पण वेडी झाली होती. परंतु ती हात टेंकून बसली नाहीं. तिनें सरोवरांत उडी टाकली आणि त्याच्या तळाशीं असलेल्या भोंकांतून ती पाताळ लोकांत गेली. तिनें आपल्या वडिलांना जाऊन घडलेलें वृत्त सांगितलें व म्हणाली—"बाबा, तुम्हांला अनेक सिद्धी








Fullscreen 127 30 / 108

प्राप्त आहेत. मला परकाय प्रवेश सिद्धीचा मंत्र शिकवून द्या." नागराजानें आपल्या मुलीला एकच काय दोन मंत्र शिकविले, एक परकाय प्रवेश सिद्धीचा व दुसरा शरीर त्याग करण्याचा. अपराजितानें दोन्ही सिद्धी प्राप्त केल्या व आपल्या आवडत्या सरोवराकडे आली.

रूपरमण न्हावी देखील अपराजिताच्या प्रेमांत आपला कामधंदा सोडून त्या सरोवराच्या चारी बाजूला अपराजिताच्या दर्शनाच्या आशेनें घिरट्या घालीत असे. आपला प्रयत्न म्हणजे आकाशांतले तारे तोडण्या सारखा आहे. कारण कोठें तिचें तें अलौकिक सौंदर्य व कोठें आपलें हें विद्रूप रूप. निदान तिचें दर्शन घडलें तरी पुरे या विचारानें तो तिकडे येत असे.

नकळत झाडाआड उभें राहून तिला पहात बसावें या हेतूनें तो चाहूल लागूं न देतां चालत होता. पण एका वाळक्या काडीवर त्याचा पाय पडला व काडी मोडल्याचा आवाज ऐकून अपराजितानें त्याला पाहिलें. पण या खेपेस तिच्या तोंडावर राग नव्हता. उलट तिनें त्याला खुणेनें जवळ बोलाविलें.



रूपरमण नागकन्या बसली होती तेथें पोचला तेव्हा ती म्हणाली—"तुझें माझ्यावर इतकें प्रेम आहे. पण मी काय करूं ? तुझें रूप पाहूनच भीति वाटते. तुमचा राजा रूपवान आहे, असें ऐकतें. तूं त्याच्या शरिरांत प्रवेश केलास तर मी तुझ्या प्रेमाचा स्वीकार करीन. मी तुला दोन मंत्र शिकवितें. तूं संधी साधून राजाच्या शरिरांत प्रवेश कर आणि माझ्याकडे ये. असें सांगून तिनें दोन्ही मंत्र त्याला शिकविले.

राजाचा आजार दिवसेंदिवस वाढत चाललेला पाहून प्रधानानें दवंडी पिटविली कीं, जो कोणी राजाचा आजार बरा करील त्याला राजाची सुवर्णतुला करून सोनें बक्षिस देण्यांत येईल.

ती दवंडी ऐकून न्हावी राजाचा इलाज करण्याचें सांगून आपला हेतू साध्य करून घेण्यासाठीं राजवाड्यांत आला. प्रथम पाहारेकऱ्यांनीं त्याला आंत जाऊं दिलें नाहीं. पण प्रधानानें स्वतःच बोलवून घेतल्यावर न्हाव्याला राजवाड्यांत प्रवेश मिळाला.

राजा व राज्याचे मोठमोठे अधिकारी ज्या जागीं बसले होते तेथें जाऊन न्हावी





नाचूं लागला. त्याचें तें रूप व त्यावर नृत्य पाहून सर्व हंसूं लागले.

नंतर न्हाव्यानें राजाला एकांतांत भेटून सांगितलें कीं, महाराज, आपण माझ्याबरोबर रानांत चलावें, तेथें मी आपला इलाज करीन.

राजानें तें कबूल केलें आणि न्हाव्याबरोबर रानांत जायला तयार झाला. न्हावी राजाला रानांत निर्जन स्थानीं घेऊन गेला. तेथें त्यांना एक मेलेला पोपट दिसला— "महाराज, पहा गंमत. मी परकाय प्रवेश करतो." असें म्हणत त्यानें आपलें शरीर सोडलें आणि पोपटाच्या शरिरांत प्रवेश केला. न्हाव्याचें मृत शरीर जमिनीवर आदळलें व पोपट भुरकन उडून झाडाच्या फांदीवर जाऊन बसला. "पाहिलेंत महाराज!" तो आवाज न्हाव्याचा होता पण पोपटाच्या तोंडांतून येत होता. पुन्हां पोपट मरून खालीं पडला व न्हावी स्वतःच्या शरिरांत प्रवेश करून उभा राहिला. हें सर्व दृश्य पाहून राजाला स्वतःच्या डोळ्यावर विश्वास बसेना.

नंतर न्हावी राजाला म्हणाला—"महाराज, यांत कांहीं नवल नाहीं. तुम्हांला सुद्धां तो मंत्र शिकवून देईन. तुम्हांला देखील परकाय प्रवेश करतां येईल. पाहिजे तर प्रयोग करून पहा."

राजा मोहाला बळी पडला व न्हाव्याकडून त्यानें दोन्ही मंत्र शिकून घेतले. पहला मंत्र म्हणून त्यानें स्वतःचें शरीर सोडलें व दुसरा मंत्र म्हणून पोपटाच्या शरिरांत प्रवेश केला. न्हावी त्याच संधीची वाट पहात होता. त्यानें लगेच राजाच्या मृत शरिरांत प्रवेश केला आणि राजाच्या घोड्यावर बसून राजवाड्याकडे निघून गेला.

राजाला तेव्हां आपली चूक कळली. पोपटाच्या शरिरापेक्षां न्हाव्याचें शरीर काय वाईट आहे? तें मनुष्याचें शरीर तरी आहे असा विचार करून राजानें न्हाव्याच्या शरिरांत प्रवेश केला व राजधानीकडे निघाला. पण त्याला राजवाड्यांत प्रवेश मिळाला नाहीं. तो पाहारेकऱ्यांना म्हणाला— "खरा राजा मी आहें व राजवाड्यांत जो राजा आहे तो तोतया आहे." पण पाहारेकऱ्यांनीं त्याच्या बोलण्याची थट्टा उडवून त्याला धक्के मारून राजवाड्या बाहेर काढलें.

आपल्या परिस्थितीचा विचार करून राजाला वेड लागल्यासारखें झालें. राज्य तर घालवून बसलाच होता. दैव दुर्विलास असा कीं तो आपलें स्वतःचें शरीर देखील घालवून बसला होता. या जिण्यापेक्षां मरण आलेलें बरें असें त्याला वाटलें. पण तितक्यांत त्याला नागकन्येची आठवण झाली. तिचें आपल्यावर प्रेम आहेच. तिला जाऊन भेटावें व तिची मदत मिळाल्यास पहावी, असा विचार करून राजा सरोवराच्याकाठीं पोंचला. त्यानें अपराजिताला घडलेलें वृत्त सांगून या संकटांतून सुटका करून देण्यास कांहीं तरी उपाय करायला सांगितलें. सर्व कांहीं ऐकून घेतल्यावर ती म्हणाली— "तुम्ही झुडपाआड लपून बसा. मी कांहीं



Fullscreen 127 34 / 108



तरी उपाय करून न्हाव्याला तुमच्या शरिरांतून बाहेर काढते. तुम्ही तावडतोब न्हाव्याच्या शरिराचा त्याग करून स्वतःच्या शरिरांत शिरा म्हणजे झालें."

राजा झुडपाआड जाऊन बसल्यानंतर थोड्या वेळानें न्हावी राजाच्या शरिरांत सरोवराच्या काठीं आला. या अवधींत नागकन्येनें सरोवरांतून एक मासा बाहेर काढून खडकावर ठेवला व रडण्याचें सोंग केलें.

न्हावी आल्यावर तिला म्हणाला—"पहा आतां, मी आपलें कुरूप शरीर सोडून या सुंदर देहांत प्रवेश करून आलों आहें. आतां आपल्या विवाहास..."

"पण मी आतां लग्न कसें करूं ही पहा माझी आजी मरून पडली आहे. तिच्या विरहामुळें मला लग्न वगैरे कांहीं एक करण्याची इच्छा नाहीं." नागकन्या म्हणाली.

"या एवढ्याशा माशा करितां तूं मला दिलेलें वचन मोडणार?" न्हाव्यानें विचारलें.

"आजीच्या परवानगी शिवाय मी लग्न कसें करूं?" असें सांगून अपराजिता रडूं लागली.

"एवढेंच ना! तिची परवानगी घेण्यापुरती ती जिवंत झाली म्हणजे झालें. मी तिला जिवंत करतों. तूं परवानगी मागून घे. मग मी परत याच शरिरांत प्रवेश करून तुझ्याशीं लग्न करीन." असें म्हणत न्हावी माशाच्या शरिरांत शिरला व माशाच्या शरिरांतून म्हणाला—"तूं खुशाल राजाशीं लग्न कर."

राजानें आपलें शरीर रिकामें झालेलें पाहाल्याबरोबर न्हाव्याच्या शरिराचा त्याग करून स्वशरिरांत प्रवेश केला. त्या बरोबर अपराजिता म्हणाली—"माझ्या आजीनें मला









Fullscreen 127 36 / 108


राजाशीं लग्न करण्यास परवानगी दिली आहे. म्हणून मी त्याच्याशीं लग्न करतें. राजा लग्नास कबूल झाला. तेव्हां कोठें त्याची चूक न्हाव्याच्या लक्षांत आली. माशाचें शरीर सोडून त्यानें पुन्हां आपल्या शरिरांत प्रवेश केला. राजानें त्याला दंड देण्यासाठीं तलवार काढली. पण अपराजिताच्या सांगण्यावरून त्यानें त्याला माफ केलें.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून राजाला विचारलें—"राजा, आतां मला हें सांग कीं, स्त्रियांचें नुसतें नांव ऐकून ज्या राजाच्या कपाळाला तिडीक येत असे तो नागकन्येशीं लग्नाला तयार कसा काय झाला? तिच्यामुळें त्याला स्वतःचें राज्य मिळालें म्हणून कीं त्याचें तिच्यावर प्रेम होतें म्हणून? माहीत असून उत्तर दिलें नाहींस तर तुला परिणाम माहीत आहेच. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर पडतील."

विक्रमार्क म्हणाला—"अपराजितानें त्याला त्याचा स्वतःचा देह परत मिळवून दिला. हा उपकार फार मोठा आहे. मनुष्याचें स्वतःच्या देहावर सर्वांत अधिक प्रेम असतें. नागकन्येवर त्याचें प्रेम बसलें होतें हें देखील खरें असलें तरी तें मुख्य कारण नव्हे. राज्य गेलें त्याचें दुःख राजाला फार वाटत होतें. परंतु आपला देह घालवून बसल्या बद्दल त्याला त्याहून अधिक दुःख होत होतें. स्वतःचा देह पुन्हां मिळाल्याचा आनंद सर्व प्रकारच्या आनंदाहून फार मोठा आहे."

राजाचें मौन भंग झाल्यावर वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला व पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. (कल्पित)





# ※ दानत ※

श्रीरंगपट्टणम् येथें हिरा शेट नांवाचा एक जव्हेरी रहात असे. त्याचा परदेशाशीं देखील व्यापार असे. एकदां हिरा शेटकडे आन्ध्र देशांतील रामचंद्र शेट नांवाचा व्यापारी आला. त्यानें हिरा शेटच्या दुकानांत उत्तमोत्तम हिरे पाहिले. त्यापैकीं एक हिरा रामचंद्र शेटला फार आवडला. त्याची किंमत विचारतां हिरा शेटनीं चार हजार मोहरें सांगितली. रामचंद्रशेट कडे त्यावेळीं फक्त तीन हजार मोहराच होत्या. त्यांनीं हिराशेटला तें सांगितलें व म्हणाले—"मी गांवीं गेल्यावर रकम पाठवून देतों."

रामचंद्र शेटच्या चोख व्यापारासंबंधी नांव लौकिक श्रीरंगपट्टणमच्या बाजारांत प्रत्येकानें ऐकलेला होता. हिराशेट तर स्वतः एक मोठे नांवाजलेले व्यापारी होते. ते म्हणाले—"शेटजी! हा एवढा हिराच काय आणखी चार हिरे घेऊन जा. अहो! माल तुमच्याकडे राहला काय किंवा आमच्याकडे राहला काय? कुठें पळून जातो. तुम्ही म्हणतांच आहां म्हणून तीन हजार रुपये जमा करतों. त्याची सुद्धां गरज नहीं. गांवीं गेल्यावर एकदम पुरी रकम पाठविलीत तरी चालेल."

रामचंद्र शेट हिरा शेटकडे तीन हजार रुपये जमा करून हिरा घेऊन गेले. त्यांच्या नांवीं हिराशेटनीं एक हजार रुपये लिहून ठेवले. घरीं गेल्यावर रामचंद्र शेट जे आजारी पडले ते पुन्हां उठलेच नाहींत. मृत्यूपूर्वी त्यांनीं आपला मोठा मुलगा पद्मनाभ याला जवळ बोलावून ती रकम परत करण्या-

श्री. भा. रा. मराडे

Fullscreen 127 38 / 108



बद्दल बजावून सांगितलें. पद्मनाभनें आपल्या वडिलांना कर्ज फेडण्याचें वचन दिलें.

रामचंद्र शेट जिवंत असेपर्यंत व्यापार खूप चाले. पण त्यांचा व्याप अवाढव्य व त्यामुळें खर्च देखील अवाढव्यच होता. म्हणून त्यांनीं म्हटल्याबरोबर दुकान बंदच करावें लागलें. पद्मनाभ तसा कर्तबगार नव्हता. म्हणून त्यानें घरांतल्या सर्व किमती वस्तू विकून वडिलांचें कर्ज फेडण्याचें ठरविलें. त्यानें सर्व वस्तुविकल्या. पण तो हिरा विकत घेणारा श्रीमंत कोणी भेटला नाहीं.

शेवटीं पद्मनाभ हिरा घेऊन श्रीरंगपट्टणला निघाला. तो विकून हिरा शेटचें कर्ज फेडण्याचा त्याचा विचार होता. जर ग्राहक मिळाला नाहींच तर हिराशेटला तो हिरा देऊन मोकळें व्हावें असें त्यानें ठरविलें.

पण त्याच्या दुर्दैवानें तो ज्या दिवशीं श्रीरंगपट्टणमला पोंचला त्याच दिवशीं शत्रूनें श्रीरंगपट्टणमवर स्वारी केली व सर्व शहर लुटलें. पद्मनाभ परतला असता तर बरें झालें असतें. पण त्यानें सारें शहर हुडकून हिराशेटचा हिरा पोंचता करण्याचें ठरविलें. शत्रूनें त्याला धरलें व खूप चोप देऊन त्याच्याकडला हिरा हिसकावून घेतला.

शत्रूनें स्वारी केल्याबरोबर हिराशेटचा मुलगा सर्व दागदागिने व हिरे-माणिक्यें घेऊन श्रीरंगपट्टण सोडून पळून गेला. हिरा शेटच्या घरांत जें कांहीं मिळालें शत्रूनें लुटलें. हिराशेट त्यामुळें हाय खाऊन आजारी पडले व त्यांतच वारले. हिरा शेटचा मुलगा म्हैसूरला व्यापार करूं लागला. पण त्याचा व्यापार चालला नाहीं. तो दारिद्र्यांतच वारला. त्याला एक मुलगा होता. हिराशेटच्या कुळाचें नांव राखणारा तोच एकटा होता. तो हुशार व कर्तबगारा निघाला त्याला आजोबांचें वैभव तर मिळालें नव्हतेंच उलट वडिलांच्या कर्जाचा बोजा मात्र त्याच्या डोक्यावर येऊन पडला. त्यानें आपला विद्याभ्यास पुरा केला. मोठमोठ्या व्यापाऱ्यांकडे नोकरी केली व वडिलांचें कर्ज फेडूं लागला.

तिकडे पद्मनाभनें आपल्या वडिलांना हिराशेटचें कर्ज फेडण्याचें वचन दिलें होतें. पण कर्ज फेडण्याचें तर दूरच हिरा देखील घालवून बसला होता व शत्रूच्या सैनिकांनीं चडविल्यामुळें तो आजारी पडला. त्यानें मृत्युसमयीं आपला मुलगा चंद्रशेखर याला बोलावून हिराशेटच्या कर्जाची गोष्ट सांगितली व म्हणाला—"बाळ, हें माझ्या वडिलांचें कर्ज आहे. मी फेडण्याचें वचन दिलें होतें. पण दैवाचा खेळ कांहीं सांगवत नाहीं. माझा आत्मा तें कर्ज फेडूं न शकल्या मुळें सुखानें परलोकीं जाऊं इच्छित नाहीं."

चंद्रशेखरनें आपल्या वडिलांना वचन दिलें कीं बाबा, हें कर्ज फेडण्याची जबाबदारी माझ्यावर. मी फेडूं शकलों नाहीं तर माझीं मुलें फेडतील. काळजी करूं नका."

बाप वारल्यावर चंद्रशेखरनें खूप मेहनत करून हळूं हळूं तीन चार हजार मोहरा



जमविल्या व त्या घेऊन तो श्रीरंगपट्टणला गेला. तेथें त्याला कळलें कीं, हिरा शेट यांचा नातू गोविंद शेट म्हैसूरला व्यापार करीत आहे. चंद्रशेखर त्याच्याकडे गेला व त्याला त्याच्या आजोबांच्या वेळच्या हिशोबाच्या वह्या काढावयास सांगितल्या. म्हणाला—"तुमच्या आजोबांनीं माझ्या आजोबांना कांहीं मोहरा कर्जाऊ दिल्या होत्या. त्या फेडण्यासाठीं म्हणून मी आलों होतों.

तें ऐकून गोविंद शेट चकित झाला. त्याच दिवशीं त्यानें आपल्या वडिलांचे


Fullscreen

127





40 / 108


सर्व कर्ज फेडून त्यांच्या काळच्या वह्या बांधून ठेवून दिल्या होत्या. आतां आजोबांच्या वेळच्या वह्या काढायला हा सांगतो आहे. समजा त्यांत आपल्याच डोक्यावर कांहीं कर्ज निघालें तर आयुष्यभर कर्ज फेडीतच रहावें लागणार. तो म्हणाला—"माफ करा! वडिलांचें कर्ज फेडून दम घ्यायला देखील मला सवड मिळाली नाहीं, तेवढ्यांत तुम्ही आजोबांच्या काळांतल्या वह्या काढायला सांगत आहां. मी त्यांनीं केलेल्या कर्जाकरितां जबाबदार नाहीं."

तें ऐकून चंद्रशेखर स्मित करून म्हणाला—"तुमच्या आजोबांकडून आम्हांला येणें नाहीं. माझ्या आजोबांकडून तुम्हांला जें येणें आहे ती रक्कम द्यायला मी आलों आहें. तुमच्या आजोबांनीं माझ्या आजोबांवर विश्वास करून एक हजार मोहरा कर्ज म्हणून दिल्या होत्या. तें कर्ज व्याजासकट फेडण्यासाठीं आलों आहें. मेहरबानी करून तेवढी वही काढा!"

गोविंद शेट चकित झाला. त्यानें ती वही हुडकून काढली तेव्हां तींत एक हजार मोहरा रामचंद्र शेटच्या नांवीं लिहिलेल्या होत्या. चक्रवाढ व्याजाप्रमाणें बारा वर्षांत सुमारें चार हजारांची रक्कम झाली. ती देण्यासाठीं चंद्रशेखर आला होता.

गोविंद शेटचें हृदय चंद्रशेखरची दानत पाहून कृतज्ञतेनें उचंबळून आलें व म्हणाला—"ह्या मोहरा तुमचा वांटा म्हणून मी व्यापारांत लावतों. आपण दोघे मिळून व्यापार करूं या."

चंद्रशेखरनें तें कबूल केलें. पुढें दोघांना व्यापारांत खूप यश मिळालें व दोघांनीं आपल्या पितरांचें नांव उज्वल केलें.





# संशयात्मा विनश्यति

सुप्रसिद्ध इंग्रजी लेखक जॉनसन ह्याच्या घरीं एका गृहस्थानें येऊन तक्रार केली कीं, या जगांत मनुष्याचें जिणें अगदीं फुकट आहे. अल्पायु मनुष्याला मुक्तीचा मार्ग शोधण्यास वेळच कोठें आहे?" इतकें सांगून तो पुढें म्हणाला—

"पहा न, मनुष्याचें आयुष्य अधिकांत अधिक म्हणजे शंभर वर्षांचें असतें. अनंत कालासमोर हा अवधी किती लहान आहे! यापैकीं अर्धा अवधी झोंपण्यांत जातो. कांहीं काळ लहानपणांत व आजारांत जातो, आणि जो उरतो त्यांतला बराच वेळ काम धंदा किंवा वृत्ति करण्यांत व खाण्या-पिण्यांत खर्च होतो. आतां उरलेला काळ तरी ईशचिंतनाला मिळतो का? मुलाबाळांची काळजी, भांडणतंटे ह्यांत किती वेळ वायां जातो. ईशचिंतनास आतां किती वेळ उरला, तुम्हींच सांगा!"

डॉ. जॉनसननें एका बाजूला तोंड फिरवून डोळ्याचीं टिपें पुसलीं. त्याला त्या गृहस्थाच्या बोलण्याचा हेतू व कळकळीची जाणीव झाली. परंतु त्याला निराश स्थितींत परत पाठविणें रुचलें नाहीं.

त्या गृहस्थानें विचारलें—"तुम्हांला माझें म्हणणें पटलें नाहीं का?"

जॉनसन म्हणाला—"तुम्हांला तर परलोकाची काळजी दिसते आहे. पण मला इहलोकाचीच काळजी वाटत आहे?"

तो गृहस्थ चकित होऊन डोळे फाड फाडून पाहूं लागला. जॉनसन म्हणाला—

श्री. बा. रा. पाटणकर









Fullscreen 127 42 / 108

"हें पहा, आपण जें अन्न खातों तें उत्पन्न करण्यासाठीं पुरेशी जमीन कोठें आहे?"

तो म्हणाला—"अहो! देवानें दिलेलें एवढें मोठें जग काय कमी आहे? काय थट्टा करतां राव?"

जॉनसन शांतपणें म्हणाला—"मी थट्टा नाहीं करीत. खरेंच विचारतों तुम्हांला. ह्या ब्रह्मांडांत कोट्यावधि नक्षत्रें व ग्रह आहेत. त्यांच्या मानानें सूर्य देखील एकाद्या अणू-सारखा आहे. व आपली पृथ्वीतर परमाणु सारखी आहे. या पृथ्वीचा तीन चतुर्थांश भाग समुद्रानें व्यापला आहे. जो बाकी आहे त्यापैकीं सप्तमांश भाग वाळवंट आहे. उरलेल्या भूभागापैकीं पुष्कळसा भाग पर्वताच्या रांगा, नद्या, सरोवरें व ओसाड जमिनीनें घेरलेला आहे. त्या नंतर मोठमोठीं शहरें, गांवें व मनुष्यवस्तीनें केवढा मोठा भूभाग आक्रमिला आहे? आतां तुम्हीच सांगा, शेती-साठीं कितीसा भूभाग उरला? शेतीच्या जमिनींत तरी सुपीक जमीन किती थोडी आहे? कोट्यावधि लोकांच्या उदर निर्वाहास ही जमीन कशी पुरणार? ह्या काळजीनें मला आयुष्य ओझें वाटूं लागलें आहे.

त्या मनुष्याला जॉनसनची खोंच कळली. आपलेंच बोलणें निरर्थक ठरलेलें पाहून तो निमूटपणें निघून गेला.





# कच देवयानी

शुक्राचार्यांचा जन्म भृगु महर्षींच्या कुळांत झाला. त्यांची तपश्चर्या व विद्वत्ता अद्वितीय होती. राक्षस त्यांना आपला गुरु मानीत. दानवराजा वृषपर्व यानें त्यांना राजगुरु मानून त्यांना त्यांची लाडकी व एकुलती एक मुलगी देवयानी हिच्यासह राक्षसांच्या राजधानींत रहावयास बोलाविलें.

देव व दानव यांचें वैर प्रसिद्धच आहे. शुक्राचार्यांना संजीवनी विद्या अवगत असल्यामुळें युद्धांत राक्षस मारले गेले कीं शुक्राचार्य त्यांना जिवंत करीत. पण देवांना ती विद्या अवगत नव्हती. म्हणून देवांची संख्या कमी होऊं लागली.

देवांचा गुरु बृहस्पति यानें विचार करून आपला मुलगा कच याला शुक्राचार्यांकडे विद्याभ्यासासाठीं पाठविलें व त्यांची सर्व प्रकारें सेवा-शुश्रुषा करून चातुर्यानें संजीवनी विद्या शिकून येण्यास सांगितलें. त्यांनीं त्याला असेंहि सांगितलें कीं, शुक्राचार्यांना एकच एक मुलगी आहे. तिची मर्जी संपादन केलीस तर तुला आपल्या कामीं खात्रीनें यश मिळेल.

कच शुक्राचार्यांकडे आला व आपला परिचय देऊन आपला शिष्य करून घेण्यास विनंति केली. देवांचा गुरु बृहस्पति यानें आपल्या मुलाला आपल्या शत्रूच्या गुरूंकडे विद्याभ्यासासाठीं पाठवावें या गोष्टीचा शुक्राचार्यांना मनस्वी आनंद झाला.

कच आपल्या गुरूची त्या काळच्या पद्धतीप्रमाणें सेवा करूं लागला. तो गुरूच्या गाई घेऊन नित्य रानांत जाई व कंद मुळें व फळें, समिधा वगैरे यज्ञ सामुग्री घेऊन येई.





Fullscreen 127 44 / 108



एके दिवशीं समिधा एकत्र करून विश्रांति घेण्यासाठीं तो एका वडाच्या सांवलींत विश्रांती साठीं बसला असतां कांहीं राक्षस आले व तूं कोण येथें कसा आलास वगैरे चवकशी करूं लागले. कचनें खरें खरें तें सांगून टाकलें.

तें ऐकून राक्षसांना राग आला. कपट करून आपल्या गुरूंकडून संजीवनी विद्या चोरून नेण्यासाठीं हा येथें आलेला आहे. तेव्हां त्यांनीं त्याचा वध करून एका लांडग्याला त्याचें मांस खायला घातलें आणि निघून गेले.

संध्याकाळ झाली. गाई घरीं परत आल्या. पण कच त्यांच्या बरोबर न आलेला पाहून देवयानीला काळजी वाटूं लागली. तिनें कचाला मनानें वरलें होतें. म्हणून ती आपल्या वडिलांकडे गेली व कच रानांतून परत न आल्याचें सांगून त्याला शोधून घेऊन यायला सांगितलें.

शुक्राचार्यांना अंतर्ज्ञानानें घडलेलें सर्व वृत्त कळलें. त्यांनीं संजीवनी विद्येच्या प्रयोग करून कच याला जिवंत केलें. कच घरीं परत आला.

पुन्हां एकदां देवयानीसाठीं रानांतून फळें आणण्यासाठीं कच गेला असतां राक्षसांनीं त्याला पाहिलें. त्यांनीं त्याला ओळखलें व त्याला ठार केलें. त्यांनीं त्याला कुटून त्याचें चूर्ण करून तें समुद्रांत फेंकून दिलें.

देवयानीनें वडिलांना सांगून त्याला पुन्हां जिवंत केलें. पण राक्षसांनीं कच याचा पिच्छा पुरविला. देवयानीच्या सांगण्यावरून शुक्राचार्य आपल्या शिष्याला जिवंत करीत आहेत हें कळल्यावर त्यांनीं त्याला तोड म्हणून एक नवीन कुप्ति काढली. तिसऱ्या खेपेस कच रानांत गेला असतां राक्षसांनीं त्याला ठार करून त्याला जाळून टाकलें व त्याची राख दारूंत घालून शुक्राचार्यांना प्यायला दिली. कच बराच वेळ घरीं न आल्यामुळें देवयानीनें पुन्हां हट्ट धरला. शुक्राचार्यांना अंतर्ज्ञानानें सर्व कांहीं कळलें व त्यांनीं तें आपल्या मुलीला देखील सांगितलें. ते म्हणाले—"मी त्याला जिवंत करूं शकेन. पण तो जिवंत झाला तर मला मरावें लागेल. मग सांग तुला तो हवा कीं मी?"

देवयानी म्हणाली—"मला दोघे हवे आहांत. तुम्हीच काय तो विचार करून उपाय करा."

शुक्राचार्यांनीं विचार करून कच याला जिवंत केला व त्याला पोटांतच असतांना संजीवनी विद्या शिकवून, बाहेर आल्यावर आपल्या गुरूस जिवंत करावयास सांगितलें. त्या प्रमाणें कच गुरू शुक्राचार्य यांच्या पोटांतून बाहेर निघून आला व त्यानें संजीवनी विद्येचा प्रयोग करून आपल्या गुरूस जिवंत केलें.

शुक्राचार्यांना मद्यपान केल्याबद्दल इतका पश्चात्ताप झाला कीं त्यांनीं त्या दिवसापासून मद्यपान न करण्याची प्रतिज्ञा केली.



Fullscreen 127 46 / 108












कच ज्या उद्देश्यानें शुक्राचार्यांकडे आला होता तो हेतू पूर्ण झाला. तो कांहीं दिवस गुरुगृहीं राहिला व गुरूची कृपा संपादन करून त्यांचा निरोप घेण्यासाठीं गेला. शुक्राचार्यांनीं त्याला प्रेमानें निरोप दिला.

पण कच देवयानीचा निरोप घेण्यासाठीं जेव्हां गेला तेव्हां तिनें आपलें प्रेमव्यक्त करून लग्न करण्यास विनंति केली.

पण कच म्हणाला—"देवयानी! तूं माझ्या गुरूंची कन्या आहेस. तुला मी आजपर्यंत आपली बहीण म्हणून मानीत आलों. आतां पत्नी म्हणून तुला कशी....!"

देवयानीला त्यावर राग आला. रागाच्या भरांत ती म्हणाली—"तूं माझ्या वडिलांच्या शत्रूचा मुलगा असून तुला मी तीन तीनदां जिवंत करण्यासाठीं वडिलांजवळ हट्ट केला व तुला जिवंत करविलें. तूं त्या उपकाराची फेड करण्याचें सोडून माझ्या प्रेमाचा धिःकार करून जात आहेस. तर तुला मी शाप देतें कीं जी विद्या तूं कपटानें मिळविली आहेस तिचा तुला उपयोग होणार नाहीं."

त्यावर कच याला देखील अर्थातच राग आला. तो म्हणाला—"तर मग तुझें प्रेम हें खरें प्रेम नव्हतें. उपकार करून तूं माझें प्रेम मिळविण्याचा यत्न केलास, व तें मिळालें नाहीं म्हणून माझा अपकार करण्यास तयार झालीस. अशा प्रेमाला मी राक्षसी प्रेम मानतों. तर ऐक, या राक्षसी प्रेमाचा स्वीकार कोणी ब्राह्मण करणार नाहीं, असा मी तुला शाप देतों."

कच देवयानीला शाप देऊन देवलोकांत गेला. बृहस्पतीच्या सांगण्यावरून त्यानें संजीवनी विद्या दुसऱ्यांना शिकविली. देवयानीच्या शापानें त्याला त्या विद्येचा उपयोग होत नसला तरी तो ज्याला

Fullscreen 127 48 / 108



शिकवील त्याला त्या विद्येचा उपयोग करतां आला. अशा तऱ्हेनें देवांचें संकट टळलें.

*　　　*　　　*

राक्षसांचा राजा वृषपर्व याला शर्मिष्ठा नांवाची एक रूपवती कन्या होती. ती आपल्या सखींबरोबर वन विहारास गेली असतां देवयानी देखील तिच्याबरोबर गेली होती. एका पुष्करणींत स्नान करण्याचा विचार करून सर्वांनीं आपापलीं वस्त्रें काठावर ठेवलीं व पाण्यांत उतरल्या. जलक्रीडा चालू असतां एक वादळ आलें व त्यांत त्यांचीं वस्त्रें एकत्र मिसळली गेलीं. घाईंत जें वस्त्र मिळालें तें त्या नेसल्या. शर्मिष्ठा चुकून देवयानीचें लुगडें नेसली. तिला राग आला. ती म्हणाली–"एकूण तूं राक्षस-कन्याच ! मी तुझ्या वडिलांच्या गुरूची मुलगी व ब्राह्मण. तुझें लुगडें मी नेसूं ?"

शर्मिष्ठाला राग आला. ती म्हणाली–"माझ्यावडिलांनीं दिलेल्या अन्नावर पोसलेला तुझा देह माजला आहे. यःश्चित् एका भिक्षु-काची मुलगी तूं, एवढा तोरा कोणाजवळ दाखवितेस ? पाहिजे तर नेस नाहीं तर पड या विहिरींत" असें म्हणत तिनें देवयानीला विहिरींत ढकललें व घरीं निघून गेली.

कांहीं वेळानें चंद्रवंशी राजा ययाती शिकारीसाठीं त्याच बाजूला आला. विहिरीं-तून स्त्रीचा आवाज ऐकून तो जवळ गेला व देवयानीला तिचा हात धरून बाहेर काढलें व राजधानीस निघून गेला.

घार्णिक नांवाच्या एका दासी करवीं देवयानीनें आपल्या वडिलांना सर्व कळविलें आणि असेंहि सांगितलें कीं असा अपमान झाल्यावर मी वृषपर्व राजाच्या राजधानींत पाऊल टाकायला देखील तयार नाहीं.

शुक्राचार्य मुलीचा निरोप ऐकून धांवत आले व त्यांनीं मुलीची समजूत घालण्याचा पुष्कळ यत्न करून पाहिला. म्हणाले–"बाळ, असा हट्ट करूं नकोस ! तूं कोणाची मुलगी आहेस हें सर्व जगाला माहीत आहे. एका अजाण मुलीनें कांहीं म्हटलें म्हणून तूं असें कांहीं करणें बरोबर नाहीं."

पण देवयानीनें हट्ट सोडला नाहीं. ती म्हणाली–"तुम्हांला माझ्या मानाची पर्वा नसेल तर मलाच माझ्या मानापमानाची पर्वा केली पाहिजे. मी गांवांत येणार नाहीं. येथें रानटी श्वापदांनीं खाऊन टाकलें तर या जिवाला सुटका तरी मिळेल.

वृषपर्वाला वर्तमान कळलें तेव्हां तो देखील धांवत, शर्मिष्ठेला बरोबर घेऊन, रानांत आला.

शुक्राचार्य म्हणाले–"राजन् ! आज पावेतों मी जिवें भावें तुझ्या पदरीं चाकरी केली. उपकाराची फेड अशा प्रकारें, अप-कारानें होईल याची मला कल्पना नव्हती."

राजा वृषपर्व म्हणाला–"गुरुवर ! खरा भिकारी मी आहें. आपण मला व माझ्या राक्षस अनुयायांना प्राणदान देऊन इतके उपकार आमच्या राक्षस वंशावर केले आहेत




Fullscreen





50 / 108


कीं त्यांची फेड सर्वस्व देऊन देखील होणें शक्य नाहीं."

शुक्राचार्य म्हणाले–"माझ्या मुलीचा अपमान झाला आहे. तिची इच्छाच माझी इच्छा. तिलाच काय तें विचार."

राजा देवयानीला म्हणाला–"देवयानी! तूं इतका राग केलास तर आमचें कसें चालणार? मी भिकारी होऊन तुझ्यासमोर उभा आहें. क्षमा कर! तूं सांगशील ती शिक्षा मी शर्मिष्ठेला द्यायला तयार आहें." देवयानी म्हणाली–"माझें लग्न होईल तेव्हां शर्मिष्ठेनें माझ्याबरोबर माझी दासी म्हणून अविवाहित राहून आजन्म माझी सेवा करावी."

शर्मिष्ठेनें राक्षसांच्या हिताचा विचार करून देवयानीची दासी होण्याचें कबूल केलें. देवयानीचें तेवढ्यानें समाधान झालें नाहीं. तिनें तिला टोंचून विचारलें—"भिकाऱ्याच्या पोरीची दासी व्हायला राजकन्या तयार आहेत का?"

शर्मिष्ठेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

देवयानी राजधानींत परत आली आणि शर्मिष्ठा तिची दासी म्हणून सेवा करूं लागली. देवयानीनें राजाला सांगून एक हजार दासी देखील आपल्या सेवेला ठेवून घेतल्या. त्यांत तिचा हेतु शर्मिष्ठेची मान खालीं व्हावी हा होता.

एकदां देवयानी आपल्या सर्व दासींबरोबर त्याच जागीं पुन्हां वन विहारास गेली असतां राजा ययाति देखील शिकारीसाठीं त्याच वेळीं तेथें आला. देवयानी बरोबर स्वर्गीय लावण्याची मूर्ति शर्मिष्ठा पण होती. तिला पाहून राजानें विचारलें–"हें उकिरड्यावरचें रत्न कोण?"

शर्मिष्ठेनें कसा तिचा अपमान केला होता व त्याबद्दल तिला आपली दासी म्हणून कसें आतां राबावें लागत आहे हें देवयानीनें ऐटींत वर्णन करून सांगितलें व म्हणाली–"राजन्! त्या दिवशीं आपण माझा हात धरून मला विहिरींतून बाहेर काढलेंत. तेव्हांच माझें आपण पाणिग्रहण केलें आहे. आतां मी दुसऱ्या कोणाशीं विवाह करणें शक्य नाहीं. तरी आपण माझ्याशीं विवाह करून मला सुखी करावें." ययाति म्हणाला–"मी क्षत्रिय, नहुष राजाचा मुलगा आणि तूं






Fullscreen




52 / 108


ब्राह्मण शुक्राचार्यांची मुलगी, आपला विवाह कसा होणार ?"

"माझ्या वडिलांनीं इतकी मोठी तपश्चर्या केली आहे कीं, प्रत्यक्ष धर्माला देखील आज्ञा करण्याचा अधिकार त्यांना प्राप्त आहे. आपला विवाह धर्मविरुद्ध नसून धर्म संगत आहे असा आदेश त्यांच्याकडून देवविते." असें सांगून तिनें एका दासीला शुक्राचार्यां-कडे पाठविलें.

शुक्राचार्य आले देवयानीचें म्हणणें ऐकून ते ययातीला म्हणाले—"तूं माझ्या मुलीशीं लग्न केल्यास माझी मान्यता आहे. बरोबर या तिच्या दासीपण येतील. शर्मिष्ठेच्या अन्नवस्त्राची जबाबदारी तुझ्यावर आहे. तिच्याशीं दुसरा कांहीं संबंध ठेवूं नकोस ही माझी आज्ञा आहे."

देवयानीचें ययाती राजाशीं लग्न झालें. देवयानी, शर्मिष्ठा व दोन हजार दासींबरोबर राजा राजधानीस परत आला. त्यानें देवयानीसाठीं एक महाल बनविला आणि तिच्या आज्ञेनें शर्मिष्ठेसाठीं दूर अशोक वाटिकेंत एक झोपडी बनविली.



कालक्रमाप्रमाणें देवयानीला यदु व त्वरस नांवाचीं दोन मुलें झालीं.

शर्मिष्ठा एकटीच अशोकवनांत आयुष्य कंठीत होती. एकदां राजा ययाती अशोक-वनांत विहार करावयास आला असतां त्याची दृष्टि शर्मिष्ठेवर पडली. त्याला तिची दया आली व या भेटीचें प्रेमांत रूपांतर झालें. दोघांनीं गांधर्व विवाह केला. कालक्रमानें शर्मिष्ठेला अनुक्रमें द्रुह्यु, अनु व पुरु अशीं तीन मुलें झालीं. हळू हळू ही गोष्ट देवयानीच्या कानावर पोंचली. ती अशोक वनांत आली व शर्मिष्ठेला विचारलें कीं तूं अविवाहित कन्या राहण्याचें कबूल करून आली होतीस आणि तुला ही तीन तीन मुलें कशीं ! त्यावर शर्मिष्ठा म्हणाली कीं एका ऋषींच्या कृपेनें तिला या तीन मुलांचा दैविक लाभ झाला आहे. पण तिघां मुलांचें रंगरूप ययाती राजासारखें होतें. त्यावरून पतीनें आपल्याशीं प्रतारणा केली या गोष्टीचा देवयानीला राग आला व ती माहेरीं वडिलांकडे निघून गेली. घाबरून ययाती देखील तिच्या पाठोपाठ गेला.




Fullscreen
127




54 / 108



सर्व वृत्त देवयानीच्या तोंडी ऐकून शुक्राचार्यांनीं संतापाच्या भरांत ययाती राजाला शाप दिला–"तुला वार्धक्य येवो." ययातीनें शुक्राचार्यांचे पाय धरले व म्हणाला–"झाली ती चूक पुन्हां होणार नाहीं. देवयानीला सुखी करण्याचाच मी यापुढें प्रयत्न करीन. या वार्धक्यांत तें कसें संभव होणार?"

त्यावर शुक्राचार्य म्हणाले–"मी दिला तो शाप परत घेणें मला शक्य नाहीं. तरी परंतु तूं इतकें म्हटल्यावर मी इतकेंच सांगू शकतों कीं, जर तुझ्या कोणत्याहि मुलानें तुझें वार्धक्य घेऊन तुला आपलें तारुण्य दिलें तर तें शक्य होईल."

त्यानंतर ययातीनें आपल्या मुलांना आपलें तारुण्य देऊन स्वतःचें वार्धक्य घेण्यास सांगितलें. प्रथम त्यानें देवयानीच्या मुलांना विचारलें. पण कोणी कबूल झाला नाहीं तेव्हां त्यानें शर्मिष्ठेच्या मुलांना विचारलें. सर्वांत धाकटा पूरु त्या गोष्टीस तयार झाला.

राजा ययातीनें त्याला आपलें वार्धक्य दिलें व त्याचें तारुण्य घेऊन त्याला आपला वारस केलें.

एक हजार वर्षें ययाती राजानें आनंदानें भोग विलासांत घालविलीं व त्यानंतर आपला मुलगा पूरु याला त्याचें तारुण्य परत देऊन स्वतःचें वार्धक्य परत घेतलें.

देवयानीनें आपल्या मुलाला वारस करून घेण्यासाठीं पुष्कळ विनवण्या केल्या. पण राजानें तिचें ऐकलें नाहीं व वचन दिल्या प्रमाणें पूरूलाच राज्य दिलें.





असें सांगतात कीं, आपले पूर्वज उत्तर ध्रुवावर रहात असत. तेथें उत्तरायणांत सहा महिने दिवस आणि दक्षिणायनांत सहा महिने रात्र असते. म्हणून दीर्घरात्रीच्या अंधारांत दिव्याशिवाय माणसाचें काम चालत नाहीं. ह्या अंधकारमय रात्रीचा प्रारंभ म्हणजे दिवाळीचा उत्सव होय! म्हणून ह्या शुभदिनी सर्वत्र पणत्या लावून प्रकाश करण्याची प्रथा पूर्वापार चालू आहे.



मेलेलीं माणसें प्रथम नरकांतून प्रवास करून मग पितृलोकीं पोहोंचतात. अशा वेळीं मेलेल्यांना रस्ता दाखविण्यासाठीं आणि पितृलोकाचा अधिपति यमराज यांची आराधना करण्यासाठीं दिवाळीचा

Fullscreen 127 56 / 108



महाबलीनें आपल्या पराक्रमानें साऱ्या स्वर्गावर आपला अधिकार स्थापित केला होता. अशा प्रसंगीं महाविष्णूनें वामन रूप धारण करून समस्त भूमि आणि स्वर्ग आपल्या पायाखालीं दाबून महाबलीला पाताळांत पाठवून दिलें. असें सांगतात कीं, महाबली बलि-प्रतिपदेच्या दिवशीं भूमीवर येतो. म्हणून त्या शुभप्रसंगाचें स्मरण म्हणून अदल्या दिवशीं दिवाळी साजरी करण्याचा प्रघात पडला आहे.



रावणानें सीतेचें हरण केलें व तिला घेऊन लंकेस गेला. रामानें वानर सेनेच्या मदतीनें रावणाचा वध केला.



अत्याचारी आणि क्रूर नरकासुर याच्याशीं युद्ध करण्यासाठीं श्रीकृष्ण सत्यभामेसह रथांत बसून गेला. नरकासुराच्या बाणानें श्रीकृष्ण मूर्छित होऊन पडला. परंतु सत्यभामेनें नरकासुराचा वध केला. अशा प्रकारे भूमीला नरकासुराच्या संकटांतून मुक्त केलें. नरकासुराच्या मृत्यूचा दिवस म्हणजे नरकचतुर्दशी आणि दिवाळीचा दुसरा दिवस म्हणजे दिवाळीची अमावास्या.



ईसवी सनापूर्वी ५८ वर्षें विक्रम संवत् सुरू झाला. गुजराती आणि मारवाडी लोक हा विक्रम संवत् मानतात. विक्रम संवत् दिवाळीपासून सुरू होतो. त्याच दिवशीं विक्रमादित्यानें शकांचा नाश



दिवाळी शरद ऋतूमध्यें येते. ह्या ऋतूमध्यें किड्यांचा प्रादुर्भाव होतो. ह्या किड्यांपासून मनुष्यांना आणि पिकांना अपाय होतो. दिवाळीच्या दिवशीं सर्वत्र पेटविण्यांत येणाऱ्या फुलबाजांच्या आणि फटाक्यांच्या गंधकयुक्त धुरामुळें ह्या किड्यांचा नाश होतो. गंधक हें किटाणू नाशक आहे. म्हणूनच दिवाळीच्या दिवशीं ह्या गंधकयुक्त फुलबाजा पेटवून फटाके उडवण्याची प्रथा पडली आहे.



दिवाळीचा दिवस हा लहान-थोरांस आनंदाचा दिवस. सर्वजण सुगंधित तेलें व उटणें लावून आंघोळ



# ❋ सायमन ❋

[ २ ]

सायमन रात्रीं त्याच महालांत झोंपला. त्याला छान झोंप लागली. सकाळीं त्याची झोंप मोडली तेव्हां त्याला गाडीचा आवाज ऐकूं आला. राजा व राजकुमारी दोघें सायमन कोणत्या स्थितींत आहे हें पाहण्यासाठीं आलीं होतीं. त्यांनीं सायमनला हंसतमुख बाहेर येतांना पाहिलें तेव्हां त्यांना फारच आश्चर्य वाटलें. त्यांना पाहून सायमन म्हणाला—

"त्या भुतानें आतां राजवाडा सोडलेला आहे. तें परत कधीं येणार नाहीं. आतां कसलीहि भीति उरलेली नाहीं. सायमननें रात्रीं भुताची भेट झाल्यानंतर घडलेलें सर्व वृत्त वर्णन करून सांगितलें.

राजानें आंत जाऊन राजवाडा पाहिला. त्याच्या मनाचें समाधान झालें. आजपर्यंत कोणी करूं शकला नाहीं तें सायमननें करून दाखविलें होतें. राजकुमारीला तर सायमन एक देवपुरुषच भासला.

बाराव्या खोलींत जीं प्रेतें पडलेलीं होतीं त्यांना मूठमाती देऊन राजानें राजवाडा स्वच्छ करविला. नंतर नवीन रंग देऊन त्यानें तो सजविला आणि समारंभानें त्या वाड्यांत प्रवेश केला. गृहप्रवेशाच्या दिवशीं सायमन व राजकन्येचें लग्न ठरलें. राजानें त्या दिवशीं सर्व दरबारी व मानकरी लोकांना एक मोठी मेजवानी दिली. लग्न समारंभ पण उरकून टाकावा अशी राजाची फार इच्छा

श्री. का. ना. सोमण



Fullscreen 127 60 / 108



होती. पण सायमन म्हणाला—"घरदार सोडून कित्येक दिवस झाले. आई-वडिलांना भेटून आल्याशिवाय माझ्या मनाचें समाधान होणार नाहीं. ते माझी काळजी करीत असतील. म्हणून मी त्यांना भेटून येतों. मग लग्न समारंभ थाटानें करतां येईल."

राजा व राजकुमारी दोघांना सायमनचें म्हणणें रास्त वाटलें. त्यांनीं सायमनच्या प्रवासाची तयारी केली. त्याच्याबरोबर दहा बारा सशस्त्र सैनिक पाठविले व आनंदानें त्याला निरोप दिला.

राजपुरुषासारखा सायमन आपल्या गांवीं निघाला. दहा दिवसांचा प्रवास निर्विघ्नपणें पार पडला. दहाव्या दिवशीं त्यांना एका रानांतून जावें लागलें. रात्रीची वेळ होती व पाऊस देखील पडूं लागला होता. सर्व दमून गेले होते. दूर मिण मिण जळत असलेला दिवा दिसला. त्याच्या अनुरोधानें सर्व तिकडे गेले.

ती एक धर्मशाळा होती. सायमननें ती रात्र त्या धर्मशाळेंत काढावयाचें ठरविलें. त्यांनीं धर्मशाळेच्या व्यवस्थापकाला जागा आहे का विचारलें. त्यानें होकार दिल्यावर सर्व उतरले व धर्मशाळेंत जें कांहीं खायला मिळालें, खाऊन झोंपले. सायमन एकटा एका निराळ्या खोलींत झोंपला होता.

ती धर्मशाळा कांहीं वाटमाऱ्यांची नेहमीं भेटण्याची जागा होती. धर्मशाळेचा व्यवस्थापक त्यांना सामील होता. त्याला ठरलेला वांटा मिळत असे. म्हणून तो स्वतः चोरांच्या सरदाराकडे गेला आणि चांगलें सावज फंसलें असल्याचें सांगून आला.

त्या रात्रीं लुटेऱ्यांनीं धर्मशाळेंत शिरून सायमनच्या बरोबरच्या लोकांना ठार करून त्यांच्याजवळ जें कांहीं सोनें, चांदी व पैसे





सांपडले लुटून नेलें. सायमन बंदुकींचा आवाज ऐकून उठून बाहेर आला. पण चोरांनीं त्याच्यावर गोळी सोडली. सायमनला गोळी लागली नाहीं. पण त्यानें गोळी लागल्याचें सोंग केलें व निश्चेष्ट पडून राहिला. कारण त्यानें विचार केला कीं दहा बारा जणांशीं एकट्यानें युद्ध करणें अशक्य आहे. चोरांनी त्याला बेशुद्ध पडलेला पाहून त्याच्या अंगावरची अंगठी व इतर ज्या ज्या मूल्यवान वस्तु दिसल्या सर्व उचलून घेतल्या आणि निघून गेले.



सायमन चोरांना चाहूल दिल्याशिवाय त्यांच्या पाठोपाठ गेला व ते कोठें जातात काय करतात हें सर्व पाहूं लागला. त्याला चोरांच्या गुहेंत जाण्या-येण्याची चोरवाट कळली. नंतर तो आपल्या गांवीं निघाला. तेथून त्याचें गांव अगदीं जवळ होतें. त्यावेळीं त्याच्या अंगावर एका फाटक्या सदऱ्याशिवाय दुसरें कांहीं एक नव्हतें. पायांत वहाणा किंवा जोडा देखील नव्हता. म्हणून त्यानें संध्याकाळपर्यंत झाडीझुडपांत लपून बसून रहायचें ठरविलें.

पण गांवांतले कांहीं लोक रानांत लाकडें फोडायला म्हणून आले होते. त्यांनीं सायमनला पाहून ओळखलें. त्यांनीं त्याला विचारलें—"अरे, तूं तर मोठा सेनापति झाला आहेस असें ऐकलें होतें. मग सेनापति साहेब अनवाणी व फाटके कपडे घालून रानावनांत कां फिरत आहेत?"

सायमन म्हणाला—"तुमची थट्टा मला कळते. पण ही थट्टेची वेळ नाहीं. तुम्हांला मी वाटतो व दिसतो तसा गरीब नाहीं. दैवदुर्विलासानें गेल्या रात्रींत माझी ही स्थिति झाली." त्यानें घडलेलें वृत्त सांगून जिवंत परी परत येऊं शकल्या बद्दल देवाचे आभार मानले.






Fullscreen
127




62 / 108



लाकूडतोड्यांनीं त्याला आपल्या गाडींत बसायला सांगितलें व गांवाकडे निघाले. सायमन घरीं पोंचला तेव्हां त्याचे वडील घरीं नव्हते. त्याच्या आईच्या डोळ्यांत आनंदाश्रु आले. म्हणाली–"बाळ, तुला पाहून किती दिवस झाले रे!" आणि त्याला पोटाशीं धरून म्हातारी बराच वेळ रडली. थोडा आवेग ओसरल्यावर तिला नवऱ्याच्या रागाची आठवण झाली. म्हणून तिनें मुलाला कणगी आड लपून बसून रहायला सांगितलें. म्हणाली–"तूं आलेला कळल्याबरोबर ते तुझा जीव घेतल्या शिवाय राहणार नाहींत."

सायमनचा बाप घरीं आला तेव्हां त्याला घरांत थोडा फरक दिसला. सायमनच्या आईचे ओले डोळे पाहून त्यानें तिला खडसून विचारलें–"काय झालें? कोण आलें होतें? तूं कां रडत होतीस?"

सायमनची आई म्हणाली–"तुम्ही रागावणार नसाल तर मी सर्व कांहीं खरें खरें सांगतें. मला कांहीं झालेलें नाहीं. सायमन घरीं परत आला आहे. त्याचा मला एका बाजूनें आनंद वाटत आहे. दुसऱ्या बाजूनें तुमचा राग पाहून भीति वाटत आहे. तुम्ही थोडा राग कमी केलात




तर नाहीं का चालणार? मुलाची जात, चूक होणारच! म्हणून का त्याचा जीव घ्यायला तयार व्हायचें?"

"त्या मूर्खासाठीं का तूं इतकी रडते आहेस? त्यानें काय तुझें किंवा माझें नांव राखलें आहे? तो दिसला तर त्याला जिवंत सोडणार नाहीं. येऊं दे तर समोर!" सायमनचा बाप म्हणाला.

"तर मग माझ्या प्रेतावरूनच तुम्हांला त्याला ठार करण्यासाठीं जावें लागेल!" सायमनची आई म्हणाली. बायकोच्या या बोलण्यानें त्याचें मन विरघळलें. म्हणाला–"आहे कोठें तो? त्या गुलामाला कोठें लपवून ठेवला आहेस?"

"तुम्ही शपथ घेईपर्यंत मी नाहीं सांगणार. त्याच्या केसालाहि धक्का लागलेला मला खपणार नाहीं." म्हातारी म्हणाली.

नवऱ्यानें वचन दिल्यावर तिनें सायमनला बोलावून आणलें व पतीच्यासमोर त्याला आणून म्हणाली–"हा तुमचा मुलगा घ्या!" सायमनच्या बापानें मुलाला माफ केलें.

आपण केलेली साहसाचीं कामें वर्णन करून सांगण्याची इच्छा सायमनला झाली.



Fullscreen 127 64 / 108



पण आपल्या बोलण्यावर त्यांचा विश्वास बसणार नाहीं असा विचार करून तो चुप बसला. आपल्याबरोबर राजाचे शिपाई आले असते व आपण आपल्या पोशाखांत आलों असतों तर कदाचित बाबांना आपलें म्हणणें खरें वाटलें असतें. राजकुमारीशीं आपलें लग्न ठरलें आहे ही गोष्ट सांगण्याची सुद्धां त्याची छाती झाली नाहीं.

सायमनला त्याच्या वडिलांनीं मेंढरें व बकऱ्या चरायला घेऊन जात जा म्हणून सांगितलें. सायमनला राजकुमारीची फार काळजी वाटत असे. तिला आपल्याकडून कांहीं बातमी मिळाली नाहीं तर ती जिवाचें बरें वाईट करून घेईल. पण पुन्हां दुसरा विचार आला. आपण परत गेलों नाहीं म्हणून राजकुमारी स्वस्थ बसणार नाहीं. ती आपला शोध काढीत आल्या शिवाय राहणार नाहीं. या विचारानें त्याच्या मनाचें थोडें समाधान होई. तो आपला पावा वाजवीत झाडाखालीं बसून राही.

तिकडे राजकुमारीनें बरेच दिवस वाट पाहिली. पण सायमन परत न आलेला पाहून तिला काळजी वाटूं लागली. ती वडिलांची परवानगी घेऊन कांहीं नोकरा-चाकरांसह सायमनच्या शोधार्थ त्याच्या गांवीं निघाली. ती देखील त्याच वाटेनें जात होती. दहा बारा दिवसांनीं तिला देखील त्याच धर्मशाळेंत उतरावें लागलें.

कांहीं वेळानें धर्मशाळेचा व्यवस्थापक आपल्या साथी लुटेऱ्यांना ही आनंदाची बातमी देण्यासाठीं निघून गेला. परंतु त्याच्या बायकोला नवऱ्याचें हें कृत्य आवडलें नाहीं. तिनें हळून जाऊन राजकुमारीला सर्व सांगून टाकलें व सावध केलें. ती म्हणाली—"कांहीं दिवसांपूर्वी एक राजकुमार दहा बारा सैनिकांबरोबर या धर्मशाळेंत उतरला होता. माझ्या नवऱ्यानें चोरांना बातमी दिली व चोरांनीं येऊन त्यांना खूप लुटलें व सर्वांना ठार केलें. तो राजकुमार मात्र कसा निसटला मला कळलें नाहीं."

राजकुमारीचें चित्त तें ऐकून शांत झालें. तो राजकुमार सायमनच असेल तर वांचला म्हणावयाचा. राजकुमारीनें आपल्या सैनि-कांना झोपेचें सोंग करून पडून रहावयास सांगितलें. तुम्ही असावध राहलात तर आज आपल्यापैकीं एक जण देखील जिवंत पर जाणें शक्य दिसत नाहीं हें देखील बजावून सांगितलें."

सैनिकांनीं राजकन्येच्या आज्ञेप्रमाणें झोपण्याचें सोंग केलें व नुसते पडून राहिले. मध्यरात्रीच्या सुमारास धर्मशाळेच्या व्यवस्था-पकानें खूण केल्याबरोबर चोर आंत शिरले. परंतु सैनिक तयार होतेच. त्यांनीं आपापल्या तलवारी उपसल्या व सर्व चोरांना ठार केलें. धर्मशाळेच्या व्यवस्थापकाला त्यांनीं कैद करून बरोबर नेलें. व्यवस्थापकाची बायकोसुद्धां राजकन्येबरोबर निघाली. त्याच दिवशीं ते सायमनच्या गांवाच्या वेशीवर जाऊन पोंचले.

सायमन त्यावेळीं आपल्या बकऱ्या व मेंढरें चरायला घेऊन गेला होता. त्याच्या




Fullscreen
127




66 / 108



वांसुरीचा आवाज राजकुमारीनें दुरूनच ओळखला व ती त्याच्या अनुरोधानें चालू लागली. त्यानें दुरून राजकुमारीला येत असलेली पाहिली व तिच्या स्वागतासाठीं म्हणून बकऱ्यांना घेऊन आला. त्यांच्या शिंगांना त्यानें गजरे घातले होते. राज-कुमारी जवळ आल्याबरोबर त्यानें बांसरीचा विशेष प्रकारचा आवाज काढला. त्याबरोबर बकऱ्यांनीं दोन पायांवर उभें राहून राज-कन्येला सलामी दिली. तें दृश्य पाहून राजकुमारीला व तिच्याबरोबर आलेल्या सैनिकांना आश्चर्य वाटलें. त्यांनीं त्या कुरणांतच तंबू टाकायचें ठरविलें.

नंतर सायमन राजकन्येचा निरोप घेऊन आपल्या बकऱ्या-मेंढरांसह गांवांत परत आला, पण तो घरीं कांहींच बोलला नाहीं.

कांहीं वेळानें राजकुमारी एका दोघां शिपायांबरोबर सायमनच्या बापाकडे आली व त्याच्या खाणावळींत उतरायला खोली आहे का विचारलें. सायमनच्या बापानें मोठें कूळ लाभलें आहे असा विचार करून सर्वांत उत्तम खोली दाखविली व म्हणाला—"आमची ही गरिबाची खाणावळ आहे. थोरांमोठ्यांसाठीं नाहीं. पण राजकुमारीनें



त्याच खाणावळींत उतरायचें ठरविल्यामुळें त्याला आनंदच झाला. नंतर राजकुमारीनें आपल्या तैनातीसाठीं म्हणून बकऱ्या चरायला घेऊन जाणाऱ्या मुलाला पाठवून द्यायला सांगितलें. ती म्हणाली—"त्यानें माझ्या बाबांकडे बरेच दिवस नोकरी केली होती. त्याचें काम आम्हां सर्वांना आवडलें."

"तो! तो तर एक मूर्ख पोर आहे. त्याला आपल्या सेवेला पाठविलें तर माझ्या खाणावळीचें नांव जाईल. मी स्वतः येऊन सर्व विचारपूस करून जाईन." सायमनचा बाप म्हणाला.

 Fullscreen  127    68 / 108

"पुष्कळ दिवसांनीं तो समोर दिसला. म्हणून त्यालाच पाठवून द्या." राजकुमारी म्हणाली.

नाइलाजानें सायमनच्या बापानें सायमनला राजकुमारीच्या तैनातीला पाठवून दिलें. त्या दिवशीं सायमननेंच तिच्या जेवणाची व्यवस्था केली. तो वाढींत असतां त्याच्या हातून कांचेचीं व चिनी मातीचीं भांडीं खालीं पडून फुटून गेलीं. त्याबद्दल त्याला राजकुमारीसमोर बापाची बोलणी खावीं लागलीं. राजकुमारी गालांतल्या गालांत हंसत होती.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सायमन तोंड धुवायला ऊन पाणी घेऊन आला. राजकुमारीनें खोलीचा दरवाजा आंतून बंद करून घेतला व त्याला उंची राजवस्त्रें अंगांत घालायला दिलीं. नंतर दोघं सायमनच्या आई वडिलांना नमस्कार करायला निघालीं. सायमनच्या वडिलांनीं मुलाला ओळखलें नाहीं व राजकुमार समजून लवून सलाम केला. राजकुमारी हंसत म्हणाली—"तुम्ही आपल्या मुलाला ओळखलें नाहीं वाटतें?"

सायमनच्या बापानें तोंड वर करून पाहिलें व म्हणाला—"हा माझ्या मुलासारखा दिसतो आहे, खरा! पण माझा मुलगा राजकुमार कोठून असणार?"

वडिलांना जास्त घोटाळ्यांत ठेवणें सायमनला बरें वाटलें नाहीं. त्यानें सर्व पूर्वेतिहास वर्णन करून सांगितला व म्हणाला—"आमचें लग्न पूर्वीच ठरलें होतें. फक्त आपल्या परवानगीसाठीं थांबलें होतें." नंतर सायमन आपल्या आई वडिलांना बरोबर घेऊन राजकुमारीच्या गांवीं गेला. तेथें थाटामाटानें त्यांचा लग्न समारंभ पार पडला.





# खलिफाचे डोळे उघडले

खलिफा हरून अल रशीद यांना फार गर्व होता कीं त्याच्यासारखा उदार व दानी या जगांत दुसरा कोणी नाहीं. तो नेहमीं आपल्या औदार्याच्या फुशारक्या मारीत असे. एकदां त्यानें आपला वजीर जाफर याच्यासमोर आपल्या धन व दौलतीच्या विषयीं खूप वर्णन केलें व विचारलें—"बोला, आहे का माझ्या इतका कोणी श्रीमंत व त्याचबरोबर उदार व दानी?" खलिफा हें विसरून गेला होता कीं, ईश्वरानें या जगांत एकाहून एक थोर पुरुष उत्पन्न केले आहेत.

जाफरला खलिफानें इतका गर्व केलेला आवडला नाहीं. तो म्हणाला—"हुजूर! आपण गैरसमज करून घेणार नसाल तर सेवक कांहीं बोलणार आहे. ईश्वरावर भरंवसा ठेवून माणसानें वागावें यांतच हित आहे. त्याच्या कृपेशिवाय श्रीमंती येत नाहीं व ती टिकवणें देखील शक्य नाहीं. ऐहिक सुख, सद्गुण, सदाचार सर्व त्या भगवंताच्या कृपेनेंच माणसाला मिळतात. म्हणून मनुष्यानें गर्व करणें बरोबर नाहीं. झाडें आपलीं फळें व फुलें दाखवून ताठ उभीं रहात नाहींत, वांकतात. तसेंच विद्वान व श्रीमंत माणसानें आपल्या नम्र वागणुकीनें त्या देवाची कृपा संपादन करावी."

"लोक आपली प्रशंसा करतात; पण कांहीं तरी आशा ठेवूनच कीं नाहीं. माझ्या पाहण्यांत एक श्रीमंत बसऱ्याला आहे. तो किती श्रीमंत आहे हें सांगणें मलाच काय कोणालाच शक्य नाहीं. त्याचें औदार्य पाहून तर मी थक्क झालों. त्याचें नांव

श्री. शा. ग. पवार

Fullscreen 127 70 / 108



अबू अल कासीम असें आहे. तें ऐकून खलीफांना फार राग आला. त्यांनीं रागाच्या भरांत जाफरला कैदेंत टाकायला सांगितलें. म्हणाला—"माझा अपमान करणारा किंवा बरोबरीच्या नात्यानें बोलणारा कैदेंतच राहील."

जाफर म्हणाला—"हुजूर! सत्य नेहमीं कडूच असतें व तें हितैषी मित्रच बोलूं शकतो. मी जें सांगितलें त्यांत यत्किंचितहि खोटें नाहीं. मी कासिमच्या घरचा पाहुणाचार पाहून थक्क झालों. विश्वास नसेल तर कोणाला तरी पाठवून खऱ्याखोट्याची परीक्षा घ्यावी."

पण खलीफा त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें व जाफरला तुरुंगांत टाकलें.

खलीफा महालांत आला तेव्हां त्याचा लाल चेहरा पाहून त्याची बेगम जुबेदा हिनें कारण विचारलें. तेव्हां खलिफानें कारण सांगितलें कीं, कोणी तरी क्षुल्लक माणसाला माझ्याहून श्रीमंत आणि उदार आहे असें सांगून वजिरानें आज माझा अपमान केला. मी त्याला कैदेंत टाकलें आहे. उद्यां त्याचें डोकें उडवीन तेव्हां माझा आत्मा शांत होईल.

बेगम म्हणाली—"कोणतेंहि काम घाईंत करून नंतर पश्चात्ताप करणें शाहण्या माणसाचें काम मानलें जात नाहीं. कोणाला तरी पाठवून प्रत्यक्ष पाहून यायला कां नाहीं सांगत? वजिराचें म्हणणें चुकीचें ठरल्यावर त्याला अवश्य फांशी द्यावी."

"आणखी कोणाला कां पाठवूं? मी स्वत: जाऊन पाहून येतों." खलीफा म्हणाला.

तो एका व्यापाऱ्याचा वेष करून बगदादहून निघाला आणि बसऱ्याला आला. बसऱ्याच्या वाटेवर तो एका धर्मशाळेंत उतरला. त्यानें धर्मशाळेच्या पाहारेकऱ्याला कासिमच्या विषयीं माहिती विचारली.



तो म्हणाला—"मालक! त्यांची प्रशंसा करायला माझें हें आयुष्य पुरणार नाहीं. त्यांच्यासारखा दानी या दुनियेंत कोणी मी पाहिला नाहीं."

खलीफा दुसऱ्यादिवशीं बसऱ्याला पोंचला. त्यानें गांवांतल्या लोकांना कासिमचें घर विचारलें. प्रत्येक जण चकित मुद्रेनें त्याच्याकडे पाहून विचारी—"परदेशी दिसतां, कोठून आलांत?" एकानें त्याला घर दाखविलें.

बगदादहून कोणी व्यापारी आला आहे हें ऐकून अबू अल कासिम त्याच्या आतिथ्यासाठीं सामोरा आला, व प्रेमपूर्वक अभिवादन करून त्याला आंत बोलावून घेऊन गेला.

कासिमचें घर बाहेरून तर सुंदर होतेंच आंतून देखील तितकेंच सुंदर होतें. आंत काम करणाऱ्या दासी एकीहून एक सुंदर जणुं अप्सराच होत्या. त्या खलीफासाठीं रत्नपात्रांत अंगूरी दारू व मोत्यांच्या टोपल्यांत फळें घेऊन आल्या.

खलीफा व कासिम जेवायला बसले. इतकें स्वादिष्ट जेवण खलीफानें आयुष्यांत कधीं केलें नव्हतें. जेवणानंतर गायनाचा



कार्यक्रम होता. खलीफाकडे देखील मोठमोठे व नामांकित गवई होते. पण त्यांच्या गाण्याला कासिमच्या घरच्या संगीताची सर कधींच आली नाहीं.

खलीफा गाणें ऐकण्यांत चूर झाले असतां कासिम घरांत गेला व आंतून एका हातांत एक काठी व दुसऱ्या हातांत एक रत्नजटित रोपटें घेऊन आला. झाडाचें खोड चांदीचें होतें. पानें पांचूचीं होतीं. त्यांवर सोन्याचा एक सुंदर मोर बसलेला होता. कासिमनें तें झाड खलिफाच्या समोर ठेवलें. खलीफा मोराला पाहून त्याचें कौतुक करीत असतां

Fullscreen 127 72 / 108



कसिमनें मोराच्या डोक्याला काठीच्या टोकानें नुसता स्पर्श केला. त्याबरोबर तो मोर उडूं लागला व दिवाणखान्यांत हळूं हळूं घिरट्या घालूं लागला. त्यावेळीं मोराच्या पिसाऱ्यांतून उत्तराचा वास बाहेर येऊन हवेंत दरवळत होता.

खलीफा तन्मय होऊन तें दृश्य पहात असतां कासिम तें झाड व तो मोर उचलून घेऊन घरांत गेला.

खलीफाला राग आला. याच माणसाची वजीर इतकी प्रशंसा करीत होता नाहींका ? पहा, असेंच आतिथ्य करतात वाटतें ? कदाचित मी हें झाड मागून घेईन या भीतीनें स्वारीनें हें झाड आंत नेऊन ठेवलें असावें. मी स्वतःच येऊन याच्या औदार्याची परीक्षा घेतली म्हणून बरें झालें. कळली याची उदारता ! जाफरला फांशी मिळाल्याशिवाय राहणार नाहीं !

इतक्यांत कासीम परत आला. त्याच्या बरोबर एक गुलाम मुलगा होता. त्याच्या हातांत दारूचा पेला होता. तो हिऱ्याचाच पेला होता. त्यांत अत्युत्तम दारू होती. कासीमनें तो पेला खलीफाला दिला. खलीफानें दारू पिऊन पेला परत दिल्यावर पुन्हां पेला भरलेला दिसला. दोन तीनदां असेंच झालें. या अक्षय सुरापात्राकडे पहात खलीफा त्या झाडाची व मोराची गोष्ट पार विसरून गेला. त्यानें कासीमला विचारलें हा पेला कांहींतरी दिव्य पेला दिसतो आहे."

"होय ! एका सिद्ध पुरुषानें तो मला दिला आहे !" म्हणत कासिमनें तें अक्षय सुरापात्र त्या मुलाच्या हातीं आंत पाठवून दिलें व स्वतः देखील बरोबर गेला.

या खेपेस खलिफाला जास्तच राग आला. हा कासीम मूर्ख तरी असला पाहिजे. किंवा पाजी तरी नाहींतर एकेक वस्तु दाखवून ती पुन्हां माझ्या नजरेसमोरून दूर घेऊन जाण्यांत दुसरा काय हेतु असावा ? जाफरचें दिवस भरत आले आहेत हेंच खरें. त्याला शिक्षा करीन तेव्हांच माझ्या मनाला शांति मिळेल.

इतक्यांत कासिम एका सुंदर दासीला बरोबर घेऊन आला. तिच्या पोशाखांत मोती, रत्न व जर पाहून खलिफाला आश्चर्य वाटलें. दासीच्या अंगावर असली वस्त्रें ! त्याहून आश्चर्याची गोष्ट म्हणजे ती दासी एक तऱ्हेचें वाद्य वाजवूं लागली व त्याच्या सुरांत गाणें म्हणूं लागली. तें गाणें ऐकून खलीफा तर मुग्धच झाला. तो मोर व सुरा पात्र विसरून गेला व म्हणाला—"नशीब असावें तर असें !"

हे शब्द कानावर पडतांच कासीम त्या दासीला धरून घरांत ओढून घेऊन गेला.

ह्या वेळेस खलीफाला कमालीचा राग आला. त्यानें विचार केला कीं, हा सर्व खेळ आपला अपमान करण्यासाठीं कासीम करीत असावा. आतां येथें राहण्यांत अर्थ नाहीं. म्हणून कासीम आल्याबरोबर खलीफा त्याला म्हणाला—"तुमच्या आतिथ्यामुळें








Fullscreen 127 74 / 108


मी कृतकृत्य झालों. आतां मला घरीं जायला परवानगी द्या."

कासीम आपल्या सन्मान्य पाहुण्याला पोंचविण्यासाठीं आपल्या बाहेरच्या दरवाज्यापर्यंत गेला. खलीफा धर्मशाळेपर्यंत पायींच चालत आला. मनांत विचार चालू होते. हा सर्व देखावा आहे मोठेपणाचा. पक्का बस्ताद दिसतो आहे. आपला दिमाख दाखविण्यांत पटाईत. पण औदार्याची एवढी वाखाणणी ऐकली पण कांहीं आढळलें नाहीं. कवडीचुंबक आहे! म्हणे, दानी आहे, धर्मात्मा आहे! खोटें बोलला त्याचें फळ भोगावें लागणार जाफरला."

विचार करीत खलीफा धर्मशाळेच्या आंत पाऊल टाकतो तर तेथें दासा दासी उभे असलेले दिसले. त्यांत ती सुंदर दासी पण होती. सुरापात्र घेऊन तो मुलगा उभा होता व तें झाड पण होतें. खलीफा आल्याबरोबर एका दासीनें लवून मुजरा केला व खलीफाच्या हातांत एक कागदाचें वेटोळें दिलें. तें कासिमचें पत्र होतें.

आपलें आतिथ्य स्वीकारल्याबद्दल कासिमनें आपल्या सन्मान्य पाहुण्यांचे आभार मानले होते व भक्तिपूर्वक पाठविलेल्या वस्तू आठवण म्हणून ठेवून घेण्याबद्दल नम्र विनंति केली होती. प्रथम परवानगी घेतल्याशिवाय ही भेट स्वीकारण्यासाठीं विनंती करण्याचें साहस केल्याबद्दल माफीची पृच्छा पण पत्रांत केली होती.

पत्र पाहून खलिफाचे डोळे उघडले. आपण किती गैरसमज करून गेतला होता. त्याचें औदार्य व अतिथिसत्कार खरोखरच अद्वितीय आहे हें जाफरचें म्हणणें खरें निघालें.

[पुढें चालू]






रामलक्ष्मणांना बरोबर घेऊन विश्वामित्र ऋषि ईशान्य दिशेनें चालूं लागले. दोघे मिथिलेला पोंचले तेव्हां जनक राजानें यज्ञ आरंभ केला होता.

जनक महाराजांना कळलें कीं त्यांचें आमंत्रण स्वीकारून विश्वामित्र ऋषी आले आहेत तेव्हां ते स्वतः गुरु शतानंद यांना बरोबर घेऊन विश्वामित्रांच्या भेटीस आले. त्यांनीं विश्वामित्र ऋषींची विधिवत पादपूजा केली व यज्ञास आल्याबद्दल आभार मानले.

यज्ञाला अजून बारा दिवस लागणार आहेत असें सांगून राजानें रामलक्ष्मणांचा परिचय करून घेतला. विश्वामित्र म्हणाले—"दशरथ राजाचे हे दोघे गुणवान पुत्र आहेत. यांनींच ताटकेचा वध करून माझा यज्ञ निर्विघ्न पार पाडण्यास मदत केली."

जनकराजाचे पुरोहित शतानंद हे अहल्या व गौतम यांचे चिरंजीव आहेत हें ऐकून रामलक्ष्मणास कौतुक वाटलें. रामाच्या कृपेनें माता अहल्या शापमुक्त झाली असल्याचें ऐकून शतानंद मुनींना पण आनंद झाला.

शतानंद मुनि रामाला म्हणाले—"तुम्हीं दोघांनीं विश्वामित्र ऋषींचा अनुग्रह संपादन केलात. या महापुरुषाचा जीवन वृत्तांत खरोखरच ऐकण्या जोगा आहे." नंतर त्यांनीं तेथें हजर असलेल्या सर्व ऋषी-मुनीं

Fullscreen 127 76 / 108



समक्ष रामलक्ष्मणांस विश्वामित्र ऋषींचा जीवनवृत्तांत सांगितला.

"ब्रह्मदेवाला कुश नांवाचा एक मुलगा होता. त्याला कुशनाभ नांवाचा मुलगा झाला. कुशनाभचा मुलगा गाधिराज याचे विश्वामित्र हे जेष्ठ चिरंजीव. त्यांनीं कित्येक वर्षें राज्य केलें. एक अक्षौहिणी सैन्य घेऊन त्यांनीं सर्व पृथ्वी पादाक्रांत केली व वशिष्ठ मुनींच्या आश्रमाजवळ आले. त्या आश्रमांत कित्येक तपस्वी मुनि रहात."

"वशिष्ठ मुनींनीं विश्वामित्र व त्यांच्या बरोबर आलेल्या सर्व लोकांचा सर्व प्रकारें आतिथ्य-सत्कार केला. कुशल प्रश्न झाल्यावर वशिष्ठ मुनींनीं विश्वामित्रांस ससैन्य जेवणाचा आग्रह केला.

विश्वामित्र म्हणाले—"ब्रह्मर्षि! आपल्या दर्शनानेंच मी कृतार्थ झालों. जेवणाचा आग्रह करूं नये." असें सांगून विश्वामित्र उठून चालूं लागले. पण मुनींनीं आग्रह केला व म्हणाले—"या आश्रमांत आपण संकोच करण्याचें कारण नाहीं. सर्वांच्या खाण्यापिण्याची तरतूद होईल."

असें सांगून त्यांनीं शबल नामक कामधेनूला आज्ञा केली कीं, भक्ष्य भोज्य, लेह्य, पानीय युक्त षड्रस भोजनाची व्यवस्था कर!" आज्ञा होतांच कामधेनूनें सर्वांच्या जेवणाची उत्तम व्यवस्था केली.

एका ऋषीच्या आश्रमांत एक अक्षौहिणी सैन्याला पंच पक्वान्नांचें जेवण लाभलेलें पाहून विश्वामित्रांचे डोळे दिपून गेले. हें सर्व कामधेनूच्या कृपेमुळें झालेलें ऐकून विश्वामित्र वशिष्ठमुनींना म्हणाले—"हें वैभव राजाच्या महालांतच शोभतें. मी आपणांकडे एक लक्ष गाई पाठवून देतों. खरोखरी राज्यांतल्या प्रत्येक वस्तूवर राजाचा अधिकार असतो. म्हणून कामधेनू पण माझीच आहे."



वशिष्ठमुनि म्हणाले—"राजन! शतकोटि गाई देखील एका कामधेनूची बरोबरी करूं शकणार नाहींत. मी तपस्या करून ही मिळविली आहे. हिच्या कृपेनेंच सान्या आश्रमाचीं कामें निर्विघ्न पार पडत आहेत."

विश्वामित्र म्हणाले—"आपण मागाल तितकें सोनें द्यावयास मी तयार आहें. हिरे, माणकें जें कांहीं पाहिजे असेल, मागून घ्या ऋषीवर!" पण वशिष्ठमुनि शांतपणें म्हणाले—"मला धनाचा लोभ नाहीं. स्वतः तपश्चर्या करून मी जी गाय मिळविली आहे तिची किंमत मी धनानें कशी मोजूं?"

तेव्हां विश्वामित्रांनीं हट्टानें बलप्रयोग करून कामधेनूला नेण्याचा प्रयत्न केला. कामधेनू हंबरडा फोडून वशिष्ठमुनींकडे धांवत आली व म्हणाली—"धनी, हा काय अत्याचार."

वशिष्ठ म्हणाले—"माझ्याकडे सैन्य नाहीं. विश्वामित्राकडे एक अक्षौहिणी सैन्य आहे. त्याचा पराक्रम ऐकून पृथ्वी कांपत आहे."

"आपली आज्ञा असेल तर हा विश्वामित्र व त्याची एक अक्षौहिणी सेनाच काय, शंभर विश्वामित्र आले तरी ते माझ्या



अंगाला स्पर्श करूं शकणार नाहींत." कामधेनु म्हणाली.

वशिष्ठ "तथास्तु!" म्हणाले.

कामधेनूनें अंग हलविल्याबरोबर लक्षावधि पह्लव, म्लेच्छ वगैरे तिच्या अंगांतून बाहेर आले व त्यांनीं विश्वामित्राच्या सैन्याचा संहार सुरू केला.

विश्वामित्र रथांत बसून दिव्यास्त्र सोडूं लागले. पण कामधेनूनें शतलक्ष काम्बोज, हरीत, किरात वगैरेंची सृष्टि केली व त्यांनीं विश्वामित्र व त्यांचें सैन्य याला चारी बाजूंनीं घेरलें.

Fullscreen 127 78 / 108



हें पाहून विश्वामित्राचे शंभर राजकुमार वशिष्ठ मुनींवर धांवून गेले. पण वशिष्ठ मुनींनीं फक्त एकदांच हुंकार केल्याबरोबर सर्व भस्म होऊन गेले. त्यांचें सैन्य देखील भस्म होऊन गेलें. विश्वामित्राला स्वतःचा प्राण वांचविण्यासाठीं पळून जावें लागलें.

विश्वामित्राचा एक मुलगा जिवंत उरला होता. त्याला राज्य देऊन विश्वामित्र हिमालय पर्वतांत तपश्चर्या करण्यासाठीं निघून गेले. तेथें त्यांनीं घोर तपश्चर्या केली व शंकराला प्रसन्न केलें.

शंकरानें प्रत्यक्ष दर्शन देऊन विचारलें– "मला कां बोलाविलेंस विश्वामित्रा !"

विश्वामित्र म्हणाले–"देव, गंधर्व व राक्षस यांचा पराभव करण्यास आवश्यक तीं सर्व अस्त्रें मला द्यावीं. मला धनुर्वेदाचें पूर्ण ज्ञान व्हावें !" शंकर "तथास्तु !" म्हणून अंतर्धान पावला.

विश्वामित्र शस्त्रास्त्रें घेऊन वशिष्ठ ऋषींच्या आश्रमांत पोंचले. त्यांनीं आश्रमाला आग लावली. ऋषी व मुनी पळूं लागले. पशु पक्षी पळून गेले. सर्व आश्रम ओसाड झाला.

तेव्हां वशिष्ठ ऋषींना राग आला. ते आपला ब्रह्मदंड घेऊन समोर उभे राहाले. विश्वामित्रांनीं आग्नेय अस्त्राचा प्रयोग केला. पण ब्रह्मदंडाचा स्पर्श होतांच तें थंड गार होऊन खालीं पडलें.

विश्वामित्रांनीं एका मागून एक शेंकडों अस्त्रें फेंकलीं. पण वशिष्ठ ऋषींच्या ब्रह्मदंडानें सर्व गिळून टाकलीं. आतां वशिष्ठ मुनींच्या ब्रह्मदंडांतून ज्वाळा निघूं लागल्या व अग्नि-वृष्टि होऊं लागली.

विश्वामित्रांना तो अपमान असह्य वाटला. ब्रह्मतेजासमोर क्षत्रियाचें बळ किती टिकाव धरणार ! तर मग मी देखील ब्रह्मत्वाची प्राप्ति



करून घेणार. असें मनाशीं ठरवून विश्वामित्र ऋषि तपश्चर्या करण्यासाठीं सपत्नीक दक्षिणेकडे निघाले. तेथें त्यांना अनुक्रमें हविष्यन्द, मधुष्यन्द, दढनेत्र व महारथ अशीं चार अपत्यें झालीं.

विश्वामित्रांची तपश्चर्या पाहून ब्रह्मदेवानें प्रत्यक्ष दर्शन दिलें व म्हणाला–"सर्व क्षत्रिय तुला आज आधीन झाले आहेत. तूं राजर्षि झालास !"

पण राजर्षि पदवी मिळाल्यानें विश्वामित्रांचें समाधान झालें नाहीं. त्यांना ब्रह्मर्षि व्हावयाचें होतें. म्हणून त्यांनीं पुन्हां तपश्चर्या सुरू केली.

त्याच वेळीं ईक्ष्वाकु वंशाचा राजा त्रिशंकु यानें सशरीर स्वर्गं जाण्यासाठीं यज्ञ सुरू केला. त्याच्या कुल गुरूनें हें अशक्य आहे असें त्याला सांगितलें. पण त्याचें समाधान झालें नाहीं. म्हणून तो वशिष्ठ ऋषींच्या मुलांकडे, त्यांची मदत घेण्याच्या अपेक्षेनें दक्षिणेकडे गेला. त्यांनीं त्याचा अपमान करून "मूर्ख आहेस ! चालता हो !" असें सांगून त्याची भर्त्सना केली.

पण त्रिशंकु स्वस्थ बसला नाहीं. तो म्हणाला–"तुमची नाहीं तर मी दुसऱ्या



कोणाची तरी मदत घेऊन सशरीर स्वर्गांत जाऊन दाखवतों, पहा !"

वशिष्ठ मुनींच्या सर्व मुलांना त्याचा तो उद्दंडपणा आवडला नाहीं. त्यांनीं त्याला शाप दिला कीं तूं चांडाळ होशील !

शापामुळें त्रिशंकूचें सर्व शरीर काळें कुट्ट झालें. त्याचीं सर्व वस्त्रें पण काळीं झालीं. त्याचे सोन्याचे दागिने लोखंडासारखे काळे पडले. त्यानें वशिष्ठ मुनींचे शत्रु विश्वामित्र यांच्याकडे जाण्याचें ठरविलें.

विश्वामित्र त्रिशंकूचें म्हणणें ऐकून घेऊन म्हणाले–"मी तुला याच रंगा रूपांत स्वर्गांत

Fullscreen 127 80 / 108



पोंचता करीन!" असें सांगून विश्वामित्र ऋषींनीं यज्ञाची तयारी केली. ऋषी व मुनींना पाचारण करण्यासाठीं आपल्या शिष्यांना पाठविलें. वशिष्ठ मुनींचे शिष्य सोडून सर्व आले. विश्वामित्रांनीं त्यांना शाप दिला.

यज्ञ सुरू झाला. पण हवि घ्यायला देव आले नाहींत. विश्वामित्रांना क्रोध आला. ते त्रिशंकूला म्हणाले—"मी आजपर्यंत जी तपश्चर्या केली आहे ती पणास लावून तुला स्वर्गांत पाठवितों!" सर्व मुनींसमक्ष त्रिशंकु स्वर्गारोहण करूं लागला.



परंतु इंद्र व इतर देवांनीं त्याला स्वर्गांत पाऊल देखील ठेवूं दिलें नाहीं व त्याला खालीं ढकललें. खालीं पडत असतां त्रिशंकु ओरडला—"मुनिवर वांचवा!"

रागाच्या भरांत विश्वामित्रांनीं दक्षिणेकडे एक नवीन सप्तर्षि मंडल निर्मित केलें व म्हणाले—"मी एक नवीन स्वर्ग व नवीन देवांची सृष्टि करीन."

तें ऐकून देव व मुनि घाबरले. त्यांनीं हात जोडून विश्वामित्रांजवळ प्रार्थना केली—"महात्मन्! शापग्रस्त त्रिशंकूला स्वर्गांत कशी जागा देतां येईल?"

"मी त्याला वचन दिलें होतें तुला सशरीर स्वर्ग देईन. माझें वचन चुकणार नाहीं." विश्वामित्र म्हणाले.

नंतर विश्वामित्र दक्षिणेकडे पुष्कर नामक तपोवनांत तपश्चर्या करूं लागले.

त्याच वेळीं अंबरीष राजानें एक यज्ञ आरंभ केला आणि इंद्र यज्ञपशूला पळवून घेऊन गेला. राजगुरूनें राजाजवळ निवेदन केलें कीं यज्ञपशु परत मिळविलाच पाहिजे. नाहींतर नरबलि द्यावा लागेल. अंबरीष राजाला यज्ञपशु न मिळाल्या कारणानें तो नरबलीसाठीं नराच्या शोधार्थ निघाला.




Fullscreen




82 / 108



भृग्रातुद नांवाच्या पर्वतीय प्रदेशांत ऋचीक नांवाचे एक ऋषि सपत्नीक रहात असत. त्यांच्याकडे जाऊन अंबरीष राजानें त्याच्यावर ओढवलेला प्रसंग सांगून कांहीं तरी तोड सुचविण्यास विनंति केली. तो म्हणाला—"आपल्याला तीन पुत्र आहेत. आपण एकाला दिलात तरी माझें कार्य पूर्ण होईल." ऋचीक म्हणाला—"मोठ्या मुलाला देण्यास मी तयार नाहीं." त्यांची पत्नी म्हणाली—"मी सर्वांत धाकट्यास देण्यास तयार नाहीं." मधल्याचें नांव शुनःशेष असें होतें. तो राजाला म्हणाला—"आतां आई-वडिलांच्या तोंडीं मला पुढील वाक्य ऐकण्याची इच्छा नाहीं. ते मला विकायला तयार आहेत. तूं मला घेऊन चल."

अंबरीष उन्हांत शुनःशेषला बरोबर घेऊन निघाला. निवाऱ्यासाठीं दोघे थोडा वेळ विश्वामित्र मुनींच्या आश्रमांत थांबले. विश्वामित्रांना पाहून शुनःशेषनें ऋषींच्या पायांवर लोटांगण घातलें व रक्षण करण्यास विनंति केली.

विश्वामित्र ऋषींना दया आली. त्यांनीं आपल्या मुलांना म्हटलें—"तुमच्यापैकीं एकानें याच्याबद्दल राजाबरोबर जावें." पण एकानें देखील ऐकलें नाहीं. तेव्हां त्यांनीं वशिष्ठ मुनींच्या मुलांना जो शाप दिला होता तो स्वतःच्या मुलांना दिला.

नंतर विश्वामित्र ऋषींनीं शुनःशेषला दोन मंत्र शिकविले. म्हणाले—"बलिस्तंभाला बांधल्यावर तूं हे मंत्र म्हण"

शुनःशेषच्या अंगाला रक्त चंदन चोपडून त्याला लाल वस्त्रें नेसवून बलिस्तंभाला दर्भांनें बांधण्यांत आलें. तेव्हां त्यानें दोन्ही मंत्र म्हटले. अग्निनारायणानें प्रत्यक्ष दर्शन देऊन दीर्घायुचा वर दिला. [पुढें चालू]





# खलीफा उमर

महंमद पैगंबर यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या उपदेशांचा प्रचार करण्यासाठीं त्यांचा जावई अबू बकर हा पहिला खलीफा झाला. तो मुसलमानांचा धर्मगुरु होता. त्याच्यानंतर उमर अल खत्ताब हा दुसरा खलीफा म्हणून नेमला गेला.

हारून अल रशीद खलीफा विषयीं तर आपल्याला थोडी फार माहिती आहेच. पण त्याच्या काळापर्यंत खलीफा हे राजा व महाराजाप्रमाणें हळू हळू भोगविलासांत गुरफटूं लागले होते. धार्मिक कार्यापेक्षां त्यांचा वेळ जास्त करून ललित कलांना प्रोत्साहन देण्यांत जाऊं लागला. परंतु पहिले खलीफा अबू बकर हे तसे नव्हते. त्यांचें आचरण त्यांच्या अनुयायांना उदाहरण होईल असें होते. खलीफा उमर यांचें चरित्र देखील अबू बकर यांच्यासारखेंच जगाला आदर्श असेंच होतें. त्यांची राहणी अगदी साधी असे. मुसलमान धर्माच्या उन्नतीसाठीं व प्रसारासाठीं त्यांना अनेक युद्धें करावी लागलीं. त्यांच्या धर्माचरणाविषयीं अनेक गोष्टी सांगतात.

स्वार्थ ही वस्तूच हजरत उमर यांस माहीत नव्हती. येमनचें राज्य हस्तगत करून घेतल्यावर हजरत उमर यांनीं त्या राज्यांतलें सर्व धन व संपत्ति मुसलमानांना समसमान वांटून दिली. त्यांत एक सुंदर कापड होतें. त्याचा एकेक लहान तुकडाच प्रत्येकाच्या वांट्यास आला. हजरत उमर त्या कापडाची लुंगी करून वापरूं लागले.

ती लुंगी नेसून हजरत उमर मदिनेच्या मशिदींत गेले. त्यांना मुसलमानांना आज्ञा

Fullscreen 127 84 / 108



केली—" काफिरांशीं युद्ध करण्यास सज्ज व्हा!" तेव्हां एक जण उठून म्हणाला—" आपली आज्ञा आम्हांला मान्य नाहीं!"

" कां नाहीं?" हजरत उमर यांनीं विचारलें.

" येमेनच्या युद्धांत मिळालेलें कापड आपण सर्वांना वांटून दिलें. सर्वांना एकेक तुकडा मिळाला मग एक लुंगी पुरेसें कापड आपल्या वाट्याला कसें काय आलें? याचें उत्तर प्रथम मिळालें पाहिजे!" तो म्हणाला.

हजरत उमर आपला मुलगा अबदुल्ला याच्याकडे वळून म्हणाले—" प्रश्न बरोबर आहे. याचें उत्तर पण मिळालें पाहिजे." तेव्हां अबदुल्ला उठून म्हणाला—' मुसलमानहो! आपल्या पुढाऱ्याला लुंगीची गरज होती व त्यांच्या वाट्याला आलेलें कापड त्यापुरेसें नव्हतें. म्हणून मी आपल्या वांट्याचें कापड दिलें. मी तें दिलें नसतें तर हजरत उमर येथें आज येऊं शकले नसते कारण, त्यांच्याकडे त्या वेळचें एकहि वस्त्र नव्हतें."

प्रश्नकर्ता उठून म्हणाला—" हजरत उमर यांची आज्ञा शिरसावंद्य आहे!"

हजरत उमर हे सीरिया, मेसोपोटेमिया, इजिप्त, इराण वगैरे देश जिंकून इराकमध्यें आले व त्यांनीं तेथें बसरा व कूफा हीं दोन नगरें बसविलीं. ते परत मदिन्याला आले तेव्हां त्यांचीं सर्व वस्त्रें फाटून गेलीं होतीं. तेच कपडे घालून मशिदीच्या पायऱ्यांवर बसून त्यांनीं प्रजेच्या फिर्यादी ऐकल्या. त्यांनीं लहान-थोर किंवा श्रीमंत-गरीब असा भेदभाव केला नाहीं.

त्याच सुमारास कॉन्स्टँटिनोपलच्या खिस्ती अंमलदारानें मदिन्याला आपला एक हेर खलिफाचें धन व वैभव आणि सैन्य यांची इत्थंभूत माहिती गुप्तपणें काढून आणण्यासाठीं पाठविला होता त्यानें मदिन्याला आल्यावर लोकांना विचारलें—" तुमचा राजा कोठें आहे?"

लोक म्हणाले—" आमचा राजा! तो परमेश्वर अल्ला आहे! त्याच्याशिवाय दुसरा कोणी राजा नाहीं. मात्र त्याचा एक सेवक आहे. तो त्या परवरदीगार अल्लाला जे शरण गेले आहेत त्यांचा नायक आहे. त्याला आम्ही खलीफा म्हणतों. तो मशिदींतच नेहमीं राहातो. फिर्यादी आले कीं त्यांच्या फिर्यादी ऐकतो व न्यायनिवाडा करतो. नाहींतर तेथेंच पडून राहातो."

हेर मशिदीपर्यंत गेला. तेथें हजरत उमर मशिदीच्या तापलेल्या दगडी पायऱ्यांवर उन्हांत पडून होते. डोक्याखालीं उशी देखील नव्हती. घामाच्या धारा वहात होत्या. तें दृश्य पाहून हेर म्हणाला—" या फकिरासमोर तर मोठमोठ्या बादशहांचीं डोकीं नमलीं नाहींत तरच आश्चर्य! इतक्या मोठ्या बलाढ्य साम्राज्याचा अधिपति असून फकिरासारखी याची राहणी!"

इराण देशाची राजधानी इस्तखर येथें होती. तेथील राजा पराभव झाल्यावर त्याचा राजवाडा जमीनदोस्त झाला. त्यांत कित्येक



Fullscreen 127 86 / 108



अनमोल वस्तू खलीफाला मिळाल्या. त्यांत साठ फूट लांबी व रुंदी असलेला एक सुंदर गालिचा होता. त्यावर एक सुंदर बागेचें चित्र होतें. फूलें हिऱ्यांची पानें पाचूंचीं व झाडें सोन्याच्या तारेचीं होतीं. त्या गालिच्याची खरी किंमत किती आहे हें मुसलमान सरदार अबू बकस याला माहीत नव्हतें. पण एक सुंदर वस्तु आहे हें ओळखून त्यानें खास खलीफांना उपहार म्हणून तो गालिचा अर्पण केला.

तो गालिचा पाहून खलीफांना फार आनंद झाला. हा गालिचा सर्व अरब सरदारांचा आहे, असें सांगून त्यांनीं त्याचे तुकडे करविले व सरदारांना वांटून टाकले. स्वत:जवळ एक तुकडा देखील ठेवला नाहीं. असें सांगतात कीं त्यापैकीं एका तुकड्याची किंमत वीस हजार दिनार मिळाली.

इराण देशाच्या पराजित सरदारांपैकीं एकाचें नांव हर्मुजान असें होतें. त्यानें या अटीवर शस्त्र खालीं ठेवलें कीं, खलीफा स्वत: सांगतील त्याप्रमाणें त्याला वागविण्यांत यावें. त्याला धरून दोन मुसलमान सरदार मदिन्याला घेऊन गेले. त्यांनीं हजरत उमर यांच्यासमोर त्याला हजर केलें.

हजरत उमर मशिदीच्यासमोर अंगणांत फाटके कपडे घालून एका फाटक्या चटईवर बसले होते. इराणी सरदार स्वत: उत्तम वस्त्रें घालून आला होता. इतक्या मोठ्या साम्राज्याच्या अधिपतीची ती साधी राहणी पाहून श्रद्धेमुळें त्याची मान खालीं झाली. खलीफा म्हणाले—“ तुझ्यासारख्या श्रीमंतीचा तोरा मिरविणाऱ्यांना चेंचून काढण्यासाठीच अल्लानें इस्लाम धर्माची स्थापना केली आहे.” नंतर त्यांनीं त्या सरदाराला जाडे भरडे कपडे अंगांत घालायला सांगितलें. सरदारानें तसें केल्यावर ते म्हणाले—“ सर्व वैभव त्या परवरदिगार अल्लाचें आहे ! ” “ तर मग हें काम देखील त्या ईश्वराचेंच असलें पाहिजे. कारण तो तटस्थ राहिला असता तर आमचा जय झाला असता. हें मी तुमचा जुना इतिहास पाहून सांगत आहें देवानेंच हात दिला म्हणून तुमचा जय आणि आमचा पराजय झाला.” इराण देशाचा सरदार म्हणाला.

तें ऐकून खलीफांच्या कपाळाला आंठ्या पडल्या. आतां आपल्याला प्राणदंडाची शिक्षा होणार, अशी त्या सरदाराला भीति वाटली. त्याच्या घश्याला कोरड पडली व त्यानें प्यायला पणी मागितलें. त्याला एका मडक्यांत प्यायला पाणी देण्यांत आलें मडें हातात घेऊन त्यानें खलिफांकडे एकदां पाहिलें.

“ पी ! शंका कसली ? ” खलीफांनीं विचारलें.

“ मी पाणी पिऊं लागतांच कोणी डोकें उडवील कीं काय ही शंका माझ्या मनांत आली आहे ! ” सरदार म्हणाला.

“ असल्यास शंकांपासून तो अल्लाच तुझें रक्षण करो ! तुझें पाणी पिऊन होईपर्यंत तुझ्या केसाला देखील धक्का लागणार नाहीं.” हजरत उमर म्हणाले.



पण सरदारानें तें पाण्याचें मडकें फोडून टाकलें. तरी हजरत उमर यांनीं त्याला त्याबद्दल शिक्षा केली नाहीं. त्याचा तो तेजस्वीपणा त्यांना कौतुकास्पद वाटला. त्याल त्यांनीं सोडून दिलें.

खलीफांच्या त्या औदार्याचा हर्मुजान याच्या मनावर इतका परिणाम झाला कीं त्यानें इस्लाम धर्म स्वीकारला. त्याला एक मोठी मानाची जागा मिळाली.

जेरुसलम नगरावर देखील मुसलमान धर्माचा अधिकार झाला होता. पण तें ख्रिस्ती धर्माचें एक क्षेत्र होतें. सोफोनियस


Fullscreen
127




88 / 108


नांवाच्या धर्म गुरूचें तेथें आधिपत्य होतें तें कळल्यावर स्वतः हजरत उमर एकटे त्यांच्या भेटीसाठीं मदिन्याहून जेरुसलेम येथें गेले. त्यांच्या उंटासाठीं एका बाजूला पिशवींत चारा होता व दुसऱ्या बाजूला खजूर. या व्यतिरिक्त त्यांच्याजवळ एक लाकडी थाळी व पाणी प्यायचें भांडें होतें. रात्रंदिवस प्रवास करीत हजरत उमर कित्येक दिवसांनीं जेरुसलेमला पोंचले. वाटेंत लोकांचीं आपसांतलीं भांडणें मिटविण्यासाठीं किंवा नमाज प्रार्थनेसाठीं फक्त ते थांबत होते. जेरुसलेम नगराच्या स्वातंत्र्य पत्रावर सही करून त्यांनीं नगरांत प्रवेश केला.

सोफ्रोनियस याच्याबरोबर नगरांत जात असतां त्यांना एक चर्च दिसलें. तेव्हां त्याना नमाज-प्रार्थनेची आठवण झाली. सोफ्रोनियसला त्यांनीं विचारलें. नमाज-प्रार्थनेची वेळ झाली आहे. एक जागा दाखवावी. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें सोफ्रोनियसनें चर्चकडेच बोट दाखविलें.

"तुमचा धर्म मला मान्य नाहीं. म्हणून चर्चमध्यें नमाज-प्रार्थना करणें बरोबर होणार नाहीं." खलीफा म्हणाले. प्रार्थना झाल्यावर खलीफानीं ख्रिस्ती गुरूला विचारलें—"मुसलमानांना आपली मशीद बाधायला एखादी जागा दाखवावी."

सोफ्रोनियस खलीफाला सुलेमानच्या तीर्थस्थळाजवळ घेऊन गेले व तेथें त्यानें मशीद बांधायला सांगितलें. तेथें एक जॅकब शिला नांवाची एक पवित्र शिला होती. त्या शिलेवर दगड माती सांचलेली होती. ती पाहून खलीफा कांहीं बोलले नाहींत. घाण उचलून त्यांनीं ती दूर फेंकून दिली. नंतर ती जागा स्वच्छ करण्यांत आली व त्या जागीं उमर यांनीं एक मशीद बांधविली. ती मशीद उमर मशीद म्हणून आजपावेतों त्याच जागीं आहे.

हजरत उमर सर्व आयुष्यभर मक्का व मदिना या दोन नगरांतच राहाले. जुन्या व फाटक्या कपड्यांशिवाय इतर वस्त्रें त्यांनीं कधीं वापरली नाहींत. हातांत काठी घेऊन ते नगरांत रोज एक फेरी मारून येत व कोठें काय काय चाललें आहे हें प्रत्यक्ष डोळ्यांना पाहून येत. कोठें चोरी लबाडी आढळून आली कीं लगेच जागच्या जागीं गुन्हेगाराला शिक्षा करीत. कोणी अक्षम्य अपराध केला असेल तर त्याला ते आपल्या






Fullscreen 127 90 / 108

काठीनें छान चोपून काढीत. एकदां ते एका गल्लींतून जात होते. ती गल्ली गवळ्याची होती. त्यांनीं एका म्हातार्‍या गवळणीला दुधांत पाणी घालत असतांना पकडलें. त्यांनीं जवळ जाऊन तिला विचारलें—"काय हें आजी ? असली लुच्चेगिरी ? पुन्हां दुधांत पाणी घालूं नका !" म्हातारीनें आपली चूक कबूल केली व पुन्हां तसला अपराध न करण्याचें वचन दिलें.

दुसर्‍या दिवशीं खलीफा पुन्हां त्याच वाटेनें निघाले. पुन्हां म्हातारीनें दुधांत पाणी घातलेलें पाहून म्हणाले—"म्हातारे ! काल तूं पुन्हां कधीं पाणी घालणार नाहीं याची कबुली दिली होतीस !"

म्हातारी म्हणाली कीं मी खात्रीपूर्वक शपथ घेऊन सांगतें कीं मी दुधांत पाणी घातलेलें नाहीं.

ती बोलतच होती, तितक्यांत तिची मुलगी बाहेर येऊन म्हणाली—"आई, तूं कां खोटें बोलत आहेस ? एक तर लुच्चेगिरी व त्यावर खोटें ! अल्ला तुला कधीं माफ करील का ?"

तें ऐकून खलीफांच्या मनाचें समाधान झालें. ते म्हातारीला कांहींच बोलले नाहींत. पण आपला मुलगा अब्दुल्ला व आकिम यांना बोलावून त्यांनीं विचारलें—"या सुशील मुलीशीं लग्नास तुमच्यापैकीं कोण तयार आहे ? तिला जीं मुलें होतील तीं तिच्यासारखींच गुणी व सुशील निघतील"

आकिम लग्नास तयार झाला. खलीफाच्या मुलाचें एका गवळणीच्या मुलीशीं लग्न झालें.

त्यांचा नातू अब्दुल अजीज हाच पुढें खलीफा झाला. पांच प्रसिद्ध खलीफांपैकीं तो एक मानला जातो.





# दिलवारा जैनालय

अरवली पर्वताच्या रांगेंत आबू पर्वत आहे. त्या पर्वतावर दिलवाराचें सुप्रसिद्ध जैन देवालय आहे. हें देऊळ समुद्राच्या पातळी पासून ४००० फुट उंचीवर पर्वतांत बांधलेलें आहे. मध्ययुगांतील कला यांत जागोंजागीं दृष्टिगोचर होते. या देवालयाच्या मध्यभागीं एक वर्तुळाकार दालन आहे. त्यांत चतुर्मुख आदिनाथाची मूर्त आहे. याच्या उत्तरेकडील देवळांत देखील या देवाची मूर्त प्रतिष्ठित केलेली आहे. पश्चिमेकडे विमलशानें बांधलेलें देवालय आहे. हें पार्श्वनाथाचें देऊळ आहे. त्याच्या शेजारच्या देवालयांत नेमिनाथाची मूर्त आहे.

आबू पर्वतावर या जैन देवालयाव्यतिरिक्त हिंदूंचीं तीर्थक्षेत्रें पण अनेक आहेत. या पर्वतावरील प्राकृतिक दृश्यें प्रेक्षणीय आहेत. म्हणून पुष्कळ यात्रेकरू देव-दर्शनाच्या निमित्तें आबू पर्वताची सहल करण्यास येतात.



Fullscreen 127 12 / 80



# भारताचा इतिहास



आपल्या या देशाला आपण भारत म्हणतों. एका काळीं याचें नांव भारतवर्ष असें होतें. इराण देशाच्या रहिवाश्यांनीं आपल्या देशाला हिन्दुस्तान हें नांव दिलें. 'सिन्धु' शब्दावरून 'हिन्दु' शब्द झाला हें निराळें सांगण्याची गरज नाहीं.

असें सांगतात कीं आपल्या देशाची सभ्यता सर्वांत प्रथम सिन्धू नदीच्या खोऱ्यांत सुरू झाली. म्हणून सिन्धू नदीवरूनच इराण अफगाणिस्तानांतले लोक आपल्या देशास ओळखत.

आपल्या देशाचें क्षेत्र फळ १२,६०,००० वर्ग मैल आहे. याच्या उत्तरेस उंच हिमालय पर्वताच्या रांगा आहेत. मध्य-भागीं मारवाडचें वाळवंट आहे. सप्तनद्यांचा हा प्राचीन देश जगांतला अत्यंत सुपीक असा देश आहे.

आपल्या देशांत सुशिक्षित व सुसभ्य लोकां-बरोबर कातकरी, संथाळ वगैरे रानांत राहून, शिकार करून अगर कंदमुळें खाऊन उदर निर्वाह करणारे आदिम जातीचे लोक पण राहतात.

कधीं एक नव्हता असें कांहीं पश्चिमात्य लोकांनीं लिहून ठेवलें आहे व आपल्याच देशांतील लोक हे मानूं लागले आहेत कीं इंग्रज राजवटींतच आपला देश एक छत्र छा छायेखालीं आला. परंतु विष्णुपुराणांतील श्लोकावरून हा भ्रम दूर होईल :—

"उत्तरं यत् समुद्रस्य
हिमाद्रेश्चैव दक्षिणं
वर्षं तद् भारतं नाम
भारती यत्र सन्तति"

अर्थात् (हिन्दु) महासागराच्या उत्तरेस व हिमालयाच्या दक्षिणेकडील भूभाग भारत आहे व त्याची संतती भारतीय होय.

इ. स. पूर्वी तिसऱ्या शतकांत भारताच्या सर्व प्रांतांत प्राकृत भाषेचा प्रचार होता. तीच त्या काळची राष्ट्रभाषा पण होती.

आपल्या देशांत एक सभ्यता व एक संस्कृति होती. त्या गोष्टीचें प्रमाण असे दोन ग्रंथ, रामायण व महाभारत भारताच्या ऐक्याची साक्ष आजवर देत आहेत. कारण या दोन्ही ग्रंथांचें वाचन काश्मीर तें कन्याकुमारी व सिंधूनदी पासून ब्रह्मपुत्रपर्यंत सर्व भारतीय प्राचीन काळापासून आज-पर्यंत करीत आले आहेत. वेद आणि पुराण आपले धार्मिक ग्रंथ होत. शिव व विष्णु यांची आराधना आपण करतों.

अशा या आपल्या देशाचा इतिहास व त्यांतील मुख्य मुख्य ऐतिहासिक महापुरुषां-विषयीं माहिती आपल्याला असली पाहिजे.

* * *

आपल्या देशांतील सर्वांत जुने रहिवाशी पाषाणयुग सुरू होण्यापूर्वींचे आहेत. त्यांनीं दगडाचीं आयुधें करून श्वापदांपासून स्वतःचें रक्षण केलें व शिकार करण्यासाठीं पण त्यांचा उपयोग केला. त्यांचीं हीं दगडी आयुधें मद्रास राज्यांतल्या चंगलपेट जिल्ह्यांत आज देखील कोठें कोठें आढळतात.



पाषाण युगांतील हत्यारें

या पाषाण युगांतील लोकांना शेतकीची माहिती नव्हती व अग्नीचा उपयोग कसा करावा हें देखील माहीत नव्हतें.

नवीन पाषाण युगांतील भारतीय रहि-वाशी भारतांतल्या सर्व प्रदेशांत पसरलेले होते. त्यांचीं आयुधें व हत्यारें जागोजागीं आढळतात. म्हैसूर प्रांतांतल्या बल्लारी जिल्ह्यांत तर त्यांचा एक कारखानाच आढळला आहे.

नवीन पाषाण युगांतील मानव जीवनांत पुष्कळच बदल झाला. मनुष्य शेतकी करूं





"काय वदूं मी, प्रभो पाहिलें
दृश्य भयंकर जें तेथें।
अंगाचा थरकांप उडाला,
भोंवळ आली मज तेथें॥

"अन्तर्यामी प्रभो! तुला का
नाहीं कळलें जें घडलें?
दक्षाच्या गृहिं यज्ञमंडपीं
अघटित एक शिवा घडलें!

"देह सतीचा राख जाहला
रे अन् तूं निश्चिंत कसा?
अगाध लीला तुझी खरोखर
कारण तूं निर्लिप्त असा!"

ऐकुनि वाणी सदाशिवानें
रौद्र रूप धारण केलें।
भृकुटी तत्क्षण वक्र जाहली
"सांग नारदा जें घडलें!"

नाद भयंकर ऐकुनि नारद
वीणा भूमीवर ठेवून
विनम्र होउन वदला—"सांगूं
जास्त काय प्रभु, मी याहून?

"दक्ष-यज्ञ कारण या सर्वा,
तोच मूळ या सर्वाला;
तोंडा आलें तें तो वदला,
आवडलें ना कोणाला॥

"प्रभूस नांवें ठेवुन त्यानें
केलि भर्त्सना अन् सतिची।
नव्हती लाज जनाची त्याला
चाड तरी निज धर्माची!

"असह्य झालें सर्व सतीला,
सह्य कसा पतिचा अपमान?
भस्म जाहली दुःखाग्नीनें
केलें दिव्य तिनें बलिदान॥

"क्रुद्ध जाहले तेव्हां सगळे
आणि गरजले गण प्रभुचे।
तुटून पडले यज्ञसभेवर
आले सैनिक पण भृगुचे॥

एक भयंकर हास्य हांसुनी
जटा उपटली त्यानें एक।
फेंकुन जमिनीवरती दिधली
ज्योति प्रगटली तिथून एक॥

प्रगट जाहला ज्योतींतुन त्या
दिव्य पुरुष अन् महाबली।
रूप भयंकर, भासे घेइल
कोणाचा तरि खास बळी॥

सहस्र शस्त्रें धारण करुनी
उभा राहिला शिवापुढें।
प्रसिद्ध झाला निज कर्मानें
वीरभद्र तो जगीं पुढें॥

आणि म्हणाला—"आज्ञा व्हावी,
चाकर प्रभुचा हजर समोर!

शंभू वदला—"जा दक्षाचीं
थांबव कर्में सारीं घोर!

"दक्ष-यज्ञ तो ध्वंस करुनि तूं
जाणिव दे त्या दक्षाला।
कर्तव्याकर्तव्याची अन्
जाणिव दे तूं भृगुमुनिला!!"

बोलुनि इतकें त्रिशूल अपुलें
दिलें शंकरानें त्याला।
आशिर्वाद दिला निज कर्मीं
पूर्ण यशस्वी होण्याला॥

वीरभद्रनें प्रणाम करुनी
शंभूचा घेतला निरोप।
चकित जाहले सुरमुनि नारद
सदाशिवाचा पाहुनि कोप॥




Fullscreen

127





18 / 80



एक भयंकर हास्य हांसुनी
जटा उपटली त्यानें एक।
फेंकुन जमिनीवरती दिपली
ज्योति प्रगटली तिथून एक॥

प्रगट जाहला ज्योतींतुन त्या
दिव्य पुरुष अन् महाबली।
रूप भयंकर, भासे घेइल
कोणाचा तरि खास बळी॥

सदस्त्र शस्त्रें धारण करुनी
उभा राहिला शिवापुढें।
प्रसिद्ध झाला निज कर्मानें
वीरभद्र तो जगीं पुढें॥

आणि म्हणाला–"आज्ञा व्हावी,
चाकर प्रभुचा हजर समोर!

शंभू वदला–"जा दक्षाचीं
थांबव कर्में सारीं घोर!

"दक्ष-यज्ञ तो ध्वंस करुनि तूं
जाणिव दे त्या दक्षाला।
कर्तव्याकर्तव्याची अन्
जाणिव दे तूं भृगुमुनिला!!"

बोलुनि इतकें त्रिशूल अपुलें
दिलें शंकरानें त्याला।
आशिर्वाद दिला निज कर्मीं
पूर्ण यशस्वी होण्याला॥

वीरभद्रनें प्रणाम करुनी
शंभूचा घेतला निरोप।
चकित जाहले सुरमुनि नारद
सदाशिवाचा पाहुनि कोप॥





# अग्निद्वीप

[ १४ ]

[उग्राक्षाला एका मागून एक युवराजाच्या ऐवजीं सैपाक्याचा व धनगराचा मुलगा कारस्थानी दासींनीं दिला होता. पण उग्राक्षाला तें सर्व कळलें. शेवटीं चित्रसेनानें स्वत:च्या मुलाला देऊन आपलें वचन पाळलें. तो मुलगा उग्रदत्त या नांवानें उग्राक्षाकडे राहूं लागला. त्याला सोबती म्हणून उग्राक्षाच्या सांगण्याप्रमाणें राक्षस गावांतून दोघां मुलांना धरून घेऊन आले. पुढें वाचा]

चित्रसेनाचा मुलगा आपल्या घरीं जितक्या लाडांत वाढला तितक्याच, किंबहुना त्याहून जास्त लाडांत उग्राक्षाच्या घरीं वाढत होता. उग्राक्षानें त्याच्या सर्व गोष्टी पुऱ्या केल्या व त्याच्या आई-वडिलांपासून झालेली ताटातूट त्याला कोणत्याहि प्रकारें भासूं दिली नाहीं. उग्रदत्ताला सोबती म्हणून जीं मुलें आणण्यांत आलीं होतीं त्यांना रुद्र व आरुद्र अशीं नांवें ठेवण्यांत आलीं. हीं तिन्हीं मुलें राक्षसांच्या मुलांबरोबर लहानाचीं मोठीं झालीं. आकारानें तीं जरी लहान होतीं तरी बुद्धीनें मोठीं होतीं.

पंधरा वर्षें लोटलीं. आतां सर्व वीस वर्षांचे तरुण झाले होते. उग्राक्षानें या पंधरा वर्षांत राक्षसांची राहणी बदलून टाकली. त्यानें रानें कापून शेतकी करण्यास त्यांना

Fullscreen 127 20 / 80



सांगितलें. राक्षसांची शेतकीचीं कामें म्हणजे सर्वांना तें आश्चर्यच वाटलें. लहान लहान नांगर, बैल किंवा घोडे हे सर्व काय कामाचे. म्हणून हत्ती, उंट व गेंडे नांगराला किंवा गाडीला जुंपीत. राक्षसांनीं नरमांस भक्षण सोडलें. पशुहत्या पण सोडली. राक्षस जातींत झालेलें हें परिवर्तन पाहून मनुष्यवस्तींतील लोकांना आश्चर्य वाटलें. आणखी एक असा फायदा झाला कीं कपिलपुरच्या राज्यांत देखील सुख संपत्ती व शांतता नांदूं लागली.

उग्रदत्त, रुद्र व आरुद्र शस्त्रविद्येंत पारंगत होते. तलवार, भालाफेंक, घोडेस्वारी सर्वांत ते तरबेज झाले होते. एकदां त्यांना उग्राक्षाकडून कळलें कीं, अग्निद्वीप नांवाच्या द्वीपांतून भयंकर पक्ष्यांवर बसून कांहीं व्याघ्रचर्मधारी लोक त्यांच्या-राज्यावर वेळीं अवेळीं स्वारी करीत असत व ते आज पावेतों राज्यावर घिरट्या घालत आहेत. यावरून त्यांचा कधीं तरी स्वारी करण्याचा विचार असणार. म्हणून सावध राहिलें पाहिजे गेल्या पंधरा वर्षांत तसा त्रास त्यांनीं दिला नसला तरी त्यांच्यापासून राज्याला धोका आहे. त्यांचा पुढारी एक करवीर नांवाचा मनुष्य आहे व नागवर्मा नांवाचा कपिलपुरचा एक जुना सरदार त्यांना फितूर होऊन त्यांच्या मदतीनें कपिलपुराचें व राक्षसांचें राज्य बळकावण्याच्या प्रयत्नांत आहे. त्यांचा पराभव चित्रसेनानें व उग्राक्षानें केला. पण ते त्या दोघांना कैद करूं शकले नाहींत. ते बहुतेक अग्निद्वीपांतच पोंचले असणार व त्यांच्या सल्ल्यानेंच पुन्हा हे व्याघ्रचर्मधारी आपल्या भयंकर पक्ष्यांवर बसून येत असावेत.

उग्राक्षाच्या तोंडीं तें सर्व ऐकल्यापासून आपलें राज्य निष्कंटक कसें करावें हा विचार उग्रदत्ताच्या मनांत घर करून बसला. नागवर्मा व करवीर दोघांचा नायनाट केल्याशिवाय


devanagari

राज्यांत कायमची शांति टिकणें शक्य नाहीं. म्हणून कांहींतरी उपाय वेळींच केलेला बरा असें त्यानें मनाशीं ठरविलें.

उग्रदत्तानें आपले मित्र रुद्र व आरुद्र यांच्याशीं सल्ला करून रात्रीं ते पक्षी व व्याघ्रचर्मधारी कोणत्या दिशेनें येतात? कोठें उतरतात कीं काय ह्या गोष्टीची माहिती काढायचें ठरविलें. एखादा व्याघ्रचर्मधारी कोणी भेटला तर त्याला धरून त्याच्याकडून सर्व माहिती काढतां येईल, आणि करवीर व नागवर्मा अग्निद्वीपांतच आहेत कीं आणखी कोठें हें देखील कळेल असा विचार केला.

व्याघ्रचर्मवाल्यांना पकडावयाचेंच असेल तर रानांत राहणाऱ्या लोकांची मदत घेतली पाहिजे. त्यांना कांहीं इनाम वगैरे देण्याचें ठरविलें तर ते जास्त उत्साहपण दाखवितील असें ठरवून त्यानें आपली सर्व योजना उग्राक्षासमोर मांडली व त्याला ती फार पसंत पण पडली. तो म्हणाला—

"राज्यांत सर्वत्र दवंडी पिटा कीं, जो कोणी एका व्याघ्रचर्मधाऱ्याला धरून आणील त्याला एकट्याला एक लक्ष होन इनाम देण्यांत येतील. आपल्याकडे सोनें



किल्ल्याच्या कोठारांत पडून राहिलें आहे त्याचा उपयोग तरी होईल."

उग्रदत्तानें त्याप्रमाणें गांवांत, रानांत सर्वत्र दवंडी पिटविली कीं मनुष्य असो किंवा राक्षस असो जो कोणी एका व्याघ्रचर्मधाऱ्याला धरून घेऊन येईल त्याला एक लक्ष होन बक्षिस देण्यांत येतील.

तेव्हांपासून रोज उग्राक्षाच्या किल्ल्यांत अग्निद्वीपातील व्याघ्रचर्मवाल्यांच्या विषयीं बातम्या नियमितपणें येऊं लागल्या. निरनिराळ्या प्रदेशांत हे लोक आपल्या भयंकर पक्ष्यांवर बसून येतात. कधीं कधीं ते उतर-

Fullscreen 127 22 / 80



तात, पण पुन्हां पळून जातात. बरोबर काय घेऊन जातात हें मात्र कोणाला कळलें नाहीं. ते बरोबर कोठें उतरतात हें कोणीच सांगूं शकला नव्हता. महिने दोन महिने गेले तरी यापेक्षां जास्त माहिती न मिळालेली पाहून उग्रदत्त थोडा निराश झाला. असें लपून छपून येण्यांत व राज्यांत धुमाकूळ माजविण्यांत त्यांचा काय हेतू हें त्याला कळेना. हे कोठें वरें उतरत असावेत? निर्जन रानांत किंवा डोंगरांत उतरत असावेत. नाहींतर आपल्या लोकांना ते कसे आढळले नाहींत? त्यानें आपल्या मित्रांच्या सल्ल्यानें



स्वतःच सर्व गोष्टींचा पत्ता लावण्याचें ठरविलें. रात्रीं एखाद्या उंच जागीं बसून पाहारा द्यायचा असा तिघांनीं बेत केला व कोणाला देखील सांगितल्याशिवाय तिघे घोड्यावर बसून अपरात्रीं रानांत निघाले. लोकवस्ती जेथें होती तो भाग सोडून निर्जन वाटेनें ते रानांतून चालले होते. मध्यरात्र लोटली तरी त्यांना आकाशांत ते अग्निपक्षी दिसले नाहींत कीं व्याघ्रचर्मवाल्यांची हालचाल कोठें दिसली नाहीं.

तिघे अगदीं दमून गेले होते त्यांचे घोडे पण दमून गेले होते. म्हणून त्यांनीं थोडा वेळ विश्रांति घेण्याचें ठरविलें. घोड्यांना चरायला सोडून विश्रांतीसाठीं सोईस्कर अशा जागेच्या शोधार्थ हिंडूं लागले. एका देवदारूच्या झाडाखालीं सपाट व स्वच्छ जागा पाहून तेथें बसण्याचा ते विचार करूं लागले. इतक्यांत एकदम उजेड झाला. झाडाच्या पानांतून दिव्याच्या उजेडाचे झोत येतात तसे त्यांच्या अंगावर पडले सर्वांनीं वर पाहिले तेव्हां त्यांना ते भयंकर पक्षी दिसले. प्रत्येक पक्ष्यांवर एक किंवा दोन व्याघ्रचर्मधारी बसलेले होते. त्यांच्या हातांत एक वस्तु त्यांना दिसली. तिच्यांतूनच उजेडाचे झोत येत होते. ते पाहून अर्थातच त्यांना आश्चर्य वाटलें.

थोड्या वेळानें ते पक्षी दूर उडून गेले. ज्या दिशेनें ते उडत होते त्याच दिशेनें तो प्रकाश देखील चालला होता.

"पाहतों हं कीं हे कोठें उतारतात कीं सरळ पुढें जातात." असें म्हणत रुद्र झरझर देवदार वृक्ष वर चढून त्याच्या शेंड्याला जाऊन पोंचला. वर त्यानें कांहींतरी पाहिलें असावें, म्हणून जास्त वेळ झाडा वर न थांबतां लगेच तो खाली उतरून आला. त्याचे दोघे मित्र जवळ पळत आले व प्रश्नार्थक मुद्रेनें त्याच्याकडे पाहूं लागले.

तो म्हणाला—"पश्चिमेकडे फार दूर नाहीं, एक किल्ला आहे. त्या किल्ल्यात दिवा वत्ती कांहीं दिसली नाहीं. निर्जन स्थान तरी असलें पाहिजे किंवा रात्रीच्या वेळीं या जागेचा कोणाला सुगावा लागूं नये म्हणून तेथील लोक दिवा वत्ती लावीत नसावेत. पण बुरजावर कोणी पाहारा देत असावा असें देखील दिसलें नाहीं."

रुद्रच्या बोलण्यावरून व त्याच्या घाबऱ्या आवाजावरून उग्रदत्तानें ओळखून विचारलें— "तर मग ते पक्षी त्या किल्ल्यांत किंवा



जवळपास उतरले असतील असें तुझें अनुमान आहे!"

"निश्चितपणें सांगणें कठीण आहे. पण मला शंकापण तशीच वाटत आहे. किल्ल्यांतले लोक अगदीं बेफिकीर वाटत आहेत. तो व्याघ्रचर्मवाला त्या किल्ल्यांत किंवा जवळपास कोठें उतरला असल्यास बातमी देणारा सुद्धां कोणी दिसला नाहीं." रुद्र म्हणाला.

रुद्रच्या मनांत जी शंका होती तीच शंका उग्रदत्तच्या मनांत पण होती हा कपिलपुरचाच कोणी मांडलिक सरदार असावा. पण हा इतका बेफिकीर कां? त्यानें थोडा

Fullscreen 127 24 / 80



वेळ विचार केला. पण त्याला उत्तर मिळलें नाहीं. उजाडण्याच्यापूर्वी या प्रश्नाचें उत्तर मिळणें शक्य नाहीं. उजाडल्यावर स्वत: जाऊन पाहिलें पाहिजे व त्या सरदाराला माहीत नसेल तर सावधपण केलें पाहिजे.

कांहीं वेळानें आपल्या घोड्यांना झाडाखालीं बांधून ते सर्व झोंपीं गेले. दमलेले होतेच. जमिनीला अंग लागतांच त्यांना झोंप लागली. सूर्योदय होतांच पक्षी कलरव करूं लागले. घोडे खेंकाळूं लागले. जमिनीवर खूर आपटूं लागले. तो आवाज ऐकून तिघांच्या झोंपा मोडल्या.

तोंपर्यंत छान उजाडलें होतें. मोठमोठे वृक्ष व लता आणि झाडाच्या पारंब्यासमोर दिसत होत्या त्यांवर चढून माकडें उड्या मारीत होतीं व चित्रविचित्र रंगांचे पक्षी किलबिल करीत होते. सर्व दृश्य एकंदरीत मनोहर होतें.

"हा प्रदेश आपल्या प्रदेशापेक्षां जास्त सुंदर वाटतो नाहीं का?" उग्रदत्तनें आपल्या दोघां साथीमित्रास विचारलें.

"म्हणून कोणीतरी सरदारानें मुद्दाम ह्याच भागांत किल्ला बांधला असावा. व्याघ्रचर्मवाल्यांना देखील एकांत व निर्जन स्थान मिळालें आहे. येथें त्यांना लपून छपून आपलीं कृष्ण कारस्थानें करायला ही छान जागा आहे.'' रुद्र म्हणाला.

व्याघ्रचर्मवाल्यांच्या नांवाचा उल्लेख करतांच उग्रदत्त उठून उभा राहिला. त्याचे दोघे मित्र पण उठून उभे राहिले. "किल्ल्याकडे जाऊं या का? तुझा घोडा घेऊन येऊं?" रुद्रनें विचारलें.

"घोडा कशाला? किल्ला तसा कांहीं फार दूर दिसत नाहीं!" उग्रदत्त म्हणाला. अर्धा मैल असेल फार तर अर्धवट उजेडांत मी तो पाहिला म्हणून नक्की सांगू शकत


Fullscreen
127




26 / 80



नाहीं कीं किती दूर आहे. पण फार दूर नाहीं एवढें खास " रुद्र म्हणाला.

" जवळ किंवा दूर असला म्हणून काय झालें. घोड्यावर बसून जावें हेंच मला बरोबर वाटतें " आरुद म्हणाला.

ते जिथे घोडे बांधले होते तेथें गेले आणि घोडे सोडूं लागले. तेवढ्यांत त्यांना कोणातरी असहाय स्त्रीची किंकाळी ऐकूं आली. त्या निर्जन स्थानां एक किंकाळी व ती देखील एका स्त्रीची ते निस्तब्ध जागच्या जागीं उभे राहाले.

" कोणीतरी स्त्री संकटांत सांपडली असावी." रुद्र म्हणाला. " तर मग चला लवकर ! " म्हणत उग्रदत्तनें आपली तलवार उपसली व ज्या दिशेनें ती किंकाळी ऐकूं आली होती त्या दिशेनें तो निघाला.

तिथे कांहीं अंतर चालून गेले असतील कीं, त्यांना झाडींत माणसांच्या चाहुल्या ऐकूनी दिसूं लागल्या. थोडें आणखी पुढें गेल्यावर त्यांना एक रेशमी वस्त्र नेसलेली तरुणी दिसली व तिला धरण्यासाठीं व्याघ्र चर्मवाले पुढें येत असलेले दिसले. त्या स्त्रीच्या दासी तिच्या रक्षणासाठीं प्रयत्न करीत होत्या व सर्व पळत पण होत्या. त्या सारख्या ओरडत होत्या—" वांचवा ! वाचवा ! "

" भिऊं नका ! आम्ही येत आहों ! " उग्रदत्त, रुद्र व आरुद ओरडले. पण तितक्यांत कांहीं व्याघ्रचर्मवाले झाडावरून उड्या मारून खालीं आले व त्यांनीं तिघांना घेरलें. उग्रदत्त व त्याच्या दोघां मित्रांना या अनपेक्षित संकटाची कल्पना देखील नव्हती ते थक्क होऊन पहात असतां व्याघ्र-चर्मवाल्यांनीं त्यांना निशस्त्र केलें व त्यांना बांधून ते फरपटत ओढीत भयंकर पक्षी होते त्या जागीं घेऊन गेले.

[ पुढें चालू ]



# गाढवाची अक्कल !

किती प्रदेशांत एका काळीं गाढवें नव्हती. एकदां एक मनुष्य आपल्याबरोबर एका जहाजांत एक गाढव घेऊन आला आणि त्यानें त्या गाढवाला डोंगराळ प्रदेशांत सोडून दिलें. त्या प्रदेशांतल्या वाघानें पूर्वी गाढवाला पाहिलें नव्हतें. त्याला पाहून व त्याची उंची पाहून वाघाला, गाढवाची भीति वाटूं लागली. तरी थोडी हिम्मत करून वाघानें त्या गाढवाला जवळून पहायचें ठरविलें. इतक्यांत गाढव मोठमोठ्यानें ओरडूं लागलें. वाघ घाबरला आणि दूर पळून गेला. तो दुरून गाढवाला पहात उभा राहिला. गाढव पाठलाग करीत येत नसलेलें पाहून त्याला हायसें वाटलें. त्यावरून त्याला अशी कल्पनापण आली कीं पाठलाग न करणारें जनावर कदाचित हिंस्रपण नसेल.

आतां वाघ निर्भयपणें गाढवाच्या अगदीं जवळ येऊन उभा राहिला. नंतर त्याच्या अंगाला अंग घासून वाघानें सलगी करण्याचा प्रयत्न केला. गाढवाला तें आवडलें नाहीं आणि लाथा झाडूं लागलें.

" कळलें तुझें शौर्य ! तुझ्या स्वभावाविषयीं मी कोण कोणत्या कल्पना करीत होतों." असें म्हणत वाघानें गाढवावर एक झडप मारली व त्याचा कंठ धरला. गाढवाचे पाय गार पडले. किती झालें तरी अक्कल गाढवाचीच.



Fullscreen





28 / 80


# देव तारी त्याला कोण मारी

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां परतला व झाडावरचें प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"कठीन काम करण्याचेंच तूं ठरविलेलें दिसतें आहे. परंतु तूं एक गोष्ट विसरलास. कदाचित तिकडे तुझें लक्ष गेलें नसेल. अरे, कित्येकदां लहानसहान कामें करणें देखील अशक्य होतें. ही गोष्ट तुला कदाचित पटणार नाहीं. म्हणून मी तुला एक गोष्ट सांगतों. तुझा थकवा पण, थोडा का होईना, कमी होईल." असें सांगून त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

एक राजा होता. एकाएकीं त्याला मरण आलें. त्याला एकुलता एक मुलगा होता,—अगदीं तान्हा मुलगा. पण तोच बापाचा वारस असल्यानें त्या देशाचा राजा झाला.

राजाला एक भाऊ होता. राजा मेल्यावर स्वतः गादी बळकाळण्याची जबर इच्छा त्याच्या मनांत उत्पन्न झाली. पण युवराजाचा कांटा दूर केल्याशिवाय त्याला तें शक्य नव्हतें. म्हणून गुप्तपणें त्याचा वध करण्याचें त्यानें ठरविलें. पण तान्ह्या मुलाचा वध करणें देखील त्याला वाटत होतें तितकें सोपें नव्हतें.

त्यानें एका परदेशी माणसाला त्या कामावर नेमलें. त्यानें त्याला राजमहालांत एका गुप्त स्थानीं लपून बसायला सांगितलें. नंतर त्यानें युवराजाच्या खोलीच्या दरवाज्यावर एक खूण करून ठेवली. युवराजाची दाई व दासी सर्वांना कांहींतरी निमित्त काढून दूर पाठवून दिलें. नंतर त्यानें मारेकऱ्याला युवराजाच्या खोलींत पाठविलें. म्हणाले—"युवराज तेथें एकटा आहे. जा, आटप! आणि हें तुझें बक्षिस!" असें सांगून त्याच्या हातांत एक पिशवी दिली.

मारेकरी तलवार घेऊन युवराजाच्या खोलींत शिरला. त्याला आंत राजा दिसला नाहीं. एक लहानसें रांगतें मूल दिसलें. त्या मारेकऱ्याला युवराज म्हणजे तें रांगतें मूल असेल याची कल्पना नव्हती. मुलाच्या



हातांत एक संतरें होतें. तें खालीं पडलें. तें घेण्यासाठीं तो रांगत पुढें निघाला. मारेकऱ्याला पाहून मुलगा "ब" "ब" असें कांहीं बडबडला. मारेकऱ्यानें तें फळ उचलून त्याच्याकडे फेंकलें. तान्हे युवराज आनंदानें हंसूं लागले. मारेकरी स्वतःचें काम विसरून मुलाशीं खेळूं लागला. थोड्या वेळानें दासी परत आल्या व त्यांनीं शिपायांना बोलावून मारेकऱ्याला कैद करविलें.

चवकशी केल्यावर मारेकऱ्यानें खरेंखरें सांगून टाकलें. म्हणाला—"राजाच्या वध

Fullscreen 127 30 / 80



करण्यासाठीं मी आंत गेलों होतों. पण त्यांच्या जागीं एका तान्ह्या मुलाला मी पाहिलें.

शिपाई म्हणाले—"आमचे महाराज वारल्यानंतर हे युवराजच आमचे महाराज झाले आहेत."

"असें होय! तर मग तें मी मालकांना जाऊन सांगतों." मारेकरी म्हणाला. कोणी तरी वेडपट दिसतो आहे असें समजून शिपायांनीं त्याला सोडून दिलें.

आपला बेत फसला ही गोष्ट राजाच्या भावाला कळली. त्यानें त्या मारेकऱ्याला भेटण्याचें टाळलें. शेवटीं कंटाळून जाऊन मारेकरी स्वदेशी निघून गेला.

राजाच्या भावानें आणखी एक प्रयत्न करून पहायचें ठरविलें या खेपेस त्यानें चोरांच्या टोळीच्या एका सरदाराला बोलाविलें आणि म्हणाला—"शिवरात्रीच्या दिवशीं सर्व लोक सांबाच्या देवळांत जातील. तुम्ही वाटेंत कोठें तरी लपून रहा. त्यांच्यावर अकस्मात छापा मारून त्यांना लुटून घेऊन जा. त्यांच्या बरोबर एक गोरा मुलगा असेल. त्याच्या अंगावर जे दागिने असतील ते तुम्ही काढून नेलेत तर तुमचें आयुष्यभराचें दारिद्र्य कायमचें नाहींसें होईल. इतर कोणाला ठार करा किंवा करूं नका, त्या मुलाला मात्र ठार करून टाका."

कट ठरला शिवरात्रीची जत्रा भरणार म्हणून लोक सांबाच्या दर्शनास निघाले. चोर झाडींत लपून बसले होते. दासी युवराजांना घेऊन देवदर्शनास निघाल्या. बरोबर कांहीं सैनिक पण होते. त्यांच्या पाठोपाठ चोरांची दुसरीच एक टोळी आली व संधी साधून त्यांनीं शिपायांची कत्तल केली व सर्व दासींच्या अंगा खांद्यावर जें कांहीं सांपडलें लुटून घेऊन गेले. युवराजांच्या अंगावरचे निवडक दागिने ते घेऊन गेले. मुलाच्या जिवाला मात्र कांहीं अपाय झाला नाहीं. मुलाला वाटेंतल्या एका धर्मशाळेंत सोडून ते निघून गेले. युवराज तेथें बसून रडत होते.

थोड्या वेळानें एक दासी युवराजाला हुडकीत तेथें आली व युवराज सुरक्षित आहेत हें पाहून तिनें देवाचे आभार मानले व त्यांना उचलून घेऊन राजवाड्यांत परतली. अशा तऱ्हेनें दुसरा कट पण फसला.

परंतु राजाचा भाऊ हताश होऊन बसला नाहीं. त्यानें सैंपाक्याला पैसे चारून मुलाच्या दुधांत विष घालून द्यायला सांगितलें. सैंपाकी धनलोभानें तें नीच कर्म करण्यास कबूल झाला. त्यानें एका पेल्यांत विष घातलेलें दूध आणून युवराजांना प्यायला देण्यासाठीं दासीला आणून दिलें. युवराज पेला लावून दूध पिणार एवढ्यांत दासीला शिंक आली. युवराज त्यामुळें दचकले व त्यांच्या हातांतून तो पेला सुटला.

अशा तऱ्हेनें राजाच्या भावाचा तिसरा प्रयत्न पण फुकट गेला. त्यानें आणखी काय काय केलें असतें कोण जाणें? पण त्याच्या एका शत्रूनें त्याचाच खून केला.




Fullscreen

127





32 / 80


त्यानंतर युवराजांवर कोणत्याहि प्रकारचें संकट आलें नाहीं. विसाव्या वर्षी त्यांचा रीतसर राज्याभिषेक झाला व त्यांनीं आपल्या प्रजेला सुखी केलें.

येथवर गोष्ट सांगून वेताळानें विचारलें—"राजा! माझ्या मनांत एकच शंका आहे. त्या एका तान्ह्या मुलाला ठार करण्यासाठीं इतका खटाटोप करण्याची गरजच नव्हती. त्या एवढ्याशा मुलाचा गळा दाबून मारून टाकणें देखील राजाच्या भावाला अशक्य नव्हतें. पण तो होता भित्रा असेंच म्हणावें लागेल. राजा होण्याची एवढी इच्छा असूनहि तीन-तीन प्रयत्न करून देखील त्याला तान्ह्या युवराजांचा कांटा दूर करतां येऊं नये, हें खरोखरीं आश्चर्यच आहे. पण ही शक्य गोष्ट अशक्य का ठरली? ह्या प्रश्नाचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर तुला परिणाम माहीतच आहे! तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर आदळतील!"

विक्रमार्क म्हणाला—"मुलाचें शैशव हेंच त्याच्या रक्षणास मूळ कारण झालें. समुद्राच्या लाटेनें किंवा पुरांत मोठमोठीं झाडें कोलमडून पडतात. पण गवत किंवा शेवाळ यांच्या अंगाला यत्किंचितहि धक्का लागत नाहीं, हें तूं पाहिलेंच आहेस. रथाच्या चाका खालीं दगड आणि गोटे फुटून चूर होऊन जातात. पण मातीला कांहीं त्रास होतो का? युवराज लहान होता म्हणूनच वांचला असें मला वाटतें. तो मोठा असता तर कधीं वांचला नसता. लहानपण हें ईश्वराचें वरदान आहे."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतावरोबर नाहींसा झाला व पुन्हां झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.

[कल्पित]





# खलीफाचे डोळे उघडले

[२]

अबुल कासिमनें दिलेले उपहार घेऊन कांहीं बोलल्याशिवाय बगदादला परत जाणें खलीफांना मुळींच आवडलें नाहीं. त्यांच्या मनांत शंकाकुशंका येऊं लागल्या. हा तरुण कोण बरें असेल? आपल्या पाहुण्यांना इतके उपहार देण्याची शक्ती याच्यांत कोठून आली असावी? असा विचार करून कासिमनें दिलेले सर्व उपहार बरोबर घेऊन खलीफा कासिमच्या घरीं गेला.

तो कासिमला म्हणाला—"तुम्हीं पाठविलेले उपहार एकाहून एक मूल्यवान असेच आहेत. मी त्याबद्दल आपला अत्यंत आभारी आहें. परंतु इतके मूल्यवान उपहार घेण्याची इच्छा नाहीं मला. तुमचें औदार्य व आतिथ्य खरोखरच वाखाणण्यासारखें आहे."

तें ऐकून कासिमला थोडें वाईट वाटलें. त्यानें विचारलें—"हुजूर! माझ्या हातून कांहीं चूक झाली का? किंवा मी पाठविलेले उपहार आपल्या इभ्रतीला साजतील असे नव्हते? नाहींतर आपण धर्मशाळेपासून येथवर फक्त एवढ्याच कामासाठीं परत याल असें नाहीं मला वाटत."

"छे, छे! असें व्यर्थ कांहीं मनांत आणून दुःखी होऊं नका. इतका उत्तम अतिथिसत्कार करणाऱ्यांचा मी अपमान करीन असें का वाटतें तुम्हांला? पण मी विचार केला, इतक्या मूल्यवान वस्तू तुम्ही औदार्यानें दिल्या हें तुमचें थोर पण. त्या बरोबर मी तें घेऊन जाणें हें माझें शहाणपण होणार नाहीं." खलीफा म्हणाले.


Fullscreen

127





34 / 80




कासिम नम्रपणें म्हणाला—"इतका संकोच मनांत बाळगून तुम्ही येथवर आलांत या बद्दल मी आपला आभारी आहें. परंतु या वस्तू दिल्यानें मी गरीब का होणार आहें. अतिथिसत्कार करणें हा माझा धर्म आहे व देवाच्या कृपेनें माझ्याकडे इतकें धन आहे कीं आपल्या सारखे रोज पाहुणे आले तरी मला आयुष्यभर पुरेल इतकें वैभव देवानें मला दिलें आहे. माझें जीवनचरित्र आपण ऐकलेंत तर माझ्या म्हणण्याची साक्ष पटेल." असें सांगून कासिमनें आपलें आत्मचरित्र वर्णन करून सांगावयास सुरवात केली.

कायरो शहरांत अब्दुल अजीज नांवाचा एक जव्हेरी रहात असे. कित्येक पिढ्या त्याच्या पूर्वजांनीं जव्हेऱ्याचा धंदा करून अलोट संपत्ती मिळविली. त्यामुळें सुलतानाची त्यांच्यावर वक्रदृष्टि असे. म्हणून अब्दुल अजीज याला कायरो नगर सोडावें लागलें. तो बसऱ्याला पळून गेला. तेथें एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या मुलीशी त्याचें लग्न झालें. त्यांना एकच एक मुलगा होता. त्याचें नांव अबू अल कासिम.

कासिम वयानें फार लहान असतांच त्याचे आईवडील वारले. त्याला वडिलांनीं जमा करून ठेवलेली सर्व संपत्ती मिळाली. परंतु अज्ञानामुळें तो सर्व धन घालवून बसला आणि दोन वर्षांच्या आंत त्याला दारिद्यांत आयुष्य कंठावें लागलें. परंतु बसऱ्याला तें लज्जास्पद आयुष्य घालवणें त्याला कठीण वाटूं लागलें. म्हणून त्यानें बसरा शहर सोडलें फिरत फिरत तो पुन्हां आपल्या पूर्वजांचें गांव कायरो येथें येऊन पोंचला. ज्या गांवीं त्याच्या वाडवडिलांनीं श्रीमंतींत दिवस काढले होते त्याच गांवीं कष्टांत दिवस काढणें त्याच्या जिवावर आलें. पण करणार काय? दुसरा उपायच नव्हता.



एके दिवशीं आपल्या गरीबीबद्दल स्वतःलाच दोषी ठरवून आत्महत्येच्या विचारानें तो नील नदीच्या काठीं गेला. तेथें नदी काठीं बांधलेल्या सुलतानाच्या महालांत एका खिडकींतून त्याला एक चंद्रमुखी तरुणी दिसली. दोघांची दृष्टादृष्ट अगदीं अचानक झाली. लाजेनें म्हणा किंवा कोणी पाहील म्हणून म्हणा, ती तरुणी लगेच पडद्या-आड झाली.

कासिमनें तिला पाहिल्यावर आत्म-हत्येचा विचार सोडून दिला. पुन्हां ती येईल या आशेनें तो बराच वेळ नदीकाठीं वाट पहात उभा राहिला. परंतु ती तरुणी पुन्हां बाहेर आली नाहीं. शेवटीं हताश होऊन तो परतला आणि एका धर्मशाळेंत राहूं लागला.

दुसऱ्या दिवशीं तो पुन्हां खिडकीकडे टक लावून पहात नदी काठीं उभा राहिला. बराच वेळ उभा राहिला तरी त्याला तें चंद्रवदन दिसलें नाहीं. परंतु पडद्याआड उभी राहून कोणी तरी तरुणी पहात असावी असा भास मात्र अवश्य झाला.

कासिम तिसऱ्या दिवशीं पुन्हां त्याच वेळीं व त्याच जागीं आऊन उभा राहिला.



Fullscreen 127 36 / 80



त्या दिवशीं मात्र त्या तरुणीनें परदा बाजूला सारून त्याला डोळे भरून पाहिलें व कासिमनें देखील तिला पाहिलें.

कासिमला राहवलें नाहीं. तो म्हणाला—"हे सुंदरी, मी आत्महत्येचा विचार करून या नील नदीकांठीं आलों. पण अल्लानें तुझें चंद्रमुख दाखवून मला जीवदान दिलें. तुझ्या दर्शनानें पुन्हां माझें भाग्य पालटणार असें मला वाटूं लागलें आहे."

परंतु तें ऐकून ती तरुणी घाबरल्या सारखी दिसली. कासिमनें देखील तेथून पाय काढण्याचा विचार केला. तिनें खिडकी बाहेर वांकून हळूच मध्यरात्रीच्या वेळीं येण्यास सांगितलें.

कासिम त्या दिवशीं त्याच्याजवळ होते त्या कपड्यांतील उत्तम कपडे काढून ते घालून मध्यरात्रीच्या वेळीं राजमहालाच्या खिडकी खालीं जाऊन उभा राहिला. समोर दोरीची शिडी लोंबकळत असलेली पाहून त्याला आश्चर्याचा धक्काच बसला. त्यानें मागचा पुढचा कांहीं एक विचार केला नाहीं आणि शिडी चढून वर खिडकींतून महालांत शिरला. खोलींत काळोख होता. त्या खोली जवळच्या खोलींत एक दिवा मिणमिण जळत होता. त्याच खोलींत त्याची ती प्रेमिका वाट पहात उभी होती.

दोघं परस्परांना भेटली. दोघांना वाटलें कीं दोघांची ओळख फार जुनी असावी. कासिमनें आपला जीवन वृत्तांत सांगित-ल्यावर ती म्हणाली—"माझें नांव हबीबा. सुलतानानें माझ्याशीं माझ्या इच्छेविरुद्ध लग्न केलें आहे. मला हें आयुष्य नकोसें वाटूं लागलें आहे.

दोघांचें असें बोलणें चालू असतां एका-एकीं दरवाज्यावर थाप ऐकून हबीबा म्हणाली—"कोणीतरी आपल्याला पाहिलें

Fullscreen 127 38 / 80



असावें व आपल्याला धरण्याचा विचार केला असावा."

हबीबाच्या हालचालीवर सुलतानाची सतत नजर असे. त्यानें आपल्या शिपायांना तिच्या महालांत पाठवून कासिमला एका खिडकींतून व हबीबाला दुसऱ्या खिडकींतून नदींत ढकलून दिलें. नदींत पडतांना दोघांनीं परस्परांस पाहिलें.

कासिम पोहण्यांत पटाईत होता. त्यानें बुड्या मारून त्या तरुणीला शोधून काढण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. पण त्याला यश मिळालें नाहीं. आतां जगण्यांत तरी काय अर्थ आहे असा विचार त्याच्या मनांत एकदां आला. पण समजा हबीबा जिवंत असली तर ती आपल्या भेटीसाठीं काळजींत पडेल. तेव्हां तिला शोधून काढण्यासाठीं किंवा तिला निराश होऊं न देण्यासाठीं तरी जिवंत राहालें पाहिजें.

त्यानें कायरो शहर सोडलें आणि बगदादला आला. त्याच्याजवळ फक्त एक दीनार होता. त्यानें मिठाई, सुका मेवा व अत्तर विकत घेऊन फेरीवाल्याचा धंदा सुरू केला. त्याला थोडें गाणें म्हणतां येत होतें. देवानें त्याला गोड गळा पण दिला होता. म्हणून त्याला धंदांत फायदा मिळूं लागला.

एकदां तो फेरी करीत बाजारांतून जात असतां बगदादच्या सर्वांत मोठ्या व्यापाऱ्यानें त्याला बोलाविलें. तो फार म्हातारा होता. त्यानें कासिमकडून कांहीं सुगंधी द्रव्यें विकत घेतलीं व त्याला प्रेमानें जवळ बोलावून त्याचा जीवन वृत्तांत ऐकून घेतला. तो म्हणाला—"तूं आतां अब्दुल अजीजहून श्रीमंत मनुष्याचा मुलगा होणार आहेस. जगांतला सर्वांत मोठा श्रीमंत म्हणून तुझी कीर्ति जगांत पसरेल. मला मूल बाळ नाहीं. मी तुलाच आपला दत्तक मुलगा मानून तुला आपला वारस करून घेत आहे." असें सांगून म्हातारा कासिमचा हात धरून आपल्या घरीं निघाला. म्हणाला—"आपण उद्यां बसऱ्याला जाऊं! तेंच माझें खरें गांव."

बसऱ्याला दोघे सुखानें राहूं लागले. पुढें कांहीं दिवसांनीं म्हातारा आजारी पडला. त्या आजारांतून वांचणें अशक्य आहे हें ओळखून म्हाताऱ्यानें कासिमला जवळ बोलावून त्याला कामाचा व्याप किती आहे हें नीट समजावून सांगितलें आणि म्हणाला—"बाळ, गेलें एक वर्ष मला तुझ्यामुळें पुत्र प्रेमाचें सुख मिळालें. माझ्याकडे जें धन आहे तें चक्रवर्ती राजाकडे देखील मिळणें अशक्य आहे. या सर्वांचा तूंच मालक आहेस. ही संपत्ती दहावीस पिढ्यांची आहे. माझ्या पणजोबांनीं आजोबांना, माझ्या वडिलांना व वडिलांनीं मला आमची अलोट संपत्ती कोठें ठेवली आहे हें दाखविलें. मरणापूर्वी मी तुला ती दाखवणार आहें."

नंतर म्हाताऱ्यानें एका तळघराचा दरवाजा उघडला व कासिमला आंत घेऊन गेला. तूं किती खर्च केलास तरी ही संपत्ति तुलाच काय, तर तुझ्या नातवांना व पंतवंडांना पुरेल इतकी आहे."



त्यानंतर दोन दिवसांनीं म्हाताऱ्यानें डोळे मिटले. कासिमनें आपल्या या प्रेमळ बापाची अन्त्येष्टी क्रिया थाटामटानें केली.

फेरीवाला कासिम पुन्हां एक गर्भ श्रीमंत व्यापारी झाला. हा सर्व भाग्याचा फेर होता. कासिमचें नशीब उदयास आलेलें पाहून कित्येक लोकांना ईर्ष्या वाटूं लागली. अधिकारी वर्गाची कडक नजर त्याच्यावर राहूं लागली. परंतु कासिमचें औदार्य पाहून त्यांना माघार घ्यावी लागली. कासिमनें राज्याच्या सर्व अधिकाऱ्यांना वर्षासनें बांधून दिलीं. मग त्याच्याशीं वैर कोण करणार?

Fullscreen 127





40 / 80




तें सर्व ऐकल्यावर खलीफाच्या तोंडाला पाणी सुटलें. तो म्हणाला—" हें सर्व वर्णन ऐकल्यावर एकदां तुमची ती अलोट संपत्ती स्वतःच्या डोळ्यांनीं पाहण्याची इच्छा मला झाली आहे. समुद्रांतलें पाणी किती काढलें तरी समुद्र आहे तेवढाच राहतो असें हें तुमचें धन आहे. तुम्हीं मला तें दाखविलेंत तर त्याविषयीं एक चकार शब्द देखील मी कोणाजवळ बोलणार नाहीं, या गोष्टीचें मी आपणांस वचन देतों."

" खरें बोलावयाचें म्हणजे मी आपल्याला नकारच दिला असता. पण आपल्या पाहुण्याला असंतुष्ट करून परत पाठविणें मला पसंत नाहीं. म्हणून मी आपल्या डोळ्यांना पट्टी बांधून त्या जागीं आपणांस घेऊन जाईन. आपणांस एवढा कष्ट देत आहें. पण आपण क्षमा कराल, असें मी धरून चालतों."

खलीफानें मान्य केल्यावर कासिमनें त्याच्या डोळ्यांना पट्टी बांधली त्याला हात धरून खजिन्यांत घेऊन गेला. चिंचोळ्या गल्लीतून तळघरांत दूर चालून गेल्यावर खजिन्यांत पोंचतांच कासिमनें डोळ्यावरची पट्टी काढून टाकली. खलीफानें डोळे भरून कासिमचें वैभव पाहिलें. त्याचे डोळेच दिपून गेले. इतकें धन एका माणसाजवळ ! चक्रवर्ती व प्रत्यक्ष खलीफा मला देखील जें लाभलें नाहीं तें कासिमच्या या भांडारांत आहे. भिंती सूर्यकान्त मण्याच्या होत्या. जमीन पांचूची होती. झालरी मोत्यांच्या होत्या. हिऱ्याच्या एका विशाल कुंडांत सोन्याच्या मोहरा भरल्या होत्या. दुसऱ्या एका सोन्याच्या कुंडांत नवरत्नांच्या राशी पडल्या होत्या. तें सर्व दृश्य खरोखरच अपूर्व असेंच होतें.

कासिम खलिफाला म्हणाला—माझ्या पूर्वजांनीं हें धन खर्च करून टाकण्याचा किती प्रयत्न करून पाहिला. पण तें कमी होण्या ऐवजीं वाढतच गेलें. कारण मला दत्तक घेणाऱ्या माझ्या बापाचा व त्यांच्या वाड वडिलांचा व्यापार तसाच दांडगा होता."

त्यानंतर कासिम खलीफाला आणखी एका दालनांत बोलावून घेऊन गेला. तेथें हिऱ्या मोत्यांच्या राशी पडल्या होत्या. उडणारा मोर असलेलीं अनेक झाडें ठेवलेलीं होतीं. त्यांतलेंच एक झाड त्यानें खलीफाला उपहार म्हणून दिलें होतें.

कासिमनें अशा प्रकारचीं अनेक दालनें खलिफाला दाखविलीं. पुन्हां डोळ्यांना पट्टी बांधून तो खलिफाला तळघरांतून बाहेर घेऊन आला.

बाहेर आल्यावर खलीफानें कासिमला विचारलें—" मला वाटतें. तुमच्याकडे देश-देशाच्या दासी असणार ! "

" दासी आहेत, पण माझ्या जीवनाशीं त्यांचा संबंध नाहीं. नील नदींत माझी प्रेमिका बुडाली. तिचें सौंदर्य कोणाला लाभणार ! तिच्या दर्शनासाठीं मी जिवंत आहे. देवाची कृपा असेल तर दर्शन घडेल." बोलत असतां त्याचे डोळे डबडबून आले.









Fullscreen 127 42 / 80

खलीफानें तें ओळखून त्याला सांत्वना देत म्हटलें—"अशीं दुःखें, जें सुख प्राप्त आहे त्यानें झांकून टाकावयाची असतात."

खलीफानें कासिमचा निरोप घेतला आणि बगदादला परत आला. परत आल्यावर त्यानें खास दरबार बोलाविला आणि जाफरला कैदेतून सोडवून आणून त्याचा दरबारांत सत्कार केला. त्यानें जें कांहीं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें तें जाफरला सांगून खलीफा म्हणाला—"मी त्या तरुणाच्या उपकारांची फेड कशी करूं शकेन हें माझें मलाच माहीत नाहीं."

"त्याला बसऱ्याचा राजा कां नाहीं करून टाकीत?" जाफरनें विचारलें.

"तूं स्वतः जाऊन त्याला सन्मानपूर्वक येथें बोलावून ये घेऊन मी त्याचा सत्कार स्वतः करणार आहें." खलीफा म्हणाला. जाफर खलीफाच्या आज्ञेप्रमाणें कासिमला आदरपूर्वक बोलावून घेऊन आला. खलीफा स्वतः स्वागत करण्यास हजर होते. त्यांनीं त्याला स्वतःच्या मुलाप्रमाणें मानून त्याच्या आदरातिथ्याची व्यवस्था केली. खलीफानें इतक्या आदरानें त्या पूर्वीं कधीं कोणाचें स्वागत केल्याचें कोणी ऐकलें नव्हतें.

कासिमच्या स्वागतासाठीं एक खास नृत्य ठेवण्यांत आलें होतें. त्या नर्तिकेला पाहतांच कासिम ओरडला—"हबीबा!" आणि मूर्छित होऊन पडला.

हबीबाला नील नदींत एका कोळ्यानें वांचविलें व तिला गुलाम म्हणून एका सरदाराच्या हातीं विकलें. त्यानें तिला खलीफाकडे नजराण्याबरोबर पाठवून दिलें.

अशा तऱ्हेनें अगदीं अनपेक्षित रीतीनें कासिम व हबीबा यांची भेट झाली. कासिमनें तिच्याशीं लग्न केलें. दोघांचें पुढील आयुष्य सुखासमाधानाचें गेलें.





# फळांची करंडी

आजीनें एकदां पाटलाकडे जाऊन विनंती केली कीं या नातवासमोर मी हात टेकलें. जें काम द्यावें तें बिघडवून ठेवतो. कोणी कामाला ठेवायला तयार नाहीं. अगदीं निरुपयोगी मुलगा आहे.

पाटील म्हणाले—"जाऊं दे म्हातारे! ज्याचें त्याचें नशीब ज्याच्या त्याच्या बरोबर. त्याला माझ्याकडे दे पाहून चार दिवस. मी त्याला सर्व काम छान शिकवून तुझ्याकडे परत पाठवतों, बघ!"

म्हातारीनें भीमूला पाटलांच्या घरीं धाडलें. जातांना बजावून सांगितलें, पाटील सांगतील तसें कर. पण भीमूच्या नशिबांत कोणाच्या तोंडून गोड शब्द ऐकून घेण्याचें लिहिलेलेंच नव्हतें. त्यानें मन लावून काम केलें तरी त्याचें कांहींतरी चुके व त्याला पाटलांच्या शिव्या खाव्या लागत. त्याला देवानें अक्कलच कमी दिली होती, त्याला आतां तो काय करणार?

एकदां पाटलांनीं भीमूला नदी पलीकडच्या एका कुळाकडे जाऊन यायला सांगितलें. म्हणाले—"जा आणि ही चिठ्ठी त्याला दे!"

भीमू चिठ्ठी घेवून धोंडिबाकडे निघाला. धोंडिबानें चिठ्ठी वाचून उत्तर लिहून दिलें आणि एका करंडींत शिताफळें घालून दिलीं. म्हणाला—"यांत पंचवीस शिताफळें आहेत. हीं उद्यां सकाळच्या आंत पिकतील. पिकल्याबरोबर खाऊन टाकली पाहिजेत नाहींतर फुकट जातील." भीमूनें मुंडी हलवून सर्व समजल्यासारखें दाखविलें व निघाला.

नदीकाठीं येऊन पाहतो तों नदीला पूर. काठावर बसून राहिला. उजाडेपर्यंत पाणी ओसरलें नाहीं. सकाळीं नदी पार

Fullscreen 127 44 / 80

करून आला. तेवढ्यांत त्याला घोंडिबानें सांगितलेली गोष्ट आठवली. त्यानें करंडी उघडून पाहिली. सर्व शिताफळें छान पिकली होतीं. घोंडिबानें पिकल्याबरोबर खाऊन टाकायला सांगितली होतीं. म्हणून त्यानें सर्व शिताफळें नदीकांठीं बसून फस्त केलीं.

घरीं पोंचल्यावर पाटलांनीं विचारलें– "कायरे! घोंडिबा भेटला का? काय म्हणाला?"

"भेटला पाटील! ही पहा चिठ्ठी दिली आहे त्यानें. आणि ही करंडी पण आपल्याला द्यायला सांगितलें आहे." भीमू म्हणाला.

"अरे पण ही करंडी तर रिकामी दिसते?" पाटलांनीं आश्चर्यानें विचारलें.

"करंडी भरलेलीच होती. त्यांत पंचवीस शिताफळें होतीं. सकाळीं पिकल्याबरोबर खाऊन टाकायला घोंडिबानें सांगितलें होतें!" भीमू म्हणाला.

पाटलांना भीमूचा इतका राग आला कीं त्यांनीं रागाच्या भरांत त्याला बेदम चोप दिला आणि "चालता हो घरीं!" असें सांगून हाकलून लावलें.

भीमूला आपली चूक कळली नाहीं. पण त्याच्या आजीला भीमू येत असलेला पाहूनच त्यानें कांहींतरी पराक्रम करून दाखविला असेल असें वाटलें. म्हणाली– "तुला कधीं अक्कल येणार देव जाणें!"

"आजी, मला कधींच अक्कल येणार नाहीं का?" भीमूनें विचारलें.

"येईल, पण या जन्मीं नाहीं. पुढल्या जन्मी येईल." म्हातारी म्हणाली.

"पुढला जन्म केव्हां येईल आजी?" भीमूनें विचारलें.

"मेल्यावर, मेल्या!" आजी म्हणाली.





# मांजरगांवची राजकन्या

एका रानांत एक लाकुडफोड्या रहात असे. रानांतच एका जागीं एक झोपडी बांधून त्यांत तो रहात असे. त्याच्या कुटुंबांत तो, त्याची बायको, एक मुलगा व एक मुलगी अशीं चार माणसें होतीं. त्यांच्याकडे एक गाय व एक मांजरपण होतें. लाकुडफोड्या व त्याची बायको दोघांचें यदाकदा कांहीं तरी कारणावरून भांडण होई.

एके दिवशीं दोघांचें भांडण झालें. बायको पळी घेऊन नवऱ्यावर धांवली. बिचारी मुलें घाबरून एका बाजूला उभी होतीं. "एक क्षणभर देखील मी या घरांत रहायला तयार नाहीं." असें सांगून तिनें पळी भिरकावून फेंकून दिली आणि काळोखांत कोठें तरी निघून गेली. लाकुडफोड्या तिच्या पाठोपाठ धांवत निघाला.

मध्य रात्र लोटली तरी आईवडील आलीं नाहींत. मुलें डुलक्या घेत बसून होतीं. सकाळीं भाऊ म्हणाला–"आतां काय परत येतात? या पुढें मी या घरांत नाहीं राहणार. घरांतलीं भांडीं-कुंडीं आपण दोघं वांटून घेऊं. आतां नाहीं मी कोणाची वाट पहात बसत."

"अरे, आहे काय आपल्या घरांत? नाहीं म्हणायला एक गाय व मांजर मात्र आहे." बहीण म्हणाली.

"ठीक, गाय मी घेतों. तूं मांजर घे." भाऊ म्हणाला.

बहीण म्हणणार होती कीं, मी मांजर घेऊन काय करूं. पण मांटी लडिवाळपणानें तिच्या पायाजवळ येऊन अंग घासूं लागली. तिनें प्रेमानें मांजराला उचलून घेतलें व म्हणाली–"आतां तुला वाटेल तें कर मी काय बोलूं?"

Fullscreen 127 46 / 80




भावानें गाईला सोडलें आणि घरा बाहेर पडला. बहीण भावाकडे पहात जागाच्या जागीं उभी राहली. काय करावें तिला सुचेना. पण तेवढ्यांत तिला झोंपडींत कोणीतरी बोलल्याचा आवाज ऐकूं आला—"चल, आपण देखील जाऊं या !"

बहिणीनें मागें वळून पाहिलें तेव्हां तिला मांजराच्या जागीं एक तिच्याच वयाची दुसरी एक मुलगी दिसली. "कोण तूं ? इकडे कशी आलीस ?" "वेडे, मी तुझी माटी ! मला तूं ओळखलें नाहींस वाटतें ? असें म्हणत त्या मुलीनें आपली आत्मकथा आरंभ केली. म्हणाली—"मी एका मांत्रिकाची मुलगी होतें. माझे वडील रानांत रहात असत. ते मंत्रशक्तीनें आपल्या सर्व गरजा भागवून घेत. परंतु त्यांना फार लवकर मरण आलें. माझें त्या वेळीं फक्त पांच वर्षांचें होतें. त्यांनीं मला त्यापूर्वीच कामरूप विद्या शिकविली. म्हणजे मला इष्टरूप मिळविण्याची शक्ति प्राप्त झाली. त्यामुळें मी वाटेल तिकडे हिंडूं फिरूं लागलें व कोठें काय घडत आहे हें मला कळूं लागलें. मी आपल्या वडिलांबरोबर जास्त राहात नसे. वडील वारल्यावर मला वाटेल तिकडे व वाटेल तेव्हां हिंडण्या फिरण्याची मुभा मिळाली. मी लाकुडफोड्याकडे, म्हणजे तुझ्या घरीं माटी होऊन रहात असलें तरी मी बाहेर आपल्या स्वतःच्या रूपांत जाऊन फिरून येत असें."

तें सर्व ऐकून लाकुडफोड्याच्या मुलीला आश्चर्यच वाटलें. म्हणाली—"बरें झालें बाई मी गाईसाठीं हट्ट नाहीं धरला. आतां मला कोणाची भीति नाहीं. तुझ्या पाठोंपाठ नेशील तिकडे मी यायला तयार आहें."

"अग या झोपडींत काय आहे ! माझ्या सांगण्याप्रमाणें तूं वागलीस तर तुला मी राजाची राणी करून देईन. नंतर तूं व मी सुखानें राहूं." मांत्रिकाची मुलगी म्हणाली. तिनें पुन्हां माटीचें रूप घेतलें व रानांत चालूं लागली. तिच्या पाठोंपाठ लाकुडफोड्याची मुलगी जाऊं लागली.

दोघी बराच वेळ चालल्यावर रानाच्या दुसऱ्या टोंकाला पोंचल्या. त्यांना दूर एक किल्ला दिसला. तेव्हां मांत्रिकाची मुलगी लाकुडफोड्याच्या मुलीला म्हणाली—"हें बघ, तूं केस पिंजारून या शेजारच्या झाडाच्या पोकळींत लपून बस. मी किल्ल्यांत जातें व राजाला सांगतें कीं तूं एक राजकन्या आहेस. तूं व तुझे नोकरचाकर सर्वांना लुटून चोर पळून गेले. तूं निसटून पळून आली आहेस व येथें लपून बसली आहेस. राजाचे शिपाई येतील व तुला बोलावून घेऊन जातील. तूं देखील राजकन्येसारखीच वाग व बोल. कोणी विचारलें कीं, तूं कोणत्या गांवाची राजकन्या तर सांग कीं मांजर गांवची राजकन्या !"

"राजकन्या कशा बोलतात व कशा वागतात हें मला नाहीं बाई माहीत. तेथें अंतःपुरांतील बायकांना सगळें कळलें तर त्या



Fullscreen 127 48 / 80



मला बडवूनच काढतील." लाकुडफोड्याची मुलगी म्हणाली.

"मी तुझ्याबरोबरच तर आहें. मातीच्या, दासीच्या किंवा आणखी कांहीं रूपानें राहीनच कीं नाहीं. तुझ्या हातून कांहीं चूक झालीच तर मी संभाळून घेऊन तुला त्यांत कांहीं चूक झालीच तर सांग, आमच्या मांजरगांवच्या राजघराण्यांत असेंच करतात." मांत्रिकाच्या मुलीनें सल्ला दिला.

नंतर ती हत्तीचें रूप घेऊन रानांत हिंडूं लागली. तिनें झाडें उपटून टाकलीं असा धुमाकूळ माजविला कीं आकाशांत धुळीचे लोट उठूं लागले. तिनें लाकुडफोड्याच्या मुलीच्या अंगावरचे कपडे फाडून टाकले. तिचें सर्व अंग धुळीनें माखून निघालें. त्यानंतर मांत्रिकाची मुलगी घारीचें रूप घेऊन किल्ल्यांत उडून गेली.

राजाचे शिपाई मांत्रिकाच्या मुलीला राजाकडे घेऊन गेले आणि म्हणाले—"ही बाई म्हणते आहे कीं ही कोणत्यातरी राजकन्येची दासी आहे. ती म्हणते कीं राजकन्येला व तिच्या नोकरांचाकरांना चोरांनीं लुटलें. राजकन्या किल्ल्याबाहेर एका झाडाच्या पोकळींत लपून बसली आहे.

राजानें सैनिकांना बोलावून आज्ञा केली कीं युवराजांबरोबर तुम्ही जा. राजकन्येला शोभतील अशीं वस्त्रें घेऊन जा. ही दासी सुद्धां बरोबर राहील.

युवराज राजाच्या आज्ञेप्रमाणें राजकन्येसाठीं वस्त्रें घेऊन मांत्रिकाच्या मुलीबरोबर किल्ल्याबाहेर गेला. मांत्रिकाच्या मुलीनें झाडाझुडपांची झालेली नासाडी दाखवून युवराजाला पटवून दिलें कीं राजकन्या केवळ्या मोठ्या संकटांतून वाचून आली आहे.

युवराजानें तिच्या हातीं राजकन्येसाठीं वस्त्रें पाठवून दिलीं. मांत्रिकाची मुलगी तीं वस्त्रें आपल्या मैत्रिणीला नेसवून बाहेर घेऊन आली. तिचें रूपलावण्य पाहून युवराज प्रथम दर्शनींच तिच्यावर भाळून गेला. तशी ती सुंदरच होती. रूपाला साजतील अशीं वस्त्रें नेसल्यावर तिचें रूप जास्तच खुलून दिसूं लागलें. युवराज विचार करूं लागला, बाबांनीं मान्य केलें तर आपण हिच्याशींच लग्न करणार. त्यानें तिला एका पालखींत बसायला सांगितलें. पालखी सरळ अंतःपुरांत गेली. तिचें रूप लावण्य पाहून ती राजकन्या नसेल असा संशय कोणालाच आला नाहीं. स्वतः राणीनें येऊन त्या संकटांतून सुटका झाल्याबद्दल देवाचे आभार मानले. नंतर राणीनें तिला विचारलें—"बाळ! तूं कोणत्या गांवची? कोठें जात होतीस? एकदम चोरांची टोळी कशी आली सर्व सांग." राणीचे ते प्रश्न ऐकून लाकुडफोड्याची मुलगी थरथर कांपूं लागली. ती मोठ्यानें ओरडून मटकन खालीं बसली. तेव्हां मांत्रिकाची मुलगी पुढें येऊन म्हणाली—"राणी सरकार! झालें त्याची आठवण देखील आमच्या मालकिणीला सहन होत नाहीं. तेव्हां तसें कांहीं विचारूं नका! आम्ही मांजरगांवचे. माझी मालकीण त्या



गांवची राजकन्या आहे. बापाची एकुलती एक मुलगी! म्हणून गादीवर त्यांचाच हक्क आहे. त्यांचे आईवडील वारले. त्यांच्या नात्यांतलें असें कोणीच या जगांत राहिलें नाहीं. तुम्हीच आतां नातेवाईक."

राणीनें लाकुडफोड्याच्या मुलीच्या अंगावर दागिने घातले. तिच्यासाठीं व तिच्या दासीसाठीं म्हणजे मांत्रिकाच्यामुलीसाठीं एका स्वतंत्र महालांत राहण्याची व्यवस्था करण्यांत आली. राजकन्या महालाबाहेर कधीं देखील आली नाहीं. युवराज कांहींना कांहीं तरी कारण काढून राजकन्येच्या

Fullscreen 127 50 / 80



भेटीला येत असे. लाकुडफोड्याची मुलगी आपल्या मैत्रिणीच्या सांगण्याप्रमाणें वागे. एखाद्या गोष्टीबद्दल राणीला आश्चर्य वाटलें तर ती म्हणें कीं, आमच्या मांजरगांवला असेंच करतात.

ती राजकन्याच आहे कीं आणखी कोणी हें पाहण्यासाठीं राजा व राणीनें युक्ति करावयाचें ठरविलें. कारण युवराजाचें मन तिच्यावर बसल्याचें त्यांना आढळून आलें होतें. लग्न होण्यापूर्वी मनाची खात्री करून घेणें बरें. नंतर पश्चाताप करण्यांत काय अर्थ आहे?

मांत्रिकाची मुलगी कधीं माशीचें रूप घेऊन तर कधीं डांस तर कधीं ढेंकूण होऊन त्यांच्या आजूबाजूस राही व त्यांचे बेत पहिल्यानेंच ओळखून आपल्या मैत्रिणीला छान पढवून ठेवी. म्हणून लाकुड फोड्याची मुलगी सर्व तऱ्हेच्या परीक्षेंतून पार झाली. तिला तिच्या मैत्रिणीनें ज्या आसनावर बसविलें होतें त्या योग्य ती आहे हें तिनें सर्वांना पटवून दिलें. राजघराण्याला न साजेसें पक्वान्न ती खात नसे, राजघराण्याला न साजणारीं वस्त्रें ती नेसत नसे. एकदां राणीनें गादीच्या खालीं एक काडी टाकली व तिला दुसऱ्या दिवशीं विचारलें—"कशी काय झोप लागली होती?"

लाकुडफोड्याची मुलगी म्हणाली—"रात्र-भर डोळा लागला असेल तर शपथ! या कुशीवरून त्या कुशीवर सारखी लोळत होतें. चाकू किंवा सुरी बोचल्यासारखें वाटत होतें."

राजा व राणी दोघांचें समाधान झालें. कसली देखील शंका उरली नाहीं. युवराजाचें तिच्याशीं लग्न होणार हें निश्चित झालें. राजानें मुहूर्त ठरविला. रीतीप्रमाणें लग्न वधूच्या घरीं व्हायला पाहिजे. युवराज नवरदेवाची तयारी करून वधूच्या गांवीं जायला तयार झाला.

इतक्या लवकर येथवर मजल येईल या गोष्टीची कल्पना लाकुडफोड्याच्या मुलीला नव्हती. मांत्रिकाच्या मुलीला देखील नव्हती. लाकुड फोड्याची मुलगी आपल्या मैत्रिणीवर रागावली. म्हणाली—"तूंच मला नाहीं नाहीं तें पढवून आतां मला कोठें विहिरींत कीं तलावांत ढकलणार आहेस." असें सांगून ती रडूं लागली.

"अग मी आहें ना! तूं कशाला भितेस? सर्व व्यवस्था करतें बघ. तूं कांहीं काळजी करूं नकोस. लग्नाला अजून एक आठवडा आहे. या अवधींत मी तुझ्या करितां एक राज्य व एक किल्ला तयार करून येतें, बघ." असें सांगून मांत्रिकाची मुलगी घारीचें रूप घेऊन रात्रीं किल्ल्या बाहेर उडून गेली. तेथून दहा कोस अंतरावर एका डोंगराळ प्रदेशांत एका जुन्या पडक्या किल्ल्यांत गेली. त्या किल्ल्यांत एक राक्षसीण रहात असे. ती सूर्यप्रकाशांत कधीं बाहेर येत नसे. सूर्य-प्रकाशाची तिला नेहमीं भीति वाटे. परंतु काळोखांत तिच्या अंगांत सहस्र हत्तींचें



बळ येई. हत्तीला उचलून आकाशांत चेंडू सारखी ती फेंकून येई. ती काळोख पडल्यावर किल्ल्याच्या बाहेर येई. रानटीं जनावरें व श्वापदें जीं भेटत तीं खाऊन आपला उदरनिर्वाह चालवी. उजाडण्यापूर्वीं आपल्या किल्ल्यांत परत जेई. दिवसभर ती एका तळघरांत पडून असे.

मांत्रिकाची मुलगी वेष पालटून कित्ये-कदां त्या किल्ल्यांत गेली होती. तिला किल्ल्यांतला कानाकोपरा छान माहीत होता. तिनें त्या राक्षसिणीला पाहिलें होतें. तिच्या हालचालीविषयीं तिला चांगली माहिती होती.

 Fullscreen  127      52 / 80 


म्हणून ती मध्यरात्रीच्या वेळीं किल्ल्यांत गेली आणि किल्ल्याचें फाटक आंतून बंद करून घट्ट कडी लावून घेतली.

उजाडण्यापूर्वीं नित्य नियमाप्रमाणें राक्षसीण परत आली. पण दरवाजा बंद पाहून तिला आश्चर्य वाटलें व रागपण आला. तिनें धक्के मारले, खूप ओरडली कीं आंत कोण आहे? कोणी दरवाजा बंद केला. आंतून मांत्रिकाची मुलगी घोगऱ्या आवाजांत म्हणाली—"मला नाहीं ओळखलेंस वाटतें? मी आहें रुद्रा!" उत्तर ऐकून राक्षसिणीला जास्तच राग आला. "कोण? रुद्रा! तुझी इतकी हिम्मत? तूं माझ्या घरांत शिरून मलाच बाहेर ठेवतेस काय? थांब तुझी खोड मोडतें. दरवाजा उघड पहिल्यानें!"

"तूं प्रथम माझें म्हणणें ऐक. कबूल केलेंस तर उघडीन दरवाजा!" मांत्रिकाची मुलगी म्हणाली—

"मी पूर्वीं हरभरा होतें. पुढें मला पाण्यांत ठेवण्यांत आलें. मी फुगलें. मग मला पाण्यांतून बाहेर काढण्यांत आलें. एक फडकें घेऊन मग...." मांत्रिकाच्या मुलीनें आपलें चऱ्हाट सुरू केलें.

राक्षसिणीला इतका धीर नव्हता. कारण सूर्योदय होण्यापूर्वीं तिला किल्ल्यांत जावयाचें होतें. दरवाज्यावर जोर जोरानें लाथ मारायला सुरवात केली. पण तो राक्षसी दरवाजा उघडला नाहीं.

मांत्रिकाची मुलगी आंतून घोगऱ्या आवाजांत म्हणाली—"तूं माझी गोष्ट ऐकली नाहींस तर मी दार मुळींच उघडणार नाहीं सांगून ठेवतो." तिनें गोष्ट सांगायला सुरवात केली—"मी प्रथम हरभरा होतें. पुढें मला पाण्यांत ठेवण्यांत आलें. मी फुगलें. मग मला पाण्यांतून बाहेर काढण्यांत आलें. एक फडकें घेऊन मला त्यांत ठेवण्यांत आलें. त्याच्यावर दडपण म्हणून एक दगड ठेवण्यांत आला. मग मला मोड येऊं लागले."

"बंदकर तुझें चऱ्हाट! दरवाजा उघडतेस कीं नाहीं?" राक्षसिणीनें धमकावणी देत विचारलें आणि दरवाजा पुन्हां धक्के मारून उघडण्याचा प्रयत्न केला. पण तिचा तो प्रयत्न फुकट गेला. म्हणून तिनें गोडी गुलाबीनें दरवाजा उघडवून घेण्यासाठीं म्हटलें—"ताई, दरवाजा उघड ना? तूं मागशील तें तुला देईन बघ, सोनें, चांदी, हिरे-माणकें जें हवें तें."





 Fullscreen  127      54 / 80 


मांत्रिकाची मुलगी पुन्हां शांतपणें म्हणाली–" तूं इतका वेळ भांडण करण्या-ऐवजीं गप्प बसली असतीस तर माझी गोष्ट संपली देखील असती. गोष्ट पुरी करीपर्यंत मी दरवाजा उघडणार नाहीं."

"बरें बाई! सांग गोष्ट!" अगदीं विनवण्या करीत राक्षसीण म्हणाली.

मांत्रिकाच्या मुलीनें पुन्हां गोष्ट सुरू केली. पण ती गोष्ट सूर्योदय होईपर्यंत संपणारी नव्हतीच.

सूर्योदय झाला, सूर्याची किरणें अंगाला लागतांच राक्षसिणीचें सर्व अंग विरघळून जाऊं लागलें–अगदीं बर्फ वितळतो तसें. दहा पांच मिनिटांनीं मांत्रिकाच्या मुलीनें दार उघडून पाहिलें तेव्हां समोर वितळ-णाऱ्या बर्फाच्या राशीशिवाय तिला कांहीं एक दिसलें नाहीं.

मांत्रिकाच्या मुलीचें अर्धें अधिक काम संपलें होतें. ती जवळपासच्या वस्तींत गेली व लोकांना म्हणाली–" किल्ल्यांतली राक्षसीण मेली. आतां सर्व खुशाल आंत जाऊन रहा! या गांवाचें नांव आजपासून मांजरगांव ठेवूं या! आपली महाराणी येईल दोन तीन दिवसांत तिच्या लग्नाला सर्वांनीं यावें. तिच्या लग्नाची तयारी करण्याची जबाबदारी तुमच्यावर!"

नंतर ती आपल्या मैत्रिणीला जाऊन भेटली आणि घडलेलें सर्व वृत्त सांगितलें. लाकुडफोड्याच्या मुलीच्या जिवांत जीव आला. ती म्हणाली–" आतां माझ्या लग्ना-बरोबर तुझें देखील लग्न लावून देतें."

मांत्रिकाच्या मुलीनें दाखविलेल्या मार्गानें वऱ्हाड आलें. लग्न समारंभ थाटामाटानें पार पडला. युवराजाच्या धाकट्या भावाशीं मांत्रिकाच्या मुलीचा विवाह झाला.





# सुभाषितांचें दुकान

एका गांवीं एक विचित्र दुकान होतें. त्या दुकानांत सुभाषितांची म्हणजे सल्ल्यांची विक्री होत असे. धर्मपाल नांवाचा एक विद्वान पोक्त माणूस त्या दुकानाचा मालक होता. त्यानें चिठ्ठ्या लिहून ठेवल्या होत्या. प्रत्येक चिठ्ठीवर एकेक सल्ला लिहिलेला होता. रोजच्या व्यवहारांत मनुष्याला कांहीं कांहीं, प्रसंगीं कोणाचा तरी सल्ला घ्यावा लागतो. अशा प्रसंगांची एक यादी तयार करून तो पोक्त माणस प्रत्येक प्रसंगाला अनुरूप अशा सल्ल्याची एकेक चिठ्ठी शंभर रुपयाला विकत असे.

एकदां त्या गांवच्या एका श्रीमंत वाण्यानें तीनशें रुपये देऊन तीन सल्ले विकत घेतले. ते सल्ले अनुक्रमें असे होते–

१. प्रवासाला निघतांना बायकोला कांहीं एक सांगू नये.

२. प्रवासांत जेवणाचा प्रसंग आला तर हमरस्त्यापासून थोडें दूर जाऊन जेवावें.

३. घाईंत पैज मारणें बरें नव्हे.

वाणी घरीं आला. त्यानें त्या सल्ल्यांच्या खऱ्या खोट्याची परीक्षा करून पहावयाचें ठरविलें. बायकोला सांगितल्याशिवाय त्यानें एकेक हजाराच्या नऊ थैल्या घेतल्या आणि गाडींत बसून प्रवासाला निघाला. कांहीं अंतर चालून गेल्यावर जेवणाची वेळ झाली. रस्त्यापासून दूर थोड्या अंतरावर त्याला एक विहीर दिसली. त्यानें विहिरीवर जाऊन फराळ केला आणि पुढें निघाला. थोडें अंतर चालून गेल्यावर त्याला आढळून आलें कीं, नऊ थैल्यांपैकीं फक्त आठच थैल्या गाडींत आहेत, म्हणून त्यानें परत विहिरीजवळ जाऊन पाहिलें तेव्हां त्याला एक थैली तेथें मिळाली.

Fullscreen 127 56 / 80



थैली घेऊन तो गाडीकडे वळला. पण तेवढ्यांत त्याच्या पायांत कांटा मोडला. सुदैवानें तो नेमका त्याच्या पायाच्या गोखराला लागला. पू गळून गेला आणि त्याला हल्कें वाटलें. दुसऱ्या दिवशीं तर गोखरू छान बरें झालें.

तो व्यापार करून परत फिरला. त्याला व्यापारांत पुष्कळ फायदा झाला. परत येत असतां त्याला त्या गोखराच्या कांट्याची आठवण झाली. त्यानें विहिरीजवळ जाऊन त्या गोखराच्या कांट्याच्या जागीं खूण म्हणून एक दगड ठेवला.

गांवांत परत आल्यावर त्याला कळलें कीं गांवांतल्या एका लक्षाधीश व्यापाऱ्याच्या पायांत कांटा मोडून गोखरू झालें आहे. जो कोणी तें बरें करून देईल त्याला दहा हजार रुपये इनाम देण्यांत येईल. तोंपर्यंत कोणी तें गोखरू बरें करूं शकला नव्हता.

तें ऐकून वाण्याला त्याच्या पायाचें गोखरू कसें बरें झालें तें आठवलें. त्यानें विचार केला कीं, तो कांटा आणून जर मी गोखरू फोडलें तर तें खात्रीनें बरें होईल व आपल्याला इनाम मिळेल. त्या आनंदांत तो त्या पोक्त माणसानें दिलेले सल्ले विसरला आणि बायकोला म्हणाला—"मी जाऊन तो कांटा घेऊन येतों. आपल्याला दहा हजार रुपये मिळतील." कांट्याच्या जागीं खुणेचा दगड त्यानें कसा ठेवला होता हें देखील सांगितलें.

बायकोच्या पोटांत तें गुपित कसें पचणार ? तिनें आपल्या शेजारणीला जाऊन तें सर्व सांगितलें. शेजारणीनें ती गोष्ट आपल्या नवऱ्याला सांगितली.

वाणी त्या लक्षाधिशाकडे हें सांगायला निघाला कीं, मी आपलें गोखरू बरें करून दाखवितों. त्याच वेळीं त्याचा शेजारी तीच गोष्ट सांगायला लक्षाधिशाकडे निघाला. दोघांची भेट वाटेंत झाली. वाण्यानें फुशारक्या मारायला सुरवात केली. म्हणाला—"तें गोखरू कसें बरें करावयाचें हें माझ्याशिवाय आणखी कोणाला देखील माहीत नाहीं !"

"शेजारी म्हणाला—"मला माहीत आहे !"

"तुझ्या हातून तें गोखरू बरें होणें शक्य नाहीं !" वाणी ठांसून म्हणाला.

"मी बरें करून दाखवितों कीं नाहीं तें पहा ! तुझी माझी पैज !" शेजारी म्हणाला.

वाणी तिसरें सुभाषित विसरला होता. घाईत तो म्हणाला—"कबूल ! तूं तें गोखरू बरें करून दाखविलेंस तर तूं माझ्या घरीं येऊन ज्या वस्तूला हात लावशील ती तुझी !"

शेजारी म्हणाला—"बघ हो !" आणि त्याच दिवशीं संध्याकाळीं त्या विहिरीजवळ गेला आणि दगडाखालीं ठेवलेला तो गोखराचा कांटा उचलून घेऊन आला. त्यानें त्या कांट्यानें लक्षाधिशाचें गोखरू फोडल्या-बरोबर पू बाहेर आला व फोड बरा झाला. वाणी दुसऱ्या दिवशीं कांटा आणायला











Fullscreen 127 58 / 80

निवणार त्याच्या आधींच गोखरू बरें झाल्याचें ऐकून तो घाबरला. जर शेजाऱ्यानें पैजेप्रमाणें तिजोरीवरच हात ठेवला तरकाय करायचें? आपण त्या पोक्त माणसाच्या सल्ल्याप्रमाणें वागलों नाहीं म्हणून हा प्रसंग ओढवला. कांटा आणायला जाणार आहे, ही गोष्ट बायकोला सांगायला नको होती. उगीच ऐटींत जाऊन घाईंत पैज मारायला पण नको होती!

तो धांवत त्या पोक्त माणसाकडे गेला आणि घडलेलें वृत्त सांगून म्हणाला—"आतां तुम्हीच कांहीं तोड काढलीत तर बचाव होणार, नाहीं तर बुडलोंच समजा!"

तो पोक्त माणूस त्याला म्हणाला—"अजून कांहीं बिघडलें नाहीं. मी सांगतों तसें कर। तुझा शेजारी घरीं येण्यापूर्वीं तूं आपली तिजोरी माळ्यावर नेऊन ठेव. शेजारी आला म्हणजे मला कळव."

गंमत पहायला गांवांतले लोक जमा झाले. शेजारी आपल्या चार चौघां मित्रांना बोलावून घेऊन आला. वाण्याचा निरोप कळल्याबरोबर तो पोक्त माणूस पण आला. शेजाऱ्यानें घरांत कोठें तिजोरी दिसली नाहीं तेव्हां माळ्यावर पाहिलें. तिथें तिजोरी पाहून वर चढण्यासाठीं वाण्याच्या घरचीच शिडी घेऊन आला आणि चढूं लागला. तेव्हां तो पोक्त माणूस त्या वाण्याला म्हणाला—"ही शिडी आजपासून तुमची नाहीं, तुमच्या शेजाऱ्याची आहे. त्यावर शेजाऱ्यानें ओरडा ओरडा करायला सुरवात केली. पण पैज ठरल्याप्रमाणें त्याला निमूटपणें शिडी घेऊन घरीं परत जावें लागलें.

वाण्यानें त्या सल्ल्याबद्दल पोक्त माणसाला शंभर रुपयांऐवजीं दोनशें रुपये दिले.





# बालकांड

पुष्कर क्षेत्रांत विश्वामित्रांनीं घोर तपश्चर्या केली. ती पाहून ब्रह्मदेव प्रसन्न झाला व त्यानें त्यांना ऋषी झाल्याची मान्यता दिली.

पण विश्वामित्रांचें तेवढ्यानें समाधान झालें नाहीं. त्यांनीं तपश्चर्या चालू ठेवली. त्यांचा तपोभंग करण्यासाठीं इंद्रानें मेनका नांवाच्या अप्सरेला पाठविलें. मेनकेचें अपूर्व रूपलावण्य पाहून विश्वामित्राचें मन विचलित झालें व त्यांनीं तपश्चर्या सोडून मेनकेला आपल्या आश्रमांत स्वतः बोलावून नेलें. तिच्या सहवासांत त्यांनीं दहा वर्षें घालविलीं.

कालक्रमानें मेनकेला शकुंतला नांवाची एक मुलगी झाली. तेव्हां विश्वामित्रांचे डोळे उघडले कीं, आपली तपश्चर्या भंग करण्यासाठीं देवांनींच हा उद्योग केलेला दिसतो आहे. मनुष्याला ज्ञान नेहमींच उशिरां येत असतें. विश्वामित्रांना पश्चात्ताप झाला. मेनका भीत होती कीं, विश्वामित्र रागानें कदाचित शाप देतील. पण ते म्हणाले—"दोष तुझा नसून माझा आहे. आतां तुझ्या सहवासांत मी राहूं शकणार नाहीं. तूं आलीस तशीच निघून जा."

नंतर ते स्वतःच उत्तरेकडे हिमालय पर्वतांत कौशिकी नदीच्या काठीं जाऊन तपश्चर्या करूं लागले. त्यांच्या तपश्चर्येच्या तापानें त्रिभुवन तप्त झालें. शेवटीं ब्रह्मदेवाबरोबर सर्व देव आले व त्यांनीं विश्वामित्राला ब्रह्मर्षींची पदवी दिली.

Fullscreen 127 60 / 80



विश्वामित्रानें विचारलें—"तर मग मी जितेंद्रिय झालों का ?"

ब्रह्मदेव म्हणाला—" जितेंद्रिय मात्र झाला नाहींस."

मग त्याचें समाधान कसें होणार ? म्हणून जितेंद्रिय होण्यासाठीं विश्वामित्रांनीं वायु भक्षण करून तपश्चर्या सुरूं केली त्याचें तें तप पाहून इंद्र वगैरे देवांना भय वाटूं लागलें. त्यांनीं या खेपेस रंभा नांवाच्या अप्सरला पाठविलें. इंद्र म्हणाला "मी को कळेचें रूप घेऊन कामदेवाबरोबर तुझ्या पाठोंपाठ येतो."

विश्वामित्रांना ध्यानमग्न असतां कोकिळेचा गोड आवाज ऐकूं आला. त्यांनीं डोळे उघडून पाहिलें तर समोर हंसत मुख रंभा उभी. पुन्हां देवांनींच हिला पाठविलें असणार असा विचार करून त्यांनीं तिला शाप दिला कीं "तूं पाषाण होऊन जा !" इंद्र व कामदेव पळून गेले.

विश्वामित्रांना पश्चात्ताप झाला कीं, आपली चूक झाली. आपण रंभेवर राग दाखवून आपलें दौर्बल्यच दर्शविलें कामक्रोधादि षड्रिपूंवर पूर्ण जय मिळविल्या शिवाय, राग द्वेष सोडून दिल्याशिवाय ब्राह्मणत्व मिळणार नाहीं.

तेथून विश्वामित्र पूर्वेकडे गेले. मौनव्रत धारण करून त्यांनीं पुन्हां तपश्चर्या सुरू केली. त्यांच्या तपश्चर्येचा ताप त्रिलोकाला असह्य झाला. पुन्हां देवांनीं ब्रह्मदेवाकडे येऊन हात जोडून प्रार्थना केली कीं या संकटांतून कांहींतरी उपाय करून आपणच सोडविलेंत तर सुटका मिळेल. तेव्हां ब्रह्मदेवानें विश्वामित्रांना दर्शन देऊन जितेन्द्रिय झाल्याची मान्यता दिली

पण विश्वामित्र म्हणाले—" जोंपर्यंत वशिष्ठ ऋषी मला ब्रह्मर्षि म्हणणार नाहींत तोंपर्यंत माझ्या मनाचें समाधान होणार नाहीं. देवांनीं वशिष्ठ मुनींकडे जाऊन विश्वामित्र ब्रह्मर्षि असल्याचें कबूल करण्यास विनंति केली. वशिष्ठ मुनींनीं त्याप्रमाणें मान्यता दिल्यावर वशिष्ठ व विश्वामित्र यांचें परस्परांशीं सख्य स्थापित झालें.

शतानंद यांनीं विश्वामित्र ऋषींची गोष्ट संपविली तेव्हां सूर्यास्ताची वेळ होती. जनक राजा विश्वामित्रांचा निरोप घेऊन आपल्या राजवाड्यात परतला दुसऱ्या दिवशीं, उजाडतांच राजानें विश्वामित्र मुनांना दोघां राजपुत्रांबरोबर आपल्या राजवाड्यांत येण्यास विनंति केली.

विश्वामित्र मुनि राम - लक्ष्मणांबरोबर आल्यावर राजानें त्यांना शंकराचें धनुष्य दाखविण्यापूर्वी त्या धनुष्याचें पूर्वचरित्र वर्णन करून सांगितलें. दक्ष-यज्ञाच्या वेळीं शंकरानें हेंच धनुष्य घेऊन देवांचा संहार करण्याचें ठरविलें होतें. पण देवांनींच शंकराला प्रसन्न करून त्याच्याकडून तें धनुष्य मागून घेतलें. ते हांपसून देवलोकांत बरेच दिवस तें धनुष्य पडून होतें. तें धनुष्य कोणी उचलूं शकला नाहीं कीं जागचें हलवूं शकला नाहीं. त्यानंतर तें त्यांनीं माझ्याकडे आणून टाकलें



पुढें जनक राजानें सीतेचा जन्म कसा झाला ती गोष्ट सांगितली. म्हणाले—" एकदां यज्ञासाठीं मी स्वत: जमीन नांगरीत असतां सीता जमिनींतून निघाली. मी त्या भूकन्येला प्रेमानें घरीं आणून स्वत:च्या मुलीसारखें तिचें लालन पालन केलें. ती मोठी झाल्यावर मी तिचें स्वयंवर करावयाचें ठरविलें. पण या अपूर्व कन्येचें स्वयंवर देखील अपूर्व व्हावें म्हणून मी ही अट घातली कीं शंकराचें धनुष्य जो कोणी उचलील त्याला सीता माळ घालील. तें ऐकून कित्येक राजकुमार आले. प्रत्येकानीं आपापल्या शक्तीची पराकाष्ठा


Fullscreen

127





62 / 80



करून पाहिली. पण एकाच्यानें तें जागचें हललें देखील नाहीं."

"म्हणून ज्या राजकुमारांना अपयश मिळालें त्यांनीं सर्वांनीं मिळून मिथिलेवर स्वारी केली. वर्षभर वेढा देऊन ते बसले होते. जनकराजानें देवांजवळ प्रार्थना केली कीं राजधानीचें रक्षण करण्याची जबाबदारी तुमच्यावरच आहे. देवांनीं सर्व राजकुमारांचा पराभव करून त्यांना पळवून लावलें."

येथवर गोष्ट सांगून जनक राजानें रामलक्ष्मणास धनुष्य पहाणार कां विचारलें व त्यांचा होकार मिळण्यापूर्वीच धनुष्य घेऊन यावयास आज्ञा केली. आज्ञेवरून राजाचे नोकर एका आठ चाकी गाडांत घालून तें धनुष्य यज्ञशाळेंत घेऊन आले.

"पाहूं तरी धनुष्य" असें म्हणत रामानें धनुष्याची पेटी उघडली व धनुष्य उचलून त्याला दोरी सुद्धां बांधली. नंतर एक बाण त्यावर ठेवून प्रत्यंचा ओढण्याचा प्रयत्न करतांच धनुष्य कडाड्कन् तुटून दोन तुकडे होऊन खालीं पडले. तिथें जे उभे होते त्यांनीं आश्चर्यानें तोंडांत बोटेंच घातलीं.

जनक राजा मात्र रामाच्या पराक्रमाचे कौतुक करीत त्याच्याकडे पहात उभा राहिला.



तो म्हणाला—"सीतेचा विवाह असामान्य पराक्रमी पुरुषाशीं व्हावा म्हणून मी ही अट घातली होती आणि आज सुदैवानें तसा पराक्रमी पुरुष लाभला." त्यानें त्या आनंदाच्या भरांत रामाला माळ घालण्यास सीतेस सांगितलें आणि अयोध्येला दशरथ राजाकडे विवाहास येण्यासाठीं निरोप पाठवला.

जनक राजाचे दूत तीन दिवस प्रवास करीत सकाळीं अयोध्येस पोंचले व त्यांनीं धनुर्भंगाचें वर्णन करून विवाहास येण्यास विनंती केली. ती बातमी ऐकून दशरथाला तर आनंद गगनांत मावेनासा झाला. तो वशिष्ठ, वामदेव, जाबाली इत्यादि ऋषी व मुनी यांचा आशीर्वाद घेऊन जनकपुरीस निघाला. चार दिवसांनीं तो मिथिलेस पोंचला.

तोंपर्यंत यज्ञ संपला होता व विवाहाची तयारी चालू होती. सीता वधूवस्त्र नेसून तयार उभी होती. राजा दशरथ आल्याचें ऐकून जनक आपला भाऊ कुशध्वज याच्यासह त्याला सामोरा गेला.

जनक राजाला सीतेशिवाय ऊर्मिळा नांवाची आणखी एक मुलगी होती. जनक



Fullscreen 127 64 / 80



राजाचा भाऊ कुशध्वज याला मांडवी व श्रुतिकीर्ति नांवाच्या दोन मुली होत्या. सीता व राम यांच्या विवाहाबरोबर या तिन्ही मुलींचे विवाह अनुक्रमें लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांच्याशीं झाल्यास बरें होईल अशी जनक राजानें दशरथ राजाजवळ विनंती केली. दोघांना ही कल्पना मान्य झाल्यावर लग्नाचा मुहूर्त ठरला.

विवाहापूर्वी जनक राजानें चार लक्ष गाईंचें दान केलें. त्याच दिवशीं भरताचा मामा युधाजित पण मिथिलेला येऊन पोंचला लग्न समारंभ फार थाटानें साजरा झाला.

विवाहसंस्कार आटोपल्यावर विश्वामित्र मुनि राजा जनक व दशरथ दोघांचा निरोप घेऊन हिमालय पर्वतावर गेले व दशरथ नव विवाहित दंपति समवेत अयोध्येला गेले. एक आठवडा सतत प्रवास केल्यावर एके दिवशीं अचानक काळोख पडला व आकाशांत धुळीचे लोट उडूं लागले. थोड्या वेळानें पाहतात तो क्रुद्ध परशुराम प्रलयकाळांतल्या वादळासारखे येत असलेले दिसले त्यांच्या खांद्यावर परशु होता व हातांत धनुष्य-बाण.

परशुरामानें येतांच रामाला विचारलें—"तूं धनुर्विद्येंत निष्णात आहेस असें ऐकतों व तूं शंकराचें धनुष्य पण तोडून टाकलें आहेस, म्हणें. हें विष्णूचें धनुष्य माझ्या जवळ आहे. याच्यावर बाण चढवून दाखविलेंस तरच मी तुला धनुर्विद्येंत तूं पारंगत झालास असें मानीन. तुला आपली शक्ती अजमावून पाहायची असेल तर मी द्वन्द्वयुद्धास तयार आहें."

परशुरामानें विष्णूच्या धनुष्याचें वर्णन केलें म्हणाला—"हें देखील विश्वकर्म्यानेंच घडवलेलें आहे दोघांच्या शक्तीची परीक्षा व्हावी म्हणून त्यानें दोन्ही धनुष्यें घडविलीं.


Fullscreen
127



66 / 80


शिव-विष्णूंचें धनुर्युद्ध झालें. त्यांत विष्णूच विजयी ठरणार हें पाहून देवांनीं मध्यस्थी करून युद्ध बंद करण्यास विनंती केली. विष्णु आपल्याहून अधिक बलवान निघालेला पाहून शंकरानें आपलें धनुष्य विदेह देशाचा राजा देवरात याला देऊन टाकलें. विष्णूनें आपलें धनुष्य भृगुवंशी ऋचीत यास दिलें. त्यानें आपला मुलगा जमदग्नि यास तें दिलें व त्याच्या मागून त्याचा पुत्र म्हणून तें मला मिळालें."

तें ऐकून दशरथ राजा घाबरून गेला. त्यानें परशुरामाचे पाय धरले आणि म्हणाला—"प्रभो ! आपण एकवीस वेळां ही पृथ्वी निःक्षत्रिय केलेली आहे. नंतर आपण इंद्रासमोर प्रतिज्ञा केली होती कीं, पुन्हा शस्त्र हातीं घेणार नाहीं. माझ्या मुलाच्या विरुद्ध शस्त्र हातीं घ‌ेलें तर माझा वंशच खुंटेल."

परशुरामानें त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें. रामाला राग आला. त्यानें परशुरामाच्या हातांतून तें धनुष्य घेतलें व त्यावर बाण चढवून विचारलें—"ह्या बाणानें तुमचा वध करणें मला शक्य आहे. पण ब्राह्मणावर शस्त्र उचलणें हा माझा धर्म नाहीं. तरी तुम्हांला निःशक्त केल्याशिवाय मात्र स्वस्थ राहणार नाहीं. तुम्हीं त्रिलोकांत ज्या ज्या प्रदेशांत तपश्चर्या केली आहे त्या सर्व प्रदेशांचा ध्वंस करण्याचें मी ठरविलें आहे." असें सांगून रामानें बाण सोडला. परशुरामाचा तेजोवध झाला. त्याचें अवतारकार्य संपलें होतें व विष्णूचा नवीन अवतार म्हणजे रामावतार प्रारंभ झाला होता.

राजा दशरथ अयोध्येला आला. राम आपल्या वडिलांना राज्यकार्यांत मदत करूं लागला. [ बालकांड संपूर्ण ]





# अमरावती

अमरावती हें आपलें अमरावती नगर नव्हें. हें आन्ध्र प्रांतांतील गुंटूर जिल्ह्यांतलें एक इतिहास प्रसिद्ध असें नगर आहे. गुंटूरपासून सुमारें ६२ मैलांवर कृष्णा नदीच्या कांठीं हें शहर होतें. शातवाहन युगांत येथें आन्ध्रची राजधानी होती. दक्षिणेकडील महायान बौद्ध संप्रदायाचें मुख्य केन्द्र धान्य कटक या नगरापासून अगदीं जवळच होतें. सातव्या शतकांत ह्युएनसँगनें जेव्हां भारताचा प्रवास केला तेव्हां तो अमरावतीला आला होता.

अमरावतीचे अवशेष २००० वर्षांपूर्वीचे आहेत. आन्ध्र देशाची त्या काळची शिल्पकला कशी होती याची थोडी फार कल्पना हे अवशेष पाहिल्यावर होऊं शकेल. ह्या अवशेषांचा शोध प्रथम १७९७ सालीं पाश्चात्यांनीं लावला. परंतु अमरावतीच्या शिल्पकलेच्या ऐतिहासिक महत्वाची खरीखुरी माहिती मिळण्यापूर्वीच अमरावतीचा स्तूप ढांसळून गेला. आज अमरावतीचे अवशेष कांहीं लंडनमध्यें, कांहीं मद्रासला, कलकत्याला व कांहीं अमरावतीला पहावयास मिळतात. २००० वर्षांपूर्वी आन्ध्र लोकांचा पेहराव, त्यांचीं आभूषणें वगैरे कशी होतीं यांची कल्पना हे अवशेष पहाल्यानें कळतें.

अमरावतीच्या अवशेषांत कांहीं शिलालेख पण मिळाले आहेत. त्यांपैकीं कांहीं मौर्य लिपींत, कांहीं ईक्ष्वाकु लिपींत व कांहीं शातवाहन लिपींत आहेत. यावरून हा स्तूप मौर्य काळापासून ईक्ष्वाकु वंशापर्यंत प्रसिद्ध होता असें अनुमान करावयास हरकत नाहीं. कर्नल कॉलिन मेकन्झीनें अनेक ऐतिहासिक प्रमाणांच्या आधारांवर या स्तूपाची एक रूपरेषा तयार केली आहे.



